# फार्सी-मराठी

## अनुबंध

### भाषिक, वाङ्मयीन व सांस्कृतिक

डॉ. यू. म. पठाण



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# डॉ. यू. म. पठाण

| | |
|---|---|
| **जन्म** | : ९ मार्च १९३० |
| **शिक्षण** | : एम्.ए., बी. टी., पीएच्. डी (मराठी), पीएच्. डी (हिन्दी), डी.लिट्. (तत्त्वज्ञान) |
| **अध्यापन** | : १९५३-१९५९ : दयानंद महाविद्यालय, सोलापूर<br>१९६०-१९९० : डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ (१९७३ पासून मराठी विभाग प्रमुख) |

**सन्मान व पुरस्कार** :

| | |
|---|---|
| १९७२ | : अतिथि प्राध्यापक : चेकोस्लोव्हाकिया |
| १९७६ | : आदर्श शिक्षक राज्य पुरस्कार |
| १९८२ | : फेलो, ब्रिटिश कौन्सिल, (लंडन विश्वविद्यालय) |
| १९८४ | : राष्ट्रीय प्राध्यापक म्हणून निवड (वि. अनु. मंडळ) |
| १९८८ | : सोळाव्या मराठवाडा साहित्य संमेलनाचे अध्यक्ष |
| १९८८ | : अ. भा. दलित साहित्य अकादमीची डॉ. आंबेडकर फेलोशिप. |
| १९९० | : अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष |
| १९९०-९२ | : सुप्रतिष्ठ प्राध्यापक (वि. अन.मंडळ ) |
| १९९२ | : राष्ट्रीय एकात्मता पुरस्कार (कौमी तंजीम) |
| १९९५ | : संतसाहित्यविषयक परिवर्तन पुरस्कार |
| १९९८ | : आचार्य अत्रे पुरस्कार |
| १९९९ | : मराठवाडा गौरव पुरस्कार |
| २००० | : पुरोहितस्वामी पुरस्कार |
| २००० | : म. रा. साहित्य -संस्कृती मंडळाची गौरववृत्ती |
| २००१ | : दिल्लीच्या बिर्ला फाउंडेशनची राष्ट्रीय फेलोशिप |
| २००१-०२ | : 'दलित मित्र' पुरस्कार |
| २००२ | : जगद्‌गुरु पुरस्कार (देहू) |
| २००२ | : पहिला सहकारमहर्षी साहित्यसेवा पुरस्कार |
| २००३ | : मणिभाई देसाई राष्ट्रसेवा पुरस्कार |
| २००४ | : डॉ. कपाळे साहित्य पुरस्कार (वीरशैव जगद्‌गुरु पुरस्कार) |

# फार्सी - मराठी अनुबंध :
# भाषिक वाङ्मयीन व सांस्कृतिक

डॉ. यू. म. पठाण



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

प्रथमावृत्ती : जुलै २००७

**प्रकाशक :**
**सचिव,**
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, तिसरा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर (पूर्व), मुंबई - ४०० ०१४.



**मुद्रक :**
व्यवस्थापक,
शासकीय फोटोझिंको मुद्रणालय,
५, फोटोझिंको पथ,
पुणे - ४११ ००१.

किंमत : रुपये ११५ /-

# निवेदन

फार्सी भाषेचा परिचय महाराष्ट्राला चौदाव्या शतकात झाला व त्यानंतरच्या ऐतिहासिक काळामध्ये ही भाषा महाराष्ट्रात तोलामोलाने वापरली जाऊ लागली. ऐतिहासिक कागदपत्रे, खलीते, दस्ताऐवज आदिंसाठी तिचा वापर होऊ लागला. मुसलमानी अंमलाच्या प्रभावामुळे या भाषेचा प्रभाव मराठी लोकसंस्कृतीवर पडला आणि फार्सी भाषा केवळ ग्रंथ व्यवहारापुरती आणि राज्यव्यवहारापुरती न राहता ती लोकभाषेमध्ये स्थिरावली. बहामनी राज्याचा काल, शिवकाल व पेशवे कालखंड यामध्ये फार्सी मराठीचा अनुबंध दृढ होत गेला. आपल्याला महाराष्ट्राचा इतिहासाचा धांदोळा घ्यावयाचा असेल, तर फार्सी भाषा कळावी लागेल. आपल्या पूर्वसूरीच्या इतिहासकारांनी फार्सीचा अभ्यास करून मराठीची मोठीच सेवा केली आहे. आधुनिक काळातील डॉ. यू. म. पठाण हे अशा व्यासंगी अभ्यासकांपैकी एक आहेत. त्यांनी अतिशय परिश्रम घेऊन "फार्सी मराठी अनुबंध" हा ग्रंथ लिहिला. तो आज महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाला प्रकाशित करण्याचे भाग्य लाभत आहे हा एक सुयोग होय. या ग्रंथाचे इतिहासकार, संशोधक, संदभार्थी अभ्यासक स्वागत करतील अशी आशा आहे.

(मधु मंगेश कर्णिक)
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

मुंबई

दिनांक : ८ ऑगस्ट, २००६.

# मनोगत

फार्सी - मराठीच्या अनुबंधाविषयीचे कुतूहल माझ्या मनात गेली चार साडेचार दशके आहे. हा वारसा मला माझे वडील रावसाहेब (खानसाहेब एम.के.पठाण) यांच्यापासून मिळाला. ते फार्सीचे व्यासंगी संशोधक डॉ.माधवराव पटवर्धन (कवी माधव ज्यूलियन्) यांचे विद्यार्थी.त्यांच्या प्रेरणेनेच मी १९५८ साली या अनुबंधाच्या एका सीमित क्षेत्राचे संशोधन केले.यातून 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप' हा माझा ग्रंथ सिद्ध झाला. त्याला पुणे विद्यापीठात १९५८ साली सादर झालेल्या सर्वोत्कृष्ट मराठी प्रबंधाचे डॉ. परांजपे, पारितोषिक मिळाले व पुढे राज्यपुरस्कारही मिळाला. या विषयाची व्याप्ती याहून किती तरी मोठी आहे ती भाषा,बोली यांच्याबरोबरच वाङ्मय,इतिहासलेखन, लोकसाहित्य इ. संस्कृतीच्या विविधांगांना स्पर्शच करीत नाही तर त्यांच्याशी आपले गहिरे व जवळीकीचे नाते प्रस्थापित करते,याची सतत जाणीव मला होत होती.

सुदैवाने नवी दिल्ली येथील के.के. बिर्ला फाउंडेशनने तुलनात्मक भारतीय भाषाध्ययनासाठी मला इ.स. २०००-२००१ ची राष्ट्रीय अभ्यासवृत्ती (नॅशनल फेलोशिप)दिली. त्यामुळे मी या विषयाचा सांगोपांग व मूलगामी स्वरूपाचा विचार करू शकलो. हा ग्रंथ हे या अभ्यासवृत्तीचेच फलित आहे. यासाठी मी के.के. बिर्ला फाउंडेशनचे मनःपूर्वक आभार मानतो.

फार्सी-मराठीतील भाषिक अनुबंधाची व्याप्ती फार मोठी व लक्षणीय असल्याने या ग्रंथात त्यावरच मुख्यत्वेकरून लक्ष केन्द्रित करण्यात आले. त्यामुळे तिने या ग्रंथाचा मोठा- जवळपास दोनतृतीयांशाहून अधिक-भाग व्यापला आहे.त्याला मी 'पूर्वार्ध' म्हटले असले तरी वाच्यार्थाने तो निम्मा भाग नाही.उत्तरार्धात या अनुबंधाच्या वाङ्मयीन व सांस्कृतिक आयामांचे ओझरते दर्शन घडविले आहे. यापुढील काळात त्याविषयी अधिक सूक्ष्म अध्ययन-संशोधन करून सविस्तर विवेचन करण्याचा मानस आहे.आता या ग्रंथातील लिपिचिन्हां विषयी थोडेसे. काही फार्सी उच्चार मराठीत नसल्याने ते(मूळ उच्चार) दर्शविण्यासाठी मी - मराठी लिपिचिन्हांतच काही खुणा वाढवून-नवीन लिपिचिन्हे योजिली आहेत व त्यांचा खुलासा तिसऱ्या प्रकरणात केला आहे.

माझ्या या संशोधनकार्यात मला अनेक संस्था व व्यक्ती यांचे साहाय्य झाले, त्या सर्वांचा निर्देश करणे केवळ अशक्य आहे. डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाचे ग्रंथालय,एकनाथ संशोधन मंदिर,औरंगाबादचा महानुभाव आश्रम, ठाण्याचे मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय यांचा मी प्रतीकात्मक ऋणनिर्देश करीत आहे. माझे संशोधन-सहायक सर्वश्री यशवंत सोनुने व कैलास इंगळे यांनीही या कामात मनापासून मदत केली, याचा निर्देश करणे आवश्यक आहे.

मराठी भाषा व साहित्य,मराठीच्या बोली,महाराष्ट्राचा इतिहास, मराठी लोकसाहित्य व मऱ्हाटी संस्कृती यांच्या अभ्यासकांना व संशोधकांना या ग्रंथाचा विशेष उपयोग होईल, असा मला विश्वास वाटतो.

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळाने या ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वीकारली याबद्दल मी मंडळाचे पूर्वाध्यक्ष प्रा.रा.रं.बोराडे, अध्यक्ष प्रा. रतनलाल सोनग्रा, मंडळाचे सचिव श्री सूर्यवंशी व सर्व सदस्य तसेच शासकीय मुद्रणालय यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

यू .म. पठाण

## संक्षेप

(अ) शब्दसंक्षेप

अ - अरबी (संदर्भाने)
अ/अव्य - अव्यय (संदर्भाने)
अप - अपभ्रंश
अव - अनेकवचन
आबव - आदरार्थी बहुवचन
इं - इंग्रजी भाषा
उद्गा - उद्गारवाचक अव्यय
उप - उपसर्ग
उभ - उभयान्वयी अव्यय
एव - एकवचन
का - कानडी
क्रि - क्रियापद
क्रिवि - क्रियाविशेषण
कृ - कृदन्त
च - चतुर्थी (विभक्ती)
त - तद्धित
तु - तुर्की
तृ - तृतीया (विभक्ती)
तृपु - तृतीय पुरुष
दे - देशी (शब्द)
व्दि - व्दितीया (विभक्ती)
व्दिपु - व्दितीय पुरुष
धा - धातू
न - नपुसकलिंग
ना - नाम
पं - पंचमी (विभक्ती)
पु - पुल्लिंग
प्र - प्रथमा (विभक्ती)
प्रपु - प्रथम पुरुष
प्रा - प्राकृत
फा - फार्सी भाषा
भविष्य - भविष्यकाळ

भाना - भाववाचक नाम

भूत - भूतकाळ

म - मराठी भाषा

म.म - मध्ययुगीन मराठी

ल - लक्षणा

वम - वर्तमान मराठी

वर्त - वर्तमानकाळ

वि - विशेषण

विना - विशेषनाम

शअ - शब्दयोगी अव्यय

ष - षष्ठी (विभक्ती)

स - सप्तमी (विभक्ती)

सर्व - सर्वनाम

सं - संबोधन (संदर्भाने)

सं - संस्कृत (संदर्भाने)

संवि - संख्याविशेषण

सारू - सामान्यरूप

साश - सामासिक शब्द

स्त्री - स्त्रीलिंगी

हिं - हिन्दी भाषा

(आ) ग्रंथसंक्षेप

अमम्श - अभिनव मराठी - मराठी शब्दकोश

आह - आंग्रे याची हकीहकत

एगा - श्रीसंत एकनाथ महाराज यांच्या अभंगांची गाथा

ऐप्र - ऐतिहासिक प्रस्तावना

ऐश - ऐतिहासिक शब्दकोश

कब - ९१ कलमी बखर

खस्वा - खडर्याच्या स्वारीची बखर

गंगापट - गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचे आत्मचरित्र

गाह - गायकवाड यांची हकीकत

चिब - (चित्रगुप्तविरचित) शिवाजीमहाराजांची बखर

चेब - चेऊलची बखर

थोरा - (चिटणीसविरचित) थोरले राजाराममहाराज यांचे चरित्र

दाह - दाभाडे सेनापती यांची हकीकत
धारा - (चिटणीसविरचित) श्रीमंत छत्रपती धाकटे रामराजे यांचे प्रकरण
धाशा - (चिटणीसविरचित) श्रीमंत छत्रपती धाकटे शाहूराजे यांचे प्रकरण
नाफ - नाना फडणीस यांचे आत्मचरित्र
पाब - (रघुनाथ यादवविरचित) पाणिपतची बखर
पेअअ - पेशवाईच्या अखेरची अखबार
पेबबाग - पेशव्यांची बखर (बा.ग. कारकून)
फामको - फार्शी-मराठी कोश
बाका - बापू कान्हो यांचे आत्मवृत्त
ब्रच - ब्रह्मेंद्रस्वामी ऊर्फ भार्गवबाबा यांचे चरित्र
भाकै - श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत
भाब - भाऊसाहेबांची बखर
म.इ.सा : खंड १ - मराठ्यांच्या इतिहासाची साधने,खंड १
मजुमा - महाबळेश्वरची जुनी माहिती
मपग - मराठेशाहीतील पत्ररूप गद्य
मब - महिकावतीची ऊर्फ माहिमची बखर
मबफास्व - मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप
मम - मध्ययुगीन मराठी
ममशि - मराठवाड्यातील मराठी शिलालेख
मशमी - मराठी शब्दसंग्रह-मीमांसा
मशस - मराठी शब्दसमीक्षा
मशावा - मराठी शाहिरी वाङ्मय
मसाछोब - मराठी साम्राज्याची छोटी बखर
याकाम - यादवकालीन मराठी भाषा
राव्यको - राज्यव्यवहार कोश
वड - जयरामस्वामी वडगांवकर,त्यांचे गुरू,परमगुरू व शिष्यप्रशिष्य यांच्या चरित्रांची बखर
वम - वर्तमान मराठी
विवि - विजयनगरचा विध्वंस
व्युको - मराठी व्युत्पत्तिकोश
शह - १७३८ शकातील हकीगत
शाब - शाहूमहाराज यांची बखर
शामव्या - शास्त्रीय मराठी व्याकरण
शिच - (सभासदविरचित) श्रीशिवछत्रपतींचे चरित्र

शिप्र - श्रीशिवाजीप्रताप

सच - (चिटणीसविरचित) शककर्ते श्रीशिवछत्रपतीमहाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र

सब - सनपुरीची बखर

संभाच - (चिटणीसविरचित)श्रीमन्ममहाराज संभाजीराजे यांचे चरित्र

हब - हरिवंशाची बखर

होकै - होळकरांची कैफियत

होथै - होळकरांची थैली

LSI - Linguistic Survey of India, Vol VII

PED - A Comprehensive Persian-English Dictionary

-----------------

# अनुक्रम



-----------------------

प्रकरण पहिले

# प्रा स्ता वि क

चौदाव्या शतकापासून एकविसाव्या शतकापर्यंतचा प्रवास हा फार मोठा,प्रदीर्घ प्रवास आहे. हा प्रवास आहे दोन भाषा-भगिनींचा -फार्सीचा आणि मराठीचा.या दोन्ही भाषा एकाच वंशाच्या आहेत. हा वंश आहे आर्य भाषावंश. या वशाच्या तीन शाखा झाल्या. इंडोयूरोपियन,इंडोइराणियन आणि इंडोआर्यन. पहिल्या शाखेत ग्रीक,लॅटिन,इंग्रजी यासारख्या भाषांचा समावेश होतो, दुसऱ्या शाखेत फार्सीचा आणि तिसऱ्या शाखेत संस्कृत, प्राकृत आणि वर्तमानकालीन मराठी,हिन्दी,गुजराती,बंगाली यांच्यासारख्या आर्यभाषांचा. 'भाषा - भगिनी ' हा शब्द फार्सी व मराठी या भाषांच्या संदर्भात याच दृष्टीने अत्यंत समर्पक आहे. मूळ एकाच वंशाच्या भाषा काही काळ उलटल्यावर भिन्न प्रदेशांत गेल्यानंतर व त्या पुन्हा एकत्र आल्यावर त्यांच्यातील मूळ प्रकृतिसाम्यामुळे त्या पुन्हा एकजीव व्हाव्यात, अशी काहीशी अवस्था फार्सी आणि मराठी या भाषा काही विशिष्ट कारणांमुळे व परिस्थितीमुळे एकत्र आल्यावर निर्माण झाली असल्याचा प्रत्यय आपल्याला यामुळे येतो.

मूळ वंश एक असला तरी या दोन्ही भाषांमध्ये आपापले वेगळेपणही होते.फार्सीचा अरबी या सेमिटिक वंशाच्या भाषेशी संबंध आला तो इस्लामच्या प्रसारामुळे.त्यामुळे अरबीच्या प्रचंड शब्दसंग्रहाबरोबरच तिच्या प्रकृतीचे काही विशेषही फार्सीत सामावले.फार्सी चौदाव्या शतकात मराठीला प्रत्यक्ष भेटली ती या बदललेल्या रूपात. त्यामुळे अरबीचाही फार्सीच्या माध्यमातून मराठीशी परोक्ष रूपाने संबंध आला. तथापि भाषावंश आणि प्रकृतिवैशिष्ट्ये यांच्या भिन्नत्वामुळे अरबीचा प्रत्यक्ष प्रभाव मराठीवर पडू शकला नाही.

फार्सी आणि मराठीच्या या अनुबंधाचे स्वरूप अक्षरशः'अन्तर्बाह्य ' या शब्दाच्या अनेकविध अर्थच्छटा व्यक्त करणारे होते. त्याची भाषिक, वाङ्मयीन व सांस्कृतिक अशी त्रिविध रूपे विशेष लक्षात घेण्याजोगी आहेत,असे मला गेल्या चार-साडेचार दशकांच्या या विषयासंबंधीच्या चिन्तनात सतत जाणवत राहिले.

हे चिन्तन करीत असताना काही पूर्वसूरींचे लेखन मला सतत वाट दाखवीत राहिले व या अनुबंधाची विविध रूपे न्याहाळण्याची प्रेरणा देत राहिले.इतिवि.का.राजवाडे यांच्या 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने'या ग्रंथाचे विविध खंड व त्यांच्या मौलिक प्रस्तावना-विशेषतःआठव्या खंडाची प्रस्तावना,प्रा.ग.ह. खरे यांचे 'संशोधकाचा मित्र ' सारखे ग्रंथ व त्यांनी संपादिलेली फार्सी साधने,डॉ.मा.त्र्यं.पटवर्धन यांचा 'फार्सी - मराठी कोश 'व त्याची बहुमोल प्रस्तावना,बाबा-ए-उर्दू डॉ. अब्दुल् हक् यांची 'मरेठी जबान पर फार्सी का असर ' ही उर्दू पुस्तिका, वा.सी.बेन्द्रे यांचा 'साधनचिकित्सा ' हा ग्रंथ, सेतु माधवराव पगडी व डॉ. देवीसिंग चौहान यांचे लेखन यांचा या संदर्भात

उल्लेख करायला हवा.
अन्य वर्तमानकालीन भारतीय आर्यभाषांचा विचार करता पं.अंबिकाप्रसाद वाजपेयी यांचा 'हिन्दी पर फारसी का प्रभाव ' आणि डॉ.नायक यांचा 'गुजराती पर अरबी-फारसीनी असर ' हे दोन्ही ग्रंथ मला लक्षात घेण्याजोगे वाटले.यांपैकी पं.वाजपेयी यांच्या लेखनाचे स्वरूप फार छोटेखानी असून त्याला बऱ्याच मर्यादा असल्याचे जसे जाणवले तसेच डॉ. नायक यांच्या ग्रंथाचे महत्त्व विशेष जाणवले पण त्याच्या मर्यादाही.

फार्सी - मराठीच्या या अनुबंधाचे स्वरूप फार व्यापक व विशाल आहे, त्याचे पैलू व पदरही अनेकविध आहे, याची उत्तरोत्तर जाणीव होत गेली. पूर्वसूरींपैकी विशेषतः राजवाडे,पटवर्धन यांच्या कार्याचे मोल जसे जाणवले, त्याचप्रमाणे या अध्ययनक्षेत्रांत जी अनेक सामर्थ्ये दडली आहेत, त्यांच्यावर अजून बराच प्रकाश पडायला हवा,याची जाणीव सातत्याने होत गेली. एक मर्यादित स्वरूपाचा सूक्ष्म अध्ययन करण्याचा- एक प्रकारे 'case study ' करण्याचा- प्रयत्न मी १९५८ साली 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप' या ग्रंथाच्या लेखनाच्या रूपाने केला व त्यावेळी या अनुबंधात दडलेल्या काही सामर्थ्यांच्या तेजस्वी कडा झळाळून गेल्या, दिपवून गेल्या. त्या प्रकाशात या अध्ययनक्षेत्राची वाट उजळत उजळत गेली. तिने ज्या ज्या दिशांवर प्रकाश टाकला, त्यांचे सगुण स्वरूप म्हणजे हा ग्रंथ होय.

पार्श्वभूमी

महाराष्ट्राच्या व मराठी भाषेच्या यादवकाळापासूनच्या इतिहासाकडे दृष्टिक्षेप टाकला तर स्थूल मानाने यादव-मराठीशी फार्सीचा निकटचा अनुबंध जुळला नव्हता असे विधान करता येईल. तथापि डॉ.शं.गो.तुळपुळे[१]यांचे या संदर्भातील मतही लक्षात घेणे आवश्यक आहे - 'ज्ञानेश्वरांच्या आणि तत्समकालीन लेखकांच्या मराठी भाषेत फारसी शब्द नाहीत असा सर्वत्र समज आहे व राजवाडे तशी ग्वाही देतात परंतु यादव-मराठी ला फारसीचा संपर्कहि नव्हता हे म्हणणें अवास्तव आहे . इतिहास आणि यादवकालीन मराठी भाषा ही त्याच्याविरुद्ध जातात. उत्तर कोकणच्या किनाऱ्याशीं अरबांचा व्यापार सातव्या शतकापासून सुरू होता आणि साहजिकच तत्कालीन कोंकणी प्रांतिक बोलींत कांहीं अरबी शब्द शिरले असले पाहिजेत'.

डॉ.तुळपुळे यांनी कोकणातील कोपराड-शिलालेखातील (काळः शके १२१९ - इ.स.१२९७) प्रोसाहि (फा.पर्वरिश् ),मुहुमद(अ.मुहम्मद्) ही शब्दरूपे दिली आहेत.त्यांनी विजापूर(इ.स.१३२०),खाटेग्राम(इ.स.१३४८)व नागाव(इ.स.१३६७) शिलालेखांतील अरबी-फार्सी शब्दांचाही निर्देश केला आहे पण ते चौदाव्या शतकातील असल्याने मी येथे नोंदविले नाहीत. माझ्या ग्रंथात[२] मात्र त्यांची नोंद घेतली आहे. ज्ञानेश्वरीतले पोतडी[३](फा.पोतेह्)आणि निसाण[४] (फा.निशान्) त्याचप्रमाणे महदंबेच्या 'धवळ्यां 'तील पेरोज्[५] ,रुखवत[६] हे फार्सी शब्दही त्यांनी निर्देशिले आहेत.

तथापि ज्ञानदेवकालीन मराठीविषयीचे डॉ.म.अ. करंदीकर[९] यांचे मतही मला ग्राह्य वाटते - 'यावरून एवढें मात्र म्हणतां येईल कीं फारसीचा प्रत्यक्ष परिणाम मराठीवर झाला नव्हता व केवळ इतर मार्गानें हे शब्द मराठींत घुसले होते. एकाद - दोन शब्द जरी मराठींत सांपडले तरी मराठीचें शुध्द व निर्मळ स्वरूप हा वेळपर्यंत दृष्टीस पडते, हें केव्हांहि अमान्य करता येणार नाहीं'.

इराणी लोकांचा भारताशी पाचव्या शतकापासून संबंध कसा आला,याविषयी डॉ.होडीवाला यांच्या 'Parsis of ancient India ', फिर्दोसीचा शाहनामा',कनिंगहॅमचे पुरातत्त्वीय अहवाल(क्र ३) यांच्या आधारे मी यापूर्वी 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप'[४] या ग्रंथात सविस्तर विवेचन केले आहे, त्याची पुनरुक्ती येथे करीत नाही. मात्र त्यातील पश्चिम भारताशी,महाराष्ट्राशी व मराठीशी संबद्ध भाग उद्धृत करतो.

"इसवी सनाच्या सातव्या शतकांत भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर इराणी लोकांची एक मोठी टोळी आल्याचा उल्लेख 'मुंबई गॅझेटियर'[९] मध्ये आढळतो. वुइलफोर्डनेही या मताचा पाठपुरावा केला आहे. सिंध व इराण या दोहोंचा निकटवर्ती संबंध सातव्या शतकाच्या अखेरीस किंवा आठव्या शतकाच्या प्रारंभी आल्याचे जनरल कनिंगहॅम[१०] याने सिद्ध केले आहे. प्रा. होडीवाला[११] यांनी हे मत मान्य केले आहे-

'This period,Cunningham extends down to A.D. 700,shortly after which direct Persian influence was brought to a close in Western India by Muhammedan conquest of Sind Multan in A.D.711' .

कोकणात सापडणारे 'द्रम्म '(फा. दिरम्, दिरहम् )हे नाणे इराणातील सासानियन कारकीर्दीतील होय, असे पं.भगवानलाल इंद्रजी[१२] यांनी सिद्ध केले आहे. मराठीतील 'दाम ' या शब्दाची व्युत्पत्ती टर्नरने[१३] सं. द्रम्म > प्रा.दम्म> म.दाम अशी दिली आहे तथापि ग्रीक Drakhma या शब्दापासून फा.दिरम् व त्यावरून मराठी 'द्राम > दाम 'ही उपपत्ती अधिक सुसंगत वाटते.

वरील ऐतिहासिक पुराव्यांवरून असे म्हणता येईल की इसवी सनाच्या पाचव्या शतकापूर्वी ही भारतीयांचा इराणी लोकांशी संबंध होता. व्यापाराच्या निमित्ताने वा अन्य कारणांनी हे सांस्कृतिक संबंध दृढ होत होते. भारताचा पश्चिम किनारा इराणी प्रवाशांना उतरण्यास सोयीचा वाटला.याच किनाऱ्यावर अरब लोकांचा संबंध प्रथम कोकणाकडूनच आला.नागाव(जि.कुलाबा)येथील शिलालेखात अ.फा.शब्द आढळतात याचे कारण तेच होय.शिवाय या परकीय लोकांना कोकणातील ठाणे,दाभोळ मालवण,कारवार या किनाऱ्यालगतच्या गावांची माहिती असल्याचे डॉ.एस. मुहम्मद हुसेन नायनार[१४]यांनी दिमिश्की,अबुल फिदा,मंसुदी,इद्रिसी या लेखकांचे आधार देऊन सिद्ध केले आहे.कोकणातील या स्थळांना तानह्(ठाणे),अल्दीबल(दाभोळ), मंदान(मालवण)इ. नावेही दिली असल्याचा उल्लेख डॉ.नायनार यांनी आपल्या ग्रंथात

केला आहे.

तुर्क,मोगल यांनी इराणवर केलेले आक्रमण,त्यांच्यावर झालेले इराणी संस्कृतीचे संस्कार(फार्सी भाषेचा स्वीकार इ ) व त्यांचा भारतात प्रवेश इ. गोष्टी इतिहासात नमूद आहेत.बाराव्या-तेराव्या शतकात त्यांची सत्ता भारतात प्रस्थापित झाली व त्याच सुमारास अल्लाउद्दीन खिलजीने देवगिरीच्या रामदेवराव यादवांवर स्वारी केली. हा इतिहासही प्रसिद्ध आहेच.या वेळेपासून मुसलमानांच्या देशव्यापी सत्तेचा महाराष्ट्राशी निकट संबंध येऊ लागला. मुसलमानांची राज्यकारभाराची भाषा फार्सी असल्याने अर्थातच फार्सीचा व मराठीचाही संबंध आला. राज्यकारभारविषयक शिष्ट व्यवहारासाठी फार्सीचा उपयोग होऊ लागला.महाराष्ट्राचे राजकीय व सामाजिक जीवनही काही अंशी फार्सीमय झाले. मुसलमान राज्यकर्त्यांप्रमाणे मराठ्यांनीही इतिहासलेखनास प्रोत्साहन दिले आणि महाराष्ट्रात बखरनवीसांचा,अखबारनवीसांचा व पारसनिसांचा एक वर्गच तयार झाला'.

१९५८ साली मी बखरींविषयी केलेले संशोधन व आज करीत असलेले चार दशकानंतरचे संशोधन यांतील ऐतीहासिक वास्तवात कोणताही बदल न झाल्याने वर माझेच अवतरण सविस्तर दिले आहे.

बहमनीकालापासूनच्या मराठी शिलालेखांशी फार्सीचा अनुबंध कितपत होता,याचा आजवरच्या संशोधनात फारसा विचार झाला नाही. याला डॉ. शं.गो. तुळपुळे यांच्या अल्पस्वल्प विवेचनाचा अपवाद करायला हवा त्याचा मी यापूर्वी उल्लेख केलाच आहे. (त्यांनी चौदाव्या शतकाच्या शिलालेखांतील क्रिमीदीन (फा. करीमुदीन),जमेति(अ.जम्ईयत्),दर्शु (फा. दाराशाह् ),मलिक-मलिकु (अ.मालिक्), मसिती-मषिती (अ.मस्जिद्),मिजिगिती (अ.मस्जिद्),मैरू (अ.मिहर),षुदुबुदीन (अ.कुत्बुद्दीन)या अरबी शब्दांचा उल्लेख केला आहे,ते फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले.) बहमनीकाळापासून मराठवाड्यात असलेल्या मराठी शिलालेखांचा या संदर्भात विचार करता जे वेगळे चित्र आढळते त्याचा सविस्तर विचार मी माझ्या मराठवाड्यातील मराठी शिलालेख'[१५] या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केला आहे -

'बहमनीकालाच्या प्रारंभानंतर मराठी भाषेत जी स्थित्यंतरे झाली, त्यांचे पडसाद या लेखांतही आढळतात.विशेष म्हणजे तेराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत जसा मध्ययुगीन मराठी साहित्याला अरबी-फार्सीचा फारसा स्पर्श होत नाही, तसाच मराठवाड्यातील मराठी शिलालेखांच्या भाषेलाही होत नाही. विसाव्या क्रमांकाच्या हातनूरच्या शिलालेखापर्यंतच्या(कालः शके १२२३/ इ.स.१३०१) सर्व शिलालेखांत एकाही अरबी-फार्सी शब्दाचा वापर केला गेल्याचे आढळत नाही, ही मोठी आश्चर्याची बाब होय ('ज्ञानेश्वरीत 'व यादवकालीन महानुभावीय साहित्यात हाताच्या बोटांवर मोजण्याइतके का होईना फार्सी शब्द आढळतात, पण तसे येथे होत नाही, हे लक्षात घ्यायला हवे).शके १३२०(इ.स. १३९८)मध्ये सुलतान फेरोजशहाचा या लेखांना स्पर्श होतो पण हे चौदाव्या शतकापर्यंतचे शिलालेख स्वत्वाचे एवढे अभिमानी की 'सुरतान 'व

'पेरोजसाहा 'या दोन फार्सी शब्दाव्यातिरिक्त ते कोणत्याही परकीय शब्दाचा स्वीकार करीत नाहीत. त्यानंतर मात्र फार्सी ही बहमनी राज्यकर्त्यांची राज्यकारभाराची भाषा झाल्याने आपोआपच लोकव्यहारातील मराठी भाषेवर अरबी - फार्सीचा प्रभाव पडणे अपरिहार्य होते.त्यामुळे उत्तरोत्तर मराठीत अरबी - फार्सी शब्दांचा आढळ होतो... शिलालेखांची भाषा ही जनसामान्यांशी संवाद साधणारी भाषा असल्याने ती अपरिहार्यपणे लोकभाषाच असणे आवश्यक असते, या तत्त्वाचे दर्शनही मराठवाड्यातील मराठी शिलालेखांच्या भाषेत घडल्याविना राहात नाही. अरबी-फार्सीचे अत्याधिक प्राबल्य असलल्याचे शिलालेख या संग्रहात अपवादादाखलच सापडतील(क्र. २३: औसा किल्ल्यातील भित्तिलेख. या शिलालेखात केवळ ठाणे, लोह आणि जहाले एवढे तीनच मराठी शब्द आहेत !)

पण याच शिलालेखांत अरबी-फार्सी शब्दांचे रूढ झालेले संक्षेपही आहेत म्हणजे त्या शब्दांच्या सतत वापराची खूणही आहे, हे मी या शब्दांत नोंदविले आहे" - 'मराठवाड्यातील या शिलालेखांत त्या त्या काळातील लेखनपद्धतीत प्रचलित असलेले किती तरी संक्षेप आढळतात. कालमानानुसार त्या शब्दसंक्षेपांत परिवर्तनही झाले आहे. यादवकालीन द्र(द्रम्म,द्राम< फा.दिरहम्/दिरम् )इ. संक्षेप आढळतात तर यादवोत्तर काळातील शिलालेखांत 'क।' म्हणजे कसबे (अ. कस्बह्), 'सु 'म्हणजे सुहूर सन (फा. सुहुर् सन् ),'म ।।'म्हणजे मजकूर (अ.मज्कूर)इ. शब्दसंक्षेप आढळतात. अरबी-फार्सीतील शब्दांनी आकडे सूचित करण्याची पद्धती (म्हणजे शब्दमूल्ये या शब्दसंकेत) ही मुसलमानी राजवटीतील या शिलालेखांत आढळते'

बहमनी,शिवकाल व पेशवेकाल यांतील फार्सी - मराठी अनुबंधाचे स्वरूप पाहता त्यात अनेक स्थित्यंतरे झाल्याचे आढळते. बहमनीकालात फार्सीची मराठीशी विलक्षण जवळीक निर्माण झाली पण तिचे रूपान्तर सावटात होऊ नये अशी चिन्ताही शिवकालात वाटू लागली. राज्यव्यवहारकोशाच्या निर्मितीमुळे मराठीच्या अस्मितेच्या रक्षणाचा एक महत्त्वपूर्ण प्रयत्न झाला खरा पण पुन्हा पेशवेकालात उत्तर भारताशी व मोगल राजवटीशी संपर्क येऊ लागल्याने फार्सी - मराठीचे संबंध अधिक व्यापक व घनिष्ट झाले.मराठी माणसाच्या जीवनव्यवहाराशी,वाङ्मयव्यवहाराशी,भाषिक व शासकीय व्यवहाराशी असलेला फार्सी भाषेचा हा संबंध उत्तरोत्तर वाढत वाढतच गेला. अव्वल इंग्रजीत व इंग्रजी अमदानीत,मुसलमानांची राजवट नसतानाही तो टिकून राहिला. एवढेच नव्हे तर इंग्रज हा देश सोडून गेल्यावरही गेले अर्ध शतक हा अनुबंध टिकूनच राहिला. याचाच अर्थ असा की फार्सीचे हे नाते मराठी मातीत अधिकाधिक रुजू लागले, अंकुरू लागले व त्याचा वेलविस्तारही होऊ लागला. तो किती अंगांनी व कसकसा होत गेला, याविषयी पुढे विस्ताराने विचार केला आहे.

या अनुबंधाची विभागणी मी तीन प्रमुख विभागांत केली आहे. त्यांतील भाषेच्या व बोलींच्या प्रकृतीच्या अन्तर्बाह्य स्वरूपाचा विचार या ग्रंथाच्या

पूर्वार्धात तपशीलवार व साधार केला आहे. उत्तरार्धात फार्सी व मराठी साहित्यात काही अनुबंध निर्माण झाला काय, याचा शोध घेतला असून त्यानंतर सांस्कृतिक संदर्भात - इतिहास, लोकसाहित्य व महाराष्ट्रीय आदिवासींची 'कोलाम' सारखी भाषा यांत काही अनुबंध आढळतो का,याविषयी सूक्ष्म अध्ययन करून काही निष्कर्ष मांडले आहेत. यांतील अनेक बाबींविषयी मराठी भाषेत प्रथमच विचार होत आहे, याची कल्पना हा ग्रंथ वाचताना येईलच.

------------------

**संदर्भ टीपा**

१. यादवकालीन मराठी भाषा,प्रथमावृत्ती,पृ.३४३
२. मबफास्व,पृ.१५
३. ज्ञानेश्वरी,राजवाडे प्रत, १४ - १७
४. कित्ता,९-२१६
५. धवळे, उत्त.
६. कित्ता,पृ.
७. मशामी,पृ. १७९
८. मबफास्व,पृ.१२ - १४
९. Bombay Gazzetteer.XIII .p 248
१०. Cunningham's Archaeological Reports,III p.5
११. Parsis of Ancient India, p.23
१२. कित्ता,पृ. २४
१३. A comparative and etymological Dictionary of Nepali,p.309
१४. Arab Geographers' knowledge of Southern India, pp 80 -81
१५. ममशि,स्वरूपदर्शन,पृ. १७
१६. कित्ता;पृ. १९

------------------

# पूर्वार्ध
# भा षि क अ नु बंध
## प्रकरण दुसरे
## ध्व नि वि चा र

**अरबी - फार्सीची ध्वनिव्यवस्था**

अरबी-फार्सीची ध्वनिव्यवस्था व मराठीची ध्वनिव्यवस्था यांच्यामधील मूलभूत साम्यभेद लक्षात घेतल्याशिवाय मराठीत आलेला अरबी - फार्सी शब्दांचे रूप कितपत कायम राहिले व कितपत बदलेल, तसेच ते का बदलले,याचा उलगडा होणार नाही. त्यांतील ध्वनिपरिवर्तनाच्या विविध प्रकारांवरही त्याशिवाय प्रकाश पडणार नाही.

यात अरबीचा विचार कशासाठी?असा प्रश्न पडण्याची शक्यता आहे.अनेक अरबी शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले आहेत,त्यामुळे त्यांची ध्वनिव्यवस्था व फार्सीची ध्वनिव्यवस्था या दोहोंची माहिती याविषयीच्या आकलनास व अध्ययन -संशोधनास अत्यंत उपयुक्त ठरते. यात आणखी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी ती ही की,अरबी ही सेमिटिक भाषावंशाची भाषा असून फार्सी ही आर्यभाषावंशातील इंडोइराणियन शाखेची भाषा होय . त्यामुळे फार्सीची ध्वनिव्यवस्था ही मराठीच्या ध्वनिव्यवस्थेला अधिक जवळची असली तरी तिच्यात अरबी ध्वनिव्यवस्थेच्या प्रभावामुळेही काही ध्वनिपरिवर्तने घडली आहेत. ही पार्श्वभूमी निश्चित झाली की या संदर्भातील पुढची वाटचाल सुगम व सुकर होते.

विख्यात हिन्दी भाषाशास्त्रज्ञ डॅा. धीरेन्द्र वर्मा[1] यांनी या संदर्भात केलेले तुलनात्मक अध्ययन येथे उद्धृत करीत आहे:

| अरबी लिपिचिन्हे | उच्चार | फार्सी लिपिचिन्हे | उच्चार |
|---|---|---|---|
| ا | अ | ا | अ |
| ب | ब् | ب | ब् |
| - | - | پ | प्[1] |
| ت | त् | ت | त् |
| ث | थ् | ث | स्[1] |

| अरबी लिपिचिन्हे | उच्चार | फार्सी लिपिचिन्हे | उच्चार |
|---|---|---|---|
| ج | ज् | ج | ज् |
| - | - | چ | च्[1] |
| ح | ह् | ح | ह्[1] |
| خ | ख् | خ | ख् |
| د | द् | د | द् |
| ذ | द् | ذ | द् |
| ر | र् | ر | र् |
| ز | ज़् | ز | ज़् |
| - | - | ژ | झ़् |
| س | स् | س | स् |
| ش | श् | ش | श् |
| ص | स् | ص | स्[1] |
| ض | द़् | ض | ज़्[1] |
| ط | त़् | ط | त्[1] |

| अरबी लिपिचिन्हे | उच्चार | फार्सी लिपिचिन्हे | उच्चार |
| --- | --- | --- | --- |
| ظ | ज़् | ظ | ज़्' |
| ع | अ़ | ع | अ' |
| غ | ग़् | غ | ग़् |
| ف | फ़् | ف | फ़् |
| ق | क़् | ق | क़्' |
| ک | क् | ک | क् |
| گ | ग् | گ | ग् |
| ل | ल् | ل | ल् |
| م | म् | م | म् |
| ن | न् | ن | न् |
| و | व् | و | व् |
| ه | ह् | ه | ह् |
| ی | य् | ی | य् |

नवीन लिपिचिन्हे: आवश्यकता व विवरण

वरील तक्त्यावरून हे लक्षात येईल की फार्सी भाषेतील काही उच्चार मराठीशी जुळणारे आहेत तर काही मराठीत मुळात नाहीतच; तथापि मराठीत फार्सी शब्द आले असताना ते त्या शब्दांबरोबर आले असावेत अशा काही अपरिचित उच्चारांसाठी मराठीत लिपिचिन्हे नसल्याने मराठी भाषकांनी ते आपल्या सोयीनुसार स्वीकारले व बदललेही आहेत. मूळ फार्सी उच्चार कसे वेगळे होते हे लक्षात यावे म्हणून मी ' मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप'' या माझ्या ग्रंथात पुढील काही मराठी लिपिचिन्हे नव्याने निर्माण करून त्यांचे वेगळेपण दर्शविले होते,यालाही चार दशकांहून अधिक काळ लोटला. तीच लिपिचिन्हे मी फार्सी मराठीच्या उच्चारप्रक्रियेचा अनुबंध दर्शविण्यासाठी येथे योजिली आहेत.

| फार्सी लिपिचिन्ह (नावासह) | | मराठी लिपिचिन्ह व उच्चार |
|---|---|---|
| ا | (अलिफ़) | अ |
| ب | (बे) | ब् |
| پ | (पे) | प् |
| ت | (ते) | त् |
| ث | (से) | स़् |
| ج | (जीम्) | ज् |
| چ | (चीम्) | च् |
| ح | (है) | ह़् |
| خ | (ख़े) | ख़् |
| د | (दाल्) | द् |
| ذ | (ज़ाल्) | ज़् |
| ر | (रे) | र् |
| ز | (ज़े) | ज़् |
| ژ | (झे) | झ़् |

| फार्सी लिपिचिन्ह (नावासह) | | मराठी लिपिचिन्ह व उच्चार |
|---|---|---|
| س | (सीन्) | स् |
| ش | (शीन्) | श् |
| ص | (स्वाद्) | स़् |
| ض | (ज्वाद्) | ज़् |
| ط | (तोय्) | त़् |
| ظ | (जोंय्) | ज़् |
| ع | (ऐन्) | अ़् |
| غ | (गैन्) | ग़् |
| ف | (फे) | फ़् |
| ق | (काफ़्) | क़् |
| ک | (काफ़्) | क् |
| گ | (गाफ़्) | ग् |
| ل | (लाम्) | ल् |
| م | (मीम्) | म् |
| ن | (नून्) | न् |
| و | (वाव्) | व् |
| ه | (हे) | ह् |
| ی | (ये) | य् |
| ء | (हम्ज़ा) | अ: |

या संदर्भात आणखी थोडासा खुलासा करणे आवश्यक वाटते,तो असाः
(१) मराठीत आलेल्या फार्सी शब्दांतील काही उच्चार मराठी भाषकांना परिचित नव्हते.
(२) त्याचप्रमाणे वर्णाच्या खाली किंवा वर काही खुणा करून अकार,आकार,इकार,
उकार,ओकार इ. स्वर दर्शविण्याची पध्दती फार्सीसारख्या भाषेत आहे (पुढे सरावाने या
खुणा न करताही ते उच्चार केले जातात,या गोष्टीची ही नोंद घ्यायला हवी . वर्णावर
(ज़बर् ) तिरपी रेघ देऊन अकार, अशी खूण करून आकार,वर्णाखाली (ज़ेर)रेघ देऊन
इकार, वर्णावर लहान 'वाव 'हे अक्षर (पेश)लिहून उकार,'य ' वर्ण जोडून
(दीर्घ)ईकार, 'वाव 'जोडून दीर्घ 'ऊ' कार, सारखे 'ये' चे रूप योजून एकार
दर्शविण्याची फार्सीची पध्दती लक्षात घेतली की आपल्या मराठी लेखनपध्दतीत व फार्सी
लेखनपध्दतीत कसा फरक आहे ते लक्षात येते. सवयीने या खुणा न करण्याची
पध्दतीही उर्दू -फार्सीत आहे!

अ चे दोन उच्चार फार्सीत आहेत :

(१) अलीफचा 'अ ' हा उच्चार व
(२)ऐन् चा कंठय 'अ़ ' हा उच्चार. त्यामुळे त्यांच्यापासून होणारे पुढील स्वर वेगळे
मानावे लागतात व त्यासाठी - म्हणजे कंठय 'अ ' साठी वेगळी लिपिचिन्हे वापरावी
लागतात -

(i) अलीफ् पासून - अ,आ,इ,ई,उ,ऊ,ए,ऐ,ओ,औ
(ii) ऐन् पासून - अ़,आ़,इ़,ई़,उ़,ऊ़,ए़,ऐ़,ओ़,औ़

याचाच अर्थ असा की फार्सीतून मराठीत आलेल्या शब्दांत 'अ' च्या बाराखडीतील स्वर
दुप्पट मानायला हवेत कारण हे स्वर मूलतः भिन्न आहेत. पण हे केवळ मूळ रूप लक्षात
घेण्यासाठी. मराठीत आल्यावर त्यांचे लेखन 'अ 'च्या पारंपरिक बाराखडीप्रमाणेच झाले
आहे . याचा तपशील पुढे 'स्वर विचारा'च्या संदर्भात व त्या उपशीर्षकाखाली केलाच
आहे असा विचार यापूर्वी झालेला नव्हता. हा विचार मराठी ध्वनिव्यवस्थेतील
स्थित्यंतरांच्या आकलनास उपयुक्त ठरेल,असा मला विश्वास वाटतो.
(३) मराठीत येणाऱ्या फार्सी शब्दांतील ध्वनिव्यवस्था कितपत कायम राहते व तिच्यात
कोणकोणती परिवर्तने होतात, याचे सूक्ष्म अध्ययन फार्सी - मराठीच्या भाषिक
अनुबंधाच्या एका विशेष आयामावर प्रकाश टाकते. त्यासाठी मध्ययुगीन मराठी
(मम)प्रमाणेच वर्तमान मराठी (वम)तील उदाहरणांचा अभ्यास करणेही आवश्यक
आहे.यासाठी फार्सी शब्दांतील त्रिविध स्थानांचा विचार केला आहे. ही स्थाने आद्य,मध्य
आणि अन्त्य अशी आहेत. 'आद्य 'व 'अन्त्य 'या संज्ञा सहज लक्षात येतील पण 'मध्य '
या संज्ञेची या ग्रंथात अभिप्रेत असलेली व्याप्ती स्पष्ट करणे आवश्यक आहे.फार्सी
शब्दाच्या आद्य व अन्त्य या वर्णांच्या मध्ये येणारे सारेच वर्ण येथे स्थानाच्या संदर्भात
अभिप्रेत आहेत.

'मध्य ' या संज्ञेचा केवळ शब्दाच्या मध्यभागी येणारे वर्ण हा अर्थ येथे अभिप्रेत

नाही. या संज्ञेचा उपयोग केल्याने उपान्त्य, उपान्त्यपूर्व या तपशीलात जाण्याचे कारण उरत नाही. शिवाय उपान्त्य,उपान्त्यपूर्व या संज्ञांनाही काही मर्यादा आहेत.उपान्त्यपूर्व वर्णाच्या आधीही काही वर्ण असल्यास, त्यांचा विचार कसा करावा, हा प्रश्न त्यामुळे सुटला आहे. 'मराठी' बखरींतील फार्सीचे स्वरूप या माझ्या ग्रंथाचा पुनर्विचार करताना अशा काही अडचणी मला जाणवल्या होत्या. हे तुलनात्मक अध्ययन करताना त्या मी माझ्या परीने सोडविल्या आहेत.

स्वरविचार

अ(फार्सी लिपिचिन्ह अलीफ् ا )

आद्य

i] बहुधा फार्सीतून मराठीत आलेला आद्य 'अ ' अविकृत राहतो -

अक्बर् >अकबर,अख़्बार्>अखबार,अदब.>अदब,अद्रक्>अदरक,अब्रक्>अभ्रक, अमानत् >अमानत,अमीन्>अमीन,अमीर् >अमीर,अर्बईन् >अर्बैन,अल्क़ाब्>अलकाब, अल़्फ् > अलफ , अलबत्तह् > अलबत्ता, अल्लाह् > अल्ला, अस्बाब् > असबाब, असामी >असामी,असील्> अशील ,अह् वाल् > अहवाल

ii] अ + अ़ = अ - अअ़्ज़म् > अजम, अअ़्लम् > अलम

iii] अ > आ - अफलातून >आफलातून (मम),अयाल् >आयाळ, अर्राह् > आरबा, अस्बाब > आजबाब (मम),अह् फाद् > आफलाद (मम),अहमक़् > आहमक (मम)

iv] क्वचित् अ > इ - अख़्लाख़ >इखलाख (मम)

मध्य

i] अविकृत अ - अदब् > अदब, इसवी >इसवी, इ़्वज़् >ऐवज, मदद् >मदत, रसद् >रसद,लक़ब् >लकब

ii] अ+ अ़ > आ - तअ़लीम् > तालीम, तअ़ल्लुक़ह् > तालुका, मुतअ़ल्लिक़् > मुतालीक

iii] क्वचित् अ > इ/ई - जिलब् > जिलिब/जिलीब

अन्त्य :- बहुतेक फार्सी शब्द व्यंजनान्त असल्याने अन्त्य 'अ ' ची फारशी उदाहरणे आढळत नाहीत.

आ

आद्य

i] अविकृत आ. - आज़ार् > आजार,आदमी > आदमी,आब् > आब, आराम् > आराम, आरायिश् > आरास

ii] आ > अ- हे परिवर्तन वैपुल्याने घडते : आख़िर् > अखेर,आज़्मायिश् > अजमास,आफ्ताब् गीर् > अबदागिरी, आस्मान् > अस्मान,आबरू > अब्रू,आस्तिन् > अस्तनी,रातिब् >रतीब, जानवर् > जनावर, जागीर् > जहागीर, शाह् जी > शहाजी,

हाज़िरी > हजेरी, हामी > हमी,हाली > हल्ली

iii] आ > ए - खारिज् > खेरीज,तारीख़ > तेरीख,दाखिल् > देखील,
साकिन् >सेकिन

मध्य

i] अविकृत आ- अलाक़ह् > इलाखा,ईमान् > इमान, इमाम् > इमाम,क़रार् > करार,करामात् > करामत,हवाला > हवाला, हर्कारह्. > हरकारा,हवालह्दार् > हवालदार.

ii] आ > अ- मुलाक़ात् > मुलाखत,मुबादलह् > मोबदला,रज़ाई > रजई , सुराही> सुरई, हवाई > हवाई (मम)

iii] आ > ए - किताब् > कितेब

अन्त्य

अविकृत आ- इज़ा > इजा,दग़ा > दगा,दंगा > दंगा, दर्या > दर्या,
मौलाना >मुलाणा,हवा > हवा.

इ

आद्य

i] अविकृत इ - इज़ारत > इजारा, इन्आम > इनाम, इस्म > इसम, इस्तावह > इस्तावा,इस्लाम् > इस्लाम, इशारह् > इशारा,इर् साल > इरसाल, इरादह् > इरादा,किताब् > किताब, तिवासी > तिवाशी

ii] इ-लोप - ज़ियादह् > जादा, ज़ियाफत् > ज़ाफत,पियादह् > प्यादा,

iii] इं > अ- फ़िद्य > फद्या, लिगाम् >लगाम, हिमयान् > हमीणा

iv] इ >ए - इक़ार् > एक्रार , इह्सान् > एहसान,चिह्रा >चेहरा, मिह्नत् >मेहनत, मिहर्बान् > मेहेरबान

मध्य

i] अविकृत इ - क़िरमिजी > किरमिजी , कोर्निशात् > कुर्निसात,कैफ़ियत् > कैफियत, कोशिश् > कोशिस, मिज़ाज् > मिजास, मिन्नत् > मिन्नत,शिकस्त् > शिकस्त हिसाब् > हिशेब, हिस्सह् > हिस्सा

ii] इ > अ - इह्तिमाम् > इतमाम,क़ाफ़िर् > काफर,क़ाफ़िलह् > काफला,
मुनासिब् > मुनासब, मालिक् > मालक, मुन्सिफ़ > मुन्सफ,
मुफ़सिद् >मुफसद,सिफ़ारिश् > शिफारस.

'आ नंतर वऱ्हस्व अक्षरापूर्वी येणाऱ्या 'इ' चा 'अ' होतो',असा बारकावाही डॉ. पटवर्धन[1] यांनी या संदर्भात सांगून त्याची आशक, कायम, जाबता, नाजर ही उदाहरणे दिली आहेत.

iii] इ > ई - फार्सीतून मराठीत येणाऱ्या शब्दांतील ही एक सातत्याने आढळणारी प्रक्रिया आहे-

क़ाबिज़् > काबीज, क़ाबिल् > काबील, ज़ामिन् >जामीन, ज़ाहीर् > जाहीर ,
रातिबह् > रतीब

iv] इ -लोप - डॉ. पटवर्धनांनी* इ -लोपाच्या प्रक्रियेऐवजी इया च्या ऐवजी आ येतो असे म्हणून अखत्यार,प्याला, न्याबत, न्याहत, म्यान ही उदाहरणे दिली आहेत. या शब्दांचे मूळ,त्यानीच आपल्या कोशात दिल्यानुसार ,अनुक्रमे पुढीलप्रमाणे आहे : अ. इख़्तियार्, फा. पियाला, अ. नियाबत्, अ. निहाल्, फा. मियान्. ही सर्व उदाहरणे इ -लोपाची आहेत व पहिले उदाहरण वगळता ती आद्य इ -लोपाची आहेत. दर्मियान् सारख्या अन्य शब्दाची उदाहरणे मध्य इ -लोपाच्या संदर्भात देता येतील.त्याप्रमाणे याच संदर्भात याच ठिकाणी विवेचन करताना इ ऐवजी आ येतो असेही म्हटले आहे.वस्तुत हीदेखील इ -लोपाचीच प्रक्रिया होय,त्यानी दिलेल्या कज्जा,गाशा,जादा,जाफत,जास्त. तकया,दानत,शाई, शास्त या उदाहरणांचे मूळ त्यांनीच कोशात दिल्याप्रमाणे अनुक्रमे अ कझ़िया,अ.घाशिया,अ.झ़ियादा,अ.झ़ियाफत,अ.झ़ियादत,अ.ताक्यिया,अ.दियानत, फा.सियाही आणि अ.सियासत हे शब्द आहेत. यांतील कझ़िया,घाशिया,ताक्यिया,ही मध्य इ ची उदाहरणे वगळता बाकीची आद्य इ ची आहेत.या उदाहरणांतही इ -लोपच घडल्याचे स्पष्ट आहे.

अन्त्य - फार्सी शब्दांत अन्त्य 'इ' ची उदाहरणे आढळत नाहीत.

ई

आद्य

i] अविकृत ई - चीज़् > चीज,चीजवस्त; जीन >जीन,जीनसामान;तीर् >तीर, नीम्आस्तिन् > नीमअस्तनी, पीर् >पीर, बीबी > बीबी,मीनाकारी >मीनगारी, मीर्आलम् > मीरआलम,मीरखान् >मीरखान.

ii] ई > इ -ईज़ा >इजा, ईरान् > इराण, ईरानी > इराणी,जीगह् > जिगा, जीनह् > जिना, जील्क़ अहद् > जिल्काद, दीवान् > दिवाण,दीवानह् > दिवाना/णा.

iii] ई > ए - नीस्त् नाबूद् > नेस्तनाबूत, मीवह् >मेवा, फ़ीरूजह् > पेराज

मध्य

i] अविकृत ई - ख़तीब् > खतीब, ख़रीफ़् > खरीप, ग़रीब् > गरीब, जंजीर् >जंजीर,ज़मीन् >जमीन,तफ़्सील् >तपशील, वकील् > वकील

ii] ई > अ - (क्वचित)- तस्लीमात् > तसलमात

iii] ई > इ - ईमान् > इमान, क़बीलह् > कबिला, दाग़ीनह् > दागिना, ख़ज़ीनाह् > खजिना, ग़रीबी > गरिबी, बीमार् > बिमार,फ़ज़ीहत् >फजिती

iv] ई > ए - उम्मीद् > उमेद,त़वीलह् > तबेला, तश्हीर् > ताशेरा,ह़वीली > हवेली

अन्त्य - फार्सी अन्त्य ई मराठीत कायम राहिल्याची विपुल उदाहरणे आहेत- आस्मानी > अस्मानी, आस्मान्गीरी> अस्मानगिरी; क़बुली >कबुली, कही > कही कार्नवीसी >कारनिसी, मुल्क्गीरी > मुलुखगिरी, फ़ुतुरी > फितुरी, फंदी >फंदी,

हाली > हल्ली

उ

आद्य

i] अविकृत उ - उम्रा > उमराव,उम्मीद > उमेद, उमेदवार; उस्तुवरी > उस्तवारी,
कुल्ल् > कुल, ख़ुदा > खुदा,ख़ुश्आमद् > खुशामत,ख़ुश्हाल् > खुशाल,
गुनाह् > गुन्हा, गुज़रान् > गुजराण,ज़ुल्म् > जुलूम, दुन्या > दुनिया,फ़ुर्सत् > फुरसत
ii] उ > अ - जुलूस > जलूस,बुंदूक़ > बंदूक, सुलूक़ > सलोखा, वुसूल् > वसूल
iii] उ > इ ( क्वचित्) - फ़ुतूर् > फितूर
iv] उ > ओ - या परिवर्तनाचे वैपुल्य आढळते, मुहिम् >मोहीम,मुबादलह् >मोबदला,
मुहर्रम् > मोहरम, मुकासा > मोकासा, मुहासबह्,मोहासाबा, रुक़्अह् > रोखा,
शुह्रत् >शोहरत, सुहबत् > सोबत
v] उ -लोप - मुवाफ़िक़् >माफक , मुअ़्तबर् > मातबर, मुसव्वदह् > मसुदा

मध्य

i] अविकृत उ - तअ़ल्लूक़ > ताल्लुक, तअ़ल्लुक़ह् > तालुका, तअ़ल्लुक़दार् >
तालुकदार, नाज़ुक् >नाजुक, बहादुर् > बहादुर,फ़क़ीर् फ़ुक़रा > फकीरफुकरा,
मीर्-इ-जुम्लह् > मीर जुमला.
ii] उ > अ (क्वचित्) - तर्जुमह् > तरजमा, मुसुलमान् > मुसलमान, शुरुअ़नवीस् >
सुरनीस
iii] उ > ऊ - चाबुक् > चाबूक, ज़ुल्ल् > झूल,तरद्दुद् > तरतूद ,तवक़्क़ुफ़् > तहकूब,
पुल् >पूल,शुरुअ़ > सुरू
iv] उ > ओ - दगाख़ुर् > दगेखोर,मन्सूबह् > मनसोबा (मम), मनसोबाबाज;
ह़रामख़ुर् > हरामखोर, ह़रामख़ुरी > हरामखोरी

अन्त्य उ - याची उदाहरणे आढळत नाहीत.

ऊ

आद्य

i] अविकृत ऊ - याची फारशी उदाहरणे आढळत नाहीत.
दूवम् > दूम, दूर् > दूर , दूर्दस्त् > दूर्दस्त; हूर् > हूर
ii] ऊ > उ (ऱ्हस्वीकरण) - हे ध्वनिपरिवर्तन मराठीतील फार्सी शब्दांच्या बाबतीत फार ठिकाणी झाले आहेः कूजह् > कुजा, तूफ़ान् > तुफान, तूमार् >तुमार, दूई > दुही,
दूबार् > दुबार,दूर्बीन् > दुर्बिण, दूयम् >दुय्यम, नमूनह् > नमुना,सूबह् > सुभा,
सूरत् >सूरत,सूराख़् >सुलाख (णे),फार्सी 'ऊ पुढे दीर्घाक्षर आल्यास तो ऱ्हस्व होतो,' हे डॉ. पटवर्धन[१]यांचे मत काही बाबतीत खरे असले तरी काही बाबतीत (उदा.दुय्यम, नमुन,सुरत,सुभा) खरे नाही, हे वरील उदाहरणांवरून लक्षात येईलच.
iii] ऊ > ओ - मूर्चह् > मोर्चा, मूर्चाल् > मोरचेल

मध्य

i] अविकृत ऊ - याची विपुल उदाहरणे आहेत -

मअ़क़ूल् > माकूल, मअ़लूम् > मालूम, मग़रूर् > मगूर,मज़्दूर > मजूर, मज़्बूत् > मजबूत, मज़्कूर् > मजकूर, मज़्बूर > मजबूर, मंज़ूर् >मंजूर,मौक़ूफ़् >महकूब, सुबुत् > शाबूद

ii] अन्य प्रक्रिया - क्वचित् ऊ > अ - फ़ानूस् > फानस

ऊ > उ - मज्मूअ़दार् > मुजुमदार, मव्सूफ़् > मवसुफ, बाज़ूबंद् > बाजूबंद

आणि ऊ > ओ - सलूक् > सलोखा अशी ध्वनिपवर्तनेही झाली आहेत.

अन्त्य

अविकृत ऊ - याचीही विपुल उदाहरणे आहेत.

जोरू > जोरू, तसू > तसू, बाज़ू > बाजू रू-ब्-रु > रूबरू ,वुज़ू >उजू (तवाजू), हिम्रू > हिमरू

ए

आद्य

अविकृत ए - आद्य ए बहुधा कायम राहतो -

जेब् > जेब, ज़ेर् > जेर,ज़ेरज़बर् > जेरजबर ,ज़ेरबंद् > जेरबंद,ज़ेरी > जेरी , तेग़ह् > तेगा, तेज़् > तेज, तेज़ी > तेजी, तेज़्आब् > तेजाब, देर् > देर, देहन्दगी > देणगी, नेक् > नेक, नेकी > नेकी, नेफ़ह् > नेफा पेच् > पेच, पेशह् > पेशा,पेश्वा > पेशवा, पेशकार् > पेशकार, मेज़् > मेज, शेख़ी > शेखी, शेर् > शेर

मध्य

मध्य अविकृत 'ए ' ची उदाहणे - फरेब् > फरेब,यासारख्या शब्दांत आढळली तरी तो अपवादात्मकच आहेत. वक्तबेवक्त > वक्तबेवक्त ,शम्शेर् > समशेर, सर्पेच् > शिरपेच ही ममत अढळणारी उदाहरणेही उल्लेखनीय होत.

अन्त्य - अन्त्य 'ए ' ची उदाहरणे आढळत नाहीत.

ऐ

अविकृत ऐ - याचीही उदाहरणे वैपुल्याने आढळतात.

कैंची > कैची, क़ैद् > कैद, कैफ् >कैफ, ख़ैरात् > खैरात, तैश् >तैश, मैदान् >मैदान, शैतान् > सैतान, हैबत् > हैबत, हैबतराव.

मध्य

याची उदाहरणे फारशी नाहीत.

बेक़ैद् > बेकैद, बेक़ैदी > बेकैदी, वग़ैरह् >वगैरे

अन्त्य ऐ ची उदाहरण त्याच्या उच्चाराच्या अवघडपणामुळे स्वाभाविकपणेच फार्सी व मराठी या दोन्ही भाषांत आढळत नाहीत.

ओ

आद्य

अविकृत ओ - कोताह् > कोता, कोताही > कोताइ, खोगीर् >खोगीर,गोशह् >गोशा, ज़ोर् > जोर, ज़ोरज़बरी >जोरजबरी, ज़ोर्दार् > जोरदार . दोस्त् > दोस्त, दोस्ती > दोस्ती, नोक् > नोक, नोक्दार् > नोकदार, पोतह् > पोते,पोतह्दार् > पोतदार, पोतह्नवीस > पोतनीस, बोय् > बोय.

मध्य

अविकृत ओ - तारोतार् >तारोतार,पापोश् > पायपोस,बग्तर्पोश् > बख्तरपोस, बज़ोर् > बजोर, बेरोज़गारी > बेरोजगारी, सर्जोर् > शिरजोर

अन्त्य –अन्य भाषांप्रमाणेच याची उदाहरणे अपवादात्मकच आहेत.

क़ानून्गो > कानगो, खुश्बो > खुश्बो (मम)

औ

आद्य

यातही अविकृत औ चीच उदाहरणे अधिक आहेत - क़ौल् > कौल, नौबत् > नोबत, फौज् > फौज, मौज् > मौज मौलवी > मौलवी, मौला > मौला

औ > अ- (मौक़ूफ़ > महफूब) आणि औ > ओ (मौतानह > मोताना,मौसम् > मोसम) अशी परिवर्तनेही थोडयाफार प्रमाणात घडली आहेत तथापि 'औ'चे 'अव 'मध्ये विश्लेषण झाल्याची प्रक्रिया मम त बरीच आढळते.तिचा विचार ' स्वरविश्लेष 'या शीर्षकाखाली याच प्रकरणात अन्यत्र उदाहरणांसह केला आहे.

मध्य व अन्त्य औ ची उदाहरणे आढळत नाहीत.

अ़ (फार्सी लिपिचिन्ह 'ऐन्' ع)

फार्सी शब्दातील 'अलीफ ' पासून मराठीत आलेला 'अ 'हा स्वर व त्याची बाराखडी त्याचप्रमाणे 'ऐन् पासून आलेला 'अ़ 'हा स्वर व त्याची बाराखडी यांचे मराठीतील ध्वनिव्यवस्थेतील फलित सारखेच असले.तरी त्यांच्यामध्ये मूलतः फरक होता, हे लक्षात येण्याच्या दृष्टीने ऐन् पासून सिद्ध झालेल्या शब्दांचा वेगळा विचार करणे तुलनात्मक अध्ययनाच्या दृष्टीने व फार्सी-मराठी उच्चारव्यवस्थेतील आदिबंध शोधण्याच्या दृष्टीने उपयुक्त ठरावे. असा विचार मराठी भाषावैज्ञानिक अध्ययनात यापूर्वी झाला नाही, तो येथे प्रथमच होत आहे. म्हणूनही त्याचे महत्त्व आहे. या संदर्भातली उदाहरणे मोजकी असली तरी ती निश्चितपणे लक्षात घेण्याजोगी आहेत. ' अ़ ' या स्वराविषयी जितकी विपुल सामग्री मिळाली तितकी आ़,इ़...

या त्याच्या अन्य रूपांविषयी फारशी मिळाली नाही, हेही येथे नमूद करायला हवे.

आद्य

अ़ > अ - अ़क़्ल् > अक्कल, अ़रबा > अरबा, अ़राबह् > अराबा, अ़जब् > अजब,

अ़दालत् > अदालत, अ़दावत् >अदावत,अ़बीर् > अबीर, अ़र्ज़् > अर्ज, अ़लाहि़दह् > अलाहिदा, अ़त्तार् > अत्तार, अ़ली > अली, अल्ली, अ़हद्नामह् >अहदनामा
क्वचित्  अ़ >इ (अ़लाक़ह् > इलाखा) आणि अ़ > उ (अ़लूफ़ह् > उनफा ) अशा प्रक्रियाही घडते.

मध्य

अ़ > अ - अ़बदुल्अ़ली > आबदुलअली,जम्अ़नवीस् > जमनीस, मज्मुअ़दार् > मूजुमदार,

अ + अ़ > आ - दअ़वा >दावा, दअ़वत् > दावत, नअ़ल् > नाल, नअ़लबंदी > नालबंदी, मुतअ़ल्लिक् > मुतालिक, शअ़रा > शहारा

अ़ > आ -  जम्अ़दार > जमादार,

उ + अ़ > आ - मुअ़त्तबर् > मातबर, रुअ़ब् > रुबाब (मम)

अ़ - लोप - मुअ़य्यन् > मोईन,शुरुअ़नवीस् > सुरनीस, शुरुअनवीसी > सुरनिशी

अन्त्य

फार्सी शब्दांतील ' अ़ ' मराठीत येताना काही वेळा गळतो किंवा पूर्वस्वरात मिसळतो - इत्तिलाअ़ > इतला, इतल्ला,ज़िल्अ़ > जिल्हा , तस्दीअ़ > तसदी

अ़ > आ - अर्बअ़ > अर्बा, जम्अ़ > जमा जाइअ़ > जाया,ताबिअ़ > ताबा , तिस्अ़ > तिसा, ख़ातिर्जम्अ़ > खातरजमा,  नफ़्अ़ > नफा , मुलम्मअ़ > मुलामा

अ़ > ए - (क्वचित्) तालिअ़ > ताले, रफ़्अ़दफ़्अ़ > रफेदफे

आ़

आद्य

आ़ > अ - आ़इदह् > अदा, आ़दिलशाह् > अदलशहा(मम),
आ़लम्पनाह् > अलमपन्हा

आ़ > आ - आ़म् > आम, आ़म्ख़ास् > आमखास, आ़शिक़ >  आशंक, आशिक; आ़लीजाबहादर् > आलिजाबहादर, आ़लम्गीर > आलमगीर.

मध्य

आ़ > आ - इन्आ़म् > इनाम, इन्आ़म्दार् > इनामदार, मुआ़मलत् > मामलत, मुआ़मलह् > मामला, मुआ़मलत्दार् > मामलेदार

अन्त्य

आ़ > आ - दुआ़ > दुवा,  मुद्दआ़ > मुद्दा,

इ़

आद्य

इ़ > अ -  इ़त्र् > अत्तर,  इ़नायत् > अनात

इ़ > इ - इ़ज्जत् > इज्जत, इ़मारत् > इमारत, इ़ल्म् > इल्म, इ़लाज् > इलाज, इ़श्क् > इश्क/इष्क.
(क्वचित्) इ़ > ऐ - इ़वज़् > ऐवज, इ़वज् > ऐवजी.
मध्य
इ़ - लोप - काइ़दह् > कायदा, काइ़दह्सर् > कायदेशीर,क़ाइ़म् > कायम,
ताइ़फह् > ताफा
फाइ़दह् > फायदा, बेक़ाइ़दह् > बेकायदा.
(क्वचित्) इ़ > ए - मुस्तइ़द् > मुस्तेद
अन्त्य
अन्त्य ' इ़ ' ची उदाहरणे आढळत नाहीत.
ई़
आद्य
या स्वराची फार कमी उदाहरणे आढळतात.
i] (ऱ्हस्वीकरण) ई़ > इ = ई़दगाह् > इदगा, ई़साई >इसाई
ii] ई़ > ई - ई़द > ईद , ई़सवी > ईसवी
मध्य
i] ई़ > ए,ऐ - अर्बई़न् > अर्बैन, तिस्ई़न् > तिसेन,तिसैन
ii] ' ई़ ' लोप- रई़यत् > रयत
अन्त्य
ई़ > ई - रजाई़ > रजई
उ़,ऊ़ - यांचीही फार तुरळक उदाहरणे मराठीत आलेल्या फार्सी शब्दांत आढळतात.
आद्य उ़ > उ- उ़ज्र > उजूर, उ़म्दह् > उमदा, उ़म्र् > उमर
आद्य ऊ > ऊ - ऊद् > ऊद
(ऱ्हस्वीकरण) ऊ़ > उ - ऊ़दी > उदी
ए़,ऐ़,ओ़,औ़ - या स्वरांची उदाहरणे आढळत नाहीत. ऐ़न् > ऐन,ऐ़ब् > ऐब, ऐ़श् > ऐश, ऐ़शआराम् >ऐशआराम यासारखे तुरळक अपवाद आहेत. 'ऐ़ ' या संयुक्त स्वराचेही 'ऐ ' प्रमाणेच काही वेळा विश्लेषण झाले आहे.

व्यंजन - विचार
यात 'अ ' विभागात प्रथम फार्सीतून मराठीत आलेल्या शब्दांतील फार्सी व्यंजनांचा परिचय करून दिला असून 'आ ' विभागात आद्य,मध्य,अन्त्य स्थानी ते कितपत कायम राहतात व त्यात कोणकोणती परिवर्तने घडतात,याचा विचार केला आहे.
**अ विभाग**
i] कंठ्य व्यंजने - फार्सी ' क् ' व्यंजनाची दोन रूपे आहेतः काफ् (ک) या

उच्चार मराठी 'क्' प्रमाणे होतो तर नुक्तावाल्या काफ् (ق) चा उच्चार उच्च कंठ्य 'क़्' असा होतो.त्याचप्रमाणे ग् चेही दोन उच्चार आहेत. गाफ् (گ) चा उच्चार मराठी 'ग्' व्यंजनासारखा असून ग़ैन् (غ) चा उच्चार उच्च कंठ्य 'ग़्' असा आहे. क़् आणि ग़् हे दोन्ही उच्चार मराठीत नाहीत.'ख्' चा मराठी उच्चार फार्सीत नाही. 'खे' या फार्सी लिपिचिन्हाचा उच्चार 'ख़्' असा काहीसा उच्च कंठ्य वर्णासारखा होतो, तो मराठीत नाही.

'घ्' हा उच्चार फार्सीत नाही.

ii] तालव्य व्यंजने - च्, ज्, झ् हे उच्चार फार्सीत असले तरी 'छ्' आणि तालव्य 'झ्' हे उच्चार नसल्याने फार्सीत त्यांची लिपिचिन्हेही नाहीत.

iii] दन्त्यतालव्य व्यंजने - 'च़्','छ़्' हे मराठी दन्त्यतालव्य उच्चार फार्सीत नाहीत व त्यासाठी लिपिचिन्हेही नाहीत. 'ज़्' (फार्सी ज़े ز) हा उच्चार फार्सीत आहे पण त्याबरोबरच ज़् (ज़ाल् ذ), ज़् (ज़ोय् ظ) आणि ज़् (ज़्वाद् ض) ही त्यांची भावंडेही आहेत. ज़ाल्, ज़ोय्, ज़्वाद यांनी सिद्ध झालेले शब्द फार्सीत असून ते मराठीत आले आहेत,त्याबरोबर त्यांचे उच्चार ही मराठीत आले असावेत पण ते मराठी भाषकांना परिचित नसल्याने त्या सर्वांची परिणती मराठीने 'ज़्'(फार्सी ज़े ز) या उच्चारातच केली व त्यांचे लेखनही वेगळ्या लिपिचिन्हांनी केले नाही. एवढेच नव्हे तर 'ज़्' या दन्त्यतालव्य उच्चारासाठी हिन्दी भाषेने जसे वेगळे लिपिचिन्ह वापरले,ते तरी मराठीने कुठे वापरले ? तालव्य व दन्त्यतालव्य ज् व ज़् हे दोन उच्चार असल्यांने त्यांच्यासाठी फार्सीत अनुक्रमे जीम व जे ही दोन वेगळी लिपिचिन्हे आहेत. ज़ाल,ज़ोय्,ज़्वाद हे मूळ फार्सी उच्चार वेगळे होते हे दाखविण्यासाठी या ग्रंथात ती वेगळ्या लिपिचिन्हांनी दाखविली आहेत. प्रत्यक्षात मात्र मराठीने त्यांचे सरसकट लेखन 'ज्' असेच केले आहे. त्यामुळे तालव्य ज् आणि दन्त्यतालव्य ज् यांच्यातील उच्चारभेद परंपरेनेच ओळखावा लागतो.

iv] मूर्धन्य व्यंजने फार्सीत नाहीत, दन्त्य व्यंजनांचे मराठीकरण होताना त्यांचे रूपान्तर काही मूर्धन्य व्यंजनांत झाले आहे.

v] दन्त्य व्यंजनें - फार्सीत 'त्' चे दोन उच्चार आहेत : 'ते(ت)' या लिपिचिन्हाचा उच्चार मराठीच्या 'त्' सारखा होतो तर 'तोय्(ط)' या लिपिचिन्हाचा उच्चार 'त़्' असा आपल्या नेहमीच्या 'त्' पेक्षा वेगळा होतो. 'थ्' हा उच्चार कधी कधी 'से(ث)' या लिपिचिन्हाने दाखविला जातो.'ध्' हा महाप्राणयुक्त उच्चार फार्सीत नाही पण फार्सी 'ह्' युक्त शब्दांचेमराठीकरण होताना कधी कधी त्याचे 'ध' या उच्चारात रूपान्तर होते.(दम् दमह् > धमधमा)

१) मागे किंवा (२) पुढे 'र्' हे व्यंजन आल्यास दन्त्य व्यंजनांचे रूपान्तर कधी कधी मूर्धन्य व्यंजनात होते -

(१) कुर्तह् > कुडता,पर्दह् > पडदा,पडदा,फर्द् > फड,बर्तर्फ़् > बडतर्फ, मुर्दह् >मुडदा

२) देरह् > देरा, डेरादांडा,डेराबाड, डेरारावटी.

vi] ओष्ठ्य व्यंजने - प् ,फ् ,ब्, म् हे ओष्ठ्य उच्चार फार्सीत आहेत तथापि ' भ् ' हा उच्चार फार्सीत नाही. फार्सी शब्दांतील 'ब् 'चे मराठीकरण होताना कधी कधी महाप्राणत्व लाभल्याने त्याचे 'भ् 'या उच्चारात रूपान्तर होते. फार्सीतील 'फ़् ' हा उच्चार मराठी 'फ् ' पेक्षा वेगळा आहे. इंग्रजी एफ् (F) मधील दन्तोष्ठ्य 'फ़् 'च्या उच्चारासारखा तो आहे तथापि मराठीकरण होतांना त्यांचे मूळ स्वरूप शिल्लक राहिलेले नाही. आपण सर्वच त्यांचा उच्चार पारंपरिक मराठी 'फ् ' सारखाच करतो व त्याच्यासाठी वेगळे लिपिचिन्हही वापरत नाही. 'फ़् 'या फार्सी उच्चाराचे लेखन मराठीत 'फ् 'असेच होते.काही शब्दांत मराठीकरण होताना फार्सी 'फ़् 'चे महाप्राणत्व लोपते व तो अल्पप्राण 'प् 'चे रूप धारण करतो. 'ब् ' हा फार्सी उच्चार बहुधा मराठीत येताना कायम राहतो तथापि कधी कधी त्यास महाप्राणत्वही लाभते.

vii] अनुनासिके - फार्सीत 'न् ' आणि 'म् 'या अनुनासिकांबरोबर 'न् ' चे एक वेगळे रूप 'नूने गुन्ना' (नुक्ता नसलेला नून्) आढळते व त्याचा उच्चार 'आं ' असा होतो. हिन्दीने चंद्रबिंदू देऊन तो दर्शविला आहे 'जहाँ 'या शब्दात तो दिसतो पण मराठीने मात्र त्याचे 'जहान' हे बाळबोध,सुगम रूपच स्वीकारले. त्यामुळे फार्सी 'कारवाँ' या शब्दात हा उच्चार आहे पण मराठीने 'कारवान 'हा पर्यायच स्वीकारला.

मराठीकरण होताना 'न् 'चे रूपान्तर कधी कधी 'ण् ' या मूर्धन्य अनुनासिकात होत असले तरी फार्सीत मूळात 'ण् 'हा' उच्चारच नाही. फार्सी 'म् 'हा बहुधा अविकृत राहतो.

viii] अर्धस्वर - य् , व् : यांच्याबाबतीत य-श्रुती, व-श्रुती, य-लोप आणि व्-लोप या प्रक्रिया कशा घडतात, याचा विचार याच प्रकरणात अन्यत्र केला आहे.

**य** : फार्सी 'य् ' या अर्धस्वराशी मराठी 'य् ' चा उच्चार जुळतो तथापि 'य ' चा म्हणजे फार्सी 'ये(ی) ' या लिपिचिन्हाचा 'ई ' असा हा स्वरासारखा वापर होतो. त्याच्या खालच्या दोन नुक्त्यांनीही इकार/ ईकार दर्शविला जातो.मराठीतील 'य् 'या अर्धस्वराचा असा उपयोग केला जात नाही.वरील प्रक्रियांव्यतिरिक्त बहुधा फार्सीतून मराठीत येणारा 'य् ' हा उच्चार अविकृत राहतो.

**व्** : या अर्धस्वराचा उच्चार मराठी 'व् 'शी जुळता असाच आहे व त्याच्या बाबतीत व-श्रुती, व्-लोपादी 'य ' सारख्या प्रक्रिया घडतात. त्याचा विचारही या प्रकरणात अन्यत्र 'य् ' सोबत केला आहे. काही फार्सी शब्द मराठीत येताना व् > ब् अशी प्रक्रिया घडते. 'औ ' किंवा 'औ ' या फार्सी स्वराचे विश्लेषण होताना 'अव/अव् ' असे विभाजन होते. त्याची उदाहरणेदेखील या प्रकरणात अन्यत्र दिली आहेत (पाहा- 'स्वरविश्लेष '). 'व् 'हा उच्चार फार्सीत 'वाव् (و) 'या लिपिचिन्हाने दर्शवितात व तो जोडून फार्सी शब्दात

'ओ ' हा स्वरही सिद्ध होतो. मराठीत 'व् ' चा असा उपयोग केला जात नाही.

र्,ल् : हे अर्धस्वर फार्सीतून मराठीत येताना बहुधा अविकृत राहतात.र् > ड् ही प्रक्रिया काही फार्सी शब्द मराठीत येताना घडते. तिचा विचार दन्त्य व्यंजनाच्या संदर्भात केला आहे. (काही शब्दांत दन्त्य व्यंजनांच्या मागे वा पुढे 'र् ' हा उच्चार आल्यास त्याचे मराठीकरण होताना मूर्धन्यीकरण होऊन 'ड् 'या उच्चारात रूपान्तर होते.)

ix] ऊष्मे - मराठीतील श , ष , स् या ऊष्म्यांपैकी फार्सीत 'ष् ' हा उष्मा व उच्चार नाही.

श् : 'शीन्'( ش ) या लिपिचिन्हाच्या साहाय्याने 'श् 'हा उच्चार दर्शविला जातो.तो फार्सीतून मराठीत येताना बहुधा अविकृत राहतो तर क्वचित् त्याचे मराठीकरण होताना श् > ष् ही प्रक्रियाही घडते.

स् : हा उच्चार दर्शविणारा से( ث ), सीन्( س ) व स्वाद्( ص ) ही तीन लिपिचिन्हे फार्सीत आहेत. स् चा मूळ 'थ् ' सदृश उच्चार मराठीत होत नाही, त्याचप्रमाणे स्वादचा मूळ फार्सी उच्चारही मराठीत होत नाही.'सीन 'च्या 'स् ' या उच्चाराप्रमाणेच फार्सी शब्दांचे मराठीकरण होताना 'से 'व 'स्वाद् ' यांचे उच्चार मराठी 'स् ' या उच्चाराचेच रूप धारण करतात.या तिहींच्या बाबतीत घडणाऱ्या प्रक्रियांचा याच प्रकरणात अन्यत्र विचार केला आहे.

x] ह : हा महाप्राण उच्चार फार्सीत हे ( ح ) व हे ( ه ) या दोन लिपिचिन्हांनी दर्शविला जातो. मराठीत याच 'ह् ' चा एकच उच्चार असून त्यासाठी एकच लिपिचिन्ह आहे. फार्सी शब्द मराठीत येताना महाप्राणत्व कसे येते व महाप्राण-लोप कसा होतो , याचा विचार या प्रकरणात अन्यत्र केला आहे. त्याचप्रमाणे आद्य, मध्य व अन्त्य स्थानी 'ह् ' कितपत अविकृत राहतो, याचाही तेथे विचार केला आहे.

xi] ळ् : हा उच्चार फार्सीत नसल्याने त्यासाठी वेगळे लिपिचिन्हही नाही.मराठीत येणाऱ्या काही फार्सी-शब्दातील 'ल् 'चे रूपान्तर 'ळ् ' मध्ये होते.

xii] क्ष : हे संयुक्त व्यंजनही फार्सीत नाही पण फार्सी शब्दांचे मराठीकरण होताना काही वेळा क + स/ श् किंवा क़ + स् /श् तसेच ख़ + स्/श् यांची गोळाबेरीज होऊन 'क्ष ' मध्ये तिचे रूपान्तर होते.
(उदा. तक़्सीर् > तक्षीर, तक़्सीम > तक्षीम, बख़्शीश् > बक्षीस)

xiii] ज्ञ् : हे संयुक्त व्यंजन व त्याचा उच्चार फार्सी ध्वनिव्यवस्थेत नाही.त्यामुळे फार्सी शब्द मराठीत येताना हे व्यंजन त्यात आढळत नाही.

'आ ' विभाग

i] कंठ्य व्यंजने

क् (फार्सी लिपिचिन्ह 'काफ्' ک)

आद्य

i] अविकृत क - कारकर्द् > कार्‌कीर्द, कार्कुन् > कारकून, कार्ख़ानह् > कारखाना, काग़ज़् > कागद

ii] क् > ख् - किश्‌मिश् > खिसमिस

मध्य

अविकृत क् - ज़क़ात > जकात, तवक्कुल् > तवकल, ताकीद् > ताकीद,नोकरी > नोकरी,नेक्‌नज़र् > नेकनजर, शिकार्‌ख़ानह् > शिकारखाना.

अन्त्य

i] अविकृत क् - दस्तक् > दस्तक, नेकी > नेकी, नोकज़ौक् > नोकझोक.

ii] क् > ख् - पाल्की > पालखी, पोशाक् > पोशाख, मुल्क् > मुलूख

मध्यमप्राण क़ (फार्सी लिपिचिन्ह दोन नुक्त्यांचा 'काफ़' ق)

यात क़ > क हा सर्वसामान्य प्रवृत्ती आद्य, मध्य आणि अन्त्य स्थानी आढळते.

आद्य

i] क़ > क - क़ज़्ज़ाक़ > कजाग, क़र्ज़् > कर्ज, क़ल्अह् > किल्ला, क़लम् > कजम, क़ाइदह् > कायदा, क़ाज़ी >काजी, क़ानून् > कानू, क़ाफ़िलह् > काफिला, क़ाबीज़ > काबीज् . क़ासीद् >काशीद, क़ित्तअ > कित्ता, क़ीमत् >किंमत, क़ौल् > कौल

ii] क्वचित् क़ > घ् - क़ूफ़ी > घुघी

मध्य

i] क़ > क - कम्‌क़स्र् > कमकसर, कम्‌क़ूवत् > कमकुवत, तहक़ीक् > तहकीक, तवक्कुफ़् >तहकुब, फ़क़ीर् > फकीर.

ii] क़ > ख् - चिहिल्‌क़द् > चिलखत, मुलाक़ात् > मुलाखत

iii] क़ > ग् - तक़ाजा > तगादा, ताक़ह्>तागा, जिक़् जिक़् > जिग जिग, हक़ीक़त् > हकीगत.

iv] क़ > द्वित्त क् (क्वचित्)- अक़्ल् > अक्कल

अन्त्य

i] क़ > क् -ख़ल्क़् > खलक, तबक़् > तबक,बुंदूक़् > बंदूक, मुतअल्लिक़् > मुतालीक, मुत्ताबिक़् > मुताबिक, संदूक़् > संदूक.

ii] क्वचित् क़ >ख् -चालाक़् > चलाख, तलाक़् > तलाख.

iii] क़ > ग् -क़ज़्ज़ाक़् > कजाग, तौक़् > तोग,

iv](क्वचित) क़ > द्वित्त क - हक़् > हक्क.

ख़् (फार्सी लिपिचिन्ह 'ख़ै' خ )
ख़् > ख् हा सर्वसामान्य प्रवृत्ती आढळते.
उदा. ख़त् > खत, ख़बर् > खबर, ख़र्च् > खर्च, ख़लीफ़ह् > खलीफा, ख़ान्दान् >खानदान, ख़ासगी > खजगी,ख़ास्स् > खास, खासा, ख़ास्सदार > खासदार, ख़िल्अत् > खिलत, ख़िलाफ़त् > खिलाफत, ख़िदमत् >खिदमत,ख़ुद् > खुद, खुद, ख़ुदा > खुदा, ख़ुलासह् > खुलासा, ख़ैरात् > खैरात
मध्य
i] ख़् > ख् - अख़बार् > अखबार, आख़िर् > अखेर, कार्ख़ानह् > कारखाना, कार्ख़ानह्नवीस् > कारखानीस , जख़्म् > जखम,जख़्मानह् > जखमाना, दाख़िलह् > दाखला.
ii] ख़् > क् (महाप्राणलोप) - ज़ख़ीरह् > जकीरा, पुख़्तह् > पोक्त, सख़्ती > सक्ती.
अन्त्य
ख़् > ख् - याची उदाहरणे फारशी नाहीत - तारीख़् >तारीख.
ग् (फार्सी लिपिचिन्ह 'गाफ़' گ)
हा बहुधा अविकृत राहतो.
आद्य
गर्द् >गर्द, गर्दन् > गर्दन, गर्दी > गर्दी, गर्मी > गरमी,गिरफ़दारी>गिरफदारी, गुज़रान् >गुजराण, गुज़री > गुजरी,गुनाह्गार् > गुन्हेगार, गोशह् > गोशा.
मध्य
अगर् > अगर ,कमर्गाह् > कमरगा, कमरगुर्ज़् > कमरगुर्दा,ख़ोगीर् >खोगीर, गुनाह्गारी >गुन्हेगारी,जागीर् > जहागीर, जाय्गाह् > जागा, जिगर् > जिगर, जीगह् >जीगा,दिल्गीर् > दिलगीर,
अन्त्य
दंग् > दंग, नग् > नग, बांग् > बांग, बेग् > बेग
मध्यमप्राण ग़् ('फार्सी लिपिचिन्ह गैन्' غ)
आद्य - मध्य - अन्त्यस्थानी मध्यमप्राण 'क़् ' प्रमाणेच मध्यमप्राण 'ग़् ' चे रूपान्तर अल्पप्राण 'ग् ' मध्ये होते.
आद्य
i] ग़रीब् > गरीब, ग़ल्बत् >गलबत, ग़ुबार् > गुबार, ग़ुलाम् >गुलाम, ग़ैबी > गैबी,
ii] ग़् > घ् (महाप्राणत्व) - ग़ुम्बद् > घुमट, ग़ुस्सह् > घुस्सा, ग़ुसुल्ख़ानह् > घुसलखाना
मध्य
ग़् > ग् - काग़ज़् > कागद, जीग़ह् > जीगा, दग़ाबाज़् > दगाबाज् , दाग़िनह् > दागिना,पैग़ाम्बर् > पैगंबर, मुग़ोल् > मोगल

अन्त्य

ग़् > ग् - विराग़् > विराग्, दग़ा > दगा, दाग़् > डाग,
क्वचित् ग़् > क् (मब्लग़् > मुबलक) आणि ग़् > ख् (दिमाग़् > दिमाख)
असे परिवर्तनही घडते.

**तालव्य व्यंजने**

च् (फार्सी लिपिचिन्ह 'चीम्' چ )

तालव्य 'च् ' > दन्त्यतालव्य 'च्' ही एक सामान्य प्रक्रिया आहे
आद्य
i] च् > च् - चम्चह् > चमचा, चर्बी > चरबी, चाकर् > चाकर, चादर् > चादर,
चाप् > चाप, चुगली > चुगली, चोब्दार् > चोपदार, चौतरह् > चौतरा,चौथरा;
चौत़र्फ़ा > चौतर्फा
ii] अविकृत 'च् ' - चपरासी > चपरासी, चालाकी >चलाखी, चिक् >चीक,
चीज़् > चीज, चंदी > चंदी
iii] च् > छ् - चाप् > छाप, चापह् >छापा, चाप्ख़ानह् > छापखाना
मध्य
i] अविकृत च् - आचार् > आचार, बीचारह् >बिचारा, बीचोबह् > बिचवा,
मूर्चह् > मोर्चा, मूर्चह्बंदी > मोर्चेबंदी ,
ii] च् > च़् - चम्चह् > चमचा.
अन्त्य
i] अविकृत 'च् ' - कम्ची > कमची, ख़र्च् > खर्च, खर्ची ; ख़जान्ची > खजांची,
गची > गच्ची, दुम्ची > दुमची
ii] च् > च़् - ख़र्च् > खर्च, ख़र्ची > खर्ची, पेच् > पेच
iii] च् > ज् (क्वचित्) दीवान्ची > दिवाणजी.
'छ् ' हा उच्चार व हे व्यंजन फार्सीत नाही.
ज् (फार्सी लिपिचिन्ह 'जीम्' ج)
फार्सीतून मराठीत येणाऱ्या शब्दांत तालव्य ज् हा बहुधा अविकृत राहतो.
i] अविकृत ज् - जज़ीरह् > जंजिरा,जहाज़् >जहाज, जंग् > जंग, जंगल् >जंगल,
जदीद् > जदीद, जदीद्क़दीम् > जदीद कदीम,जल्द >जलद, जाज़िम् > जाजम,
जुलूस् > जलूस, जागीर् > जहागीर, जागीर्दार् > जहागिरदार, जोश् > जोश,
जौहर्,जवाहर् > जवाहिर
ii] ज् > ज़् - जवाब् > जाब, जम्अ् > जमा, जम्आत्दार् > जमादार, जासूस् >
जासूद, जान्वर् > जनावर, जोराब् >जोडा.

iii] (क्वचित्) ज् > झ् - जुल्ल् > झूल

मध्य

i] अविकृत ज् - अजीब > अजब, अंजीर् > अंजीर, गंजीफ़ह् > गंजिफा, खंजर् > खंजीर, ज़ंजीर् > जंजीर

ii] ज् > ज़् - इजारत् > इजारा, मुज्‌रा > मुजरा, मज्मुअ़दार् > मुजुमदार

अन्त्य

अन्त्य 'ज ' काही शब्दांत अविकृत राहतो (उदा : ताज् > ताज, ताराज् >ताराज, शत्रंजी > सतरंजी,हज् > हज,हज्ज) तर काही वेळा त्यांचे रूपान्तर ज् > ज़् असे होते. (येथे उच्चार बदलला तर 'ज्' असे लिपिचिन्ह हिंदीप्रमाणे मराठीत नसल्याने तसे नोंदविले मात्र जात नाही.) ज् > ज़् ही प्रक्रिया इलाज् > इलाज,फौज् > फौज यासारख्या शब्दांत दिसून येते.

**दन्त्यतालव्य व्यंजने**

ज़् (फार्सी लिपिचिन्ह 'जे' ژ)

आद्य

i] बहुधा हे व्यंजन अविकृत राहते. याची असंख्य उदाहरणे आहेत: ज़ख्म् > जखम, ज़बर्दस्त् > जबरदस्त,ज़बानी > जबानी, ज़मीन् > जमीन, ज़ख़्मानह् > जखमाना, ज़ख़ीरह् > जखीरा, ज़र् > जर,ज़िरिह् > जिरे, जिरेटोप,ज़ीनह् > जिना, ज़ोर् > जोर, ज़ोर्दार् > जोरदार

ii] ज़नानह् > जनाना, ज़नानह्ख़ानह् >जनानखाना, ज़िन् > जिन, ज़िन्बंदी > जिनबंदी,

यासारख्या शब्दांत ज़् >ज् असे परिवर्तन घडले आहे.

मध्य

मध्य 'ज़् ' च्या बाबतीत तीन प्रक्रिया आढळतात -

i] अविकृत ज़् - इज़ार्दार् > इजारदार,जाज़िम् > जाजम, हज़ार् >हजार

ii] ज़् > तालव्य ज् - अज़ीज़ी > अजीजी, जज़ीरह् > जंजिरा, ताज़ह् > ताजी, तेज़आब > तेजाब,दर्वाज़ह् > दरवाजा

आणि

iii] क्वचित ज़् > द् - आज़्मायिश् > अदमास

अन्त्य

फार्सी शब्दतील अन्त्य ज़् मराठीत येताना बहुधा अविकृत राहतो -

आवाज़् > आवाज, गोलंदाज़् > गोलंदाज, जहाज़् > जहाज, तेज़् > तेज, तीरंदाज़् > तीरंदाज, दस्तावेज़् > दस्तावेज, दस्तऐवज

क्वचित् ज़् > ज् अशी प्रक्रिया घडल्याचे दर्ज़ी > दरजी यासारख्या शब्दांत आढळते.

ज़ (फार्सी लिपिचिन्ह 'जाल्' ذ)
याची उदाहरणे फार नाहीत.
आद्य ज़् च्या बाबतीत ज़कात् > जकात, ज़ात् > जात /जातीने सारख्या शब्दांत
ज़् > ज् अशी प्रक्रिया घडते तर ज़ी-अल्-ह़ज् > जिल्हेज, ज़ील्क़अदह् > जिल्काद
यासारख्या शब्दात ज़् > ज् ही प्रक्रिया घडते.
मध्य ज् ची उदाहरणे अल्पस्वल्प आहेत. तो कधी ज् मध्ये परिवर्तित होतो (गुज़रान् >
गुजराण) तर कधी झ् मध्ये (नोक् ज़ौक् > नोकझोक ). काग़ज़् सारख्या शब्दातील
अन्त्य ज् चे परिवर्तन 'द् ' मध्ये होऊन 'कागद' हा मराठी शब्द सिद्ध होतो.
ज़् (फार्सी लिपिचिन्ह 'जोय्' ظ)
याची उदाहरणेही फार कमी आहेत. तो बहुधा 'ज़् ' या उच्चारात परिणत
होतो पण हे लिपिचिन्ह मराठीत नसल्याने त्याला 'ज् 'या रूपावरच समाधान मानावे
लागते.
आद्य
ज़ुल्म् > जुलूम
मध्य
इज़ाफह् > इजाफा,मुलाहिज़ह् > मुलाहिजा.

तअ़ज़ीम् सारख्या शब्दाचे ताजीम या शब्दात मराठीकरण होऊन ज़् >
तालव्य ज् ही प्रक्रिया घडते, पण हे अपवादात्मक आहे.
ज़् (फार्सी लिपिचिन्ह 'ज्वाद्' ض)
दन्त्यतालव्य व्यंजनातील या व्यंजनाचे शब्द मराठीत बरेच आले आहेत.त्यांतील अवस्था
अशा -
आद्य
i] ज़् > तालव्य ज् - ज़ामिन् > जामीन, ज़िद् > जिद्द, ज़ियाफ़त् > जाफत,
ज़िल्अ >जिल्हा.
ii] ज़् > ज् अशी प्रक्रियाही ज़रूर् > जरूर, ज़रूरी > जरूरी
यासारख्या शब्दांत आढळते.
मध्य
i] ज़् > ज् : फज़ीहत् > फजिती, फाज़िल् > फाजिल, मवज़िअ् > मौजे / जा.
रमज़ान > रमजान, हज़रत् > हजरत, हाज़िरी > हजेरी
ii] ज़् > ज् ही प्रक्रिया रिज़ामंद > रजावंत यासारख्या शब्दात घडली आहे तर महज़र्
> मझर यासारख्या शब्दात ज़् > झ् ही प्रक्रिया घडली आहे.
अन्त्य -
अन्त्य ज़् बहुधा ज् मध्ये परिणत होतो - काज़ी > काजी ,इवज़् > ऐवज,इवज़् >ऐवजी,
गैरमर्ज़ी >गैरमर्जी,गरज़् >गरज यासारख्या शब्दांची उदाहरणे या संदर्भात देता येतील.

दन्त्य व्यंजने

(१) त (फार्सी लिपिचिन्ह 'ते' ت)

फार्सी 'त्' (फार्सी 'ते' व्यंजनाचा उच्चार ) मराठीत आलेल्या शब्दातील आद्य, मध्य व अन्त्य स्थानी कायम असल्याची असंख्य उदाहरणे आहेत.

आद्य

i] अविकृत 'त्' - तख़्त् > तख्त, तक्त, तलाश् > तलाश, तसू > तसू ,तस्बीह् > तसबी,तस्वीर् > तसबीर, तह्सील् > तहसील, ताज् > ताज, ताज़ह् > ताजा, ताबूत् > ताबूत, तुर्बत् > तुर्बत, तेजाब् >तेजाब, ताक़ीद् > ताकीद,ताबिअ़ > ताबा.

ii] त् > ट् (क्वचित्) - तंग्चाई > टंचाई, तप्पह् > टप्पा

मध्य

अविकृत 'त्' -कोत्वाल् > कोतवाल, दस्तक् > दस्तक,दस्तूर् > दस्तूर, दौलत्आबाद् > दौलताबाद,नतीजह् > नतीजा, मत्ता > मत्ता, मरातब् >मरातब,मिअ़तैन् > मयातैन, मत्लब् > मतलब, सिताबी > शिताफी, हफ़्त्हजारी > हप्तहजारी, हफ़्तह् > हप्ता,

अन्त्य

इब्रत् >इब्रत, इमारत > इमारत, किफ़ायत् > किफायत, क़ीमत् > किम्मत, ग़ल्बत् > गलबत,ज़बर्दस्त् > जबरदस्त, ताबूत् >ताबूत, तुह्मत् > तोहमत, मुलाक़ात् > मुलाखत, या शब्दांत अविकृत 'त् ' चे दर्शन घडते.

अन्त्य 'त् ' चा लोप (मालिश्त् > मालिश) आणि त् > द् (ताक़त् > ताकद ) अशा काही प्रक्रियाही अपवादात्मक स्वरूपात आढळतात.

त़् (फार्सी लिपिचिन्ह 'तोय्' ط)

मराठीत फार्सी 'त़् ' हा उच्चार नसल्याने फार्सी शब्दांचे मराठीकरण होताना आद्य, मध्य या अन्त्य स्थानी त़् > त् ही प्रक्रिया घडणे स्वाभाविक आहे व तिचीही उदाहणे फार मोठ्या प्रमाणात आहेत -

आद्य

त़बक़् > तबक, त़र्फ़् > तरफ,त़रह् > तऱ्हा, त़लब् > तल्लफ, त़लाक़् > तलाक /ख, त़ाक़ह् >तागा, त़ालाब् > तलाब, त़ालिअ़ > तले, त़ालिअ़्यर् > तालेवार, त़ासह् > ताशा, त़ुर्रह् > तुरा, त़ूफान् > तुफान

मध्य

अ़त़्त़ार् > अत्तार, ख़ात़िर् > खातरी, खात्री, ख़ात़िर्जम्अ़ > खातरजमा, ज़ाबित़ह् > जाबती, बर्त़र्फ़ी > बडतर्फी, मत़्लब् > मतलब, वत़न् > वतन

अन्त्य

याची उदाहरणे त्या मानाने कमी आहेत.

ख़त़् > खत, ख़रीदीख़त़् > खरेदीखत, फ़क़त़् > फक्त, फ़ारिग़ख़त़् > फारकत.

द् (फार्सी लिपिचिन्ह 'दाल्' د)

आद्य

अविकृत 'द्' - दअ्वा > दावा, दअ्वत् > दावत, दग़ा > दगा, दर्वाज़ह् > दरवाजा, दब्दबह् > दबदबा,दाख़िलह् > दाखला, दाग़िनह् > दागिना, दालान् > दालन, दारू > दारू, दीवान् > दिवाण,दंग् > दंग, दंगह् > दंगा.

द् > ड् : दबीर् > डबीर, दाव् > डाव, दाग़दोज़ी > डागडुजी, देरह् > डेरा, देग् > डेग

(क्वचित्) द् > ज् - दिक् > जख

मध्य

i] अविकृत द् - अदब > अदब, अ्दावत् > अदावत,उ्मदह् > उमदा, ख़िदमत् > खिदमत, ख़िद्मत्गार् > खिदमतगार, ताब्दान् > तावदान,दब्दबह् > दबदबा, मदार् > मदार, मुद्दत् > मुदत, राह्दारी > रहदारी

ii] क्वचित द् > ज् (मुदारात् > मुजारत)किंवा द्-लोप (मज़्दूरी > मजुरी,मज्दूर् > मजूर) या प्रक्रियाही आढळतात.

अन्त्य

i] अविकृत द् - अदा > अदा, कार्कर्द् > कारकीर्द, खुदा >खुदा, ताक़ीद् > ताकीद, दर्द् > दर्द, दाद् > दाद, जिहाद् >जिहाद, नामर्द् > नामर्द, फ़र्याद् > फिर्याद, फसाद् >फसाद

ii] द् > त् - ताहद् > तहत, मज़्बुदी > मजबुती, रिज़ामंद् > रजावंत

iii] व्दित्तीकरण - ख़ुद् >खुद्द, रद् > रद्द, ज़िद् > जिद्द, रद् > रद्द, ह्द् > हद्द

न् (फार्सी लिपिचिन्ह 'नून्' ن)

याचा उच्चार मराठी न् - सदृश आहे. तो बहुधा मराठीत येताना अविकृत राहतो. मध्य वा अन्त्य स्थानी काही वेळा त्याचे मूर्धन्यीकरण होते - म्हणजे 'ण्' त रूपान्तर होते. आद्य न् चे असे रूपान्तर मात्र कधीच होत नाही.

आद्य

अविकृत न् - नफ़अ् > नफा, नअ्लबंदी > नालबंदी, नाजुक् > नाजुक, नान् >नान, नामर्द् > नामर्द, नामंज़ूर् > नामंजूर, नादान् > नादान, नादार् > नादार, नालिश् > नालस्ती,नीस्त्नाबूद् > नेस्तनाबूद, निशान् > निशाण, नुक्सान् > नुकसान, नूर् > नूर, नेफ़ह् > नेफा

मध्य

i] अविकृत न् - अक्बर्नामह् > अकबरनामा, अनार् > अनार, कार्ख़ानह्नवीस् >कारखानीस,ख़ानगी > खानगी, ग़नीम् > गनीम, फ़ानूस् > फानस, फ़ार्सीनवीस् >पारसनीस,रवानगी > रवानगी, सनद् > सनद

ii] न् > ण् - दानह्दानह् > दाणादाण,देहनगी > देणगी, चिट्नवीस् >चिटणीस,

फ़र्द्नवीस् > फडणीस, सर्नौबत् > सरणोबत.

iii] व्दित्तीकरण - जिन्स् > जिन्नस.

iv] अनुनासिक - लोप : ज़मीन्दार् > जमीदार, मंज़िलह् > मजला, सरंजामी > सरजामी (मम)

अन्त्य

अविकृत न् - आज़ान् > आजान, कार्कुन् > कारकून, गुमान् > गुमान, जवान् > जवान, ताब्दान् > ताबदान,दूकान् > दुकान, नादान् > नादान, नुक्सान् > नुकसान, मिहिर्बान् > मेहेरबान, मुसुल्मान् > मुसलमान,रवाना > रवाना.

न् > ण् - कुर्आन् > कुराण, गुज़्रान् > गुजराण, दीवान > दिवाण,निशान् > निशाण, मौलाना > मुलाणा/णी, फ़लान् > फलाणा.

न् - लोप - क़ानून् > कानू (कायदेकानू), यकसान् > एकसा.

**ओष्ठ्य व्यंजने**

प् (फार्सी लिपिचिन्ह 'पे' پ)

याचा उच्चार मराठी 'प्' सारखाच होतो. हा बहुधा आद्य, मध्य व अन्त्य स्थानी अविकृत राहतो, क्वचित् अन्त्य स्थानी त्यात महाप्राणत्व येते. मध्य वा अन्त्य स्थानांपेक्षा आद्य स्थानाची उदाहरणे विपुल आहेत.

आद्य

अविकृत 'प्' - पर्वानह् > परवाना, पाजामह् > पायजामा, पादशाह् > पादशाह् , पाल्की > पालखी, पीर् > पीर, पेच् > पेच, पुर्शिस् > पुराशिस, पेशह् > पेशा, पेश्वा > पेशवा, पैदाइश् > पैदास, पुख़्तह् > पोक्त, पोतह्दार् > पोतदार, पोतह्नवीस् > पोतनीस.

मध्य

अविकृत 'प्' - गप्शप् >गपसप, गपशप, चपरासी > चपरासी, चापी > चापी, पापोश् > पायपोस, पाय्पियादह् > पायप्यादा, सिपर् > शिपर, सिपाही > शिपाई, सिपाहीगीरी > शिपाईगिरी.

अन्त्य

i] अविकृत 'प्' - गप् > गप्प, गप्पा, चुप् > चूप.

ii] प् > फ - तोप् > तोफ (महाप्राणत्व)

फ़् (फार्सी लिपिचिन्ह 'फे' ف)

याची आद्य,मध्य,अन्त्य या सर्वच स्थानांची विपुल उदाहरणे आहेत.त्या सर्वातच फ़् > फ् ही प्रक्रिया घडली आहे थोड्याफार ठिकाणी फ़् > प किंवा फ़् > ब् असे परिवर्तनही आढळले

आद्य

i]फ़ > फ् - फ़क़ीर् > फकीर, फ़र्ज़ी > फर्जी, फ़त्ह् > फत्ते, फ़तूही > फत्तू.

फ़र्माइश् > फर्माईश, फ़रार् > फरार, फ़र्मान् > फर्मान, फ़लान् > फलाणा,
फ़साद् > फसाद, फ़ाइदह् >फायदा, फ़ौज् > फौज
ii] फ़ > प् (महाप्राणलोप) - फ़ार्सी >पारशी, फ़ार्सीनवीस् > पारसनीस,
फ़ीरूजह् > पेरोज
मध्य
i] फ़ > फ् - अफ़्रातफ़्रीक् > अफरातफर, क़ाफ़िर् > काफिर, ग़ाफ़िल् > गाफिल,
तूफ़ान् > तुफान,लिफ़ाफ़ह् > लिफाफा, सफ़र् > सफर, सफ़ाई > सफाई, सफ़ेद् >
सफेद, सिफ़ारिश् > शिफारस.
ii] फ़ > प् (महाप्राणलोप) - तफ़्सील् > तपशील, तफ़हहुस् > तपास, हफ़्तह् >
हप्ता, हफ़्तहज़ारी > हप्तहजारी,हफ़्तह्बंदी > हप्तेबंदी, हाफ़ीज़् > हपीसजी
iii] फ़ > ब् (क्वचित्) - सफ़नवीस् > सबनीस, सफ़नवीसी > सबनिशी
अन्त्य
i] फ़ > फ - तश्रीफ़ > तशरीफ, तश्रीफ (मम), तारीफ़ > तारीफ, बर्फ़ > बर्फ,
बर्फ़ी > बर्फी, मुन्सिफ़ > मुनसफ, सर्राफ़ > सराफ, साफ़ > साफ, साफ़ी > साफी.
ii] (क्वचित्)फ़ > प् (महाप्राणलोप) - हरीफ़ > हरीप
किंवा फ़ > ब् - वाक़िफ़् > वाकब
ब (फार्सी लिपिचिन्ह 'बे' ب)
याचीही पुष्कळ उदाहरणे आहेत. आद्य स्थानी हे व्यंजन बहुधा अविकृत राहते. मध्य
आणि अन्त्य स्थानीही जवळपास तीच अवस्था आढळते तथापि ब् > प्,व् ; ब् - लोप
किंवा ब् > भ् (महाप्राणत्व) अशी काही परिवर्तनेही आढळतात.
आद्य
अविकृत 'ब्' - बदल् > बदल, बद्दल,बयान् > बयाण, बर्कत् > बरकत,
बर्ख़ास्त् > बरखास्त, बर्दाश्त् > बडदास्त, बर्बाद् > बरबाद, बर्हुक्म् > बरहुकूम,
बराबर् > बराबर, बरोबर ; बाजार् > बाजार, बायको > बायको, बेइज्जत् > बेइज्जत,
बेगम् > बेगम, बेगमी > बेगमी, बेज़ार् > बेजार, बंदी >बंदी, बुंदूक़ > बंदूक
मध्य
i] अविकृत 'ब्' - अक्बर् > अकबर, अक्बरी > अकबरी, अख़्बार् > अखबार,
आबाद् > आबाद, क़ाबीज़् > काबीज, ग़ुबार् > गुबार, ज़बानी > जबानी, ताबिअ़
>ताबा,ज़बर्दस्त् > जबरदस्त,ज़बानी > जबानी, ताबिअदारी > ताबेदारी.
ii] ब् > प् - चोब्दार् > चोपदार, ज़ब्त् > जप्त,मुदबख़्ख़ानह् > मुदपाकखाना,
हब्शी > हपशी (मम)
iii]ब् > भ् (महाप्राणत्व ) - दुर्बीन् > दुरर्भीण (मम), सूबह् > सुभा, सूबहदार् >
सुभेदार

iv] ब् > य् - ताब्दान् > तायदान, ताबह् > तवा
v] ब् - लोप - तुम्बान् > तुमान, दुम्बाल् > दुमाला.
अन्त्य
i] अविकृत 'ब्' - अस्बाब् > असबाब, आब् > आब, किताब् > किताब् ,गुराब् > गुराब,जनाब् > जनाब, नव्वाब् >नवाब, नसीब् > नशीब, सबब् > सबब, साहिब् > साहेब.
ii] ब् > प् - किम्ख़ाब् > किनखाप, किमखाप;
iii] ब् > फ् (क्वचित्) - सिताबी > शिताफी
iv] ब् - लोप (क्वचित्) - जोराब् > जोडा
भ् हे व्यंजन फार्सीत नाही.
म् (फार्सी लिपिचिन्ह 'मीम्' م )
फार्सीतून मराठीत येणाऱ्या शब्दातील 'म्' हे अनुनासिक आद्य,मध्य व अन्त्य स्थानी बहुधा अविकृतच राहते. क्वचित् मध्य स्थानी त्यात दोनतीन परिवर्तने होतात.या तिन्ही स्थानांतील 'म्' ची भरपूर उदाहरणे देता येतील.
आद्य
मकान् > मकान, मक़्अ > मक्ता, मज़्कूर् > मजकूर, मज़्दूरी > मजुरी, मज़्बूद् > मजबूत,मर्दुमी > मर्दुमी, मर्दुमकी; मुर्दह् > मुडदा, मुज्रा >मुजरा, मुजावर् > मुजावर.
मध्य
i] अविकृत म् - गुमाश्तह् > गुमास्ता, दम्दम्ह् > धमधमा, ज़मीन् > जमीन,नमूनह्> नमुना, फ़र्मान् > फर्मान,मुआमलह् > मामला, मुसुल्मान् > मुसलमान
ii] म् > व् - अक्ल्मंद् > अक्कलवंत, रिज़ामन्द् > रजावंत
iii] (क्वचित्) म् - लोप - ह्म्लह् > हल्ला.
iv] द्वित्तीकरण - अमल् > अम्मल, अमल् दार् > अम्मलदार, कीमत् > किम्मत
अन्त्य
अविकृत म् - इन्आम >इनाम,इमाम् > इमाम,गर्म् > गरम,शर्म् > शरम
अर्धस्वर
विशेष ध्वनिपरिवर्तन - प्रक्रियांचे विवेचन करताना अर्धस्वरांच्या संदर्भात विशेषतः य् आणि व् यांच्या संदर्भात तपशीलवार विचार केलाच आहे. 'य्'- श्रुती,'व्'-श्रुती य् - लोप, व् - लोप या प्रक्रिया कशा घडतात, ते त्यावरून लक्षात येईलच. त्याशिवाय 'य्' आणि 'व्' ची आद्य - मध्य - अन्त्य स्थानी स्थिती कशी असते, ते पुढील विवेचनावरून कळेल.
य् (फार्सी लिपिचिन्ह 'ये' ی)
आद्य
i] अविकृत 'य्' - यक़ीन् > यकीन, यग़ान्गत > यगानगत, यतीम् > यतीम,

यहूदी > यहूदी, या > या, याद् > याद, याकूत् > याकूत, यादगार् > यादगार, याद्दाश्त् > याददास्त, याद् > यादबूद

ii] य् > ए - ही प्रक्रिया अनेक शब्दांच्या बाबतीत घडते. या शब्दात आलेला ए संस्कृतपासून नसून फार्सीपासून आला आहे, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते. यक्ज़र्रह् > एकजरा, यक्तर्फ़ह् > एकतर्फी,यक्दम् > एकदम, यकदिल् > एकदिल, यकदिली > एकदिली,यक् - रकम् > एकरकमी, यकायक् > एकाएकी, यकी > एकी

मध्य

अविकृत 'य्' - क़ियास् > कयास, ख़याल् > ख्याल, दर्मियान् > दरम्यान, पाय्जामह् >पायजमा,पाय्ख़ानह् > पायखाना, पायबंद > पायबंद, पाय्माली > पायमल्ली, बायको > बायको,रईयत् > रयत, मय्यित् > मयत, रिआयत् > रया,रयाल; ह़यात् > हयात्

अन्त्य

याची उदाहरणे कमी आहेत - गोया > गोया, बमय् > बमय, बराय् > बराय

र् (फार्सी लिपिचिन्ह 'रे' ر)

आद्य

अविकृत 'र्' - रइयत् > रयत, रमज़ान् > रमजान, रवानह् > रवाना, रसद् >रसद, रसीद् > रसीद,राज़ी > राजी, राज़ीनामह् > राजीनामा, रास्तह् > रस्ता, रिसालह् > रिसाला,रुक्अह् > रोखा, रूमाल् > रुमाल, रोज़् > रोज, रोज़ी > रोजी,

मध्य

i] अविकृत 'र्' - अराबह् > अराबा, इरादह् > इरादा, ईरानी > इराणी, तारीख़् > तारीख, तारीफ् > तारीफ, नाराज़ी > नाराजी, फरार् > फरार, बराबरी > बराबरी,बरोबरी.

ii] र् > ड् - जर्जौहर् > जडजवाहिर, जोराब् > जोडा, बर्तर्फ़ > बडतर्फ, बर्दाश्त् > बडदास्त, मुर्दह् > मुडदा.

अन्त्य

आज़ार् > आजार, क़रार् > करार, ज़ोर् > जोर, तीर् > तीर, तोब्रा > तोबरा, दफ़्तर् > दप्तर, दर्बार् > दरबार, दस्तूर् > दस्तूर, सर्दार् > सरदार, सवार > स्वार

ल् (फार्सी लिपिचिन्ह 'लाम' ل)

हा अर्धस्वर विविध स्थानी बहुधा अविकृत राहतो

आद्य

लक़ब् > लकब, लज़्ज़त् > लज्जत, लफ़ंग् > लफंगा, लवाज़िमह् > लवाजमा, लश्कर् > लश्कर, लाचार् > लाचार,लाजवाब् > लाजवाब, लाल् > लाल, लिगाम् > लगाम, लिफ़ाफ़ह् > लिफाफा, लुचह् > लुच्चा, लुत्रह् > लुतरा, लुबान् > लोबान.

मध्य

या अविकृत ल ही प्रमुख अवस्था असून काही वेळा द्वित्तीकरण तर क्वचित् ल् > ळ् या प्रक्रिया आढळतात

i] अविकृत ल् - अल्लाह् > अल्ला, अलाहिदह् > अलाहिदा, इ़लाज् > इलाज, ग़िल्चह् > गिलच्या, जलाल् > जलाल, जुलूस् > जलूस, तलाश् > तलास, मुसुल्मान् > मुसलमान,सलाम् > सलाम

ii] द्वित्तीकरण - ग़लत् > गल्लत, ग़िलह् > गिल्ला, पलह् > पला, सलाह् > सल्ला, सल्लामसलत.

iii] ल् > ळ् (क्वचित्) - मलाहीखुर् > मळईखोर.

अन्त्य

अविकृत ल् - अक़्ल् > अक्कल, क़बुली > कबूल, क़ौल् > कौल, मअ़मूल् > मामूल, मुआमलह् > मामला, माल् > माल, मुल्ला > मुल्ला

व् (फार्सी लिपिचिन्ह 'वाव्' و)

'व्'- श्रुती व व् - लोप या प्रक्रियांविषयी या प्रकरणात अन्यत्र विचार केलाच आहे. मराठीत येणाऱ्या फार्सी शब्दांतील 'व्' बहुधा आद्य, मध्य वा अन्त्य स्थानी कायम राहतो. क्वचित् व् > ब् असे परिवर्तन घडते.

आद्य

वकील् > वकील, वग़ैरह् > वगैरे, वज़न् > वजन, वज़अ् > वजा, वज़ीर् > वजीर, वतन् > वतन,वर्दी > वर्दी, वाइदह् > वायदा, वासितह् > वास्ते, वारिस् > वारस, वाह्वाह् > वाहवा, वुक़ूफ् > वकुव

मध्य

अविकृत 'व्' - इ़वज़् > ऐवज, ऐवजी ; जान्वर > जनावर, जवान् > जवान, तवक्कुल् > तवकल,तवानह् > तवान, रवानह् > रवाना, रवानगी > रवानगी, लवाज़िमह् > लवाजमा, सवार् > स्वार,सवारी > स्वारी,

ii] (क्वचित्) व् >ब् - जवाब् > जबाब

अन्त्य

आवा > आवई, इस्तावा > इस्तावा, ईसवी >इसवी, पैरवी > पैरवी,मौलवी > मौलवी

ऊष्मे

श् (फार्सी लिपिचिन्ह 'शीन्' ش )

फार्सी 'श्' मराठीत येताना विविध ठिकाणी बहुधा कायम राहात असला तरी श् > स् हीही त्याच्यासारखीच एक सर्वसामान्य प्रक्रिया आहे. क्वचित श् > छ् असे ही रूपान्तर होते

आद्य

i] अविकृत 'श्' - शक् > शक,शर्त् > शर्यत,शर्त;शल्क् > शिलगावणे, शहर > शहर, शहर्पनाह् > शहर्पन्हा,शादी > शादी,शान् > शान, शाल् > शाल, शाह् > शहा, शहाजी; शाह्जादह् > शहाजादा,शिकस्त् > शिकस्त, शिकार् > शिकार, शुह्रत् > शहारत (मम), शेख़ी > शेखी, शेर् > शेर, शौक् > शोक

ii] श् > स् - शतरंजी > सतरंजी , शव्वाल् > सवाल, शुमार् > सुमार, सुमारे, शुरुअ् > सुरू,सुरवात; शुहूर्सन > सुरुसन, शैतान् > सैतान,

iii] श् > छ् (क्वचित्) शबानह् > छबिना, शान् > छान,शान्-उ-शोकत् > छानछोकी,

iv] श् > ष् (क्वचित्) शरीक् > षरीक

मध्य

i] अविकृत 'श्' - आशिक् > आशक,इशारह् > इशारा, परेशानी > परेशानी, पेशह् > पेशा,पोशाक् > पोशाख,मआशुक् > माशूक, मशहूर > महशूर, (वर्णविपर्यय), मशाल् > मशल, मशारुन्इलैह् > मशारनिल्हे,मश्गूल् > मशगूल.

ii] मध्य श् > स् ची उदाहरण आढळत नाहीत.

iii] श् > ष् (क्वचित्) - गोशह् > गोषा (गोशा हे रूपही प्रचलित आहे.) ,लश्कर् > लष्कर,लश्करी > लष्करी,सर्लश्कर् > सरलष्कर,'पोशाख' प्रमाणे 'पोषाख' हे रूपही प्रचलित आहे.

अन्त्य

i] अविकृत श् - गुंजाइश् > गुंजाइशी, पर्वरिश् > परवेशी, पर्वरिशी, पेश् > पेश, फ़र्माइश् > फर्माइश,फ़र्श् > फरशी, रविश् > रवेश, हबशी > हबशी

ii] श् > स् - आज़्मायिश् > अजमास, आरायिश् > आरास, ख़श्ख़श् >खसखस, तलाश् > तलास,तश्वीश् > तोशीस, पाय्पोश् > पायपोस, फ़र्माइश् > फर्मास, फ़र्राश् > फरास, शाद्बाश् > शाबास

स् (फार्सी लिपिचिन्ह 'सीन्' س)

याची उदाहरणे विपुल आहेत.

अविकृत स् - स् > श् या या वर्णाच्या प्रमुख प्रवृत्ती आहेत. स् > ज्, स् > द् स् > छ् अशी परिवर्तनेही काही शब्दांत झाल्याचे आढळते.

आद्य

i] अविकृत 'स्' - सख़्त् > सक्त, सन् > सन, सनद् > सनद, सफ़ेद > सफेद, सबब् > सबब,संगीन् > संगीन, सर्दार् > सरदार, सामान् > सामान, सुक्कान् > सुकाणू, सुल्तान् > सुलतान

ii] स् > श् - सर् > शिर, सर्पेच् > शिरपेच, सिक्कह् > शिक्का,सिताबी > शिताफी, सिपाही > शिपाई, सिफ़ारिश् > शिफारस, सिह्बंदी > शिबंदी, सियासत् > शास्त, सिल्ह्दार् > शिलेदार, सिल्ह्पोश् > सिलेपोश, सिवाअ् > शिवाय.

मध्य

i] अविकृत स् - अफ़सोस् > अफसोस, अस्प्सवार् > अस्पस्वार, आस्मान् > अस्मान, कसब् > कसब,क़सम् > कसम,पस्त् > फस्त, पास्बान् > पासबान, बिस्मिल्ला > बिसमिल्ला, मस्नद् > मसनद,मसीहा > मसीहा, मुसव्वदह् > मसुदा, मुस्लिम् > मुस्लिम, मौसम् > मोसम.

ii] स् > श् - बिसात् > बिशाद, मस्जिद् > मशीद,पसंद् > पसंत.

iii] स् > ज् (क्वचित्) - अस्बाब् > अजबाब

Iv] स् > छ् -(क्वचित्) - बिसात् >बिछायत

अन्त्य

i] अविकृत - कार्ख़ानह् - नवीस् > कारखानीस, चिट्नवीस् > चिटणीस, जल्सह् > जलसा, जुलूस् > जलूस,फ़र्द्नवीस् >फडणीस, फ़ार्सीनवीस् > पारसनीस, मज्लिस् > मजलिस

ii] स् > श् - कार्ख़ानह्नवीसी > कारखानिशी, ख़ासनवीस् > खासनिशी, चिट्नवीसी > चिटणीस,फ़र्द्नवीसी > फडणिशी, फ़रासीसी > फराशी.

स़् (फार्सी लिपिचिन्ह 'स्वाद' ص)

याचे लेखन मराठीत 'स्' असेच झाले आहे.

आद्य

(१) स़् > स् - स़हीह् > सही, स़ैफ् > सइफ, स़दर् > सदर, स़दाक़त् > सदाकत, स़फ़र् > सफर, स़बूर् > सबूर,स़र्राफ़् > सराफ, स़लाह् > सल्ला, स़ाबून् > साबण, स़ुबह् > सुभा, स़ुराही > सुरई.

(२) स़् >श् - स़ैकल् > शिकल, स़ैक़ल्गर् > शिकलगार, स़िहत्ख़ानह् > शेतखाना.

मध्य

स़् > स् - अस़ल् > अस्सल, इन्स़ाफ़् > इन्साफ,क़िस्स़ह् > किस्सा, तस़वीर् > तसबीर, फ़स़ल् > फसल,फ़ुर्स़त् > फुरसत, फ़ैस़लह् > फैसला, मक़्स़ूद् > मकसूद, मस़ालिह् > मसाला.

स़् > श् (क्वचित्) - तह्स़ील् > तहशील,नस़ीब् >नशीब,नशीबवान;क़ास़िद् >काशीद.

अन्त्य

स़् > स् - ख़लास़् > खलास, ख़ास़् > खास, खुसूस़् > खुसूस,ग़ौस़् > गवस, तफ़हहुस़् > तपास.

स़् > श् - (क्वचित्) - ख़लास़ी > खलाशी, ख़ास़् > खाशी.

ह़् (फार्सी लिपिचिन्ह 'है' ح )

याविषयी महाप्राणत्व व महाप्राणलोप, ह् - आगमादी चर्चा याच प्रकरणात अन्यत्र केली आहे.येथे 'ह्' च्या स्थानांचा विचार करीत आहे. मराठीत 'ह्' साठी (फार्सी है व हे याप्रमाणे ) दोन उच्चार व दोन लिपिचिन्हे नाहीत. त्यामुळे त्या दोहोंचे लेखन 'ह् '

असेच मराठीत होते. आद्य व मध्य स्थानी हा 'ह़' बहुधा अविकृत राहतो -

आद्य

ह़क़् > हक्क, ह़क़्दार् >हक्कदार, ह़क़्रसूम् > हक्करसूम, ह़क़ीक़त् >हकीगत, ह़कीम् >हकीम, ह़ज़रत् > हजरत,ह़ाज़िर् >हजर, ह़ाज़िर्जवाब् > हजरजबाबी, ह़द् > हद्द, ह़यात् > हयात, ह़र्कत् > हरकत, ह़ाल् > हाल.

मध्य

अह़काम् > अहकाम, अह़वाल् > अहवाल, सरह़द् > सरहद्द, साह़िब् > साहेब, सिह़बंदी >शिबंदी.

अन्त्य

याची उदाहरणे फार कमी आहेत. बहुतेक उदाहरणे 'है' ऐवजी 'हे' ची आहेत. त्याचे विवेचन त्या संदर्भात केलेच आहे.

ह् (फार्सी लिपिचिन्ह 'हे' ه)

आद्य

हज़ार् > हजार, हफ्तह् > हप्ता, हर्कारह् > हरकारा, हराज् > हराजी, हरासी, हरावुल् > हरोल, हवा > हवा, हाय् > हाय,हिज्री > हिजरी, हिम्मत् > हिम्मत, हुश्यार् > हुशार, हंगाम् > हंगाम, हंगामी > हंगामी.

मध्य

अविकृत 'ह्' - ज़हर् > जहर, जहाज़् > जहाज, जहान् > जहान, ज़ाहिर् > जाहीर, तह्ख़ानह् > तहखाना,तह्नाल् > तहनाल, माहीनह् > माहिना, मुहिम् > मोहीम, मुहरह्दार् > मोहरेदार, शहर् > शहर,शाह्ज़ादह् > शहाजादा, शाह्ज़ीरह् > शहाजिरे, शह्मत् > शहामत.

अन्त्य

अन्त्य ह् चे रूपान्तर त्याच्यापूर्वीच्या 'अ' स्वरात मिसळून 'आ' असे होते,याविषयी याच प्रकरणात महाप्राणलोपाच्या संदर्भात पुढे विवेचन केलेच आहे.

(अपवाद : शह् > शह)

## काही विशेष ध्वनिपरिवर्तने

### स्वरभक्ती

फार्सी शब्दांचे मराठीकरण होत असताना जे ध्वनिपरिवर्तन फार मोठ्या प्रमाणात होते, त्यात स्वरभक्तीला अग्रक्रम द्यायला हवा. मराठी भाषकांना फार्सीसारख्या परकीय भाषेचा प्रथमच परिचय होत असल्याने स्वरभक्तीसारखे ध्वनिपरिवर्तन या प्रमाणात होणे अगदी स्वाभाविकच होते. अ,आ,इ,ई,उ,ऊ, ओ या जवळपास सर्वच स्वराच्या साहाय्याने ही प्रक्रिया घडली आहे. 'अ' आणि 'अ़' ह्या स्वराच्या साहाय्याने घडलेल्या स्वरभक्तीची उदाहरणे असंख्य आहेत.

१)अ - अक्स् > अकस, अमलदार् > अंमलदार, अल्फ़ > अलफ,इश्रीन् > अशरीन, इस्म् > इस्म ,उम्दह् > उमदा,उम्र > उमर, कोर्निशात् > कुरनिसात, ख्वाहिश् > खवायष(मग), गर्शह् > गरगशा, तज्वीज़् > तजवीज,तर्कश् > तरकश, तर्कीब् > तरकीब, दुम्ची > दुमची, निस्बत् > निसबत, पर्वानह् > परवाना, पेश्क़ब्ज़ > पेषकबज, फ़र्माइश् > फरमास

२) आ - कार्गीर् > कारागीर, महल् > महाल

३) इ - फ़िक्र > फिकिर

४) ई - ज़िक्र > जिकीर

५) उ - तुर्क >तुरूक

६) ऊ - गुर्ज़बर्दार् > गुरुजबरदार, ज़ुल्म् >जुलूम, मुल्क़ > मुलुख, हुक्म् > हुकूम

**स्वरलोप**

यात (१) आद्य स्वरलोप व (२) आद्येतर स्वरलोप असे दोन प्रकार आढळतात. पहिल्या प्रकाराची उदाहरणे अशी -

आइन्दह् > यंदा (आ - लोप)

मुहम्मद > महमद (उ -लोप)

पर्गनह् > प्रगणा (अ - लोप) - (मग)

सवार् > स्वार (अ - लोप)

सवारी > स्वारी (अ - लोप)

उह्दह् > हुद्दा (उ - लोप)

दुसऱ्या प्रकाराची तरह् > तऱ्हा,फ़कत् > फक्त, मशालिह् > मसाला इ. उदाहरणे देता येतील.

**स्वरविश्लेष**

ऐ आणि औ या संयुक्त स्वराच्या बाबतीत एक वैशिष्ट्यपूर्ण परिवर्तन घडते,त्याची नोंद येथे घेणे आवश्यक वाटते. मध्ययुगीन मराठीत हे परिवर्तन घडत नव्हते असे नाही. ऐ व औ या संयुक्त स्वरांचे मूळ घटक अनुक्रमे अ + इ आणि अ + उ,ऊ यांच्यात हे विश्लेषण होत असे. मध्ययुगीन मराठीत आलेल्या अरबी - फारसी शब्दांच्या बाबतीतही हे घडते पण थोड्या वेगळ्या स्वरूपात. 'मैदान्' मधील ऐ या संयुक्त स्वरांचे विभाजन अ + इ असे होऊन मध्ययुगीन मराठीत त्याचे रूपान्तर 'मइदान' असे होते * तर 'कौल' या शब्दातील 'औ' या संयुक्त स्वराचे विभाजन अ + उ असे होऊन त्याचे रूपान्तर 'कऊल' या शब्दात होते. तथापि अनेकदा 'औ' या संयुक्त स्वराचे विभाजन अ + व (एक स्वर आणि एक अर्धस्वर) असे होते. उदा. -

औक़ात् > अवखाद, औक़ाफ़् > अवकाफ, औरंगजेब् > अवरंगजेब, औरंगाबाद > अवरंगाबाद, औलाद् > अवलाद, औलिया > अवलिया, दौलत् > दवलत, हैवान् > हयवान'.

खरे तर आजवरच्या अभ्यासकांनी याची करणमीमांसा करायला हवी होती व असे का घडले असावे, याचा शोध घ्यायला हवा होता.पण तसा तो घेतल्याचे जाणवत नाही.डॉ. पटवर्धन'' यांनीही तो घेतल्याचे आढळले नाही.

अरबी, फार्सी ऐ - युक्त व औ-युक्त शब्दांच्या लेखनाचा विचार जेव्हा मी करू लागलो तेव्हा हा प्रश्न चटकन सुटला. 'ऐ' चे लेखन अलीफ़् आणि ये (ऐ च्या बाबतीत ऐन् आणि ये) आणि 'औ' चे लेखन अलीफ़् आणि वाव् ('औ 'च्या बाबतीत ऐन् व वाव् )असे अरबी - फार्सीत केले जाते. त्यामुळे ये चा उपयोग या भाषा 'इ' कार दाखविण्यासाठी व 'वाव्' चा उपयोग 'उ'' कार दाखविण्यासाठी करतात . त्यामुळे मैदान् > चे रूपान्तर मध्ययुगीन मराठीत कधी कधी 'मइदान' असे होणे किंवा 'औलाद् 'चे रूपान्तर 'अवलाद' असे होणे स्वाभाविक आहे उच्चार- परिवर्तनातील काही कोडी सोडविण्यास लिपीचे ही कधी कधी साहाय्य कसे होते,याचा विलक्षण प्रत्यय या वेळी आला !

**अर्धस्वरागम**

(१) 'य'- श्रुती - यादवकालीन मराठीत स्वरापुढे स्वर आल्याने उच्चारास अवघड अवस्था- म्हणजे 'प्रगृह्य' - निर्माण होत असे. त्यासाठी यादव मराठीने 'य् ' किंवा 'व्' या अर्धस्वरांचा उपयोग करून हे प्रगृह्य टाळण्याचा प्रयत्न केला. या उच्चारपरिवर्तनाला अनुक्रमे 'य'- श्रुती व 'व'- श्रुती अशी संज्ञा दिली जाते.

अरबी - फार्सी शब्द मराठीत येतानाही या दोन प्रक्रिया घडतात पण येथे प्रगृह्यासारखी स्थिती असतेच असे नाही. 'ज़ाइअ' सारख्या शब्दात 'इ' पुढे 'अ' हा स्वर आल्याने अशी अवस्था निर्माण होते, त्यामुळे 'य् ' या अर्धस्वराचा उपयोग करून मराठीने 'जाया' हा शब्द सिद्ध केला व प्रगृह्य टाळले किंवा 'मअ़ना' या शब्दातील 'म' मधील अ हा स्वर व त्यापुढे 'अ़' (ऐन्) हा कंठ्य स्वर असल्याने व मराठीभाषकांना तो उच्चारास अवघड वाटल्याने तेथेही प्रगृह्य निर्माण झाले व ते टाळण्यासाठी 'य्'चा उपयोग करून मराठीने 'मायना' हा शब्द सिद्ध केला,हे खरे असले तरी सर्वत्र 'य'- श्रुती किंवा 'व'- श्रुतीचा उपयोग मराठी भाषा करते, असे नाही. 'य'-श्रुतीची आणखी काही उदाहरणे अशी -

इल्ग़ार् > येलगार
क़ाइदह् > कायदा
ख़्वाह् - म - ख़्वाह् > खामाखाय (मम.)
ज़रीन् > जरियानी

जामह् > ज्यामा (मम)
नीमचह् > निमच्या
फाइदह् > फायदा
बिसात् > बिछायत
बीजा > बेज्याहा (मम)
शर्जा > सरज्या
सिवाअ् > शिवाय
हवस् > हव्यास

(२) 'व'- श्रुती - मूळ फारसी शब्दात 'व्' हा अर्धस्वर नसताना तो मराठीत येताना व् - आगम झाल्याची उदाहरणेही लक्षात घेण्याजोगी आहेत. तथापि 'य' श्रुतीची प्रक्रियाच अधिक प्रमाणात घडल्याचे दिसते.

अक्ल्मंद् > अक्कलवंत
उम्रा > उमराव
उस्ताद > वस्ताद
जम्अ् > जमाव
तबाही > तवई, तवाई (मम)
ताबह् > तवा
तिलायह् > तलावा
दुआ > दुवा
दुआगो > दुवागीर
रिज़ामंद् > रजावंत
रुज्अत् > रुजवात
सरोपा > शिरपाव
सिह्बंदी > शिवबंदी

### अर्धस्वरलोप

१) य् - लोप

आरायिश् > आरास
कैफियत् > कैफत (मम)
गाशियह् > गाशा
गुंजायिश् > गुंजाइस
जम्ईयत > जमेत
जाय्गाह् > जागा
ज़ियादत् > जास्त

दर्याफ्त् > दरफ्त (मम)
पाय्गाह् > पागा
मालीयत > मालत (मम)
माहीयत > माहीत
मियानह् > मेण
मुज़ायक़ह् > मुजाका
विलायत् > विलाथ (मम)
शादियानह् > साहादाने
सराय > सराई
सालियानह् > सालाना

(२) व्- लोप

य् - लोपाच्या मानाने व् - लोपाची उदाहरणे कमी आहेत.

अख़्बार्नवीस् > अकबरनीस
कार्ख़ानह्नवीस् > कारखानीस.
जवाब् > जाब
जवाब् सवाल् > जाबसाल
तनख़्वाह् > तनखा
दरख़्वास्त > दरखास्त
तस़्वीर् > तसबीर
मुसव्वदह् > मसुदा
रोज़्नवीसी > रोजनिशी

### वर्णविपर्यय

वर्णांची अलटापालट किंवा त्यांची अदलाबदल ही उच्चारपरिवर्तनातील एक सर्वसामान्य प्रक्रिया आहे. मराठीतील फार्सी शब्दांच्या बाबतीत ती घडणे स्वाभाविक होते. तिची काही उदाहरणे -

अमानत > अमानत
अ़म्दन् > मुद्दाम
ख़बर् > बखर
ख़ातिर् > खात्री,खातरी
जंग् > गंज
फ़तीलह् > पलिता
बअ़द्अ़ज़् > बाजद (बाजद बरसात) - (मम)
मज़्हब > महजब (मम)

मश्हूर > महशूर
मुक़्बरह् > मुकरबा
मुसव्वदह् > मसुदा
रुख़्सत् > रुखसत
हज़्रत्पनाह् > हजरतपन्हा
हनूज़् > अजून

**महाप्राणत्व**

अरबी - फार्सी शब्द मराठीत येताना त्यांत पुढील चार प्रकारांनी महाप्राणत्व झाल्याचे आढळते.

(१) अल्पप्राण > महाप्राण

क् > ख् - कबूतर् > कबूतर (मम),कीसह् > खिसा, किश्मिश् > खिसमिस,कुर्सी > खुर्ची,चालाक् > चलाख, दिल्पाकी > दिलपाखी, पालकी > पालखी,पोशाक् > पोशाख, मुल्क् > मुलूख,हलाकी > हलाखी

ग् > घ् - गुम्बद् > घुमट

त् > थ् - कनात्  > कनाथ, कारिस्तान् >कारस्थान

द् > ध् - दम्दमह् > धमधमा,दहशत् > धास्त,धास्ती, बहादुरशाह् > बाधुरस्या (मम), मस्जिद् > मशिध (मम)

प् > फ् - तोप् > तोफ, तोप् ख़ानह् > तोफखाना, परस्त् > फरस्त

ब् > भ् - इब्रत् > इभ्रत, इब्राहीमी > इभ्रमी, बार्बदारी > भारबदारी, बिहिस्ती > भिस्ती, बुत्ख़ानह् > भूतखाना, सूबह् > सुभा

यात कंठ्य व ओष्ठ्य वर्गातील अल्पप्राण व्यंजनांत महाप्राणत्व आल्याचे विशेषकरून जाणवते.

(२) मध्यमप्राण > महाप्राण

'क़्' (काफ़्) आणि 'ग़्' (ग़ैन) हे उच्चार अरबी - तुर्की - फार्सी भाषांत आहेत. ते काहीसे महाप्राणसदृश आहेत. ते मराठीत नसल्याने अनेकदा हे शब्द मराठीत येताना त्यांचे रूपान्तर महाप्राण व्यंजनांत होते. (त्यांच्यासाठी 'मध्यमप्राण' ही संज्ञा प्रा. ग. ह. खरे यांनी सुचविली आहे.)

क़् > ख् - क़ज़्ज़ाक़ी > कजाखी
क़त्अ़ > खता(मम)
क़त्अ़ > खटा (मम)
चिहिल्क़द > चिलखत
तक़्सीर् > तखसीर
बर्क़्दाज़् > बरखंदाज

बुर्क़अ्  > बुरखा
मुलाक़ात्  > मुलाखत
रुक़्अह्  > रोखा
वक़्त्  > वखत
वाक़िअह्  > वाखा

(३) ज़् (जे), ज़् (जाल), ज़् (जोय), ज़् (ज्वाद्) हे विशिष्ट अरबी - फार्सी उच्चार मराठीत नसल्याने कधी कधी हे उच्चार असलेले शब्द मराठीत येताना त्यांच्यामध्ये महाप्राणत्व येते -
कनीज़् > कनीझ, ग़ज़ल् > गझल, जुब्बा > झब्बा, जुब्बा > झबले, ज़ारूब् > झाडू, ज़ुल्फ् > झुलूप, ज़ौक् > झोक, नोकज़ौक् > नोकझोक

(४) 'ह्' - आगम - मूळ अरबी - फार्सी शब्दात 'ह्' कार नसताना तो मराठीत येताना आल्याची काही उदाहरणे पुढे देत आहे -
ग़ज़ब्  > गहजब
तै (तय)  > तह
दूई  > दुही
मअ्मुरी  >महामुरी
मौक़ूफ़्  > महकूब
मौक़ूफी  > महकुबी
शअ्रा  > शहारा

**महाप्राण - लोप**
ही प्रक्रिया तीन प्रकारे घडल्याचे आढळते-
१) महाप्राणयुक्त व्यंजनांचे अल्पप्राणांत रूपान्तर,
२) अन्त्य 'ह् ' चा लोप होऊन त्याचे 'आ' स्वरात झालेले रूपान्तर
३) अन्त्य 'ह् ' चा लोप.
(१) अल्पप्राणात रूपान्तर - ख़िताब् >किताब (= पदवी), ख़िलाफ़् > किलाफ, ख़फ़ह् > खपा /खप्पा, तख़्तह् > तक्ता,तफ़्सील् > तपशील, दफ्तर् > दप्तर, हफ्तह्बंदी > हप्तेबंदी, हफ्तह्ज़ारी > हप्ताहजारी
(२) अन्त्य ह् - लोप > आ - या प्रक्रियेची उदाहरणे विपुल आहेत -
अ़राबह् > अराबा,अलाहिदह् > अलाहिदा,इरादह् > इरादा,इशारह् > इशारा, क़ाइदह् > कायदा,क़ाफ़िलह् > काफिला, तिलावह् > तलावा, दर्जह् > दर्जा, दरगाह् > दर्गा,दाग़िनह् > दागिना,पर्गनह् > परगणा,परवानह् > परवाना, परागंदह् > परागंदा,

मुआ़मलह् > मामला, मुर्दह् > मुडदा, मुसव्वदह् > मसुदा, सूबह् > सुभा
(३) अन्त्य 'ह् ' - लोप - आ़दिल्शाही > आदलशाई (मग), गिर्दनवाही > गिर्दनवाई, तबाही > तवई, पादशाही > पादशाई,मलाही > मलाई,सिपाही > शिपाई, सियाही > शाई, सूराही > सुरई, हम्राही > हामराई (मम)

द्वित्तीकरण

(अ) अरबी - फार्सी शब्द व त्यांचे उच्चार अपरिचित असल्यामुळे ते मराठीत येताना त्यांतील काही उच्चाराचे द्वित्तीकरण झाले आहे नुकत्यांचा काफ़ (मध्यमप्राण क़) , खे (ख़) स्वाद्, ज्वाद्, जोय्, तोय् यांचे उच्चार मराठीत नसल्याने असे काही वेळा घडले आहे तर जोडाक्षरांमुळेही असे काही वेळा घडले आहे. काही वेळा ते अकारण घडले आहे.उदा. 'द्' हा उच्चार मराठीला परिचित असूनही 'ह़द् ' चे मराठीतील रूपान्तर 'हद्द' असे होते.

अ़क़्ल् > अक्कल
अलफ़् > अल्लफ
अ़ली > अल्ली
असा़ल् > अस्सल
इ़त्र् >अत्तर
क़त्ल् > कत्तल
ख़ुद् > खुद्द
ग़िलह् > गिल्ला
ज़िद् > जिद्द
जिन्स् > जिन्नस
तपह् > टप्पा
नक़्ल् > नक्कल
फ़तह् > फत्ते
शक्ल् > शक्कल
सल्ख् > शिल्लक
रक़म् > रक्कम
रजब् > रज्जब
रद् > रद्द
ह़क़् > हक्क
ह़द् > हद्द
ह़म्लह् > हल्ला
ह़ाली > हल्ली

(आ) मूळातील अरबी - फार्सी व्दित्त उच्चार मराठीत काही शब्दांत कायम राहिल्याचीही उदाहरणे देता येतील -

ग़ल्लह् > गल्ला

ग़ुस़्स़ह् > घुस्सा

मह़ल्लह् > मोहल्ला

सिक्कह् >शिक्का

हु़क्क़ह् > हुक्का

## व्दित्त उच्चारांचे एकेरीकरण

व्दित्तीकरणाच्या उलट असलेली ही प्रक्रिया.तिचीही विपुल उदाहरणे मराठीत आहेत-

उम्मीद् > उमेद

क़ज़्ज़ाक़् > कजाग

ज़र्रह् > जरा

ज़िम्मह् > जिमा

ज़ुल्ल् > झूल

तअ़ल्लुक़ह् > तालुका

तवक्कल् > तवकल

तुर्रह् > तुरा

तैय्यारी > तयारी

दिक़्क़् > दिक

दुर्रानी > दुराणी

मुक़द्दमह् > मुकदमा

मुद्दत् > मुदत

मुरत्तब् > मोर्तब

मुलम्मअ़् > मुलामा

सफ्फ़जंगी > सफजंगी

सर्राफ़् > सराफ

ह़ज्जाम् > हजाम

## समारोप

वरील विवेचनावरून पुढील निष्कर्ष काढता येतात.

फार्सी आणि मराठी या भाषांच्या ध्वनिव्यवस्थेत काही बाबतीत साम्य होते तर काही बाबतीत वेगळेपणाही होते. अ़, क़,ग़् सारखे कंठ्य उच्चार मराठीत नव्हते त्याचप्रमाणे 'त़ '(तोय),ज़ (ज़ाल), ज़् (ज़ाय), ज़ु (ज़्वाद), स़् (स्वाद्) सारखे उच्चारही नव्हते.

या स्वरव्यंजनांनी युक्त असे शब्द तर मराठीत आले होते पण ते अभिव्यक्त करण्यासाठी लिपिचिन्हे मराठीत नव्हती.मूळातले हे उच्चार वेगळे कसे होते, हे दाखविण्यासाठी मी नवीन लिपिचिन्हांच्या साहाय्याने हा भेद दर्शविला आहे. 'अ' चे दोन (म्हणजे अ आणि अ़ ) ही संकल्पनाच मराठीत नसल्याने तिच्याकडे या प्रकरणात मी हेतुतः लक्ष वेधले आहे. मराठीने हे शब्द त्याच्या मूळ उच्चारासह आत्मसात करून त्याचा समावेश आपल्या लिपिचिन्हात व उच्चारांत करून टाकला. त्यामुळे काही ठिकाणी हे उच्चार कायम राहिले तर काही ठिकाणी त्यांत ध्वनिपरिवर्तन झाले. हे ध्वनिपरिवर्तन कसे घडले व मूळ उच्चार कुठे कायम राहिले, याचा सोदाहरण व सविस्तर विचार या प्रकरणात केला आहे.

अरबी-फार्सीच्या अपरिचित उच्चारांमुळे स्वरभक्ती, स्वरलोप,स्वरविश्लेष, अर्धस्वरागम,('य'श्रुती, 'व'श्रुती), अर्धस्वरलोप, वर्णविपर्यय,महाप्राणत्व, महाप्राण - लोप, द्वित्तीकरण व द्वित्त व्यंजनाचे एकेरीकरण ही विशेष ध्वनिपरिवर्तने कशी घडली, याचाही विचार या प्रकरणात केला आहे. त्यातील बराच भाग मराठी भाषाविज्ञानात नवीन भर घालणारा असून ध्वनिविचाराच्या संदर्भात फार्सी - मराठी चा अनुबंध किती घनिष्टपणे जुळला होता, ते विशद करणारा आहे.मराठी ध्वनिविचारांचा मूलगामी स्वरूपाचा पुनर्विचार करण्यास याचे साहाय्य होईल, अशी अपेक्षा आहे.

-----------------

संदर्भ - टीपा

१. हिन्दी भाषा का इतिहास, डॉ. धीरेन्द्र वर्मा, आ. ७ वी, हिंदुस्तानी एकेडमी, प्रयाग, पृ १८० ते १८२

२. मबफास्व, पृ ६१ , ६२

३. फामको, प्र.पृ. ८

४. कित्ता, पृ ९, डॉ. पटवर्धनांनी दिलेला 'न्याहत' हा शब्द त्यांच्या कोशात नाही, 'न्याहाल' हा आहे. (पृ ११८ त्याचे मूळ येथे दिले आहे. )

५. फामको, पृ . ९

६. फामको, प्र. पृ. १७

७. मबफास्व , पृ . ६४१

८. कित्ता, पृ . ३६६

९. कित्ता, अनुक्रमे पृ. ३३८,३३८,३३९,३३९,३३१

१०. फामको, प्र. पृ. ८-९

-----------------

## प्रकरण तिसरे
# रू प वि चा र

### प्रास्ताविक

दोन भाषांच्या आदानप्रदानात भाषेच्या उच्चारांवरील किंवा शब्दसंग्रहावरील प्रभाव हा त्या मानाने बाह्य प्रभाव मानला जातो पण भाषेची प्रकृती ही तिच्या व्याकरणविषयक वैशिष्ट्यांतून विशेषकरून लक्षात येते. उच्चार व शब्द हे तिचे बाह्य रूप आहे असे मानले तर ही प्रकृति - वैशिष्ट्ये तिचे अन्तर्गत रूप होय. हाच तिचा खरा गाभाही आहे. नाम, सर्वनाम, विशेषण, क्रियापदादी विकारी शब्द; शब्दयोगी,उभयान्वयी, उद्‌गारवाचक, क्रियाविशेषणादी अविकारी शब्द, लिंग-वचनव्यवस्था, विभक्ती व सामान्य रूप तसेच काळ - प्रयोगादी अन्य वैशिष्ट्यांनी भाषेची ही अन्तर्गत प्रकृती सिध्द होत असते.फार्सीचा मराठीशी संपर्क आल्यावर फार्सीच्या अशा प्रकृतिवैशिष्टयांचा मराठीच्या प्रकृतीवर लक्षणीय प्रभाव पडला. एका अर्थाने मराठी भाषा त्यामुळे अधिक संपन्न झाली, असे म्हणायला हरकत नाही. ही प्रकृतिवैशिष्टये स्वीकारताना मराठी भाषेनेही आपल्या स्वत्वाची जोपासना केली. त्यामुळे मराठीचे फार्सीकरण आणि फार्सीचे मराठीकरण अशा प्रक्रिया एकसमयावच्छेदेकरून घडत घडत गेल्या.त्यांचे स्वरूपदर्शन घडविण्याचा प्रयत्न पुढील विवेचनात केला आहे. अशा प्रकारचे सविस्तर विवेचन मराठीत प्रथमच होत आहे.हे येथे नम्रपणे नमूद करायला हवे व त्यातील पूर्वसूरींच्या वाट्याचीही कृतज्ञतापूर्वक नोंद करायला हवी.

### नाम

विशेषनाम,सामान्यनाम, समुदायवाचक नाम आणि भाववाचक नाम हे मराठी नामांचे विविध प्रकार गृहीत धरून त्यांचा फार्सीशी कितपत संबंध आला याचा विचार येथे केला आहे. हा संबंध केवळ वरवरचा वा तात्कालिक स्वरूपाचा नसून बराचसा मराठी भाषेच्या अंतर्गत प्रकृतीवर खोल ठसा उमटविणारा व प्रदीर्घ काळ टिकणारा असाच आहे याची कल्पना पुढील विवेचनावरून येईल.

### (अ) विशेषनामे

मराठी नामांच्या या प्रकारावर फार्सीची लक्षात घेण्याजोगी छाप उमटली आहे. त्यामुळे यासंबंधीचा विचार येथे काहीसा विस्ताराने केला आहे . त्याची पाच विभागांत विभागणी केली आहे. अशा प्रकारची मराठी विशेषनामांची विभागणी प्रथमच होत असावी, असे वाटते. त्यामुळे त्याविषयीचे स्पष्टीकरण करणे योग्य होईल.

१) व्यक्तिनाम : यात फार्सी शब्दयुक्त विशेषनामांचा तपशील दिला आहे.

२) प्राण्यांची विशेषनामे

३) अन्य वास्तू / वस्तू इ. ची विशेषनामे

४) स्थलनामे : ही त्या त्या स्थळाची/शहराची,गावाची विशेषनामेच होत,म्हणून त्यांचा विचार या विभागात केला आहे. यातील एक विभाग शहरातील विविध स्थळांच्या नावांचाही केला आहे. त्यातही फार्सी शब्द आढळतात. यातील काही अरबी,तुर्की शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले आहेत .दुसरा विभाग नगरविभागाच्या नावांचा केला आहे.

५) कालगणनादर्शक विशेषनामे.

आता या विशेषनामांचा सविस्तर विचार करू.

(१) **व्यक्तिनामे**

मध्ययुगीन मराठीच्या नामव्यवस्थेवर जो एक फार महत्त्वाचा प्रभाव पडला, तो अरबी - फार्सी शब्दांनी सिध्द झालेल्या विशेषनामांतून आपल्या प्रत्ययाला येतो.यांतील काही विशेषनामे पुढे आधुनिक मराठीत विशेषतः ग्रामीण मराठीत रुळली.या प्रकाराने भाषेच्या प्रकृतीवर जसा अन्तर्गत ठसा उमटविला तसाच लोकजीवनावरही उमटविला.इति. राजवाडे[१]यांनी याची नोंद घेतली खरी पण ती या शब्दांत -

'येथपर्यंत सांगितलेल्या विशेषांपेक्षाहि एक चमत्कारिक विशेष आता सांगावयाचा आहे. तो विशेष फारर्शीतून मराठीत रूढ झालेल्या विशेषनामांसंबधाचा आहे. सामान्यार्थवाचक शब्द परभाषेंतून घेण्यानें स्वभाषेंत थोडाथोडका बदल होतो, असे नाही पण परभाषेतील विशेषनामें स्वभाषा स्वीकारू लागली म्हणजे ती बोलणाऱ्या लोकांच्या भ्रष्टपणाची कमाल झाली म्हणून समजावे.'

राजवाडे या प्रभावाचे वर्णन 'एक चमत्कारिक विशेष 'म्हणून करतात व त्यातून काहीशी खंतही व्यक्त करतात. त्यांनी याची मध्ययुगीन मराठीतील उदाहरणे देताना म्हटले आहे-[२]

'सुलतानराव,जानराव,बाजीराव,रुस्तुमराव,शहाजीराव,शाहू,फिरंगोजीराव, दियानतराव,सर्जेराव,हैबतराव,गुलबाई,दर्याजीराव,वगैरे विशेषनामें मुसलमानी अमालांत प्रचारांत आली.'

यांतील अनुक्रमे सुल्तान्,जान्,बाज़ी,रूस्तम्, शाह्, फ़िरंगी,दियानत्,शर्जा,हैबत्, गुल्,दर्या हे शब्द फार्सी आहेत.त्यातील काही अरबी शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले.) त्यांना पुढे राव किंवा बाई हे मराठी शब्द लागले आहेत. अशी फार्सी किंवा फार्सी शब्दांनी सिध्द झालेली असंख्य विशेषनामे मला बखरींत[३] आढळली, ती पुढे देत आहे. वैपुल्य लक्षात यावे, हाही विस्तृत यादी देण्यामागील उद्देश आहे. राजवाडे यांनी दिलेली विशेषनामेही त्यात आढळतील-

उमरावगीर(अ. उम्रा)

उम्मेद(अ. उम्मीद्)

कविजंग (अ. क़वी = शक्तिमान्, फा.जंग्)

खुशालकुवर(फा. खुश् हाल्)

खुशालचंद (फा. खुश् हाल्)
खुशालसिंग "
गमाजीपंत (फा.ग़म् )
जवाहीरसिंग (जजिरेकर) (अ.जवाहिर् )
जालमसिंग (अ. जालिम्)
जिवाखान (फा. ख़ान्)
तखतबाई (फा. तख़्त्)
दमाजी (गायकवाड,थोरात) (फा.दम्)
दयाबहादूर (फा. बहादुर् )
दर्याबाई (फा. दर्या)
दर्यासागर (फा. दर्या)
दर्यासारंग (फा. दर्या)
दवलतराव (मोरे) (अ.दौलत्)
दौलतराव (गायकवाड,शिंदे) (अ.दौलत्)
नौबतराव (अ. नौबत्)
पिराजी (नाईक निंबाळकर) (फा. पीर् )
फकीरचंद (चोपदार) (अ.फकीर् )
फकीरजी (फडतरे,गाढवे ) (अ.फ़क़ीर्)
फत्तेसिंग (गायकवाड,भोसले,माने) (अ. फ़त्ह् )
फत्तेसिंगराव (गायकवाड) (अ. फ़त्ह् )
फिरंगोजी (फा. फ़िरंगी)
बहादरसिंग (फा. बहादुर् )
बाजी (परभू ,शामराज, घोरपडे,घोलप, पासलकर,पवार) (फा. बाज़ी)
बाजीपंत (फा. बाज़ी)
बाजीराव (फा. बाज़ी)
बाजीरावसाहेब (फा. बाज़ी,अ. साहिब् )
बाजूसिंग (फा. बाज़ू)
बूसाहेब (अ.बूसाहिब्)
मेहरबानसिंग (फा. मिह्र् बान्)
रायबक्ष (फा. बख़्श्)
वखतचंद (अ. वक़्त् )
शरीफजी (अ. शरीफ़् )
शहाजी (फा. शाह् )
शहाशरीफ (फा. शाह् , अ. शरीफ़् )

शहासिंग (फा. शाह् )
शाहू (फा. शाह् )
सरफोजी (अ.शरीफ़ )
सर्जेराव (फा. शर्जाह्)
साबाजी(साहिबजी) शिंदे (अ.साहिब् )
सुभानजी (खराडे,भोसले,नाईक) (अ.सुब्हान् )
सुभानसिंग (अ.सुब्हान् )
सुलतानजी (थाहड) (अ.सुल्तान्)
सुलतानबा (झाडकर,गारडकर) (अ.सुल्तान्)
सुलतानराव (निंबाळकर ) (अ. सुल्तान्)
सुलतानसिंग (अ.सुल्तान्)
सेखोजी (आंग्रे) (अ.शेख़् )
हंबीरराव (अ.अमीर्)
हैबतराव (अ.हैबत्)

बखरीतील अशा विशेषनामांची संख्याच पन्नासहून अधिक आहे. ती वेगवेगळया जातींच्या लोकांची आहेत, हे कळण्यासाठी काही ठिकाणी कंसात आडनावे दिली आहेत. त्यांत तखतबाई , दर्याबाई,बूसाहेब ही स्त्रियांचीही विशेषनामे आहेत.आजही ग्रामीण मराठीत खुशालराव,दौलतराव,पिराजी,फकीर-फकीरा,बाजीराव,रावसाहेब,शहाजी,शाहू,सर्जेराव, सुलतानराव,साहेबराव,हंबीरराव,हैबतराव ही विशेषनामे प्रचलित आहेत.

(२) प्राण्यांची विशेषनामे

मराठी बखरीत प्राण्यांच्या काही विशेषनामांचा उल्लेख आला आहे.' 'दिलपाक' हे एका घोड्याचे नाव आहे तर 'खासी नागीण ' हे एका घोडीचे नाव आहे. 'दिलप्यार' हे ही एका घोडीचे नाव आहे. यात 'दिल' आणि 'पाक्' हे फार्सी शब्द असून अरबी 'खास्' हा शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला आहे.

(३) अन्य वास्तू / वस्तू इ. ची विशेषनामे

(i) अनेक किल्ल्यांच्या विशेषनामात अरबी -फार्सी शब्दांचा प्रवेश झाला आहे. त्यांचा निर्देश मध्ययुगीन मराठीत आढळतो '
अस्मानगड (फा.आस्मान्)
कमरगड (फा कमर् )
दारुगड (फा.दारू)
दौलतमंगळ (अ.दौलत् )
नवीनागड (फा नवीनह्)

नौबतगड (अ. नौबत्)
फिरंगीदुर्ग (फा.फ़िरंगी)
बहादूरगड (फा.बहादुर् )
मेहमानगड (फा.मिह्मान् )
लालगड (फा.लाल् )
हशमगड (फा.हशम्)
(ii) काही तोफांची विशेषनामे अशी आहेत[६] -
किलेकुशाद (अ.क़ल्अह् ,फा. कुशाद्)
दर्याभवानी (फा. दर्या)
फत्तेलष्कर (अ. फ़त्ह्, फा.लष्कर् )
मुलुखमैदान ही तोफ तर आजच्या मराठी वाक्प्रचारातही प्रचलित आहे. अरबीच्या मुल्क्, आणि मैदान् या दोन शब्दांपासून 'मुलूखमैदान' हा मराठी शब्द सिध्द झाला. तो फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला आहे.

(४) **स्थलनामे:**
(i) ग्राम /नगरनामे
यांचाही समावेश विशेषनामांतच करायला हवा. मध्ययुगीन मराठी वाङ्मयात आलेली काही स्थलनामे फार्सी आहेत तर काही स्थलनामे फार्सी शब्दांना मराठी शब्द जोडून सिध्द झाली आहेत:[७]
अकबराबाद (अ. अकबर्,फा. आबाद्)
अनुपशहर (फा. शहर् )
अमदाबाद, अहमदाबाद (अ. अह्मद्, फा.आबाद् )
इसलामपूर (अ. इस्लाम्)
औरंगाबाद (अ. औरंग् ,फा आबाद् )
कातराबाद (फा. क़ादिर्, आबाद्.)
कुलाबा (अ.कुल्, फा. आब् )
घुमट शिरोळ (फा. गुम्बद् )
जाफराबाद (फा. जाफ़र् आबाद्)
दौलतपुरी (अ. दौलत् )
पादशहापूर, पाच्छापूर (फा. पाद्शाह् )
पेरोजाबाद (फा. फ़ीरोजह् आबाद् )
पोलादपूर (फा. पूलाद् )
फकीराबाद (अ. फ़क़ीर् , फा.आबाद् )
फत्तेपूर (अ. फ़त्ह् )

फर्काबाद (अ. फ़ारूक़ .फा.आबाद्)
बऱ्हाणपूर (अ.बुर्हान्)
बाजारखेड (फा.बाज़ार्)
रहिमतपूर (अ.रह्मत्)
रोशनपुरा (अ.रोशन्)
लाहूर सराई (फा. सराय्)
शहापूर (फा. शाह् )
शिखरी फत्तेपूर (फत्तेपूर शिक्री)(अ. फ़त्ह्)
सुलतानपूर (अ.सुल्तान्)
हवेली (फा. हवीली)
हुशंगाबाद (फा. आबाद्)
हैदराबाद (अ. हैदर् ,फा. आबाद्)

आजही मराठीत अरबी - फार्सी शब्दांनी सिध्द झालेली अनेक स्थलनामे रूढ आहेत, त्यांपैकी काही पुढे देत आहे :

अहमदनगर, (अ.अह्मद्)
अहमदाबाद (अ.अह्मद्, फा.आबाद्)
आदिलाबाद (अ. आ़दिल्,फा.आबाद्)
इस्लापूर (अ.इस्लाम्)
इस्लामपूर (अ.इस्लाम्)
उस्मानाबाद (अ.उ़स्मान्,फा. आबाद्.)
एदलाबाद (आता मुक्ताईनगर) (अ.आ़दिल्, फा.आबाद्)
कागजीपुरा (अ. कागजी)
खुदावाडी (अ. ख़ुदा)
खुल्ताबाद (अ. ख़ुलत् ,फा.आबाद् )
जाफराबाद (अ.जाफ़र्, फा.आबाद्)
दौलताबाद (अ.दौलत्,फा.आबाद् )
निजामाबाद (अ.निजाम् , फा.आबाद्)
फर्दापूर (अ. फ़रीद्)
फरीदाबाद (अ.फ़रीद् ,फा.आबाद्)
बिदर (अ. बरीद् चा वर्णविपर्यय ?)
बेगमपूर (तु.बेगम्)
मखमलाबाद (फा. मख़्मल्,आबाद्)
मलकापूर (अ. मलिक)



एच-६७
३

मेहेराबाद (फा. मिहर् आबाद्)
मोमिनाबाद (अंबाजोगाई) (आ. मोमिन् ,फा.आबाद्)
वजीराबाद (अ. वज़ीर्,फा.आबाद्)
शिरूर ताजबंद (अ. ताज्,फा.बंद्)
सिकंदराबाद (फा. सिकंदर् ,आबाद्)
सुलतानपूर (अ.सुल्तान्)
हैदराबाद (अ. हैदर् ,फा.आबाद्)
(ii) नगरविभागनामे
काही शहरांतील काही विभागांची नावे अरबी-तुर्की-फार्सी शब्दांनी सिद्ध झाली आहेत:
आमखास (अ. आम् - उ - ख़ास्स् )(मैदान)
उस्मानपुरा (अ.उस्मान्)
औरंगपुरा (अ/फा.औरंग्)
खासबाग (अ. ख़ास्स् ,फा.बाग्)
गंज गोलाई (फा.गंज्)
गंज पेठ (फा.गंज्)
तोफखाना (तु. तोप्, फा.ख़ानह्)
दिल्ली दरवाजा (फा. दर्वाज़ह्)
फरासखाना (फा. फ़र्राशख़ानह्)
बरकतपुरा (फा. बर्कत् )
बारुदगरनाला (फा. बारूद्गर्नालह् )
बेगमपुरा (तु. बेगम् )
मकई दरवाजा (अ.मक्कइ ,फा. दर्वाज़ह्)
महाल (अ.महल्)
मोमीनपुरा (अ.मोमिन्)
रोशनगेट (फा.रोशन्)
सुभेदारी (फा. सूबह्दारी) (विश्रामगृह)
हुजूरपागा (अ. हुजूर,फा.पाय्गाह्)

५) कालगणनादर्शक विशेषनामे

मराठी सनदा,फर्माने, राज्यकारभारविषयक पत्रव्यवहार यांत मुस्लिम कालगणनेचा निर्देश असल्याने त्यांत मुस्लिम महिन्यांची व वर्षाची अरबी विशेषनामे फार्सीच्या माध्यमातून मराठीत आली आहेत.

१) मासनामे :

मोहरम, सफर, रबिलावल, रबिलाखर, जमादिलावल,जमादिलाखर,रज्जब,साबान,

रमजान,शव्वाल,जिल्काद,जिल्हेज.

२) कालगणना :

अमली,इलाही,इसवी,फसली, शुहूर,हिजरी इ.याविषयी विवरण करताना प्रा.ग.ह. खरे[9] म्हणतात, 'हिंदुस्थानांत सौरमान किंवा चांद्रसौर मान मुसलमानपूर्व कालात सर्रास प्रचारांत होतेच पण मुसलमान येथें राज्यकर्ते म्हणून नांदू लागल्यावर त्यांनी येथें शुहूर, फसली,विलायती,अमली, इलाही इत्यादी तत्त्वतः एकच पण नामरूपतः भिन्न असे काल सुरू केले.' येथे 'मव्लूदी' कालगणनेचाही निर्देश करायला हवा कारण तिचा उल्लेख असलेली शेकडो पत्रे मोडी लिपी व मराठी भाषा यांत लिहिलेली आपण पाहिली आहेत, असे प्रा. खरे[10]यांनी म्हटले आहे -

'हिजरत याचा मूळ अर्थ जरी निष्क्रमण असला तरी कालांतराने त्यावर पलायन असा अर्थ लादला गेला. अर्थात् हिजरी सन म्हणजे मुहम्मदाने मदीनेस केलेल्या पलायनापासून सुरू झालेला काळ असा अर्थ सर्वसामान्य लोक करू लागले. टिपूला हे आवडेना म्हणून त्याने मुहम्मदाच्या जन्मापासून आरंभ झालेल्या कालाची कल्पना केली व त्यास मव्लूदी (जन्मासंबधी) हें नांव दिलें . टिपूनें केलेले हे उपक्रम त्याची नाणीं व त्याचे कागदपत्र यांत चांगल्या तऱ्हेनें प्रतिबिंबित झाले आहेत. ही नाणीं व कागदपत्रें महाराष्ट्रांत-विशेषतः कर्नाटकात-पुष्कळ आढळतात. शेंकडों पत्रे मोडी लिपी व मराठी भाषा यांत लिहिलेली मी पाहिली आहेत म्हणून येथें या पद्धतीचा प्रपंच करावा लागला. त्यांनी या पध्दतीनुसार कागदपत्रांत आढळणारी वर्षनामे व मासनामे अशी दिली आहेतः

वर्षनामे : जकी, अजल, जलव,दलव,शा,सारा,सराब,शिता, जबरजद, सहर, साहिर, रासिख, शाद, हिरासत, साज, शादाब, बारिश.

मास - नामे :

(अ) अब्जद : अहमदी, बहारी, जअ्फरी, दाराई, हाशिमी, वासई ,ज़बरजदी, हदैरी, तुलूई, यूसुफी, ईज़दी, बयाजी,

(आ) अब्तस : अहमदी, बहारी, तकी, समरी,जअ्फरी, हैदरी,खुस्त्रवी, दीनी,जाकिरी, रहमानी,राज़ी, रब्बानी

टिपू सुलतानाने दिलेल्या मराठी - मोडी सनदेत यांतील काही वर्षांच्या व महिन्यांच्या नावांचा उल्लेख कसा आढळतो याचेही विवरण प्रा. खरे[11] यांनी साधार केले आहे...

(आ) सामान्यनाम

मराठीतील फार्सी सामान्यनामांचे विवेचन करण्यासाठी मी दोन विभाग केले आहेतः पहिल्या विभागात सर्वसामान्य स्वरूपाच्या सामान्यनामांची उदाहरणे दिली असून दुस-या विभागात आडनावे दिली आहेत. आडनावांचा समावेश सामान्यनामांत कसा? हा प्रश्न येथे उपस्थित होईल. त्याचा खुलासा त्या संदर्भात केलेल्या विवरणावरून होईलच.

(i) पहिला विभाग :

अत्तर (अ.इत्र्)

अत्तरदाणी (अ.इत्र्,फा.दान्)

अमलदार (अ.अमल्,फा.दार्)

अर्ज (अ.अ़र्ज़्)

अर्जदार (अ.अ़र्ज़्,फा.दार्)

अर्जदास्त (अ.अ़र्ज़्,फा.दाश्त्)

आमदार (अ.आम्,फा.दार्)

अंबारी (अ.इमारी)

कफन (अ.क़फ़न्)

कबर (अ.क़बर्)

कबूतर (फा.कबूतर्)

कलम (अ.क़लम्)

कागद (अ.काग़ज़्)

कारकून (फा.कार्कुन्)

कारखाना (फा.कार्ख़ानह् )

किल्ला (अ.क़ल् अह् )

किल्ली (फा.किलीद् )

कुलूप (अ.कुफ़्ल् )

कंदिल (अ.किंदील् )

खासदार (अ.ख़ास्स्,फा.दार् )

चोपदार (फा.चोब् दार् )

जिन्नस (अ.जिन्स्)

तख्त (फा.तख़्त्)

तलाव (फा.तालाब)

ताईत (अ.तअ़वीज़् )

तोफ (तु.तोप् )

दमामा (फा.दमामा )

दरवाजा (फा.दर्वाज़ह् )

दौत (अ.दवात् )

नगारा (अ.नक़्क़ारह्)

पडदा (फा.पर्दह्)

परगणा (फा.पर्गनह्)

पीर (फा.पीर्)

प्यादा (फा.पियादह्)
फकीर (अ.फ़क़ीर् )
बुरूज (अ.बुर्ज़् )
महाल (अ.मह्‌ल् )
मेवा (फा.मेवह्)
मोहोर (फा.मुह्‌र् )
याद / यादी (फा.याद् )
शाई (फा.सियाही )
शिक्का (फा.सिक्कह्)
शिपाई (फा.सिपाही )
स्वार (फा.सवार् )
साहेब (अ. साहिब्)
(ii) दुसरा विभाग : आडनावे
व्यक्तिनाम हे विशेषनाम असते पण आडनाव हे सामान्यनाम असते. आडनावाचा त्या त्या घराण्याशी संबंध येतो, त्यामुळे फार्सी शब्दयुक्त आडनावांचा मराठी माणसाने केलेला स्वीकार ही त्याच्या जीवनव्यवस्थेतील महत्त्वाची घटना होय. इस्लामी राजवट जाऊन काही शतके लोटली तरी ही आडनावे तशीच कायम आहेत,त्यावरून हा प्रभाव किती दूरगामी होता,ते कळते.

फार्सी शब्दयुक्त विशेषनामांप्रमाणेच यादवोत्तर कालात महाराष्ट्रात फार्सी शब्दयुक्त हुद्दे रूढ झाले व त्यांचेच पुढे आडनावांत रूपान्तर झाले. त्याविषयी व पित्याचे नाव लिहिण्यापूर्वी मुस्लिम पध्दतीप्रमाणे बिन/ बिन्न (चा पुत्र) हा अरबी शब्द लावला जाई, त्याविषयीही इति. राजवाडे यांनी या शब्दांत खंत व्यक्त केली आहे - 'सौदागर, मुश्रीफ,सराफ,चिटणीस,फडणीस,पोतनीस,हेजीबराव,दिवाण,पेशवे,वाकनीस,दफ्तरदार, वगैरे फारशी आडनावेहि मराठीत रूढ झाली. 'बिन्न' ह्या फारशी शब्दाने पितापुत्रांचा संबंध दाखविण्यापर्यंत ज्या देशातील भटाभिक्षुकांचीही मजल गेली जाऊन पोहोचली, त्या देशांतील भाषेच्या भ्रष्टपणाबद्दल जास्त काय लिहायचे आहे'' ?'

ही आडनावे किंवा हुद्दा / व्यवसाय दर्शविणारे फार्सी शब्द मुसलमानपूर्व महाराष्ट्रात मुळीच प्रचारात नव्हते, हे मत श्री.वा.कृ भावे''यांनी सप्रमाण नोंदविले आहे.मराठी बखरीत आढळलेली फार्सी शब्दयुक्त आडनावे देत आहे. त्यांतील बरीच आडनावे आजही रूढ असल्याचे दिसून येईल. बखरीतील या आडनावांची संख्याच साठपेक्षा अधिक आहे'', त्यावरून हा प्रभाव किती मोठा होता तेही कळेल.(शब्दार्थ डॉ. पटवर्धन यांच्या फार्शी- मराठी कोशातून दिले आहेत.)
अकबरनीस (फा. अख़्बार् नवीस् = बातमीपत्र पाठविणारा)
अमीन (अ. अमीन् = विश्वस्त )

कानगो (फा. क़ानून्गो = वहिवाटीची नोंद ठेवणारा)
*कारखानीस (फा. कार्ख़ानह्-नवीस् =उद्योगशाळेतील कारकून)
कारभारी (फा. कार्बारी =व्यवस्थापक,दिवाण)
*कासीद (फा. क़ासिद् = पत्रे पोहोचविणारा दूत)
*किल्लेदार (फा. क़ल्अह् -दार् = दुर्गाधिपती, किल्लेकरी)
*कोतवाल (फा.कोत्वाल् =किल्लेदार, दारोगा)
*खासगीवाले (फा. ख़ास् गी + म.वाला = राजाच्या खासगीचा अधिकारी)
खासनीस (फा. ख़ास् - नवीस् )
*चिटणीस (फा. नवीस् ) = पत्रव्यवहार करणारा.
*जकाते (अ. ज़कात् ) = जकात वसूल करणारा.
*जमादार (फा. जम्अ़दार् = टोळीचा / तुकडीचा नायक)
*जहागिरदार (फा. जागीर् दार् )
ठाणेदार (फा. दार् )
*डबीर (फा. दबीर् = लेखक,कारकून,चिटणीस)
*तबीब (अ. तबीब् = वैद्य)
*तोफखाने (तु. तोप् + फा. ख़ानह् )तोफखानेवाला
*दप्तरदार (फा. दफ़्तर् दार् = कागदपत्रांची काळजी घेणारा अधिकारी)
दफेदार (फा. दफ़्अदार् = रिसाल्यातला लहान अधिकारी)
*दारुवाला (पारशी जमातीत)(फा. दारू = मद्य)
*दिवाण (फा. दीवान् = प्रधान)
*दिवाणजी (तु. दीवान् ची = प्रधान)
नालबंद (फा. नअ़लबंद = नाल ठोकणारा)
*पागनीस (फा. पाय्गाह् नवीस् = रिसाल्याकडील कारकून )
*पागे (फा.पाय्गाह् = रिसाल्याचा अधिकारी )
पागेदार (फा. पाय्गाह् दार् )
*पारसनीस (फा. फ़ार्सीनवीस् = फार्सी पत्रव्यवहार करणारा)
*पेशवे (फा.पेश्वा = पुढारी,पंतप्रधान)
*पोतदार (फा. पोतह्दार् = नाणेपारखी )
*फडणीस (अ. फ़र्द्. = एकेरी पत्र,नवीस् लिहिणारा )
*फरास (अ. फ़र्राश् = बिछायत घालणारा)
*बक्षी (फा. बख़्शी = सैन्यात पगार वाटणारा)
*बारगीर (फा. बार्गीर् = धन्याने दिलेला घोडा ठेवणारा शिपाई )
*बिनवाला/ली (फा. बीनी = सैन्याची आघाडी)
बेलदार (फा. बेल्दार् = खणत्या)

*म (मु) जुमदार (फा. मज्मूअ़दार् = वसुली कारकून)
*महाले (अ. मह़्ल्) = महालाचा रक्षक?
*मिराशी (अ. मीरास् ) = मिराशीचा उपभोग घेणारा
*मिरासदार (फा. मीरासीदार्)
मिर्धा / र्धे (फा. मीर्दह् = दहा शिपायांचा नाईक)
*मोकाशी (मुकासा - गावइनाम)
*रास्ते (फा.रास्त् )
*वाक(के)नीस (फा. वाक़िअ् नवीस् = अखबार् नवीस् )
*शिकिलकर (फा. सैकलार् = हत्यारे साफसूफ करून पाणी देणारा )
*शिलेदार (फा. सिलह्दार् = सैन्यातील राऊत)
शेखदार (अ. शेख़् , फा. दार् )
*सबनीस (फा. सफ़्नवीस् = सैन्यातील तुकड्यांतील सैनिकांची गणती करणारा )
*सरदार (फा. सर्दार् : बडा अधिकारी, मनसबदार)
सरंजामी (फा. सरंजामी)
*सरंजामे
*सराफ (अ. सर्राफ़् : सोनेचांदीचा व्यापारी)
*सुभेदार (फा. सूबह्दार् = प्रान्ताधिकारी)
हकीम, हकीमजी (अ. ह़ाकिम् = आज्ञा देणारा अधिकारी)
*हजारी, हजारे (फा. हज़ारी = हजार सैनिक बाळगण्याची मनसब असलेला)
हरीप, हरीफ (अ. हरीफ़्)
*हशमनीम, हसबनीस (फा. हशम्नवीस् = हशमाकडील कारकून)
*हवालदार (फा. ह़वालत् - दार्)
*हेजीब (अ. हाजिब् = वकील)
मुळातले हुद्दे /व्यवसाय व त्यांचे स्वरूप लक्षात यावे, यासाठी येथे मूळ शब्द व त्यांचे डॉ.पटवर्धन यांनी दिलेले अर्थ वरील यादीत नोंदविले आहेत.

*या खुणेने दर्शविलेली आडनावे आजही महाराष्ट्रात प्रचलित आहेत. याशिवाय गुमास्ते (फा.गुमाश्तह्),दास्ताने (फा. दास्तान् ), पेशकार (फा.पेश् कार्),शिकारखाने (फा. शिकार् ख़ानह्),वकील (अ. वकील्) अशी कितीतरी आडनावेही आढळतात.

(इ) समुदायवाचक नामे

मराठीत असंख्य समुदायवाचक नामे फार्सीतून आली आहेत. पुढे वानगीदाखल पंचवीस - तीस उदाहरणे देत आहे. ही नामे विविध क्षेत्रांतील असल्याने त्यांची व्याप्ती सहज लक्षात येईल:

१. अतराफ (अ. अत्राफ़ ): जवळचे नातलग
२. अफलाद (अ. अफ्लाद): वंशपरंपरा
३. अफवाद (अ. अफ्वाद): वंशपरंपरा
४. असबाब (अ. अस्बाब ): सामुग्री, सामान
५. अहफाद (अ. अह्फ़ाद): मुलीची प्रजा
६. कबिला (अ. क़बीलह्): कुटुंब
७. काफिला (अ. क़ाफ़िलह् )प्रवाशांचा तांडा, कारवान.
८. खानदान (फा. ख़ान्दान् ): घराणे, थोर घराणे.
९. गरीबगुरबा (अ.ग़रीब् - ग़ुर्बह् ): दरिद्री लोक.(यापासूनच सिध्द झालेला 'गोरगरीब' हा शब्द आजच्या मराठीत रूढ आहे.)
१०. चाकरपेशा (फा. चाकर्पेशह् ):नोकरी करणारांचा वर्ग
११. चाकरमाने (फा. चाकर्): नोकरी करणारांचा वर्ग
१२. जमात (अ. जमाअ़त् ) : समुदाय,जमाव,संघ.
१३. जमाव (अ. जम्अ़): समुदाय.
१४. जमीनजुमला (फा.जमीन्, अ.जुमला): जमीन इ. मालमत्ता
१५. तायफा (अ. ताइफा): समुदाय,टोळी
१६. नोकरचाकर (फा.नौकर चाकर ): सेवकवर्ग
१७. नोकरपेशा (फा. नौकर् ,पेशह् ): सेवा करणारांचा वर्ग
१८. फकीरफुकरा (अ.फ़क़ीर् - फ़ुक़रा): गरीब लोक.
१९. फौज (अ. फ़ौज् ): सेना
२०. फौजफाटा (अ. फ़ौज् ): सेना इ.
२१. बाजार (फा. बाज़ार् ): पेठ,हाट.
२२. बारदान (फा. बार् दान्) : (ग्रामीण मराठी) सर्व कुटुम्बीय, वस्तू इ.
२३. बुणगे (फा. बुन्गाह् )
२४. मालमत्ता (अ. माल, मताअ़): जिदंगी,इस्टेट
२५. मोर्चा (फा. मूर्चा ): (व.म.)विशिष्ट मागणी करण्यासाठी जाणारा समुदाय
२६. याद,यादी (फा. याद ):सूची
२७. रयत (अ. रईयत् ): प्रजा
२८. रिसाला (अ. रिसालह् )घोडदळाची तुकडी.
२९. लष्कर (फा. लश्कर् ): सैन्य
३०. लवाजमा (अ. लवाज़िमत् ): परिवार, गाड्या - घोडे,नोकर वगैरे इतमाम
३१. सरंजाम (फा. सरंजाम् ): साधनसामुग्री
३२. सामान, सामानसुमान (फा. सामान् ): चीजवस्त.

मराठी भाषेला समृद्ध करण्यात या समुदायवाचक नामांचा चांगलाच हातभार लागला आहे.

(ई) भावबाचक नाम

अगणित फार्सी भाववाचक नामे मराठीत आली आहेत. अरबी भाववाचक नामेही फार्सीच्या माध्यमातून मराठीत आली आहेत.त्यांच्या निर्मितिप्रक्रियेविषयी 'शब्दसिध्दी'च्या तद्धितविषयक विवेचनात अधिक विवरण केले आहे.एखाद्या भाषेतून दुसऱ्या भाषेत काही सामान्यनामे वा समुदायवाचक नामे येतात, ही गोष्ट दोन्ही भाषांतील जवळीकीची द्योतक असली तरी एखाद्या भाषेतून दुसऱ्या भाषेत भाववाचक नामेही येतात आणि ती फार मोठ्या संख्येने येतात,एवढेच नव्हे तर शतकानुशतके तशीच टिकून राहतात ,ही बाब या दोन्ही भाषांतील गहि-या संबंधांचीच द्योतक नाही का ?या ठिकाणी मला ती असंख्य उदाहरणे सहज उद्धृत करता येतील पण विस्तारभयास्तव केवळ पुढील उदाहरणे देत आहे.त्यांची संख्याही ' विपुल' या शब्दा सन्याय देण्याइतकी निश्चितच आहे.

१. अखत्यार,अखत्यारी (अ. इख़्तियार् )
२. अजुर्दगी (फा. आजर्दगी)
३. इज्जत (अ. इज़्ज़त्)
४. इतबार (अ. इअ़्तिबार् )
५. इभ्रत (अ. इबारत् )
६. इमान (अ. ईमान् = श्रद्धा): सचोटी, एकनिष्ठा
७. ऐपत (फा. आफ़ियत्): संपन्नता, आर्थिक सामर्थ्य
८. खबरदारी (अ. ख़बर् + फा. दारी)
९. खात्री (अ. ख़ातिर् )
१०. खातरजमा (अ. ख़ातिर्जम्अ़)
११. खिदमत (अ. ख़िदमत् : सेवा)
१२. खुशाली (फा. खुश् ह़ाली)
१३. खुशी (फा ख़ुशी)
१४. गरीबी (अ. ग़रीब्,फा. ई)
१५. चिटणिशी (चिट् + फा. नवीसी)
१६. छानछोकी (अ. शान् - उ - शौकत् )
१७. जादूगिरी (फा. जादूगरी ) : मोहिनी
१८. जोरजबरी (फा. ज़ोर् - ज़बरी)
१९. टंचाई (फा तंग्चाय् ) : चणचण,दुर्मिळता, अभाव
२०. तकवा (अ. तक़वियह्)

२१. तंगी (फा. तंगी)

२२. तहकुबी (अ. तवक़्कुफ़ + फा.ई )

२३. दहशत (अ. दहशत् )

२४. दावेदारी (फा. दअवा- दारी ): वैर

२५. धास्ती (अ. दहशत् )

२६. फजिती (अ.फ़ज़ीहत् )

२७. फडणिशी (फा. फ़र्द् - नवीसी)

२८. बाजीगिरी (फा. बाज़ीगरी)

२९. बारकाई (फा. बारीक् )

३०. बारीकी (फा. बारीक् + ई)

३१. बेइमानी (फा. बीईमान् + ई)

३२. बेशरमी (फा. बेशर्मी )

३३. मसलाशी (अ.मुख़ल्लस् + फा. ई) : सारवासारवी, खोटे समर्थन

३४. मग्रुरी (फा. मग़्रूरी)

३५. मजुरी (फा. मज़्दूरी)

३६. मस्ती (फा. मस्ती)

३७. माफी (फा. मुआफ़ी)

३८. मिरासी (फा. मीरासी )

३९. मोगलाई (फा. मुगोल + ई ): मोगलांचे राज्य, बेबंदशाही, अंदाधुंदी

४०. हुकमत (अ. हुक्मत् )

४१. हुशारी (फा. हुश्यारी ): बुध्दिमत्ता, चलाखी.

## सर्वनाम

मराठीतील सर्वनामांच्या पुरुषवाचक, दर्शक,आत्मवाचक,अनिश्चित, संकीर्ण व प्रश्नार्थक या सर्वच प्रकारांवर फार्सी सर्वनामांचा काही ना काही प्रभाव पडल्याचे जाणवते. मराठी पुरुषवाचक व प्रश्नार्थक सर्वनामांवर तो फारसा पडला नसला तरी मराठी आत्मवाचक व संकीर्ण सर्वनामांत अनेक फार्सी सर्वनामे अगदी सहजपणे मिसळून गेली आहेत. इतिहासकाळ इतिहासजमा झाला तरी आधुनिक मराठीत यांपैकी काही सर्वनामे मराठी मातीत तशीच रुजल्याचे दिसते त्यांचे विवरण पुढे केले आहे.

### (अ) पुरुषवाचक सर्वनाम

मराठीतील जवळपास सर्वच पुरुषवाचक सर्वनामे संस्कृत > प्राकृत > मराठी या प्रक्रियेने आली आहेत. यांपैकी कोणतेही सर्वनाम फार्सीपासून आलेले नाही.हे मत मी यापूर्वी बखरींच्या संदर्भात मांडलेच आहे, ते आजही बव्हंशी बरोबरच आहे.

द्विपुएव 'तू' या सर्वनामाचे याच फार्सी सर्वनामाशी रूपसाम्य दिसत असले तरी त्याची
संस्कृत > महाराष्ट्री >अपभ्रंश > मराठी
त्वम् > तुमं > तुइं > तूं
ही उपपत्ती, त्याचप्रमाणे यादवकालापासून आजपावेतो आढळणारे सातत्य, ते फार्सीपासून आलेले नाही, हे स्पष्ट करते. फार्सी 'तू' हे सानुनासिक नसल्याने त्याचे वेगळेपण सिध्द होते. मराठीचा व फार्सीचा भाषावंश एकच- म्हणजे आर्यभाषा हा - असल्याने पुरुषवाचक द्विपुएव.सर्वनामांत असे साम्य आढळणे स्वाभाविक आहे, हा युक्तिवादही मी यापूर्वी मांडला आहेच. मात्र फार्सीचा स्पर्श मराठीच्या पुरुषवाचक सर्वनामांना अगदीच झालेला नाही, असे नाही. डॉ. पटवर्धन[15] यांचे फार्सीतील 'ऊ' या तृपुएव सर्वनामाविषयीचे विवरण लक्षात घ्यायला हवे.

फार्सी 'ऊ' चा अर्थ 'तो' किंवा 'ती' असा आहे. तो दर्शविण्यासाठी 'अश्' हा प्रत्ययही लावला जातो,हा बारकावा डॉ.पटवर्धनांनी[17] ऐतिहासिक मराठी कागदपत्रांच्या आधारे स्पष्ट केला आहे. तो येथे लक्षात घ्यायला हवा. ते म्हणतात,'पुरुषवाचक सर्वनामांपैकी तृतीय पुरुषी एकवचनी ऊ म्हणजे तो- ती हे पुढील वाक्यांत आढळते:
"बाद ऊ (= त्याच्यामागून) अव्लाद व अह्फाद त्यांसी रवा करणे (राजवाडे १५/३६४). पुरुषवाचक पण षष्ठीदर्शक संयुक्त सर्वनामांपैकी तृतीय पुरुषी अश् 'आखीरश' (=म्हणजे त्याच्या अन्ती, साने - पयाव ४८० ) यांत आढळते."

बखरींत मात्र मला या दोहोंचा आढळ झाला नाही व डॉ. पटवर्धनांनी उल्लेखिलेले उदाहरण अपवादात्मक मानायला हवे.पुढे आधुनिक मराठीत तर ते कुठेच आढळत नाही.

याच प्रकारे फार्सीत प्रपुएव म्हणजे 'मी' हे सर्वनाम दर्शविण्यासाठी 'म्' नामान्ती जोडला जातो(उदा. जानम्)व द्विपुएव दर्शविण्यासाठी 'त्' जोडला जातो,पण ही प्रवृत्ती हिन्दीत व उर्दूत आली असली तरी मराठीत मात्र आलेली नाही. याकडे मला मुद्दाम अभ्यासकांचे लक्ष वेधायचे आहे.

(आ) दर्शक सर्वनाम

'इं ' (हा,ही ) आणि 'आं' (तो)ही दोन फार्सी दर्शक सर्वनामे मध्ययुगीन मराठीत आल्याचे आढळते डॉ. पटवर्धन[16] यांनी यासंबंधी केलेले सोदाहरण विवेचन लक्षात घेण्याजोगं आहे. ते म्हणतात, '२० दर्शक विशेषणांपैकी 'इं ' (= हा) व आं (= तो) ही मराठीत आढळतात.दर्बारी पत्रांत इ जानिब (= ही बाजू )याचा उपयोग आम्ही दर्शविण्याकडे होतो, त्याचप्रमाणे'आ साहेबीं खत पाठविलें' यांत आं साहेबी याचा अर्थ 'आपण' असा करावयाचा. याशिवाय अर्जीबाद, दरींविला इत्यादि प्रयोगांत ई आहे .

'अजींबाद (=यानंतर) होईल तें नमूदास येईल' (राजवाडे १०/१९३); शिवाय 'दरी सुरत' म्हणजे या स्थितीत (राजवाडे १९ / ८)'.

बखरींत 'आं' आढळत नाही.पण 'इं' हे दर्शक सर्वनाम संयुक्त स्वरूपात आढळते. उदा.पेशजी(फा. पेश् अज् इं = यापूर्वी). डॉ. पटवर्धन वर उल्लेखिलेल्या ठिकाणी क्र. १८ मध्ये फार्सी पुरुषवाचक सर्वनामांचा तर क्र. १९ मध्ये अन्य फार्सी सर्वनामांचा विचार करतात. क्र. २० मध्येही त्यांनी फार्सी सर्वनामांचाच विचार केला आहे पण येथे ते दर्शक सर्वनाम ही संज्ञा योजण्याऐवजी दर्शक विशेषण ही संज्ञा का योजतात, ते कळत नाही. त्यांना येथे खरे तर फार्सी दर्शक सर्वनामांचाच विचार व विवेचन करायचे आहे. मराठी व्याकरणात दर्शक सर्वनाम हीच संज्ञा प्रचारात आहे. 'इं ' हे फार्सी दर्शक सर्वनाम आधुनिक मराठीत 'अजीबात' (फा. अज् इं बाद् )या शब्दांत दडले असले तरी त्या शब्दांचा आजच्या मराठीत दर्शक सर्वनाम म्हणून उपयोग केला जात नाही, क्रियाविशेषण म्हणूनच उपयोग केला जातो.

**(इ) आत्मवाचक सर्वनाम** (१ते ६)

या प्रकारात फार्सी आत्मवाचक सर्वनामांची मोलाची भर पडली आहे पण त्यांची नोंद अभ्यासक व व्याकरणकार यांनी घ्यायला हवी होती, तशी घेतलेली दिसत नाही. बखरींविषयी केलेल्या संशोधनातून मी[२९] याविषयी १९५८ साली पुढील निष्कर्ष मांडले आहेत, ते आजही मान्य होण्याजोगे आहेत.

(१) खुद्, खुद - अरबी 'खुद्[३०] 'पासून फार्सीच्या माध्यमातून मराठीत आलेले हे आत्मवाचक सर्वनाम. बखरींत याची दोन्ही रूपे आढळतात पण आजच्या मराठीत केवळ 'खुद' हेच रूप प्रचारात आहे. डॉ. पटवर्धन[३१] याचा उल्लेख करतात तथापि 'खुद ' (खुद् = आप) हे सर्वनामाप्रमाणे आहे, असे का म्हणतात ते कळत नाही.मो.के.दामले[३२] यांनीही सर्वनामांत याचा निर्देश केला आहे.

(२) जातीनें - 'जात् ' या अरबी शब्दापसून (मराठी तृतीयेचा 'ने' प्रत्यय लागून) हे रूप सिध्द झाले. 'जात्' या शब्दाचा अरबी - फार्सीतील अर्थ soul, body, person, self असा स्टेनगॅसने[३३] दिला आहे.संस्कृत 'ज्ञाति' पासून आलेल्या 'जात' या शब्दाशी त्याची गल्लत होऊ देऊ नये, हा इशारा मी माझ्या बखरविषयक संशोधनात[३४] दिलाच आहे. राजवाडे व डॉ. पटवर्धन[३५] यांच्या सर्वनामांच्या यादीत याचा आढळ होत नाही; तथापि फार्शी मराठी कोशात डॉ. पटवर्धन यांनी या शब्दाचा समावेश केला असून त्याचा अर्थ 'खुद,स्वतः,स्वांगे' असा दिला आहे. दामले[३६] खुद व जातीने ' ही क्रियाविशेषणे असल्याचे मानतात.

(३)खुद + जातीन - कधी कधी या दोन्ही आत्मवाचक सर्वनामांचा एकत्र उपयोग केल्याचे मला[३७] बखरींत आढळले. उदा. 'दमाजीराव यांणी खुद जातींनें तरवारीचा वार करून...' (गायकवाड यांची हकीकत, पृ. ४२)

(४) बजिन्नस - फार्सी 'बजिन्स्' पासून मराठीत आलेले हे आत्मवाचक सर्वनाम. स्टेनगॅस त्याचा मूळ अर्थ in kind, sort,species असा देतो आणि 'बजिन्सीही' या अर्थ the thing itself असा देतो. हा दुसरा शब्द व अर्थ मराठीतील 'बजिन्नस' चे मूळ असावे. बखरीत हे सर्वनाम 'स्वतः' या अर्थाने विपुल प्रमाणात योजिले आहे. इति.राजवाडेही याचा उल्लेख करतात.त्याचा 'खुद','तेच' असा अर्थ दर्शविण्याकडे होत असल्याचे डॉ. पटवर्धन सांगतात. आजच्या मराठीत हे सर्वनाम वापरले जात नाही.

(५)बराय खुद (फा. बराय् ख़ुद्) - फार्सी 'बराय्' (=साठी) आणि 'खुद् '(=स्वतः )या दोन शब्दांनी मिळून हे आत्मवाचक 'जोड सर्वनाम' तयार झाले आहे. त्याचा मूळ अर्थ 'स्वतःसाठी' असा आहे. पण बखरीत मात्र ते स्वतः ,जातीनिशी किंवा जातीने या अर्थाने वापरले जाते. खरे तर केवळ 'खुद' नेही काम भागले असते पण या संदर्भात डॉ. पटवर्धन यांचे मत योग्य आहे असे दिसते. अज्ञानामुळे असा वापर केला गेला असावा असे ते म्हणतात. आधुनिक मराठीत त्याचा उपयोग केला जात नाही.

(६) बरायखुद खास (फा. बराय् ख़ुद् + अ. ख़ास़्) - 'बराय खुद' या सर्वनामाविषयी यापूर्वी विवेचन केले आहे ते या जोडसर्वनामालाही लागू आहे. त्याची वेगळी स्वतंत्र अशी नोंद यापूर्वी च्या अभ्यासकांनी घेतली नसल्याने ती येथे घेत आहे. मुळात 'बराय' आणि 'खुद' यांच्याच जोडीला आणखी 'खास' हा शब्दही जोडला गेला. खरे तर या सर्वांच्याऐवजी केवळ 'खुद' या एका सर्वनामानेही काम भागले असते. डॉ. पटवर्धन यांनी राजवाड्यांचा दाखला देऊन त्याकडे लक्ष वेधले, हेही महत्त्वाचे होय - 'गोपाळराव गोविंद यांनी आपली फौजेचे तरफेस बराय खुदखास उभे राहून श्रीमंतांचे हवेलीचें रक्षण केलें'. (राजवाडे ११/५९)

### (ई) अनिश्चित सर्वनाम

फलाणा, फलाणाबिस्ताना - अरबी 'फुलान् ' पासून फार्सीत 'फुलान् ' व पुढे मराठीत 'फलाणा' हे अनिश्चित सर्वनाम आले.'बिस्ताना' चे मूळ डॉ. पटवर्धन देत नाहीत व स्टेनगॅसनेही ते दिल्याचे आढळत नाही. 'फलाणा' या सर्वनामाचा स्वतंत्र व 'बिस्ताना' बरोबर प्रयोग केल्याचे बखरीत आढळत असल्याचे मी निदर्शनास आणून दिले आहे.

1)फलाण्याची चाकरी जाली,फलाण्याची जाली नाही असे सांगून पत्रानुदा पुरवून द्यावा.

2)हा गोळा फलाणे - बिस्तानेच्या फलाण्यांत घाल.

### (उ) संकीर्ण सर्वनाम (१ ३)

१ कुल (अ. कुल्),कूल,कुळ - अरबी कुल् : हे सर्वनाम फार्सीत व फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले. बहुधा मध्ययुगीन मराठीत- विशेषतः पत्रात्मक गद्यात व

बखरीत-त्याचा वापर झाल्याचे आढळते. त्याची 'कुल' व 'कूळ' ही रूपेही बखरीत[17] आढळतात पण अर्थपरिवर्तनातील स्पष्टीकरणाची प्रक्रिया घडून मूळ फार्सी सर्वनामाबरोबर त्याचा मराठी अर्थ (मराठी सर्वनामात) देऊन व्दिरुक्ती केल्याचेही आढळते. अरबी - फार्सी सर्वनाम मराठीत रूढ करण्याचा हा एक प्रयत्न आहे -

(i) 'कुल सारे' (मराठी साम्राज्याची छोटी बखर, पृ.४)

(ii) कुल सर्वत्रांनी (होळकरांची कैफियत, सं. केळकर, पृ २२)

सध्याच्या मराठीत हे सर्वनाम कायदेविषयक पत्रव्यवहारात आढळते.

(२) तमाम (फा. तमाम्) - मध्ययुगीन मराठीप्रमाणेच आधुनिक मराठीतही विपुल प्रमाणात वापरले जाणारे हे सर्वनाम.

(३) बाजे (फा. बअ़्ज़ि, बअ़्ज़ु) - आजच्या मराठीत याचा वापर होत नसला तरी मध्ययुगीन मराठीत ते वापरले जात असल्याची अनेक उदाहरणे देता येतील.

### (ऊ) प्रश्नार्थक सर्वनाम

'चे' (फा. चेह्) - फार्सी 'चेह्' हे प्रश्नार्थक सर्वनाम आहे. त्याविषयी इति. राजवाडे यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नाचा विचार करायला हवा.'चेह्' या सर्वनामाचे फार्सीतील अर्थ स्टेनगॅसने[18] who,what,which,in what manner,why असे दिले आहेत. राजवाडे[19] म्हणतात, 'दर ,फलाणा,हर वगैरे फारशी सर्वनामांसंबंधाने विशेष काही सांगण्यासारखे नाही परंतु कस व चे ह्या सर्वनामांना नुसते जाऊ देता कामा नये. चे हे फारशीत प्रश्नार्थक सर्वनाम आहे व त्याचा मराठीत कोठचें व कसचे ह्या संयुक्त सर्वनामांत उपयोग होतो. ज्ञानेश्वरीत कोठचें व कसचें ही प्रश्नार्थक रूपे नाहीत. याबाबतीत मी यापूर्वी मांडलेले मतच[20] आजही ग्राह्य वाटते .ते मत असे - 'हा दूरान्वय वाटतो. 'कोठचे' या शब्दातील 'कोठे 'हा शब्द ज्ञानेश्वरीत आढळतो[21].कोठे या शब्दाचा अर्थ 'कोणत्या ठिकाणी' असा असून 'चे' या सर्वनामाचा अर्थ फार्सीत who,what, which असाच होतो. पर्यायाने कोठचे या शब्दाचा अर्थ (कोठे = कोणत्या स्थळी, चे = कोणते) असा व्दिरुक्तिमय होईल. पहिल्या शब्दाच्याच अर्थाचा आणखी एखादा परकीय शब्द घेण्याचे येथे काहीच प्रयोजन दिसत नाही. म्हणजेच, पर्यायाने ही व्दिरुक्ती झाली तर ती निरर्थकच ठरेल. 'कसचे' या शब्दाची श्री. राजवाडे यांनी दिलेली व्युत्पत्तीही शास्त्रशुध्द वाटत नाही.निदान फार्सीत तरी तसा प्रयोग होत नाही. आणि इतकी ओढाताण होऊन मग ता शब्द मराठीत आला असेल, असे वाटत नाही ', याविषयी आणखीही खुलासा करावा असे मला वाटते फार्सी शब्द मराठीत परिचित करून देण्यासाठी अर्थाच्या स्पष्टीकरणाची प्रक्रिया घडल्याचे मी'मराठी बखरीतील फार्सीचे स्वरूप' या ग्रंथात[22] विवरण केले आहे. येथेही आत्मवाचक व संकीर्ण सर्वनामांच्या संदर्भात फार्सी सर्वनामांचे स्पष्टीकरण करण्यासाठी मराठी सर्वनामे येतात, असे विवेचन मी केले आहे. पण 'कोठचे' किंवा 'कसचे' यातही अर्थस्पष्टीकरणाची प्रक्रिया घडत नाही, हे निदर्शनास आणणे आवश्यक आहे, असे मला वाटते.

संख्यात्मक विचारच करायचा झाला तर फार्सीतून मराठीत पुढील सर्वनामे आली आहेत, असे म्हणता येईल :

| | |
|---|---|
| पुरुषवाचक | १ |
| दर्शक | २ |
| आत्मवाचक | ६ |
| अनिश्चित | १ |
| संकीर्ण | ३ |
| एकूण | १३ |

यातील खुद, जातीचे, तमाम या मराठी सर्वनामाचे मूळ फार्सी आहे, हे मुद्दाम सांगितल्याशिवाय खरे वाटत नाही, इतकी ही सर्वनामे मराठीच्या प्रकृतीशी एकरूप झाली आहेत.

विशेषण-

मराठी शब्दसंग्रहात फार्सी विशेषणांची संख्या डोळ्यांत भरण्याजोगीच नव्हे तर अगणित आहे. शतकामागून शतके ओलांडून ही विशेषणे आजही मराठी भाषेत स्थिरावली आहेत.ती मराठी भाषेशी एकजीव झाली आहेत, एकरूप झाली आहेत. त्यांच्यामुळे भाषेतले अनेक बारकावे चांगल्या प्रकारे प्रकट करता येतात, या त्यांच्या सामर्थ्याची जाणीव झाल्यामुळेच त्यांचा स्वीकार व उपयोग सातत्याने करावा असे विविध काळांतील मराठी भाषकांना वाटले असणे स्वाभाविक आहे.फार्सी विशेषणाचा उपयोग करण्याचे पाच प्रकार मराठी भाषेत आढळतात. ते असे:

१)विशेष्यापूर्वी विशेषण : ही पध्दती मराठीत मूळचीच आहे तथापि ती फार्सीतही आहे. त्यामुळे ती या दोन्ही भाषांतील समान प्रवृत्ती आहे ,एवढेच म्हणता येईल.

२)विशेष्यानंतर विशेषण : ही मात्र फार्सीची खास प्रवृत्ती असून ती मराठी भाषेने फार्सीपासून स्वीकारली, हे मान्य करावे लागते.

३)'इजाफती'चा प्रत्यय आणि फार्सी विशेषणे : 'इ' हा प्रत्यय मूळचा फार्सी भाषेचा इजाफतीचा असून मराठी षष्ठी विभक्तीच्या अर्थाने वापरला जातो. ही पध्दती फार्सी भाषा आपल्या विशेषणांसाठी वापरते व ती यादवोत्तर मध्ययुगीन मराठीने स्वीकारली असल्याचे मी[१]बखरींच्या आधारे विशद केलेच आहे.

(४) 'इजाफती' च्या प्रत्ययाचा लोप : कधी कधी फार्सी भाषेत विशेषणांचा उपयोग करीत असताना इजाफतीच्या 'इ' प्रत्ययाचा लोप होतो.ही प्रवृत्तीही मराठीने स्वीकारली.

(५)फार्सी संख्यावाचक विशेषणे : मराठी काही फार्सी संख्यावाचक विशेषणे आली आहेत त्यांचे उपप्रकारही लक्षात घेण्याजोगे आहेत.

(१) विशेष्यापूर्वी विशेषण

(अ)अविकृत फार्सी विशेषणे

अस्सल(अ.अस्ल्),इज्जतदार(फा.इज़्ज़त्दार),इनामी(अ.इन् आम्),इमानदार(अ.ईमान्, फा. दार), कंगाल (फा.कंगालह्),कजाग(तु.कज़्ज़ाक़्),करारी(फा.क़रारी),कसबी(अ.कस्ब्),कागदी (अ.काग़ज़्),कायदेशीर(अ.क़ाईदह्,फा.सर्),कीमती(फा.क़ीमती),खानदानी (फा. ख़ान् दानी),खुशामती(फा.ख़ुश् - आमद्),गरीब(अ.ग़रीब्),जखमी(फा.ज़ख़्मी), जहांबाज(फा.जांबाज़्),दगाबाज(फा.दग़ाबाज़्),दर्दी (फा.दर्दी),नरम(फा.नर्म् ),नाखुष(फा. नाख़ुश्),पोशाखी(फा.पोशाकी),बकाली(अ.बक़्क़ाल्),बेफिकीर(फा.बेफ़िक्र्),बेशरम(फा. बेशर्म्),बेवारशी(फा.बेवारिस्),हिकमती(अ.हिक्मत्),हिशेबी(फा.हिसाब्),हुशार(फा.हुश्यार्)

(आ)अविकृत फार्सी विशेषणांची व्दिरुक्ती :

कधी कधी फार्सी विशेषणांची व्दिरुक्ती झाल्याचेही मध्ययुगीन मराठीत आढळते. याची पानिपतची बखर, शिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र,धाकटे रामराजे यांचे प्रकरण इ.बखरीतील पुढील उदाहरणे मी" दिली आहेत :खांसी खांसी,नामी नामी मातबर मातबर इ.आजच्या मराठीतही 'छान छान ' (फा. शान्)सारख्या प्रयोगात फार्सी विशेषणाची व्दिरुक्ती केल्याचे आढळते.

(इ) विशेष्यनिघ्न विशेषणे :

सर्व फार्सी विशेषणे अविकृत असतानाही मध्ययुगीन मराठीने आपल्या प्रकृतीनुसार त्यांचे रूपान्तर विशेष्यनिघ्न विशेषणात कसे केले आहे, ते बखरींतील उदाहरणे देऊन मी"विशद केलेच आहे.त्यांतील 'खांसा' या विशेषणाची रूपे विशेष्याप्रमाणे कशी बदलतात, ते पाहण्याजोगे आहे -

खासा पादशहा,खाशा वाड्यातून,खाशा स्वारीसमक्ष,खाशा बाया,खाशी स्वारी,खांशा डेऱ्यापर्यंत,खाशी नागीण इ.

(ई) विविध अर्थच्छटा प्रकट करण्याचे सामर्थ्य :

संदर्भानुसार विविध अर्थच्छटा प्रकट करण्याचे सामर्थ्य फार्सी अविकृत विशेषणांत कसे आढळते, ते पाहण्याजोगे आहे. 'मातबर' हे फार्सी विशेषण संदर्भानुसार विविध अर्थच्छटा कशा व्यक्त करते, ते मी"बखरीतील उदाहरणांच्या आधारे स्पष्ट केलेच आहे - मातबर किल्ला,मातबर गढी,मातबर मजली,मातबर मागरो, मातबर मुछदी (मुत्सद्दी), मातबर युध्द, मातबर लग्नसमारंभ, मातबर लढाई व मातबर शहर इ.

(२) विशेष्यानंतर विशेषण योजण्याची प्रवृत्तीः

फार्सी भाषेत विशेष्यानंतर विशेषण योजण्याची प्रवृत्ती आहे. ती मध्ययुगीन मराठीतही फार्सीच्या संपर्कामुळे आली. शिवकालीन पत्रात्मक गद्यात "सालगु।। (सालगुदस्ता), मामले मा (मामले मजकूर), साल मजकुरी, सुभेदार, नामजाद अशी असंख्य उदाहरणे आढळतात. मराठी बखरीविषयी ही हेच विधान करता येईल "अल्ली बहादूर, असामी खासे, किल्ले मजकूर वाघ मजकूर यासारखी उदाहरणे लक्षणीय आहेत.

याबाबतीत विशेष सांगावयाची गोष्ट अशी की ही प्रवृत्ती मध्ययुगीन मराठीने केवळ आत्मसातच केली नाही तर विशेष्यानंतर येणाऱ्या फार्सी विशेषणाचे सामान्यरूप करून त्याला विभक्तीचे प्रत्यय ही लावले. यावरून त्या काळात मराठीत फार्सीची ही प्रवृत्ती किती खोलवर रुजली होती, हे लक्षात येते. केवळ 'मजकूर' आणि 'मशारनिल्हे' या दोन फार्सी विशेषणांची ही बखरींतील उदाहरणेच याची साक्ष देतील"- कोट मजकुरी गुजर मजकुराने, प्रांत मजकुरी, मौजे मजकुरी, सरदार मजकुराशी, साल मजकुराची, लागू मशारनिल्हेचे, पंत मशारनिल्हेस, पंत मशारनिल्हेचा इ. फार्सीची ही प्रवृत्ती म्हणजे विधिविशेषण नव्हे, हेही लक्षात घ्यायला हवे.

(३) 'इजाफती' चा प्रत्यय आणि फार्सी विशेषणे :

फार्सी भाषेत विशेष्यानंतर येणाऱ्या विशेषणाच्या संदर्भात एक वैशिष्ट्यपूर्ण प्रवृत्ती अशी दिसते की विशेष्यालाच ' इ ' हा फार्सीचा 'इजाफती 'चा (म्हणजे षष्ठीचा ) प्रत्यय जोडला जातो. मध्ययुगीन मराठीत ही प्रवृत्ती विशेषकरून दिसते, आणि मौज अशी की फार्सी विशेषणालाही पुन्हा मराठी विभक्तिप्रत्यय लावले जातात ! त्याची बखरींतील" ही उदाहरणे मी दिली आहेत -कसबे मजकूरची, परगणे मजकूरचा, मौजे मजकुरी इ.

(४) -आणि 'इजाफती 'च्या प्रत्ययाचा लोप :

विशेष्यानंतर विशेषणाची योजना करताना विशेष्याला लागलेला इजाफतीचा प्रत्यय गाळण्याची लकब ही फार्सी भाषेत आहे डॉ. पटवर्धनांनी" या लकबीची मध्ययुगीन मराठीतील पुढील उदाहरणे दिली आहेत -साल मजकुरी, साहेब बहाद्दरांनी, साअत् नेक इ.

बखरींतही ही प्रवृत्ती आढळत असल्याचे मी" पुढील उदाहरणांच्या आधारे स्पष्ट केले आहे - कोट मजकुरी, तक्तराव (तख्त् - इ - रवान् ), सन मजकुरी, साल मजकुरी इ.

(५) संख्यावाचक विशेषणे :

फार्सीतून मराठीत आलेल्या संख्यावाचक विशेषणांत पुढील पाच प्रकार वा भेद आढळतात :

अ. पूर्णांकवाचक
आ. अपूर्णांकवाचक
इ. संख्याक्रमदर्शक
ई. पृथकत्ववाचक
उ. अनिश्चित

(अ) **पूर्णांकवाचक**

एक (फा.यक्) : 'एक 'या मराठी संख्यावाचक विशेषणाची व्युत्पत्ती सं.एक > प्रा.एक्क, एग्ग, > अप. एक्क, एग्गा > मराठी एक अशी मानतात व ते योग्यही आहे तथापि फार्सी 'यक् 'पासूनही काही संख्याविशेषणे आली आहेत, त्यांचा स्वतंत्र विचार व्हायला हवा.त्यांचे मूळ फार्सी ':यक्' हे आहे,हेही मान्य करायला हवे. मराठी व्याकरणकारांनी हे लक्षात घेतलेले दिसत नाही.[१३]

मी या मताच्या पुष्ट्यर्थ बखिरींतील पुढील उदाहरणांच्या साहाय्याने फार्सी शब्दांतील संख्यावाचक विशेषण फा. यक् पासून कसे आले आहे,ते स्पष्ट केले आहे[१४] - एकदिल,यकदिल (फा.यक् दिल्),एकदिली (फा. यक् दिली ), एकसा (फा.यक् सान्),एकी (फा.यकी),येकायेकी (फा. यकायक्).

आजच्या मराठीतही एकदम, एकदिलाने,एकदिली, एका,एकी एकाएकी ही संख्यावाचक विशेषणे प्रचलित आहेत.माझे हे विवेचन फार्सीतून मराठीत आलेल्या शब्दांपुरतेच मर्यादित आहे, हे येथे पुन्हा सांगावेसे वाटते.

इह्दि : मराठी पत्रात्मक गद्यात अरबीतून फार्सीत आलेले 'एक ' या अर्थाचे हे संख्यावाचक विशेषण आढळते .

दु. दाः (फा. दू .दो) : याविषयीही वरीलप्रमाणेच विधान करता येईल. मराठी बखरींतील या फार्सी संख्यावाचक विशेषणासंबंधी मी जे विवेचन केले आहे तेच मी येथे उद्धृत करतो [१५]- 'मराठीत 'दोन ' हे संख्यावाचक विशेषण सं. द्वि > प्रा. दोण्णि > अप. दुअ > मराठी दोनि, दोन अशा प्रक्रियेने आले असेच आहे. फार्सी 'दु 'हे रूपही त्या रूपाशी सदृश असेच आहे. फार्सी 'दुतर्फा ' हा शब्द बखरींत येतो, तेव्हा 'दु ' या संख्यावाचक विशेषणाविषयी शंका वाटू लागते. शिवाय 'दुई ' (फा. दूई = बेकी ) सारखे मूळ फार्सी शब्दच जेव्हा मराठीत वापरले जातात, तेव्हा हा 'दु काही विशिष्ट शब्दांत तरी फार्सीतून मराठीत येतो, असा निर्णय घ्यावा लागतो. फार्सीतून मराठीत आलेल्या शब्दापुरतेच हे विधान मर्यादित आहे

डॉ. पटवर्धन यांच्या ' फार्शी - मराठी कोशा'[१६]'त मध्ययुगीन मराठीतील या फार्सी संख्यावाचक विशेषणाची पुढील उदाहरणे आढळतात:

दुआब, दुवाब (फा. दो आब् ), दुकित्ता, दुतर्फा (फा. दो तरफ़ ), दुतर्फी, दुबार यावरून

दुनिम्मा,दुतर्फा (फा. दो तरफ्),दुतर्फी,दुबार(फा.दुबार्),दुरस्ता(रस्त्याच्या दोन बाजूंनी), दुरोजा(फा.दु - रोज़ह् = दोन दिवसांचा खर्च ),दुवक्त (फा. दो वक़्त = दोन वेळा ), दुशोला (फा दु + अ. शुअ़्ला = जोड शमादान),दुहज्जी (फा.दु + अ.हज्व = दोन कामारा गेणारा),दोदील(फा.दू दिल् = द्विधा मनस्थितीचा, दोहीकडे संधान बांधणारा.) यावरून वरील उदाहरणातील 'दु ' किंवा 'दो ' हे संख्यावाचक विशेषण फार्सीतून मराठीत आले आहे, हे मत मान्य व्हायला हरकत नाही.

इसेन - इसनैन (=दोन.) - हे संख्यावाचक विशेषण अरबीतून फार्सीच्या माध्यमातून मराठी पत्रात्मक गद्यात आले आहे.

सलास (= तीन ) - वरीलप्रमाणे.

अर्बा (= चार ) - वरीलप्रमाणे.

चहार (=चार ) - हे फार्सी संख्यावाचक विशेषण

मराठी बखरीतील 'च्यारो तर्फ ' (फा. चहार् तर्फ्),च्यारकुब्बा (फा.चहार्) या शब्दांत योजिले आहे[१३].

खम्स (= पाच ) - अरबीतून फार्सीत आलेले हे संख्यावाचक विशेषण मराठी सनदा, पत्रे,दफ्तर - वाङ्‌मय यांत योजिले आहे.

पंज (= पाच ) - मराठीतील पाच हे संख्यावाचक विशेषण संस्कृत 'पंच ' पासून आले आहे तथापि त्याच्याशी सादृश्य असलेले 'पंज् ' हे संख्यावाचक विशेषण फार्सीचे आहे. पंजाब (फा. पंज् - आब्),पंजा (फा. पंजह्)

या शब्दांत ते आढळते. हे शब्द मध्ययुगीन मराठीतील बखरीप्रमाणेच[१४] आजच्या मराठीतही वापरले जातात.

सित्त(= सहा) - वरीलप्रमाणे .

हप्त, हफ्त (फा. हफ़्त् = सात) - मध्येयुगीन मराठीतील 'हप्तहजारी' किंवा 'हफ्तहजारी' सारख्या शब्दांत याचा उपयोग केला गेला आहे[१५].जुन्या व आजच्या मराठीतील हप्ता, इप्तेबंदी या शब्दांतही तो आढळतो.याशिवाय मध्ययुगीन मराठी पत्रात्मक गद्यात (सनदा, फर्माने, राजकीय पत्रव्यवहार इ. मध्ये ) अरबीतून फार्सीत व फार्सीतून मराठीत पुढील संख्यावाचक विशेषणे आली आहेत: समान (= आठ), तिसा (= नऊ),अशर (= दहा ),अशरीन (= वीस ),सलासीन (= तीस ),अर्बैन(= चाळीस ), खम्सीन (= पन्नास),सित्तैन (= साठ),सबैन (= सत्तर ),समानीन (= ऐंशी),तिसैन (= नव्वद),मया - मिअत(= शभर ),मया - मिअतैन(= दोनशे) ,अलफ(= हजार) .

हजार (फा. हज़ार् ) हे संख्यावाचक विशेषण यादवोत्तर कालापासून[१६] आजतागायत मराठीत सातत्याने वापरले गेले आहे.

### (आ) अपूर्णांकवाचक

निमा, निम्मा,निम्मी,निम्मे (फा. नीम्) · हे एकमेव अपूर्णांकवाचक फार्सी संख्यावाचक विशेषण मध्ययुगापासून आजतागायत मराठी भाषेत वावरत आहे.बखरींत[५२] त्याची निमे,निमे,निमें,निम्मे ही रूपे तर मला आढळलीच पण 'निमेनिम,निमेनिमे' अशी त्याची व्दिरुक्तीशी आढळली.'अर्धा ह्याचेऐवजी 'निमा ' किंवा 'निम्मा 'असें सर्वसाधारणपणे म्हणण्याची चाल आहे. निमा किंवा निम्मा हा शब्द फारसी आहे.' हे मो.के.दामले [५३] यानीही मान्य केले आहे.

इति. वि. का. राजवाडे[५४]यांनी उद्धृत केलेल्या इ. स. १५५८ (शके१४७९) च्या महत्त्वपूर्ण पत्रातही 'निमे' हा शब्द आढळतो. उदा. 'निमे चावराचा फाळा '.

### (इ ) संख्याक्रमदर्शक

याविषयी विवेचन करताना डॉ. मा. त्र्यं. पटवर्धन म्हणतात, 'संख्याक्रमदर्शक विशेषणे अव्वल,दूम,सानी,सीम,चहारुम ही पाच आहेत.' मध्ययुगीन मराठीत ती आहेत तथापि अव्वल (फा. अव्वल् ) सारखे विशेषण आजच्या मराठीतही प्रचलित आहे. 'दूम ' हे विशेषण फार्सी 'दूवम् '[५५]पासून आले आहे,त्याचे 'दुय्यम ' हे रूप आजच्या मराठीत रूढ झाले असून त्याला 'गौण 'असा आणखी एक अर्थ प्राप्त झाला आहे. त्याची व्युत्पत्ती डॉ. पटवर्धन[५६] यांनी फार्सी 'दूयुम् ' पासून दिली आहे.

### (ई ) पृथकत्त्ववाचक

व्याकरणकार मो. के. दामले[५७] यांनी हा भेद मानला असून त्याची दर एक, हररोज ही उदाहरणे दिली आहेत.

### (उ) अनिश्चित

वरीलप्रमाणेच हा दुसरा भेदही मो. के. दामले[५८]यांनी मानला असून त्यात 'जरासा '(अ. जर्रह् ), बाकी - बाकीचा (अ. बाकी ) आणि वगैरे (वगैरह्) यांचा समावेश केला आहे.

## क्रियापद

मराठीतील अरबी फार्सी शब्दयुक्त वा त्यांनी सिध्द झालेली क्रियापदे, त्यांची विविध रूपे, त्यापासून निर्माण झालेली प्रयोजक रूपे आणि संयुक्त क्रियापदे यांचा विचार येथे केला आहे. मराठी वैयाकरणांनी याची फारशी दखल घेतली नाही,हे येथे नमूद करायला हवे. खरे तर हा प्रभावदेखील मराठीच्या प्रकृतीचा एक महत्त्वाचा घटक आहे आणि मध्ययुगीन मराठीत तो विशेषकरून जाणवतो.

[ अ./फा. क्रियापदांचे विविध प्रकार

अरबी - फार्सी शब्दांपासून मराठीत बहुध तीन प्रकारांनी क्रियापदे सिध्द होतात. (यांत मध्ययुगीन मराठीतील उदाहरणेही[५८] समाविष्ट केली आहेत.)

(अ)अ / फा नामांपासून सिद्ध होणारी क्रियापदे

| अ / फा. नाम | | मराठी क्रियापद |
|---|---|---|
| (१) ख़र्च् | > | खर्चणे |
| (२) ग़ल्बह् | > | गलबलणे |
| (३) जंग् | > | गंजणे(वर्णविपर्यय) |
| (४) जवाब् | > | जवाबणे |
| (५) ज़ोर् | > | जोरावणे |
| (६) जारूब् | > | झाडणे |
| (७) दाग़् | > | डागणे |
| (८) तफ़हहुस् | > | तपासणे |
| (९) ताव् | > | तावणे (तावून सुलाखून) |
| (१०) दगा | > | दगावणे |
| (११) दफ़न् | > | दफन |
| (१२) नक़्ल् | > | नकलणे |
| (१३) नक़्क़ाश् | > | नक्कासणे,नकसणे |
| (१४) पेच् | > | पेचणे |
| (१५) पेरहन् | > | पेहेरणे (वर्णविपर्यय) |
| (१६) फ़ित्ना | > | फितणे |
| (१७) फ़ुतूर | > | फितूरणे |
| (१८) बदल् | > | बदलणे |
| (१९) बिना | > | बनावणे |
| (२०) बिसात् | > | बिछावणे |
| (२१) मुरब्बा | > | मुरणे |
| (२२) रंज् | > | रंजणे |
| (२३) शर्म् | > | शरमणे |
| (२४) शल्क | > | शिलगावणे |
| (२५)सतम्, सितम् | > | सतावणे |
| (२६) सुराख़् | > | सुलाखणे |
| (२७) ह़वालह् | > | हवालणे |
| (२८)हुज़ुर | > | हुजुरणे |

(आ) अ.फा. विशेषणांपासून सिद्ध झालेली क्रियापद

| अ/फा विशेषण | | मराठी क्रियापद |
|---|---|---|
| १. ज़ाहिर् | > | जाहीरणे , |
| २. नर्म् | > | नरमणे |
| ३. फ़ुतूर | > | फितुरणे |
| ४. लंग् | > | लंगडणे |
| ५. सर्द् | > | सर्दणे, सरदणे |
| ६. सुस्त् | > | सुस्तावणे |

(इ) अरबी / फार्सी धातूंपासून सिद्ध झालेली क्रियापद -

| अ/फा क्रियापद | अ.फा. धातू | मराठी क्रियापद |
|---|---|---|
| (१) आज़मूदन् | आज्मा | अजमावणे |
| (२) गुज़श्तन् | गुज़र् | गुजरणे,गुदरणे |
| (३) गुज़रानीदन्[१६] | गुज़रान् | गुजराणणे |
| (४) चापीदन्[२०] | चाप् | छापणे |
| (५) तवानीदन्[२१] | तवान् | तवानणे |
| (६) नवाख्तन् | नवाज़् | नावाजणे |
| (७) फर्मूदन् | फर्मा | फर्मावणे |
| (८) बजा आवर्दन् | बजा आर् | बजावणे. |
| (९)शल्क् कर्दन् | शल्क्[२१] | शिलगावणे |

## II प्रयोजक रूपे

अरबी - फार्सी शब्दांपासून मराठीत केवळ क्रियापदेच तयार झाली नाहीत तर त्यांनी यापुढचा टप्पाही गाठला.हा टप्पा म्हणजे प्रयोजक रूपे तयार करण्याचा. 'अव ' (सं.आपय ) या प्रत्ययाने प्रयोजक रूप सिध्द करण्याचा स्वधर्म मराठीत अरबी - फार्सीपासून सिद्ध झालेल्या क्रियापदांच्या संदर्भातही पाळला. अशा प्रकारे बखरींत आढळणाऱ्या प्रयोजक रूपांचा विचार मी[२१] यापूर्वी केला आहे -

| मूळ अ./फा शब्द | त्यापासून सिध्द झालेले मराठी क्रियापद | मराठी प्रयोजक रूप |
|---|---|---|
| १. अर्ज़् | अर्जणे | अर्जविणे |
| २. गुम् | गमणे (?)[२३] | गमावणे |
| ३. गुज़र् | गुजरणे | गुजरविणे |
| ४. जम्अ् . | जमणे | जमविणे |
| ५. ज़ुरब् | जरबणे | जरबावणे |

| मूळ अ./फा शब्द | त्यापासून सिध्द झालेले मराठी क्रियापद | मराठी प्रयोजक रूप |
|---|---|---|
| ६. फ़ित्न् | फितणे | फितवणे |
| ७. बदल् | बदलणे | बदलविणे |
| ८. शल्क् | - | शिलगावणे,शिलगावणे |

या प्रयोजक रूपांची निर्मितिप्रक्रिया मौजेची आहे. उदा. गुजश्तन् या फार्सी क्रियापदाचा धातू 'गुजर् ' हा आहे व पुन्हा त्यालाच 'णे ' प्रत्यय लावून मराठीने 'गुजरणे 'हे क्रियापद सिद्ध केले.वेगळ्या शब्दांत सांगायचे तर फार्सी 'गुजश्तन् 'म्हणजेच मराठी 'गुजरणे 'हे क्रियापद व त्याचेही पुन्हा मराठी पद्धतीने 'गुजरविणे' हे प्रयोजक रूप झाले आहे ! यावरून अरबी - फार्शी क्रियापदे व त्यांचे धातूदेखील मराठीत कसे 'आपपरभाव ' विसरून मिसळले होते,याची प्रचीती येते.

आजच्या मराठीत वरील गमावणे, जमविणे, फितवणे, बदलविणे इ. प्रयोजक रूपांशिवाय खतविणे(>.अ. ख़त् ),दमविणे (> फा. दम्),नोंदविणे (>फा. नमूद् ),नकलविणे (अ. नक़्ल्) यासारखी प्रयोजक रूपें प्रचलित आहेत.

### III 'संयुक्त 'क्रियापद

डॉ.माधवराव पटवर्धनांनी[२४] या संदर्भात उपस्थित केलेल्या एक वेगळ्या मुद्याची नोंद येथे घ्यायला हवी व त्याचा विचारही करायला हवा.ते म्हणतात, 'करणें ,मारणें, देणें इत्यादि क्रियापदांच्या पूर्वी क्रियावाचक अगर इतर नाम घालून संयुक्त क्रियापद सिध्द करण्याचा प्रकार मराठीनें फार्शीवरूनच उचलला. कुदणें अजून खान्देशांत प्रचारांत आहे. हा प्रयोग कानाला गोड लागत नाही. उडी मारणें (फा. झदन् ) हा प्रयोग रूढ झाल्यामुळे गोड लागतो. मिशीवर ताव देणें यांतील ताव देणें हे बरोबर ताब् दादन् = पीळ देणें चे भाषांतर आहे.' या प्रवृत्तीची नोंद यासाठी घ्यायची की मराठी क्रियापदव्यवस्थेवर फार्शीने या पद्धतीने आपला एक वेगळा ठसा उमटविला तथापि त्यास आजच्या रूढ व्याख्येप्रमाणे संयुक्त क्रियापद कितपत म्हणता येईल याची शंका वाटते.मो.के.दामले[२५] यांनी 'संयुक्त क्रियापदां'ची व्याख्या अशी केली आहे : 'धातूंच्या काहीं विशेष कृदन्तांपुढे काहीं धातूंची आख्यातरूपें येऊन जी क्रियापदें बनतात, त्यांस संयुक्त क्रियापदें म्हणतात... संयुक्त क्रियापदात मुख्य क्रियेचें कृदन्त असते आणि गौण क्रियेचें आख्यात असतें म्हणजे कृदन्तांतील धातु मुख्य धातु होय आणि आख्यातरूपांमधील धातु हा सहायधातु होय' , पण डॉ. पटवर्धन ज्या अर्थाने 'संयुक्त क्रियापद ' ही संज्ञा योजतात, ती लक्षात घेता(श्री.दामले यांच्या अर्थाने यांना संयुक्त क्रियापदे म्हणता येत नसले तरी ) काही विशिष्ट अर्थाने त्यांचा या संदर्भात जरूर विचार करता येईल असे मला वाटते. डॉ.पटवर्धन[२६] म्हणतात, 'सकर्मक क्रियावाचक नाम व असणें अगर होणें मिळून कर्मणि क्रियापद सिध्द होऊं लागले, जसे कत्तल होणें म्हणजे मारले जाणे,गडप होणें म्हणजे

ग्रस्त होणे इ. याचा एक परिणाम असा झाला की मागील क्रियावाचक नामांचा उपयोग कर्मणि धातुसाधित विशेषणांसारखा होऊं लागला.
जसे इतराज़(=नाराज ),गर्क(= निमग्न),जमा(= एकीकृत),तर्बेज(=शिक्षित,प्रवीण), तहकीक(=सत्यनिर्णित, खरे ),दखल(श्रुत,माहीत),दिक्क(=क्षीण),माहीत(= ज्ञात) वगैरे' डॉ. पटवर्धन यांचे हे विवेचन निश्चितपणे लक्षात घेण्याजोगे आहे आणि 'अशी 'असंख्य अ तु फा. शब्दयुक्त संयुक्त क्रियापदे मध्ययुगीन तसेच आधुनिक मराठीत आढळतात.

आणखी एक आधार : फार्सीत संयुक्त क्रियापदांची व्यवस्था आहे. ती लक्षात घेता डॉ. पटवर्धनांच्या याविषयीच्या मताला आणखी एक भक्कम आधार उपलब्ध झाला आहे. या संदर्भातील त्यांनी नंतर केलेले विवेचन पुरेसे बोलके तर आहेच पण ते पटण्याजोगेही आहे. ते म्हणतात[२]. 'क्रियापदांच्या रूपांपैकी 'गुम शुद ','मोर्तब सूद 'मध्ये 'शुद 'म्हणजे झाले व 'रवाँ अस्त '(राजवाडे १६/४९) मध्ये अस्त म्हणजे आहे. 'रोशन गर्दीद ' मध्ये 'गर्दीद 'म्हणजे झाले व 'गुदस्त ' म्हणजे झाले. न रवां दारन्द मध्ये दारन्द म्हणजे ठेवावे असे पांच शब्द सांपडतात' याशिवाय मध्ययुगीन मराठीत 'सई सूद','सप्त सूद'असे शब्दही आढळतात[४]. मध्ययुगीन मराठी पत्रात्मक गद्याचा बराचसा भाग प्रशासकीय स्वरूपाचा व फार्सीमय आहे. त्यातील दरबारी भाषेत अशी अनेक उदाहरणे आढळतात. जिज्ञासूंनी या संदर्भात 'छत्रपती शिवाजी महाराज यांची पत्रे 'पाहावीत. ती डॉ. सुधाकर पवार[५] यांनी आपल्या प्रबंधाच्या परिशिष्टात उद्धृत केली आहेत.

### शब्दयोगी अव्यय

मराठी व्याकरणातील शब्दयोगी अव्यय हे केवळ पुरोगामी असतानाही फार्सी शब्दयोगी अव्ययांचे चार प्रकार मराठीत आलेले दिसतात. पुरोगामी शब्दयोगी अव्यय वगळता फार्सीमुळे मराठीत नव्याने आलेले हे तीन अन्य प्रकार असे :
१) पूर्वगामी शब्दयोगी अव्यय
२) व्दिरुक्ती होऊन येणारे शब्दयोगी अव्यय आणि
३) संयुक्त शब्दयोगी अव्यय.
या फार्सी शब्दयोगी अव्ययांमुळे मराठी व्याकरणात गुणात्मक तर भर पडलीच पण फार मोठी संख्यात्मक भरही पडली. ती अशी -

| | |
|---|---|
| १) पूर्वगामी शब्दयोगी अव्यय | ३१ |
| २) पुरोगामी शब्दयोगी अव्यय | २३ |
| ३) व्दिरुक्तीने सिध्द झालेली शब्दयोगी अव्ययं | ५ |
| ४) संयुक्त शब्दयोगी अव्ययं | २० |
| एकूण | ७९ |

पुरोगामीव्यतिरिक्त शब्दयोगी अव्ययांच्या अन्य प्रकारांची संकल्पना मराठीत भाषेला नवीन आहे पण नाविन्याचे हे परकेपण फारसे व फार काळ टिकलेच नाही. पुरोगामीप्रमाणेच शब्दयोगी अव्ययांचे अन्य फार्सी प्रकार मराठी भाषेत चांगलेच रुजले या सर्वच प्रकारांचे विवरण पुढे क्रमशः व सविस्तर करीत आहे. मराठी व्याकरणाला फार्सीचे हे मौलिक योगदान आहे त्यामुळे भाषेतले अनेक बारकावे अधिक सूक्ष्मपणे दाखविता आले.

(अ) पूर्वगामी शब्दयोगी अव्यय (१-३१)

मराठीत शब्दयोगी अव्यये शब्दांच्यानंतरच लावतात. फार्सीत ती शब्दांच्या पूर्वी लावण्याची पध्दती आहे. फार्सीच्या संपर्कामुळे यादवोत्तर मध्ययुगीन मराठीत ही प्रवृत्ती फार मोठ्या प्रमाणात आली. या 'पूर्वगामी' फार्सी शब्दयोगी अव्ययांची संख्याही फार मोठी, जवळपास तीस - एकतीस, आहे. आधुनिक मराठीत मात्र ही प्रवृत्ती तितकीशी टिकली नाही तथापि फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्यये एके काळी चांगलीच रुजली होती हे पुढील उदाहरणांवरून[४] लक्षात येईल -

१) अज् (फा. अज़् = मुळे, पासून) : अजहत्त सरदेशमुख. राजवाडे[८] यांनी याची यादवोत्तर मध्ययुगीन मराठीतील 'अज रख्तखाने', 'अज तागाइत' ही उदाहरणे दिली आहेत.

२) गैर ? (अ.ग़ैर् = व्यतिरिक्त) : इति. राजवाडे[८] यांनी याचा फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांत समावेश करून 'गैरचाल' हे त्याचे उदाहरण दिले आहे तथापि गैरसमज,गैरहजर,गैरशिस्त, गैरवर्तन यासारख्या शब्दांत 'गैर' चा चुकीचे, वाईट असा किंवा नकारात्मक अर्थ होतो . त्याचा उपयोग शब्दयोगी अव्यय म्हणून होत नाही. उपसर्ग म्हणूनच होतो. त्यामुळे याचा फार्सी उपसर्गात डॉ. पटवर्धन[१] यांनी केलेला समावेशच मला योग्य वाटतो.

३) तह (फा. ता) : काही वेळा फार्सी 'ता' या पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाचेच रूपान्तर मराठीत 'तह' मध्ये झाले असावे, हे डॉ. पटवर्धन[१] यांचे मत मान्य करण्याजोगे आहे. आजच्या मराठीत आजीव वा आजन्म या अर्थाने 'तहहयात' असा शब्दप्रयोग केला जातो.

४) ता (फा. ता = पर्यंत) : ता सन ११८२, तामगदूर (याविषयी इति. राजवाडे यांचे महत्त्वपूर्ण विवेचन 'दर' च्या संदर्भात पुढे उद्धृत केले आहे ते पाहावे.)

५) तागाईत (फा. तागायत् = पर्यंत) : तागाइत पौष

६) ते (फा. ता = पर्यंत) औरंगाबाद ते पुणे, वाळीस ते पन्नास हे राजवाडे यांनी दिलेले आधुनिक मराठीतील उदाहरणही मला लक्षात घेण्याजोगे वाटते.

७) दर (फा. दर् = आत.फा. हर् = प्रत्येक) : यात काही वेळा 'हर' ऐवजी 'दर' चा उपयोग 'हर' च्या अर्थानेच मराठी भाषकांनी केला आहे पण त्याचप्रमाणे 'दर' चा आत या अर्थी अपयोगही त्यांनी केला आहे. याविषयी इति. राजवाडे[८] यांचे पुढील विवेचन

महत्त्वाचे आहे - 'नामांच्या पाठीमागें लागणाऱ्या फारशी शब्दयोगी अव्ययांच्या योगानें मराठी भाषेच्या स्वभावात बदल झाला आहे.दर साल, दर सदे किंवा दर शेकडा पांच टक्के व्याज सुटतें, ह्या वाक्याचा अर्थ सालांत शंभर रुपयांमागें पांच टक्के व्याज सुटतें, असा आहे. 'दर 'म्हणजे आंत हे शब्दयोगी अव्यय फारशींत इतर शब्दयोग्यांप्रमाणें नामाच्या पाठीमागें लावतात. दररोज म्हणजे रोजीं, दर बाजार म्हणजे बाजारीं ; असा प्रयोग फारशींत होतो . दर रोज तीन आणे मजुरी देतों किंवा रोजीं तीन आणे मजुरी देतों, असे दोन्ही प्रयोग मराठींत होतात. दर रोज ह्याबद्दल संस्कृतांत, महाराष्ट्रींत व मराठींत दिवसे, दिसम्मि, दिवशीं असे प्रयोग होतात. म्हणजे सप्तमीचा प्रत्यय नामाच्या पुढें लागतो. मागे लागत नाही. इंग्रजीत किंवा फारशीत in किंवा दर ही शब्दयोगी अव्ययें नामाच्या पाठीमागें लागतात. येणेंप्रमाणें, शब्दयोगी अव्यय योजण्याची मराठीत जी सार्वत्रिक चाल आहे तिच्याविरुद्ध 'दर ' हें शब्दयोगी अव्यय मराठीत योजिले जाऊं लागलें आहे. ही कथा ता ह्या फारशी शब्दयोगी अव्ययाची आहे.ता ह्या शब्दयोगी अव्ययाचा अर्थ फारशींत पर्यंत असा होतो. अज् मुंबई ता पुना, ह्या फारशी शब्दांचा अर्थ मुंबईपासून पुण्यापर्यंत असा आहे. ह्या ता ची ते, तो अशी रूपें मराठींत योजिलीं जातात. मुंबई ते पुणें पांच रुपये भाडें पडतें, ह्या पुस्तकाचे एक ते पांच भाग छापिले जातील, ह्या वाक्यात 'ते 'ह्या शब्दयोग्याचा अर्थ 'पर्यंत ' असा आहे.'ते ','ता ' ह्या शब्दयोग्याचा अपभ्रंश असून फारशींतल्याप्रमाणें नामाच्या मागें लागतें.'

इति. राजवाडे यांच्या इतक्या महत्वाच्या विवेचनाची दखल मो.के. दामले आपल्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'च्या संपूर्ण सातव्या अध्यायात (पृ.१८३ ते २०४ या संपूर्ण वीस पानांत ) कसलीच दखल घेत नाहीत. एवढेच नव्हे तर फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांविषयी अवाक्षर काढीत नाहीत, याचे मोठे नवल वाटते.

इति. राजवाडे" येथेच थांबत नाहीत तर 'दर 'व 'ता ' या पूर्वगामी फार्सी शब्दाच्या एका वेगळ्या-राजवाडयांच्या शब्दांत 'फाजील '-उपयोगाविषयी म्हणतात,'दर व ता या पूर्वगामी अव्ययांचा मराठींत दुसऱ्या एका तऱ्हेने फाजील उपयोग होत असतो. मी दर दिवशीं चार कोस चालतों , ह्या वाक्यांत दर हें पूर्वगामी अव्यय योजून शिवाय दिवस ह्या शब्दाची सप्तमी योजिली आहे. पुण्यापासून तो मिरजेपर्यंत अडीचशें मैल अंतर आहे, येथें तो हे पूर्वगामी व पर्यंत हे पश्चाद्गामी अशी दोन्ही शब्दयोगी अव्यये आली आहेत. ह्या ठिकाणीं तो व दर ह्या शब्दांची शक्ति काय आहे व त्यांचा मूळ प्रयोग कसा करीत असत ,हे माहीत नसल्यामुळें बोलणाऱ्याने फारशी व मराठी अशी दोन्ही अव्यये योजिली आहेत.फारशी प्रयोग अत्यंत रूढ झाल्यानें तो सोडवेना व मूळ मराठींतल्याप्रमाणे बोलण्याचा स्वभाव सुटेना, असा चमत्कार ह्या फाजील प्रयोगांत झाला आहे,परंतु या फाजील प्रयोगांत एक मोटे इंगित सांठलेलें आहे.तें हें कीं इंग्रजीप्रमाणें किंवा फारशीप्रमाणे पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांचा मराठीला जातीचाच ह्या

कटाळा आहे. शब्दाचे सामान्यरूप करून पश्चादगामी शब्दयोगी अव्यय त्या सामान्यरूपापुढे लटकावून देण्याचा मराठीचा आनुवंशिक स्वभाव आहे. परंतु ह्यालाहि एक अपवाद आहे. मराठीत भर म्हणून एक शब्दयोगी अव्यय फारशीतून आलेलें आहे. फारशीत बर म्हणून एक पूर्वगामी शब्दयोगी आहे,त्यापासून हें मराठी भर अपभ्रंशाने आलें आहे. भर अव्ययाचा, शब्दाचें सामान्यरूप न होतां, उपयोग होतो. जसें घरभर, गुडघाभर, पायलीभर, हौदभर इत्यादि '

८) दि ।।, दिमत, दिम्मत (अ. ज़िम्मत् = स्वाधीन) : 'पानिपतच्या बखरीं'त ' लेखक दिमत चिटणीस '(पृ.१) किंवा 'होळकरांच्या कैफियती'त 'मल्हार शामजी दिम्मत होळकर' (पृ.१३१) असे उल्लेख आढळतात. त्याचा अर्थ च्या सेवेत, साठी, तर्फेचा, कडील असा होतो. चिटणीसांच्या सेवेतील लेखक, होळकरांच्या सेवेसाठी/सेवेतील/कडील मल्हार शामजी असा वरील उदाहरणांचा अर्थ आहे. यादवोत्तर- विशेषत: शिवकालीन व पेशवेकालीन मराठीत- हे पूर्वगामी शब्दयोगी अव्यय प्रचारात असले तरी त्या स्वरूपात ते आधुनिक मराठीत वापरले जात नाही. 'आम्ही तुमच्या दिमतीस आहोत 'या वाक्यात 'दिमत 'चा सेवा असा नामार्थी उपयोग होतो. राजवाडे यांच्या शब्दयोगी अव्ययांच्या यादीत हे अव्यय आढळत नाही.

९) देखील (फा. दाखि़ल) : फार्सी पूर्वगामी अव्ययाचे हे मराठी रूपान्तर .मूळ अव्ययाचा अर्थ समाविष्ट,सुद्धा असा आहे. इति.राजवाडे यांनी याचे यादवोत्तर मराठीतील 'देखील इनाम '(म्हणजे 'इनामासुध्दा ') हे उदाहरण दिले आहे. सध्याच्या मराठीत हे अव्यय पूर्वगामी स्वरूपात योजिले जात नाही तथापि पुरोगामी स्वरूपात सर्रास योजिले जाते.

१०) नजीक (फा. नज़्दीक् = जवळ) : या फार्सी शब्दयोगी अव्ययाचा पूर्वगामी व पुरोगामी असा दुहेरी उपयोग होतो तथापि पूर्वगामी उपयोग विशेषकरून यादवोत्तर मध्ययुगीन मराठीत झाला आहे.आजच्या मराठीत तो पुरोगामीच आहे.'नजीक तळेगाव ', 'नजीक खरगोण' ही बखरीतली उदाहरणे मी दिलीच आहेत.इति.राजवाडे 'नजदीक' चा पुरोगामी फार्सी शब्दयोगी अव्ययांच्या यादीत समावेश करतात पण पूर्वगामींच्या यादीत का करीत नाहीत, याचा उलगडा होत नाही. 'नजदीक ' हे रूप आजच्या मराठीतही प्रचलित नाही. काही मराठी शब्दांनाही हे फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्यय कसे जोडून येते, ते डॉ. पटवर्धन यांनी यादवोत्तर मध्ययुगीन मराठीतील काही उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे,तेही लक्षात घेण्याजोगे वाटते. त्यांनी दिलेली उदाहरणे अशी-नजीक समाधी (राजवाडे १५/१५४),नजीक नदी (राजवाडे १५/२५२).

११) नि।। , निसबत (अ. निस्बत् = संबंध) : संबंधी, संबंधित, च्या तर्फेचे अशा अर्थी हे फार्सी शब्दयोगी अव्यय यादवोत्तर मराठीत वापरले जात होते. मूळात हे अरबी नाम असून ते मराठीत स्त्रीलिंगी नाम व शब्दयोगी अव्यय अशा दोन्ही प्रकारे वापरले गेले. 'चिटणीस निसबत सर्जेराव 'म्हणजे सर्जेरावसंबद्ध चिटणीस किंवा सर्जेरावाशी संबंधित

असलेले चिटणीस. डॉ. पटवर्धनांनीही याचा उल्लेख केला आहे. आजच्या मराठीत हे शब्दयोगी अव्यय वापरले जात नाही. पेशवेकालीन मराठीत त्याचा 'नि।।' हा संक्षेपही रूढ झाला, याचा अर्थ ते त्या काळात अधिक प्रमाणात योजिले जात असावे. राजवाडे यांच्या पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांच्या यादीत ते नाही.

१२) ब (फा. ब) : 'सह' अशा अर्थाचे हे शब्दयोगी अव्यय. याची बजिन्नस, बशर्त यासारखी अनेक उदाहरणे यादवोत्तर मध्ययुगीन पत्रात्मक वाङ्मयात व बखरीत आहेत. सध्याच्या मराठीत मात्र ते आढळत नाही

१३) ब (फा. बा) : बदिमाख, बपोशाख् यासारख्या बखरींत येणाऱ्या शब्दांत 'बा'चे 'ब'मध्ये रूपान्तर झाले आहे.

१४) बगैर (अ.बग़ैर् = शिवाय, वाचून) : इति.राजवाडे यांनी याचा फार्सी शब्दयोगी अव्ययांच्या यादीत उल्लेख केलेला नाही.डॉ. पटवर्धन मात्र त्याची आवर्जून नोंद घेतात व 'इतिहास मंजिरी'तून त्याचे 'बगैर जागीर' हे उदाहरणही देतात.हे उदाहरण अर्थातच पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाचे आहे.याची उत्पत्ती डॉ. पटवर्धन यांनी 'बि - घैर - इ' अशी दिली आहे आणि त्यामुळेच त्यांनी याचा समावेश संयुक्त शब्दयोगी अव्ययात केला आहे. स्टेनगॅसने मात्र त्याचे मूळ अरबी 'बिगैर्'/ 'बगैर्' हे शब्दयोगी अव्ययच दिले आहे व त्याचा अर्थ without ,besides असा दिला आहे. त्यामुळे मी त्याचा समावेश संयुक्त शब्दयोगी अव्ययांत न करता येथे केला आहे.

१५) बदल (अ. बदल् = ऐवजी) : याचे आजच्या मराठीत सर्रास वापरले जाणार रूप म्हणजे 'बद्दल'.त्याचा पूर्वगामी स्वरूपातील वापरही यादवोत्तर मराठीत होत होता, हे डॉ. पटवर्धन यांनी इति. राजवाडेसंपादित 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां'च्या पंधराव्या खंडाच्या आधारे दाखवून दिले आहे. त्यातील पुढील उदाहरण त्यांनी नोंदविले आहे.-'बदल नंदादीप व भंडारा' ... पण स्वतः राजवाडे यांनी मात्र आपल्या याविषयीच्या यादीत त्याला स्थान दिलेले नाही.

१६) बर (फा. बर् = वर) : 'बरबाद' म्हणजे वाऱ्यावर - पर्यायाने नष्ट वा उद्ध्वस्त. 'बडतर्फ'चे मूळ रूप फा. बर्तरफ् असे आहे.बखरीत 'बरतर्फ' हा शब्दही आढळतो. आधुनिक मराठीत 'बरतर्फ' चे बडतर्फ या शब्दात रूपान्तर झाले. त्यातील 'बड' हे पूर्वाश्रमीचे 'बर' हे फार्सी शब्दयोगी अव्यय आहे, असे जाणवले तरी का ?

१७) बराय (फा. बराय् = साठी) : 'बराय खुद' किंवा 'बराय मसलत' असे शब्दप्रयोग बखरींत आढळतात, त्यांचा अर्थ अनुक्रमे स्वतःसाठी, मसलतीसाठी असा आहे. इति. राजवाडे यांच्या फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांच्या यादीत मात्र ते दिसत नाही.डॉ. पटवर्धनांनी त्याची 'बराय तिजारत' (= व्यापारासाठी),'बराय मालमपुर्सी' (= दुखवट्यासाठी) ही उदाहरणे दिली आहेत.

१८) बा (फा. बा) : याचाही अर्थ 'सह' असाच आहे. यादवोत्तर ऐतिहासिक पत्रात्मक वाङ्मयात व बखरींप्रमाणेच तो मराठी ऐतिहासिक नाट्यवाङ्मयात आढळतो.

'बाअदब बामुलाहिजा होशियार !' सारख्या सूचना/घोषणांत तो अजून टिकून असला तरी आजच्या दैनंदिन व्यवहारात त्याचा उपयोग केला जात नाही. राजवाडे यांनी त्यांच्या पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाच्या यादीत त्याची नोंद घेतली नसली तरी त्यांनी संपादिलेल्या 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां'च्या आधारे डॉ पटवर्धन यांनी त्याची उदाहरणे दिली आहेत,ती अशी - बाजमियत(५/१३२),बावकर(१०/२५२), बा - वकूफ (१२/२७)

१९) बाद (अ. बआ्द) : अरबीतून फारसीत व फारसीतून मध्ययुगीन मराठीत आलेल्या या पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाचा अर्थ 'नंतर ' असा आहे. 'बाद बरसात ' म्हणजे पावसाळ्यानंतर.इति राजवाडे[१०]यांच्या यादीत ते नसले तरी यादवोत्तर मराठीत तो बाद - ऊ,बाद दसरा यासारख्या उदाहरणांत आढळत असल्याचे डॉ. पटवर्धन[११]यांनी नमूद केले आहे.

२०) बि, बी (फा. ब् = सह) : मध्ययुगीन मराठीतील (राजकीय) पत्रात्मक गद्यात वा बखरींतच नव्हे तर एकनाथांच्या 'अर्जदास्त 'सारख्या भारुडात - म्हणजे बहमानीकालीन संतवाङ्मयातही - हे फारसी पूर्वगामी शब्दयोगी अव्यय आढळते. 'बितपशील ' म्हणजे तपशीलासह, तपशीलवार हे त्याच प्रख्यात उदाहरण.[१२]

२१) बिला (अ . बिला) : इति.राजवाडे[१३]यांनी याची 'बिलाकसूर 'व डॉ.पटवर्धन[१४]यांनी त्याबरोबरच 'बिलाउजूर ,'बिलाहुज्जत' ही यादवोत्तर मराठीतील उदाहरणे दिली आहेत.

२२) बी । , बीत।। : 'बितपशील 'शब्दासाठी हा संक्षेप यादवोत्तर मराठीत वापरला जातो.

२३) बेला (अ. बिला) : याचे 'बेलाशक ' हे यादवोत्तर मध्ययुगीन[१५] व आधुनिक मराठीतील लोकप्रिय उदाहरण.

२४) बे (फा. बी = शिवाय, याचून) : याची यादवोत्तर ऐतिहासिक मराठीत बेकैदी, बेचिराख,बेजरब, बेतरतूद,बेदील, बेफिकीर, बेबंद, बेलाशक, बेषक, बेरोजगार, बेवतन ही उदाहणे आढळतात. आजच्या मराठीत या पूर्वगामी फारसी शब्दयोगी अव्ययाने सिद्ध झालेले पुढील शब्द रूढ आहेत -

बेकार,बेकारी, बेगमी,बेगुमान,बेजार,बेजारी,बेदिक्कत, बेपर्वा, बेपर्वाई , बेफिकीर,बेबंद, बेबंदशाही. बेरोजगार, बेरोजगारी, बेवकूफ, इ.

काही मराठी शब्दांना फा. बे हे पूर्वगामी शब्दयोगी अव्यय लावूनही काही रूपे सिद्ध झाली आहेत : उदा. बेघर,बेसावध इ.

२५) मये,मै (फा. मअ् = सह ):

डॉ. पटवर्धन[१६] यांनी याची मध्ययुगीन मराठीतील पुढील उदाहरणे दिली आहेत - मै जमियत, मै फौज, मये लक्षणपत्र, मये वसूल. यांपैकी शेवटची दोन उदाहरणे राजवाडे[१७]संपादित 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां'च्या (प्रथमावृत्ती), पहिल्या व दहाव्या खंडातील आहेत तथापि याच ग्रंथांना लिहिलेल्या 'ऐतिहासिक प्रस्तावने'त

मात्र राजवाडे यांची नोंद घेत नाहीत.'बमय ' या फार्सी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांची नोंद मात्र त्यांनी घेतली आहे.

२६)माफक (अ. मुआफ़िक़ = प्रमाणे) : राजवाडे[११३] पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांत याचा निर्देश करीत नसले तरी डॉ. पटवर्धन[११४] यांनी तो केला आहे व त्याची मध्ययुगीन मराठीतील 'माफक मरातब ', 'माफक मामूल ', 'माफक - हुकूम - विलायत ' इ. उदाहरणे दिल आहेत. मलाही त्याची पुढील उदाहरण बखरींत[११५] आढळली- माफक हुकूम, माफक भारबर्दारी.

२७) मार्फत (अ. मुअ़रिफ़त्) : हे बहुधा पुरोगामी शब्दयोगी अव्यय म्हणूनच मध्ययुगीन आणि आधुनिक मराठीत वापरले जाते पण त्याचा पूर्वगामी शब्दयोगी अव्ययासारखं उपयोगही होत असावा, हे मी, 'मार्फत बळवंतराव' यासारखी उदाहरणे देऊन, स्पष्ट केले आहे[११६].

२८) मुताबीक (अ.मुताबिक़ = प्रमाणे) : सध्याच्या मराठीत हे अव्यय वापरले जात नाही तथापि मध्ययुगीन मराठीत विशेषतः बखरीत[११७] ते पूर्वगामी स्वरूपातही वापरले जात होते.उदा - 'मुताबीक छ रबीलाखर ' .

२९) मुतालिक (अ. मुतअल्लिक़् = संबंधी) : या अरबी अव्ययाने फार्सीत - व पुढे फार्सीद्वारा मराठीत येऊन - वेगवेगळी व्याकरणिक कार्ये केली. त्याचा पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाप्रमाणे झालेला उपयोग मी[११८] बखरींच्या आधारे नोंदविला आहे- मोरो शामराव मुतालिक प्रतिनिधी, गोविंद मल्हार मुतालिक न्यायाधीश इ. पुढे त्याचे आधुनिक मराठीत नामात रूपान्तर झाले एवढेच नव्हे तर एक आडनाव म्हणूनही ते आज महाराष्ट्रात प्रचलित आहे !

३०) ला (अ. ला = शिवाय,रहित,विरहित) : याचा नकारार्थी उपयोग केला जातो. मला ते बखरींत[११९] 'लाचार ' सारख्या शब्दात आढळले. फा. 'चारह् ' म्हणजे उपाय व 'लाचार 'म्हणजे उपाय नसलेला,निरुपाय(पुढे त्याचा असहाय, दीन असा अर्थ झाला.) राजवाडे[१२०] यांनी हे शब्दयोगी अव्यय नोंदविले असून त्याचे 'लाइलाज 'हे उदाहरण दिले आहे.आजच्या मराठीत वापरल्या जाणाऱ्या 'लाजवाब 'या शब्दातही ते आढळते.

३१) शिवाय (फा. सिवाअ़ ) : आधुनिक मराठीत हे फार्सी शब्दयोगी अव्यय पुरोगामी रूपात फार लोकप्रिय आहे तथापि त्याचा पूर्वगामी स्वरूपातही मध्ययुगीन मराठीत वापर होत असावा, हे डॉ. पटवर्धन यांनी दिलेल्या पुढील उदाहरणावरून लक्षात येते -

१. 'शिवाय पाटीलबावाचे परवानगी '(म्हणजे पाटीलबावाच्या परवानगीशिवाय.)

२. शिवाय तोफा तहफ

(आ) **पुरोगामी शब्दयोगी अव्यये** (१ ते २३)

शब्दांच्या नंतर त्यांना शब्दयोगी अव्यये जोडणे ही मराठीची नेहमीची प्रवृत्ती. फार्सीची प्रवृत्ती याउलट आहे. तिचा विचार पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांच्या संदर्भात यापूर्वी केला

आहे.यादवोत्तर काळात तसेच आधुनिक मराठीत फार्सी शब्दयोगी अव्यये मराठीच नव्हे तर अरबी - फार्सी शब्दांनाही- (शब्दानंतर )जोडण्याची प्रवृत्ती मोठ्या प्रमाणात दिसते, त्याचप्रमाणे या शब्दयोगी अव्ययांची संख्याही लक्षात घेण्याजोगी आहे. ती जवळपास वीसपेक्षा अधिक आहे.

(१) अखेर (अ. आख़िर् = शेवट,शेवटी) : मध्ययुगीन व आधुनिक मराठीत सातत्याने वापरले जाणारे शब्दयोगी अव्यय.त्याची बखरींतील[illegible]उदाहरणे अशी - तिसाअखेर, फालगुनअखेर, बरसातअखेर, भाद्रपदअखेर. आजच्या मराठीत महिनाअखेर, सालअखेरसारख्या शब्दांत ते सातत्याने वापरले जाते.इति.राजवाडे[illegible]यानी 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां'च्या संदर्भात याचा उल्लेख का केला नाही,ते कळत नाही, डॉ. पटवर्धन[illegible] मात्र तो करतात.

(२) ऐवजी (फा. इवज़् ईन्) : डॉ. पटवर्धन[illegible] याची व्युत्पत्ती 'ब - इवज़ - इ ' अशी देतात. मध्ययुगीन मराठीच्या संदर्भात राजवाडे[illegible] त्याची नोंद घेतात.मला बखरींत[illegible]त्याची खंडणीऐवजी, बाकीऐवजी यासारखी अनेक उदाहरणे आढळली. आजच्या मराठीत हे शब्दयोगी अव्यय चांगलेच रुळले आहे.

(३) खेरीज (अ. ख़ारिज् = बाह्य, शिवाय[illegible]) : याची परवानगीखेरीज, मसलतीखेरीज, हुजरातखेरीज ही मध्ययुगीन मराठीतील उदाहरणे. आजच्या मराठीतही हे अव्यय प्रचलित आहे.इति. राजवाडे[illegible] मात्र हे अव्यय आपल्या शब्दयोगी अव्ययांच्या यादीत नोंदवीत नाहीत.

(४) तर्फे (फा. तर्फ़्, तरफ़् = च्या बाजूने) : इति. राजवाडे[illegible] व डॉ. पटवर्धन याचा निर्देश करीत नाहीत.आमचेतर्फे ,आमच्यातर्फे,इच्यातर्फे,त्यांचेतर्फे,ही याची बखरीतील उदाहरणे मी[illegible] दिली आहेत. आधुनिक मराठीत ते सर्रास वापरले जाते.

(५) तहत, तहद (फा. ता - हद् = पर्यंत) : याचा वापर यादवोत्तर मध्ययुगीन मराठीपुरताच मर्यादित आहे. आधुनिक मराठीत ते फारसे आढळत नाही. इति. राजवाडे[illegible] व डॉ. पटवर्धन यांच्या यादीत ते का नसावे ते कळत नाही.बखरीतील त्याचे 'वसईतहत 'सारखे उदाहरण मी[illegible]निर्देशिले आहे. त्याचा पुरोगामीऐवजी पूर्वगामी शब्दयोगी अव्ययासारखाच वापर मराठीत अधिक होत असावा,असे दिसते.

(६) ता।। (फा. तागायत् = पर्यंत) : 'तागायत'चा हा संक्षेप. याविषयीचा अधिक तपशील पुढे 'तागाईत 'मध्ये दिला आहे.'भाऊसाहेबांच्या बखरीत आजता।। 'हा संक्षेप आढळला[illegible].

(७) तागाईत तागायत (फा. ता - ग़ायत् = पर्यंत) : याची 'आजीतागाईत ', 'त्यातागाईत ' ही बखरीतील[illegible] काही उदाहरणे. शिवाजी महाराजाच्या पत्रांतही ते आढळते[illegible]. आजच्या मराठीत ते 'तागायत ' या रूपात प्रचलित आहे. इति. राजवाडे[illegible] यांच्या यादीत ते दिसत नाही.

(8) दाखल (फा. दाख़िल्) : याचा निर्देश इति.राजवाडे[illegible] व डॉ.पटवर्धन[illegible] यांनी केला

आहे कैदेदाखल,तनकादारखल, डेरेदाखल ही याची मध्ययुगीन मराठीतील[१] उदाहरणे. आजच्या मराठीतही हे अव्यय प्रचारात आहे.

(९) देखील (फा. दाख़िल् = समाविष्ट,सुध्दा) : इति. राजवाडे[१] याचा निर्देश पूर्वगामी फार्सी शब्दयोगी अव्ययांत करतात पण पुरोगामींत करीत नाहीत.मध्ययुगीन मराठीत ते जसे वापरले गेले तसेच ते आजच्या मराठीतही सातत्याने वापरले जाते.मध्ययुगीन मराठीतील[१] काही उदाहरणे अशी उमरावदेखील, पागादेखील इ.

(१०) नजीक (फा. नज़दीक़ = जवळ) : मध्ययुगीन मराठीत हे विपुल प्रमाणात आढळते[१] : उदा किल्ल्यानजीक,दरवाज्यानजीक,बुरजानजीक,सदरेनजीक इ. आजच्या मराठीतही ते चांगलेच रुळले आहे.इति. राजवाडे[१] यांच्या पुरोगामी शब्दयोगी अव्ययांच्या यादीत ते 'नजदीक 'या रूपात आढळते.

(११) निसबत (अ. निस्बत्) : मध्ययुगीन मराठीत हे अव्यय त्या मानाने क्वचित प्रमाणात वापरात असावे,त्यामुळे इति. राजवाडे व डॉ. पटवर्धन[१] त्याचा उल्लेख करीत नाहीत. बखरींतही[१] मला त्याचे निसबत हे त्याचे अपवादात्मक उदाहरणच आढळले.

(१२) निहाय (अ. निहायत्) : अरबी 'निहायत् 'चा अर्थ पराकाष्ठा, सीमा असा असल्याने हे शब्दयोगी अव्यय त्यापासूनच आले किंवा नाही याबद्दल साशंकता वाटते तथापि ते अरबी - फार्सीपासून आले हे निश्चित. निहाय चा अर्थ 'गणिक 'असा काहीसा वेगळा होत असल्याने वरील शंका मनात आली. या अर्थानेच हे शब्दयोगी अव्यय मध्ययुगीन मराठीत वापरले जाई तसेच आजच्या मराठीत वापरले जाते. इति. राजवाडे[१] व डॉ. पटवर्धन याचा उल्लेख करीत नाहीत पण बखरींत[१] त्याची पागानिहाय, महालांनिहाय ही उदाहरणे आढळतात.

(१३) बद्दल (अ. बदल्) : हे अव्यय मध्ययुगीन मराठीत तसेच आजच्या मराठीत इतके प्रचलित आहे की त्याविषयी वेगळे विवेचन करण्याची आवश्यकता नाही. तरीही बखरींतील[१] त्याची काही उदाहरणे वानगीदाखल देतो - कारकुनीबद्दल, नजराण्याबद्दल, नजरेबद्दल, फौजेबद्दल इ. इति. राजवाडे[१] यांच्या यादीत ते आहे.

(१४) बाद (अ. बअ़्द् = नंतर) : इति. राजवाडे[१] याचा निर्देश करीत नाहीत तथापि मला बखरींत हे 'पुरोगामी ' स्वरूपात आढळले नाही.डॉ. पटवर्धन[१] यांनी ते नोंदविले असून मध्ययुगीन मराठीतील 'दाखलबाद 'हे त्याचे उदाहरण दिले आहे.हे आजच्या मराठीत पुरोगामी शब्दयोगी अव्ययाच्या रूपात वापरले जात नाही. 'सालाबादप्रमाणे ' सारख्या शब्दांच्या अपवादाचा येथे उल्लेख करायला हवा.

(१५) बाबत,बाबद (फा. बाबत्) : इति. राजवाडे[१] यांनी याची नोंद घेतली असली तरी डॉ. पटवर्धन[१] यांच्या यादीत ते आढळत नाही, खरे तर मध्ययुगीन मराठीत ते विपुल प्रमाणात आढळते. त्याची नालबंदीबाबत,फौजेबाबत,खर्चाबाबद,'नजरेबाबद' इ. बखरींतील[१] उदाहरणे मी दिलीच आहेत. आजच्या मराठीत त्याचे पहिले रूप विशेष प्रचारात आहे.

(१६) बिगर (अ. बिग़ैर) : यापूर्वी 'बगैर ' या निर्देश पूर्वगामी शब्दयोगी अव्ययांत केलाच आहे. आजच्या मराठीत विशेषतः ग्रामीण मराठीत ते 'बिगर 'या रूपात प्रचलित असून ते पुरोगामी शब्दयोगी अव्यय आहे.

(१७) माफक (अ. मुवाफ़िक़ = प्रमाणे) : इति. राजवाडे[४५]यांनी या फारसी शब्दायोगी अव्ययाचा अल्लेख केलेला आहे.डॉ. पटवर्धनही[४६] तो करतात. मध्ययुगीन मराठीतील 'मुद्यामाफक 'यासारखे त्याचे उदाहरण देतात. बखरींत ते विपुल प्रमाणात आढळते: उदा. खातरजमेमाफक, दस्तुरमाफक, मर्जीमाफक इ.आजच्या मराठीतही ते चांगलेच प्रचारात आहे.

(१८) मार्फत (मुअ़रिफ़त्) : याचा 'मध्यस्थीने,ओळखीने' असा अर्थ डॉ.पटवर्धन[४७] देतात;'दवारा,कडून',या अर्थांनीही ते वापरले जाते.याची बखरींत[४८] दस्तुरामाफक, मर्जीमाफक,मुद्यामाफक अशी अनेक उदाहरणे दिसतात.डॉ. पटवर्धनांनीही यांतील शेवटचे उदाहरण दिले आहे.

(१९) माविजा (फा. ब् मुअ़ावज़् - इं ← ऐवजी) : हे अव्यय मध्ययुगीन मराठीत अत्यल्प प्रमाणातच प्रचारात होते.ते मला बखरींत आढळले नाही. डॉ.पटवर्धन[४९]त्याचे म.इ. साधनांतील (खंड ५)'वकलातीचे मावजा'हे उदाहरण देतात पण स्वतः राजवाडे[५०] यांनी मात्र आपल्या यादीत त्याचा समावेश केलेला नाही !

(२०) लायक, लायख (अ. लाइक़् = पात्र,योग्य) : इति. राजवाडे[५१] व डॉ. पटवर्धन यांच्या यादीत याचा समावेश केलेला नाही. बखरींत[५२] याची वरील दोन्ही रूपे आढळतात:आमच्यालायख, उपमेलायख इ.

(२१) वस्तू (अ. वासितह् = साठी) : हे शब्दयोगी बखरींत[५३] वैपुल्याने योजिले गेले आहे.आमचेवस्तू (= आमच्यासाठी), तुमचेवस्तू, त्याचेवस्तू, कोणाचेवस्तू(=कुणासाठी) 'वास्ते ' हे त्याचे दुसरे रूप .राजवाडे[५४] व डॉ. पटवर्धन[५५] 'वस्तू 'या शब्दयोगी अव्ययाचा उल्लेख करीत नाहीत.

(२२) वास्ते (अ. वासितह् = साठी) : राजवाडे[५६] याचा उल्लेख करीत नाहीत. हे शब्दयोगी अव्यय मला बखरींत आढळले नाही.(त्याचे 'वस्तू ' हे रूप आढळले, त्याविषयी यापूर्वी विवरण केले आहे.) सध्याच्या मराठीत ते वापरले जात नाही.मात्र आधुनिक हिन्दीत आजही ते रूढ आहे.यादवोत्तर ऐतिहासिक मराठीतील 'मजमुना वास्ते ' (= मजकुरासाठी)हे त्याचे उदाहरण डॉ. पटवर्धन[५७] यांनी दिले आहे.

(२३) शिवाय (अ. सिवा़ ) : यादवकाळानंतर आजपर्यंत मराठीत हे शब्दयोगी अव्यय सातत्याने वापरले जात आहे. त्यामुळे राजवाडे[५८] व डॉ. पटवर्धन यांनी याची नोंद घेतली नसती तरच आश्चर्य वाटले असते. तोफां शिवाय मोह-याशिवाय, सल्याशिवाय, हुकुमाशिवाय ही त्याची बखरींतली[५९] उदाहरणे.

### (इ) व्दिरुक्ती होऊन येणारी शब्दयोगी अव्यये

फार्सीच्या या प्रवृत्तीकडे इति. राजवाडे[illegible] यांचे लक्ष गेले नसावे असे वाटते.डॉ. पटवर्धन[illegible] यांनी मात्र ती नेमकेपणाने टिपली आहे.पण त्यांच्या याविषयीच्या विवेचनात काही त्रुटी जाणवतात. 'नामांची व्दिरुक्ती होऊन शब्दयोगी अव्यय मध्ये येते ' हे त्यांचे विधान बरोबर असून त्यांनी दिलेली ब,बे आणि दर फार्सी शब्दयोगी अव्ययांची यादवोत्तर मध्ययुगीन मराठीतील उदाहरणेही बव्हंशी योग्य आहेत . ती अशी -

(१) कूच - ब - कूच,गिर्द - ब - गिर्द,जरा - ब - जरा,जा - ब - जा,देह - ब - देह, दर - ब - दर,माह - ब - माह,रोज - ब - रोज,रू - ब - रू, साल - ब - साल .

(२) जोर - बे - जोर, रात - बे - रात, शर्त - बे - शर्त, सलामत - बे - सलामत.

(३) कार्किर्दी - दर - कार्कीर्दी,कूच - दर - कूच,मजल - दर - मजल, पुस्त - दर - पुस्त.

यांतील क्र.१ मध्ये डॉ. पटवर्धन 'अलाहिदा - ब - अलाहिदा ' व 'एक - ब - एक ' यांचाही समावेश करतात तथापि अलाहिदा व एक ही नामे नसून विशेषणे आहेत. त्यांतील एक (फा. यक् ) हे संख्याविशेषण आहे .( 'एक' हा शब्द संस्कृत पासून व्युत्पादिता येत असला तरी मराठीत आलेल्या फार्सी शब्दांतील 'एक ' चे मूळ फार्सी आहे,हे लक्षात घ्यायला हवे.) यासाठी डॉ. पटवर्धन यांनी दिलेल्या वरील 'प्रवृत्ती'त पुढील भर घालणे आवश्यक आहे.

(४) विशेषणाची व्दिरुक्ती होऊन त्यात 'ब ' हे फार्सी शब्दयोगी अव्यय येते .

(५) फार्सी शब्दयोगी अव्ययांची व्दिरुक्ती होऊन त्यांत 'आ ' किंवा ओ (फार्सी 'वाव् ') येऊन काही रूपे सिद्ध होतात. उदाः (अनुक्रमे) 'बराबर ' व 'बरोबर ' त्याविषयी पुढे तपशीलवार विवेचन केले आहे.

(i) बराबर (फा. बराबर् )

'बर् आ बर् ' या शब्दातील 'बर् ' या फार्सी शब्दयोगी अव्ययाची व्दिरुक्ती होऊन हे नवीन शब्दयोगी अव्यय सिध्द झाले आहे.इति. राजवाडे[illegible] व डॉ. पटवर्धन याची नोंद का घेत नाहीत, ते कळत नाही. बखरींत[illegible] तर ते वारंवार वापरले जाते. त्याची अनेक उदाहरणे मी दिली आहेत. त्यांपैकी काही अशी - निशाणाबराबर वकिलाबराबर, स्वारीबराबर

(ii) बराबरी (फा. बर् - आ - बर् = सवे, सोबत )

'बर् 'या फार्सी शब्दयोगी अव्ययाची व्दिरुक्ती होऊन त्या मध्ये 'आ 'आला आहे. वस्तुतः 'बरोबर 'हे व्दिरुक्तीने सिध्द झालेले शब्दयोगी अव्यय आधुनिक मराठीत पुरोगामी रूपातच मोठया प्रमाणावर वापरले जाते पण त्याचे 'बराबरी ' हे एक रूप . यादवोत्तर मध्ययुगीन मराठीत पूर्वगामी स्वरूपातही वापरले जात असल्याची नोंद डॉ. पटवर्धन[illegible]यांनी राजवाडेसंपादित 'मराठयांच्या इतिहासाच्या साधनां'च्या प्रथमावृत्तीच्या

याचव्या खंडाच्या आधारे केली आहे -
'बराबरी माणकोजी हुकेबदार ऐवज पाठविला असे.'
(iii.) बरोबर (फा. बर् - उ - बर् )
हे शब्दयोगी अव्ययही व्दिरुक्तीनेच सिद्ध झाले आहे. बराबर मध्ये 'आ ' हा स्वर येतो तर यात 'उ ' हा स्वर येतो. हे रूप यादवोत्तर ऐतिहासिक मराठीप्रमाणेच आधुनिक मराठीतही फार प्रचलित आहे. इति. राजवाडे[९०] व डॉ. पटवर्धन यांच्या यादीत ते आढळत नसले तरी बखरीत[९१] ते विपुल प्रमाणात आढळते. त्याची काही उदाहरणे पाहा - कहीबरोबर,जासुदाबरोबर, फौजबरोबर. आजच्या मराठीतही ते सर्रास वापरतात. डॉ. पटवर्धन यांनी दिलेल्या वरील क्र. ३ च्या प्रवृत्तीचा आजच्या मराठीच्या संदर्भात विचार करता 'मजल - दर - मजल ' चा प्रयोग सध्याही रूढ असल्याचे आढळते. 'रात्री बेरात्री ' सारख्या उदाहरणात मराठी रात्र या शब्दात ' बे 'हे फार्सी शब्दयोगी अव्यय आजही वापरात असल्याचे दिसते.

## (ई) संयुक्त शब्दयोगी अव्यय (संशअ.)

फार्सीत दोन शब्दयोगी अव्यये- किंवा एक शब्दयोगी अव्यय व एक नाम/सर्वनाम किंवा अन्य शब्द- एकमेकांना जोडून त्यांच्या आधारे नवीन शब्दयोगी अव्यय सिद्ध करण्याची जी प्रवृत्ती आहे, तिला डॉ. पटवर्धन[९२] यांनी 'संयुक्त शब्दयोगी अव्यय 'ही संज्ञा दिली आहे, ती मलाही सार्थ व योग्य वाटते. मूळ मराठीत अशी प्रवृत्ती नाही पण ती फार्सीच्या संपर्कामुळे आली आहे. म्हणून तिची नोंद मराठीच्या भाषिक अभ्यासात व व्याकरणात अवश्य घ्यायला हवी. यांतील फार्सी शब्दांत विकार होत नाहीत म्हणून त्यांचा समावेश अव्ययात करता येतो. यांची उदाहरणे बहुधा मध्ययुगीन मराठीतच आढळतात.(ती मला बखरींत त्या मानाने कमी प्रमाणात आढळली. त्यांचा आढळ बहुधा ऐतिहासिक पत्रात्मक वाङ्मयात अधिक होतो.)
(१) अजकदीम (फा. अज़् + अ. कदीम् )
शब्दयोगी अव्यय आणि विशेषण यांनी मिळून हे सं.श.अ. सिद्ध झाले असून त्याचा अर्थ पूर्वीपासून ,आधी, पूर्वी असा होतो.
(२) अजतरफ (फा. अज़् + अ. तरफ़् )
शब्दयोगी अव्यय आणि नाम मिळून हे सं.श.अ. सिद्ध झाले आहे. त्याचा अर्थ कडून,बाजूने असा आहे.
(३) अजबायेस (फा. अज़् + बाइस् )
शब्दयोगी अव्यय व नाम यांच्या साहाय्याने सिद्ध झालेले सं.श.अ. त्याचा अर्थ कारणे, मुळे असा होतो.
(४) अज् रा,अजराहे (फा. अज़् राह् - इ)
शब्दयोगी अव्यय सं.श.अ, आणि नाम मिळून हे पूर्वगामी सं.श.अ. सिद्ध झाले आहे.

पूर्वक ' असा त्याचा अर्थ. उदा. 'अजरा एखलास' म्हणजे स्नेहपूर्वक.'अज् राहे दोस्ती म्हणजे मैत्रीपूर्वक, मित्रतापूर्वक. डॉ. पटवर्धन[७९] यांनी 'अज् रा ' चा अर्थ 'मार्गे ' असा दिला आहे.

(५) अज् रूय (फा. अज़् रू )

शब्दयोगी अव्यय व नाम यांच्या संयोगाने सिद्ध झालेले सं.श.अ. ते 'रीतीने 'या अर्थी मध्ययुगीन मराठीत योजिले जाई.काही वेळा याचा मूळ फार्सी अर्थ नीटसा लक्षात न आल्याने त्याच्या अर्थाची व्दिरुक्ती झाल्याची डॉ. पटवर्धन[८०] यांनी नोंद घेतली आहे - 'अज् रूय वाजबीच्या व हक - परस्तीच्या व इन्साफाच्या रीतीने '.

(६) अज् सबब (फा. अज़् सबब् )

फार्सी शब्दयोगी व उभयान्वयी अव्ययांच्या साहाय्याने सिद्ध झालेले सं.श.अ. ; त्याचा अर्थ कारणे, मुळे असा होतो.

(७) अर्जी (फा. अज़् इन = पासून,यापासून )

'अज् 'हे फार्सी शब्दयोगी अव्यय व 'इन् '(= हे) दर्शक सर्वनाम यापासून सिद्ध झालेले हे सं.श.अ. याचाही मराठी भाषकांना नीटसा उलगडा न झाल्याने त्याचा अर्थ दाखविणारे 'पासून 'हे मराठी शब्दयोगी अव्यय पुन्हा कसे वापरले गेले आहे, त्याचे डॉ. पटवर्धन[८१] यांनी नेमके उदाहरण दिले आहे. 'अर्जी पासून कुसूर न कीजे[८२].' 'अर्जी ' याचाच मुळात अर्थ 'यापासून 'असा असताना त्याच्याचपुढे पुन्हा 'पासून 'हे शब्दयोगी अव्यय जोडले गेले आहे.

(८) अहद (फा. अज़् , अ. हद् )

फार्सी शब्दयोगी अव्यय व अरबी नाम मिळून सिद्ध झालेले पूर्वगामी सं.श.अ. ते ऐतिहासिक पत्रात्मक गद्यवाङ्मयात[८३] व बखरींत[८४] आढळते. 'च्या सीमेपासून ' असा त्याचा शब्दशः अर्थ असून 'पासून 'हा सर्वसाधारण अर्थ आहे.डॉ. पटवर्धन[८५]यांनी त्याचे 'अहद रायगिरी ' हे चित्रगुप्ताच्या बखरींतील उदाहरण दिले आहे.

(९) कबिले (अ. कब्ल् , फा. ई )

अरबी शब्दयोगी अव्यय व फार्सी इजाफतीचा (षष्ठीचा) प्रत्यय मिळून सिद्ध झालेले सं.श.अ. त्याचा 'पूर्वी' असा अर्थ होतो. त्याचे मध्ययुगीन मराठीतील 'कबिले माही ' हे उदाहरण 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां 'मध्ये आढळते[८६]. डॉ. पटवर्धन[८७] यांनी त्याचा 'महिन्यापूर्वी ' हा अर्थ दिला आहे.

(१०) खिलाफ (फा. ब्, अ. ख़िलाफ़् , फा.इ )

'विरुध्द ' अशा अर्थाचे हे सं.श.अ. ब्,खिलाफ ही शब्दयोगी अव्यये आणि फार्सी इजाफतीचा प्रत्यय मिळून सिद्ध झाले आहे. (व पुढे त्यातील 'ब 'हे शब्दयोगी अव्यय आणि 'इ 'हा इजाफतीचा प्रत्ययही लोप पावला आहे !) त्याचे 'खिलाफ मर्जी[८८] ' हे मध्येयुगीन मराठीतील उदाहरण. 'इच्छेविरुध्द 'असा त्याचा अर्थ आहे.

(११) जहाती (फा. ब् ,अ. जिहत् , फा. इ = साठी)
'साठी 'अशा अर्थाचे हे सं.श.अ. उदा. 'जहाती भंडारा'[८] ,मला ते बखरींत[९] आढळले नाही.

(१२) तहत, तहद (फा. ता, अ. ह्द्, फा. इ)
फा. शब्दयोगी अव्यय व अरबी नाम मिळून हे सं.श.अ. तयार झाले आहे. त्यापुढील फार्सी इजाफतीचा प्रत्यय मध्ययुगीन मराठीत लोपल्याचे दिसते. बखरींत[११] हे पूर्वगामी व पुरोगामी अशा प्रकारच्या दोन्ही शब्दयोगी अव्ययांच्या रूपांत वावरते. उदा.

(अ) तहत बालापूर ,वसई तहत

(आ) तहद वाई

(इ) याशिवाय याच्या संदर्भात मराठी भाषकांची आणखी एक प्रवृत्ती आढळते, ती अशीः याचा अर्थ नीटसा न कळल्याचे पुन्हा 'पर्यंत' हे मराठी शब्दयोगी अव्यय त्याला जोडल्याचे 'होळकरांच्या कैफियती'त आढळले. 'तहद हडोतीपर्यंत'(पृ ३४) असा प्रयोग तेथे केला आहे तथापि केवळ याच बखरीत नव्हे तर पुढील इतर बखरींतही ही प्रवृत्ती आढळते.उदा. 'मराठी साम्राज्याची छोटी बखर- तहद माळव्याचे झांप्यापर्यंत (पृ ११०), तहद सौध्याचे सरदेपावेतो (पृ २६)श्रीशिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र' : तहद गंगातीरपर्यंत (पृ १४९)तहद फोंडेपर्यंत (पृ १४९)

(१३) दर्म्यान, दरम्यान, दरम्यान(फा. दर् = आत, फा. मियान् = मध्ये,आत,+ फा. इ)
'दर् 'अणि 'मियान्.'ही दोन्ही फार्सी शब्दयोगी अव्यये समानार्थी असून त्यांच्या संयोगाने व त्यांना इजाफतीचा प्रत्यय लागून हे शब्दयोगी अव्यय सिद्ध झाले आहे. इति. राजवाडे[१२] त्याचा निर्देश का करीत नाहीत, ते कळत नाही. डॉ. पटवर्धन[१३] यांनी मात्र ते सं.श. अव्ययांत नोंदविले आहे. मला ते पुरोगामी शब्दयोगी अव्ययाच्या रूपात बखरींत अनेक ठिकाणी आढळले. बखरींतील[१४] त्याची उदाहरणे अशी - 'मुदगल व रायचूर दरम्याने ','नालतवाडी दरम्याने '. या दोन्ही उदाहरणांत इजाफतीचा 'इ ' प्रत्यय शिल्लक आहे पण 'जाबसाल दरम्यान' सारख्या उदाहरणात त्याचा लोप झाला आहे . पुढे आधुनिक मराठीत तर ते केवळ या प्रत्ययाविना 'दरम्यान 'या पुरोगामी शब्दयोगी अव्ययाच्या रूपातच वावरू लागले आहे. आजकालच्या मराठी वृत्तपत्रांत बातम्या देताना ते कुठल्याही शब्दाला न जोडता परिच्छेदाच्या प्रारंभी (पूर्वीच्या परिच्छेदाचा अनुबंध जोडण्यासाठी ) दिले जाते तेव्हा ते क्रियाविशेषणाचे कार्य करते.

(१४) दरीं (फा.दर् इन् )
फा. दर् (आत) हे शब्दयोगी अव्यय आणि फा. इन् (= या) हे दर्शक सर्वनाम यांच्या संयोगाने हे सं.श.अ. सिध्द झाले आहे. बखरींत[१५] मला त्याची उदाहरणे आढळली नाहीत.डॉ. पटवर्धनांनी[१६] ते यादवोत्तर मध्ययुगीन मराठीतून नोंदविले आहे व त्याची दरीं बाब, दरीं वख्त, दरीं विला, दरीं सुरत ही उदाहरणे दिली आहेत. दरीं बाब म्हणजे या बाबतीत, 'दरीं वख्त' आणि 'दरीं विला 'म्हणजे या वेळी. आधुनिक मराठीत

ते आढळत नाही.

(१५) बमय,बमै (फा. ब् मय् )

'सह 'या अर्थीच हे पूर्वगामी शब्दयोगी अव्यय वापरले गेले. बखरींत[१९७] त्याचा विपुल उपयोग केला गेला आहे. राजवाडे[१९८] त्याचा निर्देश करतात. 'बमय सरंजाम ' म्हणजे सरंजामासह. 'बमै फौज ' म्हणजे फौजेसह[१९९]. 'ब् ' आणि 'मय् ' या दोन फार्सी शब्दयोगी अव्ययांच्या साहाय्याने ते सिध्द होत असल्याने त्याचा सं.श.अव्ययांत समावेश करणे उचित ठरते.

(१६) बर्हक्क, बरहक (फा. बर् + अ. हक़् )

फार्सी शब्दयोगी अव्यय व अरबी नाम यांच्या आहाय्याने सिद्ध झालेले सं.श.अ. त्याचा अर्थ 'अनुसरून', 'प्रमाणे 'असा होतो. डॉ. पटवर्धनांनी[२००] त्याचा निर्देश केला आहे. ते मध्ययुगीन मराठीत अल्प प्रमाणात प्रचलित असले तरी आजच्या मराठीत मात्र पुरते नामशेष झाले आहे. (बखरींत[२०१] मला त्याचे 'बरहक 'हे रूप आढळले . उदा. मनसुब्याबरहक.)

(१७) बर्हुकूम, बरहुकूम (फा. बर्हुक्म् = प्रमाणे)

हे फार्सी शब्दयोगी अव्यय आजच्या मराठीत पुरोगामी रूपात योजिले जाते तथापि मध्ययुगीन मराठीत ते पूर्वगामी स्वरूपातही वापरत होते, त्याची नोंद डॉ.पटवर्धन[२०२]यांनी 'बर्हुकूम याद ' (= यादीप्रमाणे ) यासारखी उदाहरणे देऊन केली आहे. फा. बर् (= वर) हें शब्दयोगी अव्यय व अरबी 'हुक्म् '(= आज्ञा ) हे नाम मिळून हे सं.श.अ. तयार झाले आहे. त्याचा अर्थ 'आज्ञेप्रमाणे ' असाच होतो असे नाही तर 'प्रमाणे ', 'अनुसार 'असाही होतो.

(१८) बाजत,बाजद (अ. बअ़द् = नंतर , फा. अज़् = पासून)

बअद् आणि अज् या दोन शब्दयोगी अव्ययांनी सिध्द झालेले हे पूर्वगामी सं.श.अ. त्याचा अर्थ 'नंतर ' असा आहे. त्यात वर्णविपर्ययाची प्रक्रिया होऊन ते मध्ययुगीन मराठीत आले आहे. 'बाजत' किंवा 'बादज बरसात ' या बखरींतील[२०३] शब्दांचा अर्थ 'पावसाळ्यानंतर ' असा आहे. इति. राजवाडे [२०४]यांनीही याची नोंद घेतली आहे. आजच्या मराठीत हे प्रचारात नाही.

(१९) बादज (अ. बअ़द् + फा. अज़् )

'बाजत 'किंवा 'बाजद ' मध्ये झालेला वर्णविपर्यय यात घडलेला नाही. डॉ. पटवर्धन[२०५] यांनी या पूर्वगामी शब्दयोगी अव्ययाची मध्ययुगीन मराठीतील पुढील उदाहरणे दिली आहेत.- बादज ईद (म्हणजे ईद नंतर),बादज बरसात (म्हणजे पावसाळयानंतर),बादज फत्ते (म्हणजे विजयानंतर).

बखरींत मात्र मला हे शब्दयोगी अव्यय आढळले नाही. बअद् आणि अज् ही फार्सी शब्दयोगी अव्यये यात एकत्र आली असल्याने त्यांचा समावेश संयुक्त शब्दयोगी अव्ययांत केला आहे.

(२०) सवाइ (फा. सवा + ई)
यातील 'सवा 'चा अर्थ  योग्यता बरोबरी असा आहे व 'इ ' हा फार्सीतील षष्ठीचा इजाफतीचा  प्रत्यय आहे. स्टेनगॅसने[२०६] सवा चे अर्थ equality, except असे दिले आहेत. नाम व विभक्तिप्रत्यय यांच्या संयोगाने सिध्द झालेल्या या पूर्वगामी संयुक्त शब्दयोगी अव्ययाचा अर्थ 'प्रमाणे 'असा होऊ लागला. इति.राजवाडे[२०७] यांनी हे पूर्वगामी शब्दयोगी अव्यय नोंदविले असून त्यांनी त्याची सवाई  बाजीराव, सवाई माधवराव, सवाई  शिकंदर  ही उदाहरणे दिली आहेत. ते 'सवाई  माधवराव  'याचा अर्थ 'माधवरावांच्या योग्यतेचा ' असा देतात.डॉ.पटवर्धन[२०८] याची नोंद घेत नाहीत व आपल्या फार्शी - मराठी कोशातही त्याचा समावेश करीत नाहीत.

मला बखरींत[२०९]'सवाई  जयसिंग' व ' सवाई माधवराव' हे शब्द आढळले त्याचप्रमाणे 'सवाई सरखेल 'हा किताबही आढळला. आजच्या मराठीत 'सवाई ' हा शब्द वापरला जातो पण त्याचा उपयोग शब्दयोगी अव्ययाप्रमाणे न होता विशेषणाप्रमाणे होतो. त्याचा अर्थदेखील बदलला असून ज्या व्यक्तिनामाचा या शब्दापुढे उल्लेख केला असेल,त्यापेक्षा श्रेष्ठ असा त्याचा अर्थ झाला आहे. 'सवाई' या शब्दाच्या रचनेतील, व्याकरणिक कार्यातील व अर्थातील हा गुंता फार बारकाईने लक्षात घ्यायला हवा.

### उभयान्वयी अव्यय

'सर्वनामांप्रमाणे  फारशींतून मराठींत अभयान्वयी अव्ययेही बरीच आली आहेत 'हे इति. राजवाडे[२१०] यांचे विधानच या विषयावर महत्त्वपूर्ण प्रकाश टाकते. मध्ययुगीन मराठीतील पुढील अकरा फार्सी उभयान्वयी अव्ययांचा निर्देश इति.राजवाडे[२११] करतात -
अगर,कीं,चुनाचे,बल्के,बाकी,मगर,लेकिन,सबब,व,या,यांपैकी 'वा ' हे मूळे फार्सीतून आलेले नाही हे मी बखरविषयक[२१२] विवेचनात स्पष्ट केले आहे.ते ज्ञानेश्वरीत[२१३] आढळते, हे ते अव्यय फार्सी नसल्याचे एक प्रमाण होय.

डॉ. पटवर्धन[२१४] म.म. तील पुढील दहा फार्सी उभयान्वयी अव्यये देतात - अगर,अम्मा,कीं,चुनांचे,मगर,या,व लेकीन ,लेहाजा ,सबब.

डॉ. पवार[२१५] यांना मराठेशाहीतील पत्रवाङ्मयात जी उभयान्वयी अव्यये आढळली,त्यांत एकही फार्सी नाही, हे पाहून आश्चर्य वाटले. मी ही पत्रे वरवर चाळली तरी त्यांत 'व '(पृ.१७७,१८७) ,की  (पृ.१७८,१८७)ही उभयान्वयी अव्यये अगदी सहजा सहजी दिसली. यावरून त्यांची नीटशी नोंद घेत ली नसावी,हे जाणवले.

बखरींत मला पुढील आठ फार्सी  उभयान्वयी अव्यये आढळली त्यांचे विस्तारपूर्वक विवेचन मी माझ्या ग्रंथात[२१६] केले आहे. ती अशी आहेत - अगर / आगर, ऊर्फ,कीं,बाकी,लेकिन,या व ,सबब.

**विविध प्रकार** - मराठीतील फार्सी उभयान्वयी अव्ययांच्या विविध प्रकारांविषयी समग्रपणे असा विचार करता येईल :

(१) समुच्चयबोधक : 'व ' (<फा.व् ) आणि 'व ' ची लकब.

(अ) दोन किंवा अधिक शब्द किंवा प्रधान वाक्ये या प्रकारच्या उभयान्वयी अव्ययांनी जोडली जातात. डॉ. म.अ.करंदीकर[२१७]म्हणतात त्याप्रमाणे ते सं. 'वा 'चे रूप मुळीच नाही कारण ते फार्सीच्या संपर्कानंतरच मध्ययुगीन मराठीत आले आहे. ज्ञानेश्वरीत ते आढळत नाही, याचा उल्लेख यापूर्वी केलाच आहे.बखरीं व ऐतिहासिक कागदपत्रे, मध्ययुगीन पत्रात्मक गद्य-वाङ्मय यांत त्याचा सर्रास वापर केला जात होताच पण आजही ते सातत्याने वापरले जाते व त्यातले 'परकेपण ' उरलेले नाही. अरबी 'व् ' पासून फार्सीत आलेले हे अव्यय तिच्याच माध्यमातून मराठीत आले.

(आ ) अनेक वस्तूंचा / व्यक्तींचा / पदार्थांचा समुच्चय दर्शविताना ते लागोपाठ वापरण्याची लकब अरबी व फार्सी या भाषांत आहे.तीही म.म.ने. आत्मसात केली आहे. याची बखरींतील विपुल उदाहरणे मी[२१८] दिली आहेतः तरीही 'मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरींतील[२१९]'एक उदाहरण वानगीदाखल देतो 'पागेचे सरंजाम जिन्नस खोगरे व जीनगंडे व पट्टे व खुमे व पडदे हरजिनसी व कनाता व अस्मानगिऱ्या व सुजन्या व गालिचे वगैरे यांची पाहणी झाली नाही.'

मराठेशाहीतील पत्रांतील[२२०] आणखी एक उदाहरण -

'त्यास व त्याचे कबिला हुसेनखानाचे दोघे लेक असे दस्त केले व हत्ती पाच व घोडे पाचसे पाडाव केले .' 'अशी शेकडो उदाहरणे देता येतील ' असा निष्कर्ष मी बखरींच्या संशोधनातून काढला आहे.[२२१]

(२) विकल्पबोधक : अगर,आगर (फा. अगर् ), या (फा. या )

यामुळे दोन वा अधिक शब्दांपैकी / वाक्यापैकी एकाचे ग्रहण होते. 'या ' हे अव्यय आजच्या मराठीत प्रचलित नाही पण 'अगर 'हे फार मोठ्या प्रमाणात योजिले जाते . म.म.त. मात्र 'अगर ' आणि 'या 'अशा दोन्ही उभयान्वयी अव्ययांचा उपयोग केला जात असे बखरींतील त्यांची विपुल उदाहरणे मी दिली आहेत , ती कृपया पाहावीत.[२२२]

(३) स्वरूपदर्शक : कीं (फा. के > कि ), उर्फ (फा.ऊर्फ़ )

संस्कृत 'किम् ' पासून 'की ' हे उभयान्वयी अव्यय आलेले नाही कारण 'किम् ' हे प्रश्नार्थक अव्यय आहे, याचा विचार मीं यापूर्वी केलाच आहे.[२२३]या संस्कृत अव्ययाचा अर्थ 'का ' आणि 'अथवा 'असा होतो.फार्सीतून आलेल्या 'की 'चा अर्थ 'that' असा आहे. त्याच अर्थी तो मध्ययुगीन पत्रात्मक वाङमयात व बखरींत आणि आधुनिक मराठीत वापरला जातो.प्रा. कृ. पां कुलकर्णी [२२४] यांनी 'कीं ' च्या उत्पत्तीविषयी मराठी

व्युत्पत्तिकोशात जे विवेचन केले आहे, ते मला योग्य वाटत नाही त्याविषयीची मतभिन्नता मी माझ्या ग्रंथात[२२५] व्यक्त केलीच आहे.ती अशी -

'(ही ) दोन्ही अव्यये मूलतः भिन्न आहेत मात्र त्यांतील भेद दाखविणारी प्रा.कृ.पां. कुलकर्णी यांची उपपत्ती बरोबर वाटत नाही. त्यांनी या अव्ययांच्या उत्पत्तीसंबंधी पुढील विवेचन केले आहे.

१) < सं.किम् ,हिं. कि

२) < फा.के

हे अव्यय दोन अर्थ दाखविते: एक प्रश्नार्थक 'कां ' या अर्थी आणि दुसरा स्वरूपबोधक 'जे ' या अर्थी. ह्यांपैकी पहिले सं. किम् पासून उत्पन्न झाले असून दुसरे फार्सीपासून निरनुस्वार आहे.'

पण बखरींतील व वर्तमान मराठीतील स्वरूपबोधक 'कीं ' हे उभयान्वयी अव्यय सानुस्वारही असतेः याहीपुढे जाऊन असे म्हणता येईल की, बखरींतील 'कीं 'हे अव्यय काही तुरळक अपवाद सोडून बव्हंशी सानुस्वारच असते. स्वरूपदर्शक 'कीं ' या अव्ययाची उपपत्ती माझ्या मते पुढीलप्रमाणे आहे -

फार्सी 'के 'चे रूपान्तर 'कि ' किंवा 'की ' असे होते. त्याचप्रमाणे त्याचा उच्चार 'कि ' किंवा 'की ' असाही होतो. याच 'की ' चे संस्कृत 'किम् ' पासून आलेल्या 'कीं 'या अव्ययाशी रूपसादृश्य असल्याने दोन्ही अव्यये एकाच प्रकारची आहेत असा समज होऊन ही अव्यये एकमेकांसाठी वापरण्यात येऊ लागली.तथापि त्यांचा वेगवेगळा अर्थ मात्र त्यांच्या उत्पत्तीविषयीचा पुरावा सादर करतो व त्यावरून त्यांतील वेगवेगळेपण लक्षात येते '. मी १९७२ साली मांडलेल्या या मताला आजवर तरी कुणी विरोध केलेला नाही.

ऊर्फ,उरफ (< अ. उर्फ़ > फा.उर्फ़)

मध्ययुगीन मराठी पत्रात्मक वाङ्मयात आणि बखरींत [२२७]या स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्ययाचा विपुल उपयोग केला गेल्याचे आढळले तरीही राजवाडे [२२८]व डॉ. पटवर्धन[२२९] यांनी आपल्या याविषयीच्या विवेचनात त्याचा का निर्देश केला नाही ते कळत नाही. आजच्या मराठीतही हे उभयान्वयी अव्यय चांगलेच रुळले आहे.

(४) न्यूनत्वबोधक :

मराठीत'बाकी',' अमा' आणि 'लेकिन ' ही उभयान्वयी अव्यये फार्सीतून आली.

बाकी (अ. बाक़ी > फा. बाक़ी )

इति. राजवाडे,मो.के.दामले आणि ग.ह.केळकर यांनी या फार्सी अव्ययाचा समावेश उभयान्वयी अव्ययांत केला आहे. मराठेशाहीतील पत्ररूप गद्यविषयक विवेचनातील डॉ. पवार यांच्या उभयान्वयी अव्ययांच्या यादीत त्याचा आढळ का होत नाही ते कळत नाही कारण शिवाजीमहाराजांच्या पत्रांत तो आढळतो ,हे डॉ. मु.श्री.कानडे [२३०]यांच्या

यादीवरून कळते. डॉ. पटवर्धन[२१२] 'बाकी ' हे स्त्रीलिंगी नाम वा विशेषण असल्याचे मानतात.बखरींत ते विपुल प्रमाणात आढळत असल्याच्या नोंदी मी[२१३] केल्या आहेत, त्या या संदर्भात पाहाव्यात.येथे एका गोष्टीचा खुलासा करायला हवा. अरबीतून फार्सीत आलेल्या 'बाकी ' या शब्दाचा उपयोग म.म. आणि व.म.त उभयान्वयी अव्ययाप्रमाणे होतो. त्याचप्रमाणे नाम आणि विशेषण यांच्या रूपातही होतो तथापि त्याचे उभयान्वयी अव्यय या नात्याने अस्तित्व नाकारण्याचे काहीच कारण नाही.

आमा,अम्मा (अ. अम्मा)
मध्ययुगीन मराठीत वापरल्या जाणाऱ्या या उभयान्वयी अव्ययाचा निर्देश डॉ. पटवर्धन[२१४] यांनी केला आहे.
लेकिन,लेकीन (<फा.लेकिन् < अ.लाकिन्)
इति. राजवाडे[२१५],डॉ.पटवर्धन[२१६] यांनी या फार्सी उभयान्वयी अव्ययाला मान्यता दिली आहे तथापि डॉ. पवार[२१७] वा डॉ. कानडे[२१८] शिवकालीन पत्रांच्या संदर्भात त्याचा उल्लेख करीत नाहीत.आजच्या मराठीतही तो आढळत नाही म्हणूनच मो.के.दामले[२१९] यांनीही त्याचा समावेश उभयान्वयी अव्ययांत केला नसावा.

(५) परिणामबोधक
सबब (फा. सबब): या उभयान्वयी अव्ययाने पुढे येणा-या वाक्यातील अर्थ हा त्याच्यामागील वाक्यार्थाचा परिणाम होय,असे सूचित केले जाते. बखरींत[२२०] हे अव्यय अनेक ठिकाणी आढळते. मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यातही ते असायला हवे असे मला वाटते (कारण समकालीन बखरींत ते आहे ) तथापि डॉ. पवार[२२१] त्याचा निर्देश करीत नाहीत. डॉ. कानडे[२२२] त्याचा उल्लेख करतात,यावरून माझे हे मत स्वीकारार्ह वाटेल.आजच्या मराठीत हे उभयान्वयी अव्यय सर्रास वापरले जाते,त्यामुळेच मो.के. दामले[२२३] याचा समावेश आपल्या उभयान्वयी अव्ययांच्या यादीत करतात.

फार्सी समुच्चयबोधक,विकल्पबोधक,स्वरूपदर्शक,न्यूनत्वबोधक आणि परिणामबोधक अशा सर्वच प्रकारची उभयान्वयी अव्यये मराठीत आली आहेत. समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययातील 'व ' च्या लकबीकडे मी माझ्या बखरींच्या संशोधनाद्वारे प्रथम लक्ष वेधले व पुढील (डॉ. सुधाकर पवार व डॉ. मु.श्री.कानडे यांच्यासारख्या ) अभ्यासकांनी ते मत स्वीकारलेही आहे. 'व 'प्रमाणेच की, बाकी, ऊर्फ,अगर,सबब ही फार्सी उभयान्वयी अव्यये मराठी उभयान्वयी अव्ययांच्या कुटुम्बातील अविभाज्य घटकच झाली आहेत.

उद्‌गारवाचक अव्यय
एकाद्या भाषेतून दुसऱ्या भाषेत काही शब्द जाणे ही एक सर्वसामान्य भाषिक प्रक्रिया

होय तथापि उद्‌गारवाचक अव्यये जाणे हा मी अधिक लक्षात घेण्याजोगा व खोलवर झालेला प्रभाव मानतो. उद्‌गारवाचक अव्ययांच्या निर्मितिप्रेरणेत शोक,हर्ष,आश्चर्य इ. भावनाही असतात. त्यांच्या प्रकटीकरणासाठी जेव्हा एखादी भाषा दुसऱ्या भाषेतून उद्‌गारवाचक अव्ययांचाही स्वीकार करते,त्या वेळी ती केवळ शब्दांची देवाणघेवाण उरत नाही. त्या भाषेत अभिव्यक्त होणा-या भावविश्वाशी तिचा निकटचा व जिव्हाळ्याचा संबंध' असतो. फार्सीतून मराठीत आलेल्या उद्‌गारवाचक अव्ययांच्या बाबतीत हेच म्हणता येईल. इति. राजवाडे म.म.ती.ल.अफसोस,अलबत,खुश,खूप, छी,छे,फूः,बस,बेदाद, बेलाशक,बेशक,वाहवा,शाबास आणि हां या चौदा उद्‌गारवाचक अव्ययांचा उल्लेख करतात तर डॉ. पटवर्धन अफसोस खबरदार,खामोश,खाशी,खूप,खैर,गप,चूप,तोबा, वाह,वाहवा,शाबास या बारा अव्ययांची नोंद घेतात. बखरींत[३४] मला विपुल अरबी - फार्सी उद्‌गारवाचक अव्यये आढळल्याने मी त्यांचे वर्गीकरण करून त्याविषयी विवेचन केले. अशा प्रकारचे विवेचन या पूर्वी केल्याचे मला आढळले नाही. ते आजही कालबाह्य झाले नसल्याने त्यातील काही भाग येथे उद्धृत करीत आहे - 'श्री. राजवाडे व डॉ. पटवर्धन यांनी दिलेली उद्‌गारवाचक अव्ययांची यादी सर्वांगपरिपूर्ण आहे, असे म्हणता• येत नाही. उदा. या दोन्ही विद्वानांच्या याद्यांत एकही संबोधनद्योतक उद्‌गारवाचक अव्यय आढळत नाही. शिवाय,बखरींत व वर्तमान मराठीत आढळणारे 'हाय ' हे शोकद्योतक उद्‌गारवाचक अव्ययही त्यात नाही. श्री. राजवाडे यांनी दिलेल्या यादीतील 'छे ' किंवा 'छी ' ही उद्‌गारवाचक अव्यये मूळात फार्सी आहेत किंवा नाहीत, याबद्दल शंका वाटते... 'हां ' हे उद्‌गारवाचक अव्यय मूळात फार्सी 'हां' असून त्याचा अर्थ truly,yes असा स्टेनगॅसने[३५] दिला आहे प्रा.कृ.पां. कुलकर्णी[३६] तो ध्वनिशब्द असल्याचे मानतात. या सर्व गोष्टी लक्षात घेता 'हां ' हे उद्‌गारवाचक अव्यय फार्सीतूनच आले, असा आग्रह न धरता तो ध्वनिशब्द आहे, असे मानण्यास हरकत नाही. मात्र 'गप '(< फा. गप),'चूप ' व 'वा ' (< फा. वाह्‌ ) ही तिन्ही उद्‌गारवाचक अव्यये डॉ. म.अ. करंदीकर[३७] यांना केवळ ध्वन्यनुकारी वाटतात,'चूप 'याचे मूळ फार्सी नसावे, असे वाटते. मात्र 'गप 'आणि 'वा ' ही दोन्ही अव्यये उघड उघड फार्सी उद्‌गारवाचक अव्ययेच होत. यांना जर ध्वन्यनुकारी ठरविले तर फार्सीतील बेशक बेलाशक,शाबास,अफसोस इ. उद्‌गारवाचक अव्ययेही ध्वन्यनुकारी' मानवयास काय हरकत आहे? याच न्यायाने मराठीतील सर्व उद्‌गारवाचक अव्ययेदेखील 'केवळ ध्वन्यनुकारी ' या सदरात सहज घालता येतील.'

मराठी बखरींत[३८] मला पुढील १६ अरबी - फार्सी उद्‌गारवाचक अव्यये आढळली - अल्ला,अल्ला अल्ला,खबरदार, खामोश,खुदा, खुदा खुदा, परवरदिगार,बेलाशक,बेशक,या,ये,वा,वाहवा,शाबास,हाय हाय.यांतील काहींमध्ये पुनरावृत्त झाल्याचे आढळते.डॉ. पवार[३९]यांनी मराठेशाहीतील पत्रवाङ्‌मयातील पुढील फार्सी उद्‌गारवाचक अव्यये दिली आहेत:अलबत,आफसोस,खूप,खूष,बस,बेशक,बेलाशक,

वाहवा,शाबास. मो.के.दामले[२४] यांनी फार्सी मूळाचा उल्लेख न करता पुढील उद्गारवाचक अव्यये दिली आहेत वा,वः वाहवा,हाय,हाय हाय,हायरे, शाबास,खाशी, गप, हां इ.

**वर्गीकरण**

म. म. आणि व.म.यांतील फार्सी उद्गारवाचक अव्ययांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करता येईलः मराठीत आलेल्या फार्सी उद्गारवाचक अव्ययांना व्याकरणकारांनी व अभ्यासकांनी फारसे महत्त्व दिले नव्हते. त्यांचे भाषेतील स्थान काहीसे नगण्य असल्याचाच सूर आजवरच्या एतद्विषयक विवेचनात आढळतो. इति.राजवाडे व डॉ. पटवर्धन[२५] यांनी निदान त्यांची वेगळी नोंद तरी घेतली पण मो.के.दामले[२५] तर ती अरबी- फार्सीतून आली आहेत, याचा उल्लेखही करीत नाहीत. त्यांनी दिलेल्या उदाहरणांत मात्र अशा काही उद्गारवाचक अव्ययांचा समावेश केला आहे.

मराठीत पुढील सात प्रकारांची उद्गारवाचक अव्यये आली आहेत-

(१) हर्षद्योतक : खाशी (अ ख़ास् ) वा,वाहवा(फा.वाह्) ,जिन्दाबाद. लाजवाब, शाबास (फा. शाद् बाश्).'खाशी 'हे उद्गारवाचक अव्यय म.म.त प्रचलित होते. व.म.त ते फारसे प्रचारात नाही. 'वा ' हे अव्यय बखरींत आढळत नाही तथापि व.म.त ते सर्रास 'वाः' या रूपात वापरतात. त्याच्या द्विरुक्तीने सिद्ध झालेले 'वाहवा ' हे म.म. तील रूप आजही लोकप्रिय आहे. 'शाबास 'विषयीही तसेच म्हणता येईल. काळाचा परिणाम त्याच्यावर झालेला नाही. 'लाजवाब ' हे अरबी - फार्सी संमिश्र उद्गारवाचक अव्यय आजकाल मराठीत रूढ व लोकप्रिय होत आहे. 'जिन्दाबाद ' या फार्सी शब्दाचे रूपान्तरही सध्याच्या मराठीत उद्गारवाचक अव्ययांत होऊ पाहत आहे.

(२) शोकद्योतक : अल्ला (अ.अल्लाह् ), अल्ला अल्ला,आफसोस (फा. अफ्सोस ) खुदा (अ. ख़ुदा), खुदा खुदा, परवरदिगार (अ.पर्वर्दिगार् ),हाय (फा. हाय् ). हाय हाय.मराठीत 'देवा 'किंवा 'देवा देवा' सारखे शोकद्योतक उद्गारवाचक अव्यय प्रचलित आहेच. त्याचप्रमाणे बखरींत अल्ला, अल्ला अल्ला,खुदा,खुदा खुदा, परवरदिगार ही उद्गारवाचक अव्यये आढळतात.'हाय ' चा उल्लेख इति. राजवाडे व डॉ. पटवर्धन का करीत नाही ते कळत नाही. म.म.त आणि व.म.त त्याचा मोठ्या प्रमाणावर उपयोग केल्याचे आढळते. 'हाय हाय ' ही त्याची पुनरावृत्तीही म.म. प्रमाणेच व.म.त ही सातत्याने केल्याचे आढळते. आजच्या मोर्च्यांच्या घोषणांतही 'हाय ! हाय ! ' हे उद्गारवाचक अव्यय किती लोकप्रिय आहे, हे सांगायलाच हवे काय?

'हैदोस 'या सध्या प्रचलित असलेल्या मराठीतील फार्सी शब्दाची सिध्दता 'हाय् दोस्त्. ' पासून झाली आहे.तथापि 'हैदोस 'ने नामाचे रूप घेतले आहे.

(३) अनुमतिद्योतक किंवा प्रशंसादर्शक : अलबत (फा. अल्बत्तह्),बेशक(फा. बीशक़्), बेलाशक(फा. बिलाशक़्).बखरींत 'बेशक' व 'बेलाशक' चा उपयोग क्रियाविशेषणांसारखा

केला आहे तथापि आज त्यांचा उपयोग अनुमतिदर्शक उद्गारवाचक अव्ययाप्रमाणे होतो, त्यामुळे या यादीत इति.राजवाडे यांनी त्यांचा समावेश केला तो योग्यच आहे, असे म्हणायला हवे. डॉ. पटवर्धन मात्र त्यांचा समावेश उद्गारवाचक अव्ययांत करीत नाहीत. 'अलबत् ' कडे मात्र अभ्यासक व व्याकरणकार यांचे दुर्लक्ष झालेले दिसते.

(४) तिरस्कारदर्शक वा धिक्कारदर्शक : वा ! वाहवा ! शाबास ! वस्तुतः'ही प्रशंसाद्योतक किंवा हर्षद्योतक उद्गारवाचक अव्यये आहेत पण आजच्या मराठीत कधी कधी त्यांचा उपयोग उपहास करण्यासाठी किंवा तिरस्कार/धिक्कार व्यक्त करण्यासाठीही केला जातो;मात्र ते त्यांचे मुख्य कार्य नव्हे.आजच्या मराठीत 'मुर्दाबाद'हा फार्सी शब्दही धिक्कारदर्शक उद्गारवाचक अव्ययाचे रूप घेऊ लागला आहे.

(५) सूचनादर्शक : खबरदार (फा. ख़बर्दार्) ,खामोश (फा. ख़ामोश्).मो.के. दामले व ग.ह. केळकर यांनी उद्गारवाचक अव्ययांचा हा प्रकार मानलेला नाही. वस्तुतः तो मानायला हवा. फिलॉटने[३४] फार्सी भाषेच्या व्याकरणात तो 'Attention or warning ' या सदरात त्यांचा उल्लेख केला आहे.

(६) संबोधनद्योतक : या (फा. या ) , ये (फा. ऐ ).इति. राजवाडे व डॉ.पटवर्धन या प्रकारच्या उद्गारवाचक अव्ययांचा निर्देश करीत नाहीत. मो.के. दामले व ग.ह. केळकर तो करतात पण त्याच्या संदर्भात फार्सी 'या 'व 'ये ' ही उदाहरणे देत नाहीत. ही उदाहरणे व.म.त आढळत नसली तरी मराठी बखरींत निश्चितपणे आढळतात.

(७) मौन / प्रतिबंधद्योतक : 'गप ' या फार्सी उद्गारवाचक अव्ययाचा निर्देश मो.के. दामले[३५] या प्रकारात करतात.ते आजच्या मराठीतही रूढ आहे. 'चूप ' या अव्ययाचाही या संदर्भात निर्देश करता येईल.

**क्रियाविशेषण**

स्थलवाचक,कालवचक(क्षणवाचक व अवधिवाचक)पौन :पुन्यवाचक,संख्या/परिमाणवाचक, प्रकर्षवाचक /अपकर्षवाचक,आधिक्यवाचक,पर्याप्तिवाचक,श्रेणिवाचक आणि रीतिवाचक अशा सर्वच मराठी क्रियाविशेषणांच्या प्रकारांत असंख्य फार्सी क्रियाविशेषणांची भर पडली आहे. ती सर्वच येथे नोंदविणे स्थलाभावी शक्य नाही तथापि त्यांचे,विपुल उदाहरणांसह,विवरण पुढे केले आहे. क्रियाविशेषणांच्या या सर्वच प्रकारांना फार्सीचे योगदान लाभले,यावरून त्यांचा ठसा मराठीवर कसा खोलवर उमटला आहे, ते लक्षात येते.फार्सीतून मराठीत आलेल्या क्रियाविशेषणांविषयी इति. राजवाडे[३६] यांचे मत पुरेसे बोलके आहे. ते म्हणतात,'मराठीत फार्शी क्रियाविशेषणे शेकडो[३७] आहेत. त्यांपैकी दहा - पाच पुढे देतो.

हमेश,बिलकुल,वारंवार,बेहत्तर,छान,बितपशील,शिताबीनें,दरवक्त,मुष्कील,हरवजा,लाशक,अलाहिदा, वगैरे,पेष्तर,वापस,नवदीगर,तमाम,गुदस्तां,यंदा,एकटा,दुकटा,काहीच,नाहीच,अव्वल, दुय्यम,सियम,देखील'.

यांपैकी एकटा,दुकटा,काहीच,नाहीच यांचा ते फार्सी क्रियाविशेषणांत समावेश का करतात, ते कळत नाही.डॉ. पटवर्धन[२८] यांनी याविषयी चांगला विचार केला आहे. ते म्हणतात, 'पुढील फार्शी क्रियाविशेषणे फार्शीतून मराठीत आलेली आहेत-
अखेर,अजीबाद,अजून,अन्करीब,अव्वल,अल्बत्,अलाहिदा,आस्ते,खाईनखाई, खामखा, खास,खुफिया,खुसूस,गायबाना,गुदस्ता,गोया,जाहिराणा,जूद,फक्त,फिलफौर,फिल्वाके,फिल्हाल; पेशजी,बल्के,बार्बार,बाहो, बिल्एकरुई,बिल्कूल,बिल्फैल, बेलाशक,मबादा,महलकदम, यंदा,शायद,शिताब,हर्गीज,हमखास,हमेशा.'

त्यांनी या क्रियाविशेषणांची तीन वर्गात विभागणी केली आहे, ती मला लक्षात घेण्याजोगी व स्वीकारण्याजोगी वाटते. तिच्यात मला[२९] बखरींत आढळलेल्या उदाहरणांची तरोच आधुनिक मराठीत रुळलेल्या फार्सी क्रियाविशेषणांची भर घालून मी पुढील विवेचन केले आहे.

(१) स्थलवाचक

अन् करीब,आनकरीब (फा. अन्करीब् ) = जवळ

आमखास (अ. आ़म् खास् )

इस्तकबाल,इस्तकबिल (फा. इस्तिक़् बाल् = सामोरे )

गर्दोगर्दी (फा. गर्द्,गर्दी )

चौगिर्द (फा. गर्द् ) : चोही बाजूंस

चौतर्फा (अ. तर्फ़् )

जानिबीन (फा. जानिब् )

दुतर्फा (फा. दो, अ.तर्फ़् ) दुतर्फी = on both sides

दुरस्ता (फा. दू रास्तह् )

दूर (फा. दूर् ): हे सं. दूर पासूनही व्युत्पादिता येते पण जेथे ते फार्सी शब्दांत आले आहे,तेथे त्याचे मूळ फार्सी मानावे असे मला वाटते. उदा. दुर्बीण,दुरन्देश,दुरी दराज या शब्दांत ते फा. 'दूर 'पासून आल्याचे डॉ.पटवर्धनही[३०]मानतात. यामुळे, मी[३१] यापूर्वी या संदर्भात बखरींविषयी केलेल्या विवेचनात, मला आता वरीलप्रमाणे परिवर्तन व पुनर्विचार करावासा वाटतो.

तर्फेन (अ. त़र्फ़ेन् = उभय पक्ष[३२] ) .

नजीक (फा. नज़्दीक़् = जवळ)

(२) कालवाचक

यामध्ये (अ) क्षणवाचक आणि (आ) अवधिवाचक असे दोन विभाग करावयास हवेत. या दोन्ही विभागांतील फार्सी क्रियाविशेषणे मराठीत आली आहेत. त्यांतील मध्ययुगीन मराठीतील कोणती व आधुनिक मराठीत वापरली जाणारी कोणती,हे सहज ओळखता येईल. मो.के. दामले[३३] यानीही यांतील ब-याच क्रियाविशेषणांचा निर्देश केला आहे. मी दिलेली बखरींतील[३४] फार्सी क्रियाविशेषणांची यादीही या संदर्भात पाहावी.

(अ) क्षणवाचक

अखेर (फा. आख़िर) ,एकाएकी(फा. यकायक् ),औंदा (फा. आइन्दह् ), गतसाल/गतसाली (स. गत + फा. साल् ),गुदस्ता(फा. गुज़श्तह् = गेलेला): गेल्यावर्षी,जलद (अ. जल्द् ),जूद (फा. जूद् ),पेशजी/पेशजी(फा. पेश् अज़् ईन् = यापूर्वी), यंदा , येकायेकी(फा. यकायक्),शिताब (फा. शिताब् ),हल्ली/हाली (फा. हाली),अखेरसाल (फा. आख़िर् - साल), अ(आ)खेरीस (फा. आख़िर्),आवंदा (फा. आइंदह्),एकदम (फा यक् दम).

(आ) अवधिवाचक

अजून,अजूनही,आजुनी,आजून (फा.हनूज़् ), फिलवाके,फिल् हाल,महिनाभर (फा. माहीनह् + म. भर ), मुदाम (अ. मुदाम् = सतत ),हमेश/हमेशा/हंमेशा/हमेषा (फा. हमीशह्)

(३)पौन : पुन्यवाचक

जरा जरा (अ.ज़र्रह्),दरकूच (फा.दर् कूच्),दरमजल (फा. दर् + अ. मंज़िल्) दरमहा (फा. दर् माह्),दररोज (फा. दर् रोज़् ),दरसदे [फा.दर् (हर्)+ अ.सदी],दरसाल (फा.दर् साल्),बार्बार (फा. बार्बार्).

वारंवार : याविषयी मी[११] पुढील मत यापूर्वी व्यक्त केले आहे ते असे - 'हे क्रियाविशेषण श्री राजवाडे[१०] फार्सीतून आल्याचे मानतात पण डॉ. पटवर्धनांनी[१८] याचा निर्देश केल्याचे आढळत नाही. हा शब्द डॉ.करंदीकर[१९] यांनी संस्कृतपासून व्युत्पादिला असून आधारासाठी त्यांनी 'मालती - माधवातील' उदाहरण उद्धृत केले आहे. 'डॉ.करंदीकरांचे एतद्विषयक मत ग्राह्य धरावयास हरकत नाही.

'सालोसाल(फा. साल्), हरवक्त/ हरवख्त (फा. हर् + अ. वक्त् ).

फा. 'दर ' किंवा फा. हर् या शब्दास मराठी शब्द लागून काही पौनःपुन्यवाचक क्रियाविशेषणे होतातः दरदिवस[२०], हरघडी.

(४) संख्यावाचक किंवा परिमाणवाचक

याचे पुढील विभाग असून त्यांची उदाहरणे अशी -

(अ )प्रकर्षवाचक

अलबत्त,अलबत्ता (अ.अल् बत्तह् ),खास (अ.ख़ास् ),जरूर (अ.जरूर्),निखालस (म. नि + अ.ख़ालिस्), बेशक/बेषक(फा. बी-शक्) , बेलाशक (< बिला - शक्),साफ (अ. साफ्),हम्खास/हमखास (फा. आम्ख़ास् ?)

(आ) अपकर्षवाचक

अजिबात/अजिबाद (फा. अज़् इं बाद् ), आस्ते (फा. आहिस्तह् ), जरा (अ. ज़र्रह्), जराजरा (अ. ज़र्रह् ), फक्त (अ. फ़क़त् ) : हे बखरीत[२१]आणि व.म.त आढळते पण मो.के. दामले[२२] त्याची नोंद घेत नाहीत. हरगिज (फा. हर्गिज़् ).

(इ) आधिक्यवाचक : खूप/खूब (फा. खूब),फाजील (अ. फाज़िल्), वगैरे (अ. वग़ैरह् ).
(ई) पर्याप्तिवाचक : बराबर/बरोबर(फा. बराबर), बस/बस्स (फा. बस् = पुरे), वाजवी (अ. वाजिब् ).
(उ) श्रेणिवाचक : अव्वल (फा. अव्वल् ), दुय्यम (फा. दुव्वम् ),जरजरा,जराबाजरा, जराजरा (अ. ज़र्रह्).
(ऊ) रीतिवाचक : खमखाम/खामखा/खामाखाय(फा. ख्वाह्-म-ख्वाह्),खास (अ.खास्), खुफिया(फा.खुफ्या) = गुप्तपणे,अन्तस्थ रीतीने:,खुसूस (फा. बि. ख़ुसुस ) = विशेषत : जबानी(फा.ज़बानी) = तोंडी, जरूर(अ.ज़रूर् ) = अवश्य,जाहिराणा(फा.ज़ाहिरानह्) = जाहीर रीत्या,जिन्हार(फा.जिन्हार) = बिल्कुल,तन्हा (फा.तन्हा) = एकट्याने, थेट(फा.ताह्द् ), न्यहायत (अ.निहायत्) = पराकाष्ठेचा, पैहम(फा.पैहम्) = वारंवार, मबादा (फा.म्. बादा) = कदाचित्,मुद्दाम (अ. अम्दन[२७]) = हेतुत:जाणूनबुजून,बुद्ध्या; मुफास्सल(अ.मुफस्सल्) = सविस्तर,मोफत(फा.मुफ्त),राजरोस(फा. रोज़्-इ-रौशन्) = दिवसाढवळ्या,रोजबरोज(फा.रोज़्-ब्-रोज़्) = दिवसेंदिवस, शायद (फा.शायद् ) = कदाचित् ,सर्मोय(फा.सरीमूय्) = यत्किंचितही,हकनाक(फा.हक् नाहक्) = उगीच, विनाकारण.
(मध्ययुगीन मराठीतील काही फार्सी शब्दांचे अर्थ कळणार नाहीत, म्हणून ते येथे डॉ.पटवर्धन यांच्या फा.म. कोशानुसार मुद्दाम दिले आहेत.)

## लिंग

फार्सी भाषेच्या लिंगव्यवस्थेचा मराठीच्या लिंगव्यवस्थेवर कितपत प्रभाव पडला,याविषयी आजवर फारच कमी विचार झाला आहे. मराठी वैयाकरणांनी तर जवळपास या विषयाकडे दुर्लक्षच केले आहे.'शास्त्रीय मराठी व्याकरण'कार श्री. मो.के.दामले[२८]यांनी याविषयी 'फारसी,अरबी,इंग्रजी,शब्दांची लिंगे ' या उपशीर्षकाखाली तीन - चार पानांत जो ओझरता उल्लेख केला आहे,त्यामुळे काहीसा वैचारिक गोंधळ उडतो. ते म्हणतात, 'फारसी,अरबी,इंग्रजी ह्या परकीय भाषांतून जे शब्द मराठींत आले आहेत, त्यांच्या लिंगाबद्दल कांहींच नियम दिसत नाहीं. कधीं कधीं एक तर कधीं कधीं दुसरा, आणि कधीं कधीं तिसराच प्रकार दिसतो ' यांत काही शब्दांचे मूळ लिंग कायम राहते तर काहींना मराठी शब्दाचे लिंग प्राप्त होते, अशी माहिती देताना त्यांनी कचेरी,खुर्ची या फार्सी शब्दांची उदाहरणे पहिल्या 'अ ' या भागात दिली असून हे शब्द मूळ स्त्रीलिंगी असल्याचे म्हटले आहे.वस्तुतः हे मूळ शब्द नपुसकलिंगी आहेत ! दुसऱ्या 'आ ' विभागात 'रसीद ' या फार्सी शब्दाला मराठीत स्त्रीलिंग प्राप्त झाले आहे, असे म्हटले आहे पण तेही बरोबर नाही. 'रसीदन् ' या फार्सी क्रियापदाचे 'रसीद् ' हे भूतकाळाचे रूप असून त्याचाच पुढे 'पावती 'या अर्थी नामासारखा वापर झाला. स्त्रीपुरुषवाचक शब्दांखेरीज इतर शब्द फार्सीत नपुसकलिंगी असतात[२९].त्यामुळे 'रसीद 'हा शब्द

फार्सीत नपुसकलिंगी आहे.

तथापि वरील बाबीसाठी श्री. दामले यांना दोष देता येणार नाही कारण त्यांना अरबी - फार्सी भाषांच्या व्याकरणाची माहिती नाही व तशा प्रकारचा उल्लेख त्यांनी आपल्या ग्रंथात अन्यत्र केला आहे[१९]. अरबी - फार्सीची लिंगव्यवस्था विशिष्ट प्रकारची आहे व ती स्वीकारताना काही वेळा मराठीने अरबी - फार्सीच्या बाबतीत अन्यत्र जे संस्कार केले तसे येथेही केले, हे सूत्र लक्षात घेतले असता,सारा उलगडा चांगल्या प्रकारे होतो. मराठीचे हे संस्करण कसे झाले,याविषयी मी बखरींच्या संदर्भात सविस्तर विवेचन यासाठीच केले आहे[२०],ते पाहावे.माझ्यापूर्वीही इति.राजवाडे[२१] यांनी मराठीच्या या संस्करणाविषयी जो विचार मांडला आहे,तो लक्षात घेण्याजोगा आहेः 'मराठीचा प्रकार जर्मन किंवा संस्कृत ह्या भाषांप्रमाणे फारशीहून निराळा आहे. प्रत्येक शब्दाची प्रथम जात ठरवून व त्याला स्त्रीलिंगी,पुल्लिंगी किंवा नपुसकलिंगी बनवून,नंतर त्याच्याशी विभक्तीचा व्यवहार करावयाचा,असा मराठीचा कायदा आहे. फारशींतील नपुंसकलिंगी हजामत् , सफर,नजर हे शब्द मराठींत स्त्रीलिंगी ठरवले गेले. तसेच बाग,पायपोस,खुर्दा वगैरे नपुसकलिंगी फारशी शब्द मराठींत पुल्लिंगी बनविले गेले. हा दुसरा शिक्का मिळविल्यावर कोणताही मराठी शब्द बहुतेक संव्यवहार्य झाला,अशी व्यवस्था होती '.

वरील सर्व विवरणाच्या आधारे,तसेच मध्ययुगीन व आधुनिक मराठी भाषेच्या अध्ययनानंतर अरबी - तुर्की - फार्सी शब्दांना मराठीत कोणकोणती रूपे प्राप्त झाली, त्याविषयी काही अनुमाने करता येतात -

(१)फार्सीत पुरुष - स्त्रीवाचक लिंगभेद दर्शविण्यासाठी त्या नामाच्या आधी अनुक्रमे 'नर् ' व 'मादह् ' हे शब्द लावले जातात. ही व्यवस्था गुजरातीने स्वीकारली. उदा. नर कबूतर,मादा कबूतर किंवा नर बतक (बदक),मादा बतंक (बदक). मराठीने ही प्रवृत्ती फारशी स्वीकारली नाही. 'मादयान पागा ' असा अपवादात्मक स्त्रीलिंगदर्शक उल्लेख एका बखरीत - 'श्रीशिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र'यात आढळतो. त्याचप्रमाणे 'मादी ' या नामाचे 'माद्या 'हे अनेकवचनी रूप 'मराठी साम्राज्याची छोटी बखर ' आणि 'शाहू महाराजांची बखर ' या बखरींत आढळते,याची नोंद मी[२२]बखरविषयक भाषिक अध्ययनात केली आहे :" 'नर 'व 'माद्या 'अशा शब्दप्रयोगांनी 'घोडा ' या प्राणिवाचक नामांतील लिंगभेद स्पष्ट करण्याचा प्रयत्न केल्याचे बखरींत दिसते. उदा. 'पागा हजार,नर पांचशे व माद्या पांचशे, सरदार,बारगीर वगैरे शिदी बिलावल हपशी तैनात केले '(- मराठी साम्राज्याची छोटी बखर, पृ१३.) फार्सीच्या या लकबीचा वर्तमान मराठीत लिंगभेद दर्शविण्यासाठी सर्रास उपयोग होत नाही. प्राणिवाचक वा पक्षीवाचक नामांच्या संदर्भातच हे शब्द वापरले जातात."

(२) अरबी,फार्सी व तुर्की या भाषांत पुल्लिंग व स्त्रीलिंग दर्शविण्यासाठी काही वेळा स्वतंत्र शब्द वापरले जातात. उदा.

फा. पिदर् (पिता) - फा. मादर् (माता)

अ. ख़ादिम[३४२] (सेवक) - अ. खादिमा (सेविका)

तु. बेग[३४३] (स्वामी) - तु. बेगम (स्वामिनी)

अ. साहिब्[३४४] (स्वामी,राजा) -साहिबा (स्वामिनी)

अ. बन्दह्,ग़ुलाम् (दास) - अ. कनीज् (दासी)

अशा शब्दांपैकी काही शब्द मराठीने स्वीकारले आहेत.

नर - मादी (<फा. मादह् )

पादशहाजादा - पादशहाजादी

बेग (तु.बेग् ) - बेगम् (तु.बेगम् )

शहाजादा - शहाजादी

सुलतान (अ.सुल्तान)-सुलताना

(३) अ.फा.तु. सामान्य नामांची लिंगे मराठीने आपल्या लिंगव्यवस्थेनुसार निश्चित केली -

(अ) पुल्लिंग : कागद,किनारा,तालुका,तीर,रुमाल,सदरा .

(आ)स्त्रीलिंग : इमारत,तोफ,दौत,फौज,मशीद,मोहर,

(४) अ.फा.भाववाचक नामांची लिंगेही मराठीने आपल्याला हवी तशी निश्चित केली -

(अ)पुल्लिंग : आब,डौल,तोरा,दिमाख

(आ)स्त्रीलिंग : अदब,अब्रू,इज्जत,इतराजी,इम्रत,दिलगिरी,नाखुषी,नाराजी, परवेशी,बिरादरी,शिस्त,हमी

(इ)नपुसकलिंग : इमान

(५) फार्सी समूहवाचक नामांची लिंगे मराठीने ते शब्द स्वीकारताना आपल्या 'इच्छे'नुसार ठरविली आहेत. 'फौज ' स्त्रीलिंगी आहे तर 'लष्कर ' नपुसकलिंगी. (येथे सेना हा शब्द स्त्रीलिंगी आहे तर 'सैन्य ' हा शब्द नपुसकलिंगी आहे ही तुलना मनात येऊन जाते.) 'जमाव 'पुल्लिंगी आहे तर 'जमात' स्त्रीलिंगी ! तुर्की 'चपाती ' मराठीत स्त्रीलिंगी आहे.

(६) 'ईण '- प्रत्यय लावून मराठीत स्त्रीलिंगी रूप साधले जाते. हा नियम मराठीने अरबी - फार्सी - तुर्की शब्दांनाही लागू केला . त्यामुळे कारभारीण,मजूरीण (क्वचित्) , वकिलीण,साहेबीण यासारखी स्त्रीलिंगी नामे मराठीत आढळतात.

(७) मराठीत आलेल्या अरबी - फार्सी - तुर्की शब्दांच्या लिंगव्यवस्थेच्या बाबतीतील एका वेगळ्या प्रवृत्तीकडे मी बखरींतील उदाहरणे देऊन लक्ष वेधले होते. तिचा येथे पुनरुच्चार करतो[३४५] :

'मराठी लिंगव्यवस्था फार्सी शब्दांच्या बाबतीत लागू पडत असली तरी तिच्यातही अज्ञानामुळे वा गरजेनुसार बदल होऊ लागला. एकच शब्द दोन्ही लिंगी

वापरला जाऊ लागला. पुल्लिंग व स्त्रीलिंग यांच्याबाबतीत हे विशेषकरून घडले आहे. याच्याही पुढे जाऊन पाहिले तर एकाच बखरीत एकच शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी अशा दोन्ही प्रकारे वापरल्याचेही दृष्टोत्पत्तीस येते :

धाकटे रामराजे यांच्या प्रकरणा'त 'हल्ला ' हा शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी असा उभयलिंगी वापरला आहे :

१) पुल्लिंग : किल्यास मोर्चे बसविले आणि सुरंग लावून हल्ला चढविला.

२) स्त्रीलिंग : नवाब आवसे येथे जाऊन पावले,तेव्हां हल्ला केली.

'भाऊसाहेबांच्या कैफियती 'तही असेच आढळते. 'होळकरांची कैफियत' आणि 'भाऊसाहेबांची बखर ' या दोन्ही बखरींत 'सल्ला 'व 'जागा ' हे शब्द असेच उभयलिंगी योजिले आहेत. ती उदाहरणे व संदर्भ मुळातूनच पाहावेत[८].

(८) निशाण-(फा. निशान्) सारखे शब्द मराठी व फार्सी या दोन्ही भाषांत नपुसलिंगीच आहेत.

मराठीतील अरबी - फार्सी - तुर्की शब्दांची लिंगव्यवस्था अशी विविधतापूर्ण आहे.फार्सी - मराठी अनुबंधात येथे कधी मूळ भाषेचे अवशेष टिकून आहेत तर कधी त्यांनी इथल्या मातीचे रंगरूप स्वीकारले आहे.

**वचन**

मराठी भाषेच्या वचनव्यवस्थेवर अरबी - फार्सी - वचनव्यवस्थेचा प्रभाव कसा व कोणकोणत्या बाबतीत पडला व त्या प्रभावाचा प्रकर्ष - अपकर्ष कसाकसा होत गेला, त्यात चढउतार कसे झाले,याविषयी येथे विचार केला आहे. आन,आत,गान,जात, हा या फार्सी प्रत्ययांनी सिद्ध झालेली अनेकवचने,अरबीच्या वचनव्यवस्थेतील विशिष्ट प्रक्रियेने सिद्ध झालेली अनेकवचने ,त्याचप्रमाणे अरबी.'ऐन ' प्रत्ययाने सिद्ध झालेली द्विवचने असे या फार्सी वचनव्यवस्थेचे त्रिविध स्वरूप असून तिच्यामुळे मराठी वचनव्यवस्थेत कोणकोणती परिवर्तने घडली व मराठी वचनव्यवस्थेनेही त्यांचा स्वीकार करताना आपली अस्मिता कशी राखली, याचा मागोवा येथे घेतला आहे.

**फार्सी अनेकवचनाचे प्रत्यय**

पुढील प्रकारे अरबी - फार्सी शब्दांचे अनेकवचन केले जाते. ही पध्दती मध्ययुगीन मराठीने स्वीकारली.विशेषकरून ऐतिहासिक पत्रात्मक गद्यात आणि बखरींत याची अनेक उदाहरणे आढळतात. अधिक नेमकेपणाने बोलायचे तर बखरींत त्या मानाने कमी आढळतात पण पत्रात्मक गद्यात मात्र पदोपदी आढळतात. या संदर्भात डॉ.सुधाकर पवार यांच्या 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्य ' या ग्रंथातील 'छत्रपती शिवाजीमहाराजांची पत्रे ' हे संपूर्ण परिशिष्ट अवश्य पाहावे[९]. त्याचप्रमाणे मी बखरींच्या संदर्भात यासंबंधी केलेले विवेचनही नजरेखालून घालावे[१०].

अनेकवचनाचे रूप सिद्ध करण्यासाठी फार्सीने पुढील पाच प्रत्ययांचा उपयोग केला आहे
(१) आत - या प्रत्ययाने अरबी भाषेत अनेकवचन साधले जाते. तो अरबीतून फार्सीत व फार्सीतून मराठीत आला आहे. हा प्रत्यय मराठी बखरींत अनेक ठिकाणी आढळतो. मात्र मौज अशी की,त्याचे अनेकवचनाचे रूप एकवचन दर्शविण्यासाठी वापरले जाते व पुन्हा त्याचे अनेकवचन मराठी वचनव्यवस्थेनुसारही केले जाते ! यांतील पहिला प्रकार 'अ 'विभागात दर्शविला असून दुसरा प्रकार 'आ 'विभागात दर्शविला आहे[११९].

(अ) १. मूळ तु .कोर्निश् >(अव) कोर्निशात >(एव) कुरनिशात,खुरनिशात
२. अ. तस्लीम् > (अव) तसलीमात् > (एव) तसलीमात .
३. अ. तईन > (अव ) तईनात् > (एंव) तैनात

(आ) वरील शब्दांचे अनेकवचन मराठी वचनव्यवस्थेनुसार 'कुरनुसा ', 'तसलिमा ' व 'तैनाती ' असे अनुक्रमे होते.मराठी पत्रात्मक गद्यातील 'तसरुफाती ' हे रूपही मला येथे नोंदवावेसे वाटते. इ.स. १६४६ च्या एकाच शिवकालीन पत्रात ते दोनदा आले आहे[१२०].याशिवाय इ.स. १६५६ च्या शिवकालीन पत्रातही हे रूप आले आहे[१२१].
(२) ' आन्| '- हा प्रत्यय लावून फार्सीत अनेकवचनाचे रूप सिध्द करतात. मध्ययुगीन मराठी पत्र-वाङ्मयात याची विपुल उदाहरणे आहेत. त्या मानाने मराठी बखरींत त्याचा वापर फार कमी झाला आहे.मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात वरचेवर आढळणारी उदाहरणे अशी[१२२] -

कारकुनानि / नी
मोकदमानि
रयानि
वजिरानि / नी.

यात बारकावा असा की एकाच पत्रात 'कारकुनानी 'हे आन - प्रययान्त अनेकवचनाचे रूप जसे आढळते तसेच 'कारकून 'हे रूपच अनेकवचनासाठीही वापरले आहे[१२३] मराठी शब्दांचेही असे फार्सी 'आन ' हा प्रत्यय लावून अनेकवचन केल्याने या पत्रात आढळते. उदा. देशमुखानि.[१२४]

येथे 'आन ' प्रत्ययाचे विवेचन करताना 'आनि /नी ' प्रत्ययाची उदाहरणे कशी दिली आहेत, अशी एक शंका मनात उद्भवण्याची शक्यता आहे. या शंकेचे निराकरण यापूर्वीच डॉ.पटवर्धन[१२५] यांनी करून ठेवले आहे. ते असे -
"नामाचे अनेकवचन 'आन् ' प्रत्यय लागून होते. 'कारकुनानि हाल व इस्तिकबाल ' या शब्द प्रयोगामध्ये 'कार्कुनान् ' हे अनेकवचनाचे रूप असून त्याला पुढील शब्दाशी षष्ठीचा संबंध दर्शविणारा इझाफतीचा 'इ' हा प्रत्यय लागलेला आहे. परन्तु भाषेच्या अज्ञानामुळें'आनी 'हाच अनेकवचनाचा प्रत्यय असें मराठी लेखक समजूं लागले आणि 'अर्कानि दौलत '(= राज्यस्तम्भ ) हा शुध्द प्रयोग जाऊन 'अर्कानी दौलतानी' (इम २३६) असें लिहिण्यांत येऊं लागलें तसेच पुढील वाक्यांत पहा : 'महालीचे कार्कुनानी

इस्कील करून दुम्बाला करीत नाहीत ' (राजवाडे २०/१५२)'

'आन' हा फारसी प्रत्यय आजच्या मराठीत अनेकवचन दर्शविण्यासाठी वापरला जात नाही. याची बीजेदेखील मराठी पत्रात्मक गद्यात मध्ययुगात पेरली गेली असावीत. आज 'कारकून 'हा शब्द एकवचन व अनेकवचन या दोन्ही वचनी वापरला जातो तसाच तो मध्ययुगीन पत्रात्मक गद्यातही वापरला जाऊ लागला होता[९६]

(३) गान : मूळ (अरबी - फारसी ) शब्द अकारान्त असल्यास त्याचे अनेकवचन होताना 'आन् 'ऐवजी 'गान् ' हा प्रत्यय लागतो, असे डॉ. पटवर्धन[९७] यांनी म्हटले असले व ते काही अंशी बरोबर असले तरी त्यात एक दुरुस्ती करणे आवश्यक आहे. फारसी व्याकरणातील मूळ नियम असा आहे की हलन्त असलेल्या शब्दाचे अनेकवचन होताना 'आन् 'ऐवजी 'गान् ' हा प्रत्यय लागतो. या संदर्भात डॉ. पटवर्धन[९८] यांनीच दिलेले 'बंदा ' या शब्दाचे उदाहरण घेऊ या. त्यातील मूळ फारसी शब्द ' बन्दह् ' असा आहे. त्याचे अनेकवचनी रूप 'बंदेगान् 'असे होते. डॉ. पटवर्धन यांनीच दिलेले दुसरे उदाहरण 'प्यादा ' या फारसी शब्दाचे आहे. त्याचे मूळ रूप 'पियादह् ' असे हलन्त असल्याने त्याचे अनेकवचनी रूप पियादगान व पुढे मध्ययुगीन मराठी पत्रात्मक गद्यात 'प्यादगान ' असे झाले आहे.

या प्रत्ययाची उदाहरणे मराठी बखरींत[९९] आढळत नाहीत,त्याचप्रमाणे आजच्या मराठीतही आढळत नाहीत.

(४) जात : फारसीत हलन्त नामांचे अनेकवचन करताना जसा 'गान "हा प्रत्यय लागतो, त्याचप्रमाणे 'जात ' हा प्रत्ययही लागतो. या संदर्भातही डॉ.पटवर्धन[१००] यांचे 'मुळात अकारान्त नामाचें अनेकवचनाचे रूप जात (<जात) हा प्रत्यय लागून होते ', हे विधान थोडे बदलून घ्यायला हवे. 'अकारान्त 'ऐवजी 'काही हकारान्त 'अशी दुरुस्ती केल्यास डॉ. पटवर्धन यांचे मत मान्य करावयास हरकत नाही .'कारखानेजात ' व 'किल्लाजात ' ही डॉ. पटवर्धन यांचीच उदाहरणे घेऊ या. त्यांची मूळ रूपे फा. कार्खानह् व अ. कल्अह् अशी आहेत. त्याच प्रमाणे त्यांनी दिलेल्या 'तोफजात "मेवेजात ' व 'सुभेजात 'या अरबी / फारसी अनेकवचनी शब्दांची मूळ एकवचनी रूपे अनुक्रमे अ.तुह्फह्, फा.मेवह् आणि फा.सूबह् अशी आहेत. ती मूळ फारसी लिपीत डॉ. पटवर्धन यांनी याच प्रकारे फारसी - मराठी कोशाच्या शेवटी दिलेल्या शब्दसूचीत अनुक्रमे पृ.क्र १६,२८ व ३४ यावर नोंदविली आहेत. ती हलन्तच आहेत.

मराठी बखरींत हा प्रत्यय मला आढळला नाही[१०१].

मध्ययुगीन पत्रात्मक गद्याचा अपवाद वगळता अन्य मराठी साहित्यातही तो वापरला गेलेला नाही व आजच्या मराठीत तर त्याचा मागमूसही राहिला नाही.

(५) हा : याविषयी डॉ. पटवर्धन म्हणतात, 'फारसी भाषेत 'हा 'हा प्रत्यय लागून कोणत्याही नामाचे अनेकवचनाचे रूप सिद्ध होते '. त्यांनी यासाठी 'बार् 'चे 'बारहा 'हे

अनेकवचनाचे उदाहरण दिले आहे. मध्ययुगीन मराठी पत्रात्मक गद्यात त्याचा आढळ होत असला तरी मध्ययुगीन बखर व अन्य मराठी वाङ्मयात तो आढळत नाही. सध्याच्या मराठीत तर तो अदृश्यच झाला आहे.

**अरबी अनेकवचन - प्रक्रिया**

अरबी भाषेत मूळ एकवचनाच्या रूपात फेरफार करुन अनेकवचनाचे रूप साधले जाते. उदा. अ. गरीब् हे एकवचनाचे रूप असून 'गुरबह् 'हे त्याचे अनेकवचनाचे रूप आहे.अ 'फकीर् 'हे एकवचनाचे रूप असून 'फुकरह् ' हे त्याचे अनेकवचनाचे रूप आहे. अ.'मज्लिस्' हे एकवचनाचे रूप असून 'मजालिस् ' हे त्याचे अनेकवचनाचे रूप आहे. त्याच प्रमाणे अ.मर्तबत् चे 'मरातिब् ' हे अनेकवचनाचे रूप आहे[१०४]. अ.अमीर चे 'उमरा' हे अनेकवचनाचे रूप आहे.

अरबी एकवचनी शब्दास त्याचे अनेकवचनी रूप जोडून वापरण्याचीही पध्दती असून ती फार्सीच्या माध्यमातून मध्ययुगीन मराठी वाङ्मयात - विशेषतः पत्रात्मक गद्यात आणि बखरींत - आली आहे .बखरींतील तिची पुढील उदाहरणे मी दिलीच आहेत[१०५]: अमीरउमराव,खैरखैरात,गरीबगुरीब,फकीरफुकरा इ. आजच्या मराठीतही अमीरउमराव,गोरगरीब,मानमरातब या शब्दांत ही अरबी अनेकवचनाची रूपे आढळतात. अ.हाल् चे 'अहवाल ' हे अनेकवचनाचे रूप आहे,त्याचे रूपान्तर आजच्या मराठीत 'हालहवाल ' या शब्दात झाले आहे.

**आणखी एक प्रवृत्ती**

याशिवाय आजच्या मराठीत रुळलेल्या एका प्रवृत्तीचा उल्लेख केल्याशिवाय अरबी - फार्सी अनेकवचनी रूपांचा हा विचार पूर्ण होणार नाही. पुढील शब्दांची अरबी अनेकवचनाची रूपे सध्याच्या मराठीत एकवचनी म्हणूनच वापरली जातात -

| मूळ एकवचनी रूप अ/फा/तु | अ/फा/तु अव | मराठीत होणारा एकवचनी प्रयोग |
|---|---|---|
| अ. इस्म् | असामी | असामी |
| अ. हाल् | अह्वाल् | अहवाल |
| अ. अदब् | आदाब् | आदाब |
| अ. अमीर् | उम्रा | उमराव |
| अ. वली | औलिया | अवलिया |
| अ. काइदह् | कवाइद् | कवायत |
| (तु)कोर्निश् | कोर्निशात् | कुर्निसात |

**व्दिवचन**

'ऐन 'प्रत्यय :

याविषयीचे डॉ. पटवर्धन यांचे मत उद्धृत करणे आवश्यक आहे, असे मला वाटते. ते म्हणतात, " फार्शीत व्दिवचन नाही. ऐन प्रत्ययान्त जानिबैन, तर्फैन,वालिदैन हे शब्द अरबी आहेत. 'जानीबैन ' (साने पयाव ४८४ ) व 'तर्फैन '(खरे ७/ ३५ /६४ )यांचा दुतर्फा,परस्परें या अर्थी क्रियाविशेषणासारखा उपयोग होतो.पुस्त (< पुश्त) पिढी हा शब्द फार्शी असतांही पुस्तैन असें व्दिवचन पुढील वाक्यांत आढळतें : दोन्ही रियासती पुस्तैनपासून येक,जुदाई नाही '.

या व्दिवचनाचा प्रवास अरबीतून फार्सी व फार्सीतून मध्ययुगीन पत्ररूप गद्य असा आहे. बखरींत ते अपवादात्मक स्वरूपात आढळत असले तरी ते मराठीत खऱ्या अर्थाने फारसे रुजलेच नाही व आधुनिक मराठीत तर त्याचा पूर्णतया लोप झाला आहे.

**विभक्ती**

विभक्तीचे प्रत्यय हे मराठीच्या प्रकृतीचे एक लक्षणीय वैशिष्ट्य आहे.मध्ययुगात मराठी भाषा फार्सीच्या संपर्कात आल्यानंतर मराठीच्या विभक्ति - व्यवस्थेवरही फार्सीचा परिणाम होतो, ही बाब दुर्लक्षिण्याजोगी खास नाही. मराठेशाहीतील पत्ररुप गद्याच्या 'भाषिक पाहणी 'चा समारोप करताना डॉ. सुधाकर पवार जेव्हा पुढील सरधोपट निष्कर्ष मांडतात, तेव्हा त्यांनीच केलेल्या प्रकरणाच्या विभक्तिविषयक विवेचनाशी त्याची तुलना केल्यावर काहीसे आश्चर्य वाटते. ते म्हणतात, ' विभक्तिप्रत्यय,क्रियापदाची रूपे,कृदन्ते, तध्दिते हा सर्व सांगाडा मराठीने कायम ठेवला.'क्रियापदांची रूपे, कृदन्ते व तध्दिते यांवर फार्सीचा लक्षणीय प्रभाव कसा पडला,याचे सप्रमाण विवेचन त्यांनी याच ग्रंथातील त्या त्या विषयाच्या अनुषंगाने केले आहे पण त्यांचा हा विभक्तिविषयक निष्कर्ष मात्र पटण्याजोगा नाही, हे येथे नमूद करणे आवश्यक आहे. इति. राजवाडे या विषयाचा अधिक गांभिर्याने विचार करताना म्हणतात,'मराठीच्या व फारशीच्या सान्निध्यासंबधाने आता पर्यंत जे हे विशेष सांगितले त्याहूनहि एक विशेष बराच संस्मरणीय असा फारशीच्या संसर्गानें मराठीत आला आहे' असे म्हणून त्यांनी त्यापुढे तपशीलवार विवरण केले आहे त्याचा विचार पुढे त्या त्या मुद्याच्या अनुषंगाने केलाच आहे.

डॉ.माधवराव पटवर्धन यांनीही फार्सीच्या विभक्तिविषयक प्रभावाचा चांगला विचार केला आहे, त्याचा मागोवा येथे घेतला आहे. यापुढे मराठीच्या कोणत्या विभक्तीवर फार्सीचा प्रभाव कितपत पडला,केव्हा पडला व नंतर आधुनिक मराठीत तो कितपत टिकून राहिला,याचा विचार केला आहे.

**(१) प्रथमा विभक्ती**

फार्सीच्या प्रथमेच्या 'ई ' प्रत्ययाविषयी डॉ. पटवर्धन म्हणतात,'प्रथमेच्या एकवचनाच्या

रूपात अनिश्चितपणा दाखववायचा असला म्हणजे ई हा प्रत्यय लागतो. जसे,मर्दी म्हणजे कोणी एक मर्द. कसोशी,किताबती,खुमारी,तफावती वगैरे पुष्कळच शब्दांत निरर्थक अन्त्य ई हा प्रत्यय आढळतो,त्याचे मूळ उपरिनिर्दिष्ट नियमात असावें'.

मला हा प्रत्यय बखरीत आढळला नाही. मध्ययुगीन पत्रात्मक गद्यात तो अल्प प्रमाणात आला असला तरी पुढील काळात त्याने फारसा तग धरला नाही व आधुनिक मराठीत तर तो नामशेषच झाला आहे. यादवकालीन प्रथमेच्या 'उ' प्रत्ययाचे जे घडले तेच या फार्सी प्रत्ययाचेही घडले.

**(२) व्दितीया व चतुर्थी विभक्ती**

या विभक्तीच्या 'ला' प्रत्ययाचे मूळ फार्सी 'रा' या प्रत्ययात आहे,हे इति. राजवाडे व डॉ. मा.त्र्यं.पटवर्धन या दोन्ही विद्वानांनी सप्रमाण मान्य केले आहे.त्यांचे हे मत स्वीकारायला हरकत नाही,असे मलाही वाटते.

(अ) राजवाडे यांचे मत -

प्रथम इति. राजवाडे यांनी जे सविस्तर विवेचन केले आहे, ते उद्धृत करतो म्हणजे मला त्याविषयी वेगळे लिहिण्याची फारशी गरज भासणार नाही.या 'संस्मरणीय विशेषा'संबंधी इति.राजवाडे[११]म्हणतात, "तो विशेष चतुर्थीच्या किंवा व्दितीयेच्या ला प्रत्ययासंबंधीचा आहे. हा प्रत्यय फारशी व्दितीयेचा प्रत्यय जो रा त्यापासून आला आहे. फारशीत राम या शब्दाची व्दितीया राम् रा अशी होते. मराठीत राम, ह्या शब्दाची व्दितीया ज्ञानेश्वराच्या वेळीं राम,रामा,रामासी,रामातें,रामाप्रति अशी होत असे. पुढें फारशीच्या सान्निध्यानें रामाला अशी व्दितीया विकल्पानें होऊं लागली. राम राम् रा, राम रामाला (राम + आ + ला ), अहमदनगर,अहमदनगररा ह्या फारशी व्दितीयेबदल अहमदनगर,अहमदनगरला किंवा अहमदनगराला अशी मराठी व्दितीया होऊं लागली. हा ला प्रत्यय कोठून आला,त्याविषयीं, दादोबा पांडुरंग,कृष्णशास्त्री चिपळोणकर व कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांना गूढ पडलें होतें. (दादोकृत मोठे व्याकरण,दहावी आवृत्ति,पृष्ठ६५,चिपळोणकरकृत व्याकरणावरील निबंध,पृष्ठ७३,गोडबोलेकृत व्याकरण). ज्ञानेश्वरींत हा ला प्रत्यय नसतांना पुढें तो एकाएकीं कोठून आला ? नामदेवांच्या अभंगांत हा ला प्रत्यय प्रथम आढळतो. ज्ञानेश्वर व नामदेव हे जर समकालीन होते, तर नामदेवांच्या ग्रंथांतच तेवढा ला प्रत्यय आणि ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांत बिलकुल नसावा,हें आश्चर्य आहे. खरा प्रकार असा आहे कीं ज्याचे अभंग आपण सध्यां वाचतों तो नामदेव सोळाव्या शतकांत होऊन गेला, व सोळाव्या शतकांत दोनशे वर्षांच्या घसटीने ला प्रत्यय मराठीत रूढ होऊन नामदेवाच्या अभंगांत आला. आतां लग् धातूपासून निघालेल्या लागून लागीं,लगी ह्या रूपांचा व्दितीयेचा ला प्रत्यय अपभ्रंश आहे असें प्रतिपादन कोणी ग्रंथकार करितात.

जॉन बीम्स ह्यानें आपल्या Comparative Grammar नामक ग्रंथांत हेंच मत स्वीकारलें आहे. लग् धातूपासून निघालेल्या लागी ह्या शब्दाची शेवटली गी लुप्त

होऊन ला हा द्वितीयेचा प्रत्यय झाला असें बीम्सचें म्हणणें आहे.ह्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ तो असें कारण देतो कीं, जुन्या मराठींत (?) लागीं व लागून अशीं रूपें होतीं ती जाऊन हा ला प्रत्यय वर्तमान मराठींत राहिला आहे. परंतु बीम्सचे हें म्हणणे १२९० पासून १८९० पर्यंतची ऐतिहासिक परंपरा पाहिली असतां खरें आहे असे म्हणतां येत नाहीं. आधी जुन्या मराठीतील लागी व लागून हीं रूपें प्रस्तुत काळापर्यंत लुप्त झाली नसून सध्याहि चालू आहेत.ज्याला मरून नुकतीच शंभर वर्षे झाली,त्या महिपतीनें हा शब्द योजिला आहे -

नक्र बोलला तूजलागोन। तुझें नाम पतितपावन ।
आणि माझा अव्हेर करून । जासी घेवोन गजेंद्रा ।। (भक्तिविजय)

ज्ञानेश्वर (इ. स. १३००),मुतोजी (१५५०),एकनाथ (१६००),नामदेव (१६०० ),मुक्तेश्वर (१६४०),वामन (१६६०),श्रीधर (१७००),मोरोपंत (१७७०), महीपति (१७९०) वगैरे ग्रंथकारांनी आज सहाशें वर्षे हा शब्द योजण्याचा क्रम सारखा ठेविला आहे. तेव्हां हा शब्द अलीकडील काळांत केव्हाहि लुप्त झाला नाहीं, हें उघड आहे. बीम्सचें म्हणणें खरें नसण्याला दुसरें कारण असें आहे कीं,कोणच्याहि शब्दयोगी अव्ययाला विभक्तिप्रत्ययाचे रूप येण्याला,ते शब्दयोगी अव्यय लोकांच्या बोलण्यांतून व लिहिण्यातून हळूहळू कमी झालें पाहिजे. ह्या नियमाप्रमाणे पाहिलें असता,ला हा द्वितीयेचा प्रत्यय ज्या मराठी ग्रंथकाराच्या लेखांत प्रथम दिसतो त्याच्या लेखांत लागी,लागून ही रूपें क्वचित आलीं पाहिजेत व त्याच्यानंतरच्या ग्रंथकारांच्या लेखांत मुळींच येतां कामा नाहींत. आतां नामदेवांच्या ग्रथांत ला हा प्रत्यय प्रथम दृष्टीस पडतो,परंतु लागीं हें शब्दयोगी अव्ययहि त्याच्या अभंगांत व भारतांत अनेक वेळां आलें आहे. तसेच नामदेवाच्या नंतर झालेल्या एकनाथादि ग्रंथकारांच्या ग्रंथांतहि तें हमेशा येतें. तेव्हा बीम्सची कल्पि खरी नाहीं असें म्हणणें प्राप्त होतें. मुसुलमानांच्या ऐन अमदानींत वाढलेल्या नामदेव,मुक्ताबाई वगैरेंच्या ग्रंथांत फारशी रा पासून निघालेला ला हा द्वितीयेचा प्रत्यय जसा कित्येक ठिकाणीं योजिलेला दृष्टीस पडतो तसा प्रस्तुत खंडांत छापिलेल्या शिवाजीच्या पत्रांत दिसत नाहीं. सहयाद्रीच्या पूर्वेकडील मावळांत व पश्चिमेकडील तळकोकणांत फारशी भाषेचा संचार केव्हांहि फारसा नसल्यामुळे तेथील लोकांच्या बोलण्यांत फारशींतून घेतलेला द्वितीयेचा ला प्रत्यय बिलकूल येत नसून प्रायःस प्रत्यय येत असे. शिवाजीचे ब्राह्मण मुत्सद्दी एकोन एक मावळांतील किंवा तळकोकणांतील होते व ते स प्रत्ययाचा हमेश उपयोग करीत. जर लागी किंवा लागून ह्या शब्दयोगी अव्ययापासून ला प्रत्यय निघाला असता,तर महाराष्ट्रांतील सर्व भागांत ह्या ला चा उपयोग निदान नामदेवानंतर शंभर दीडशें वर्षांनी तरी,सर्व महाराष्ट्रांत व्हायला पाहिजे होता. परंतु तसा प्रकार झालेला नाही.ला प्रत्यय शिवाजीच्या वेळेस मावळांत व तळकोकणांत फारसा लावीत नसत हे तर काय,पण दादोबा पांडुरंग व कृष्णशास्त्री चिपळोणकर ह्यांच्या वेळींहि हा प्रत्यय कोकणांत फारसा योजीत नाहींत व

देशांत हमेशा योजतात,असा भेद भासत होता (दादोकृत मोठें व्याकरण,दहावी आवृत्ती ,पृष्ठ ६५ व चिपळोणकरांचे व्याकरणावरील निबंध, पृ. ७३ ). येणेंप्रमाणे बीम्सची ही क्लप्ति केवळ निराधार आहे,असें मला वाटतें. ज्ञानेश्वरींत आ,स,सी,ते हे द्वितीयेचे किंवा चतुर्थीचे प्रत्यय होते. लागीं,लागौनि,लाग,लागा,अशी लाग ह्या नामाचीं व क्रियापदाची रूपें ज्ञानेश्वरींत व तिच्यापुढील सर्व ग्रंथांत येतात ".राजवाडे यांच्या या विवेचनातील बहुतेक भाग मान्य होण्याजोगा आहे. ते ज्या दुसऱ्या भारतकार नामदेवांचा उल्लेख करतात,तो विष्णुदास नामा असावा. ला हा प्रत्यय शिवकालीन पत्रांत आढळत नाही[२१२],हेही खरे आहे.

(आ) डॉ.पटवर्धन[२१३] यांचे मत : 'कर्मदर्शक नामास संदिग्धता घालविण्याकरितां विभक्तिप्रत्यय लागलाच तर रा लावितात. मराठीतील ला प्रत्यय फार्शी रा पासूनच निघाला आहे,असे दिसते'. ला हा प्रत्यय फार्सी रा पासून आला,याबद्दल या दोन्ही विद्वानांचे मतैक्य आहे. तो नेमका कोणत्या काळात आला, हा काहीसा वादविषय आहे. फार्सीत 'मला 'साठी 'मरा ' हा शब्दप्रयोग केला जातो, याचीही नोंद येथे घ्यायला हवी. आजच्या मराठीत मात्र द्वितीया व चतुर्थीचा प्रत्यय म्हणून या प्रत्ययाचा सर्रास वापर होतो, हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही.

(३) 'इजाफतो'चा प्रत्यय

(i) फार्सीत षष्ठीचा अर्थ दर्शविण्यासाठी 'इ 'हा प्रत्यय वापरतात. त्याला 'इजाफतीचा प्रत्यय ' असे म्हणतात. चा-ची-चे या प्रत्ययांचे काम हा फार्सीतील एकच प्रत्यय करतो मात्र तो जोडण्याचा क्रम उलटा असतो. याविषयी डॉ. पटवर्धन[२१४] यांनी चांगले विवेचन केले आहे :

'इझाफत म्हणजे षष्ठी संबंध ,यांत शब्दक्रम मराठीच्या उलटा असतो : व षष्ठीचा प्रत्यय इ(याचा उच्चार ए असाच बहुधा होतो)हा पहिल्या नामाला लागतो.उदाहरणार्थ, द्युतीचा गिरी याचे कोह-इ-नूर, जूनचा महिना याचे भाषांतर माहे जून असें होतें'.

(ii) नाम व पुरोगामी विशेषण यांच्याबाबतीतही हेच घडते पण याची दखल विभक्तीच्या संदर्भात डॉ. पटवर्धन यांनी घेतली नाही,असे दिसते. बखरींच्या संदर्भात विवेचन करताना मी[२१५] याविषयी साधार खुलासा केला आहे व त्याची पुढील उदाहरणेही दिली आहेत - करार्वे मजकूरची ,परगणे मजकूरचा ,मौजे मजकुरीं इ. मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात हा प्रत्यय मोठ्या प्रमाणात वापरला गेला.त्याविषयी डॉ.सुधाकर पवार[२१६] म्हणतात,"फार्शीतील षष्ठीसंबंध (इसाफ्त) तत्कालिन मराठीत आढळतो. षष्ठीचा प्रत्यय इ मौजे,किल्ले इ.उदाहरणांमध्ये 'मौजा-ई ','किल्ला-ई'असा होतो.किल्ले रोहिडा म्हणजे किल्ला-इ-रोहिडा. षष्ठीचा 'इ ' प्रत्यय मागील शब्दास लावण्याची प्रवृत्ती पूर्णपणे भाषेला खिळून बसलेली दिसते '. हे खरे असले तरी त्यापूर्वीदेखील एकनाथांच्या[२१७] पत्रात्मक रूपकांत (भारुडांत) हा प्रत्यय अनेकदा वापरला गेला आहे -

१. अभंगपत्र : मौजे देहपूर,मौजे मजकुरी

२. अर्जी : बंदे शरीराकार,प्रगणे शरीराबाद,किल्ले कायापुरी,परगणे मजकुरी,परगणे मजकूरचे
३. अर्जदस्त : किल्ले कायापूर,परगणे मजकूर
४. अर्जीचा जाब : परगणे कर्मआचरण,तालुके कैलासगिरी
५. ताकीदपत्र : परगणे शरीराबाद
६. कऊलपत्र : कसबे ब्रह्मपुरी

**(४) इजाफतीच्या प्रत्ययाचा लोप** : या प्रत्ययाचा कधी कधी उच्चार न करण्याची- म्हणजेच त्याचा लोप करण्याची- प्रवृत्तीही फारसी भाषेत आहे ती मध्ययुगीन मराठी पत्रात्मक गद्यात तसेच बखरींत आली आहे. यापूर्वी बखरींतील पुढील उदाहरणे देऊन मी[१४] याविषयी विवेचन केलेच आहे - कोट मजकुरी,तक्तराव (फा.तख्त्-इ-रवान्), सन मजुकरीं,शाल मजकुरीं इ.

डॉ. पटवर्धन[१५] यांनी या प्रवृत्तीचा निर्देश केला आहे पण तो एका वेगळ्याच संदर्भात.ते म्हणतात, "हा षष्ठीचा प्रत्यय शाहआलम,शाहजहान,नूरजहान,वगैरे अपवादात्मक शब्दांत व साहेब,वली वगैरे शब्दांनी सुरू होणाऱ्या षष्ठी संबंधात उच्चारिला जात नाही. उदा. साहेब हिम्मत,हिम्मतवान,वली न्यामत(=श्रीमन्त,राजवाडे १०/१६५)व वली अहद (राजवाडे १/१६३) म्हणजे युवराज वगैरे शब्दप्रयोगांत षष्ठीच्या प्रत्ययाचा उच्चार नाही.मराठीत त्याचा उच्चार होणे हीच अपवादात्मक बाब आहे. उदाहरणार्थ 'अज सबब - दूरी - राह '(पदमव ११२), 'अज बायेस बिमारी '(पदमव ११४) ,अजरा मव्हामत. हिम्मत मर्दा - मदत खुदा या महशूर म्हणीचा अर्थ धीर -कसोशी मनुष्यांची (व मग) मदत ईश्वराची असा आहे.मूळांत हिम्मत् व मदद् या शब्दांच्या अन्तीं इ हा प्रत्यय आहे.तसेच रंग - रोगण मूळात रंग् - इ - रौघन म्हणजे तैल - रंग असें आहे' डॉ. पटवर्धन यांचे हे मत मान्य करण्याजोगे असले तरी त्यात पुढील पुस्तीदुरुस्ती आवश्यक आहे असे मला वाटते.
(i) दोन नामांपैकी एका (पहिल्या नामाला) हा प्रत्यय लागतो व तो गळतोही हे खरे असले तरी नाम व विशेषण अशा जोडीतील नामास तो लागतो व गळतोही हे वरील बखरींतील उदाहरणांवरून स्पष्ट होईलच.
(ii) याच उदाहरणांवरून हेही स्पष्ट होईल की डॉ. पटवर्धनांनी उल्लेखिलेल्या अपवादात्मक शब्दांत व साहेब,वली वगैरे शब्दांनी सुरु होण्याऱ्या षष्ठी संबंधातच तो उच्चारला जात नाही,असे नाही तर त्यांच्याव्यतिरिक्त इतर शब्दांच्या बाबतीतही असे घडते.
(५)फारसीच्या या प्रवृत्तीचा इतर मराठी विभक्तिप्रत्ययांवरील प्रभाव : द्वितीया व चतुर्थीच्या प्रत्ययांचा लोप करण्याची प्रवृत्ती शिवकालीन मराठीत आढळते.मराठेशाहीतील पत्ररूप गद्यातील 'खान सातारा आला यासारखी उदाहरणे प्रा.कृ.पां.कुलकर्णी व डॉ.पवार[१६]

यांनी दिलीच आहे.विभक्तिप्रत्ययांचा लोप करण्याच्या फार्सीच्या प्रवृत्तीचा प्रभाव मराठीच्या प्रन्य विभक्तींवर पडला असल्याची शक्यताही यातून सूचित होते.

(६) संबोधन : संबोधनासाठी फार्सीत ऐ व अरबीत 'या 'हे प्रत्यय योजिले जातात. मराठी बखरींत 'या 'हा प्रत्यय क्वचित् आढळतो. त्याचे डॉ. पटवर्धनांनी[१११]'या खुदा 'हे उदाहरण दिले आहे.

(७) शब्दयोगीसाधित विभक्ती : शब्दयोगी अव्ययांच्या साहाय्याने विभक्तिप्रत्ययांचे कार्य करून घेण्याची प्रवृत्ती यादवकालीन मराठीपासून आढळते. ती फार्सीतही आहे. तथापि ती फार्सीपासून मराठीत आली असे मात्र म्हणता येणार नाही.फार तर दोन्ही भाषांत ही समान प्रवृत्ती आहे,असे म्हणता येईल.मध्ययुगीन गद्यात जेथे फार्सी शब्दयोगी अव्ययांच्या साहाय्याने हे कार्य केले जाते,तेथे मात्र ती फार्सीची प्रवृत्ती आहे. असे म्हणावे लागेल. डॉ. पटवर्धन[११२]याविषयी म्हणतात,'इतर विभक्तींनी दाखविले जाणारे संबंध पूर्वगामी अव्ययांच्या साहाय्यानें व्यक्त केले जातात,जसें 'अझ्-इं-सबब' म्हणजे 'या कारणाने', 'दर्रीं विला' म्हणजे 'या वेळी' वगैरे.' मराठी बखरींत फार्सी शब्दयोगी अव्ययांच्या साहाय्याने विविध विभक्तींचे कार्य कसे केले जाते,ते मी[११३] तपशीलवार दाखविलेच आहे मात्र ही शब्दयोगी अव्यये बहुधा पुरोगामी म्हणजे शब्दानंतर येणारी आहेत,डॉ.पटवर्धन म्हणतात तशी पूर्वगामी नाहीत -

तृतीया : कारकुनाबरोबर,किल्ल्यानजीक,मदतीबरहुकूम,मनसुब्याबरहक.

चतुर्थी : जमिनीबद्दल,फौजेबद्दल,वसुलाबद्दल,सरंजामाबद्दल.

पंचमी : कारकुनाखेरीज,तोफांशिवाय,सल्याशिवाय,हुकुमाशिवाय. इ.

मराठीच्या प्रथमा,द्वितीया,चतुर्थी,षष्ठी व संबोधन या विभक्तींच्या प्रत्ययांवर फार्सीच्या प्रत्ययांचा कसा प्रभाव पडला,तो आपण पाहिले. यांतील प्रथमा व संबोधन यांच्यावरील प्रभाव अल्पस्वल्प असला तरी द्वितीया/चतुर्थीवरील प्रभाव 'ला ' प्रत्ययाच्या रूपाने आपले लक्ष वेधून घेतो. षष्ठीचा इजाफतीचा प्रत्यय मध्ययुगीन मराठीत बराच रुळलेला दिसतो तर त्याचा लोपही फार्सीच्या तत्सम प्रवृत्तीकडे अंगुलिनिर्देश करतो. त्यातून विभक्तिप्रत्ययाच्या लोपांची फार्सीची प्रवृत्तीही मध्ययुगीन मराठीत डोकावत असताना दिसते. शब्दयोगीसाधित विभक्तीची फार्सीतील समान प्रवृत्तीही मराठीतील फार्सी शब्दांच्या संदर्भात लक्षात घ्यावी लागते.

### सामान्यरूप

(अ) पूर्वार्ध : फार्सी - मराठी या दोन्ही भाषांत किती घनिष्ट संबंध प्रस्थापित झाला होता,हे सिद्ध करणारे एक लक्षणीय वैशिष्ट्य म्हणजे सामान्यरूप होय. सामान्यरूप ही मराठी भाषेची एक व्यवच्छेदक निर्मिती होय. विभक्तिप्रत्यय वा शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वी मराठी शब्दाचे सामान्यरूप होते. असे सामान्यरूप हिन्दीसारख्या आर्यभारतीय भाषेत होत नाही.फार्सी आर्यभाषेची इराणातली एक शाखा.तिच्यातही

सामान्यरूप होत नाही. फार्सी शब्दांचे मराठीकरण होताना मराठी सामान्यरूपाचा संस्कारही त्यांच्यावर अपरिहार्यपणे कसा होतो,याचे सविस्तर विवेचन मी माझ्या 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप[११४] 'या ग्रंथात केले आहे, ते जिज्ञासूंनी मूळातूनच पाहावे. मध्ययुगीन मराठीतील ही प्रवृत्ती पुढे आधुनिक मराठीतही तशीच आली.या विवेचनात मी भरपूर उदाहरणे दिली असून त्यांपैकी बरीच उदाहरणे आजच्या मराठीतही आढळत असल्याने पुनरुक्ती टाळण्यासाठी ती येथे पुन्हा उद्धृत करीत नाही.

(आ) उत्तराध : शब्दाचे सामान्यरूप करणे ही जर मराठीची मूलभूत प्रवृत्ती होती तर मग मध्ययुगीन तसेच आधुनिक मराठीत ही काही अरबी-तुर्की-फार्सी शब्दांचे सामान्यरूप का होत नाही,ही बाबही फार्सी - मराठीच्या अनुबंधावर प्रकाश टाकते. या विवेचनाच्या पूर्वार्धात फार्सी शब्दांनी मराठीत येताना मराठीची प्रवृत्ती स्वीकारली तर येथे उत्तरार्धात सामान्यरूप न करण्याची फार्सी भाषेची प्रवृत्ती मराठी भाषेने काही अरबी -तुर्की-फार्सी शब्दांच्या संदर्भात स्वीकारली. सौजन्यपूर्ण आणि सौहार्दपूर्ण भाषिक सहकार्याचे हे एक मनात ठसणारे उदाहरण होय. या प्रवृत्तीसाठी मी 'सामान्यरूपाचा लोप ' असा शब्दप्रयोग माझ्या ग्रंथात केला होता[११५] पण तो योग्य नाही असे मला आता पुनर्विचारान्ती वाटत आहे. सामान्यरूप झालेच नाही तर त्याचा लोप होण्याचा प्रश्न कुठे उद्‌भवतो ?फार्सीत सामान्यरूप होत नसल्याने तीच प्रवृत्ती मराठीने काही अरबी - तुर्की-फार्सी शब्दांच्या बाबतीत स्वीकारली,असे म्हणणे योग्य होईल.शब्दास विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी किंवा त्यास शब्दयोगी अव्यय लागण्यापूर्वी - अशा दोन्ही बाबतींत काही वेळा सामान्यरूप कसे होत नाही,याची ही उदाहरणे मी माझ्या विवेचनात दिलीच आहेत[११५]. पुनरुक्ती होऊ नये म्हणून तीही येथे देण्याचे टाळले आहे.

काळ

अरबी-फार्सी शब्दापांसून सिध्द झालेल्या क्रियापदांची व त्यांच्या प्रयोजक रूपांची विविध काळांची रूपे मराठीने आपल्या पद्धतीने तयार केली. याचाच अर्थ असा की हे अरबी - फार्सी शब्द मराठीत मध्ययुगापासून चांगलेच रुळले होते.पुढे 'अ ' विभागात क्रियापदांची विविध काळांची रूपे दिली असून 'आ ' विभागात त्यांची प्रयोजक रूपे दिली आहेत. ही उदाहरणे 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप 'या माझ्या ग्रंथातून दिली असून उदाहरणांपुढे कंसात दिलेले पृष्ठक्रमांक याच ग्रंथातील आहे. काही उदाहरणे 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्य 'या ग्रंथातून दिली असून त्यापुढे 'मपग 'निर्देश केला आहे.

'अ 'विभाग

(i) वर्तमानकाळ : जमले आहेत (४६१),बजावतात (६०७) इ.

(ii) भूतकाळ : खर्चिले(४१०),गलबलले(४३१),गुजरला-गुजरली-गुजरले(४३७), गुजरला आहे(४३७),जमले(४६० आ),जमला होता/जमली होती(४६० आ),दमले/ दमिले(५१७), बजाविली/बजाविले(६०७), मुरदा (६७९), रंजले - गांजले (६९९) इ.

(iii) भविष्यकाळ : गुजरेल(४३७),जमेल(४६० आ),बाजावू(६०७)इ.

मूळ फार्सी रूपांचा उपयोग : या ठिकाणी एका महत्त्वाच्या बाबीकडे लक्ष वेधणे आवश्यक आहे,असे मला वाटते. काही फार्सी क्रियापदांची रूपे मराठीत तशीच किंवा थोड्याफार फरकाने वापरण्यात आली आहेत :

१. वर्तमानकाळ : नस्त/ नेस्त (५६२),< फा. नीस्त् , नस्त (मपग २०७)

२. भूतकाळ : नाबुद (५६२,मपग २०७)<फा नाबूद् , सूद (मपग १९५,१९७ व २११)

३. भविष्यकाळ : याची मूळ फार्सी रूपे बखरींत आढळली नाहीत, तथापि अन्यत्र पुढील रूपे आढळतात. इन्शा (अल्ला : परमेश्वर इच्छील तर), बाषद(=होईल).

आजच्या मराठीत 'जिन्दाबाद 'व'मुर्दाबाद ' ही रूपे प्रचलित आहेत.ती फार्सीतूनच आली आहेत. डॉ. पटवर्धन[illegible] यांनीही याविषयी केलेले विवेचन मला फार महत्त्वाचे वाटते. ते म्हणतात, 'क्रियापदांच्या रूपांपैकी 'गुम शुद ','गोर्तब सूद 'मध्यें शुद म्हणजे झालें व 'रवां अस्त '(राजवाडे १६/४९) मध्यें अस्त म्हणजे आहे. 'रोशन गर्दीद ' मध्ये 'गर्दीद ' म्हणजे झालें व 'गुदस्त ' म्हणजे झालें. न रवां दारन्द मध्ये दारन्द म्हणजे ठेवावे असे पांच शब्द सांपडतात. "शाबास ' हे फार्सीतून मराठीत आलेले उद्‌गारवाचक अव्यय आहे तथापि त्याचीही येथे मराठीतील फार्सी क्रियापदांच्या संदर्भातील व्युत्पत्ती लक्षात घ्यायला हवी.'शाबास ' हा शब्द फार्सी 'शाद् बाश् '(=सुखी राहा,आनंदी राहा ) या दोन शब्दांपासून आला आहे.'बाषद ' हे भविष्यकालदर्शक रूपही फार्सीचेच आहे. (ते बखरींत आढळा असल्याची नोंद मी केली आहे[illegible].) 'दाश्तन् ' या फार्सी क्रियापदाचे 'दाश्त् 'हे रूप 'याददाश्त ', 'अर्जदास्त 'या शब्दांत मध्ययुगीन मराठी वाङ्‌मयात आढळते तर 'दादन् 'या फार्सी क्रियापदाचे 'दाद ' हे भूतकाळाचे रूप 'मोजदाद ' या मराठी शब्दात आढळते. 'शिकस्त ' हेही फार्सी 'शिकस्तन् ' क्रियापदाचे भूतकाळाचे रूप आहे.

(आ)प्रयोजक रूपे :

वर्तमानकाळ : गमाविलात (४२८), जमवितात (४६१),फर्माविला आहे (मपग १८४) इ.

भूतकाळः गमावला / गमावली / गमावलें (४२८), गुजरविला (४३७), गुदरला/ ले / गुदरली (४३८), जमविली (४६१), जमविले होते (४६१), जमविल्या (४६१) बदलाविला (६०९),फर्मावले (मपग २२६ ), शिलगावले (७४३) इ.

**प्रयोग**

फार्सी प्रयोगव्यवस्थेचा मराठीतील प्रयोगव्यवस्थेवर कितपत परिणाम झाला, याविषयी विद्वानांनी जितके लक्ष द्यावयास हवे,तितके दिलेले नसल्याचे जाणवते.इति. राजवाडे, डॉ. मा.त्र्यं. पटवर्धन व मो.के. दामले यांच्याकडून अशा विवेचनाची अपेक्षा होती. 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां 'च्या आठव्या खंडाची व 'फार्शी – मराठी कोशा '

दी प्रस्तावना तसेच दामल्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा 'चे प्रयोगविषयक प्रकरण,डॉ.सुधाकर पवार यांच्या 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्य 'तील भाषिक पाहणीविषयक प्रकरण यांत यासंबंधी विचार केल्याचे मला आढळले नाही. श्री. आ.बा.जोशी व आबा चांदोरकर यांनी संपादिलेल्या 'श्रीशिवशाहीचा लेखनालंकार 'या ग्रंथात महत्त्वाची सामग्री असूनही याविषयीचा विचार केला नसल्याचे निदर्शनास आले.

फार्सी भाषेत प्रयोजक रूपात्मक व कर्मणी प्रयोगात्मक रचना आढळते. प्रयोजक रूपांविषयी यापूर्वी विवेचन केलेच आहे. अशी रचना मध्ययुगीन मराठीतील ऐतिहासिक पत्रात्मक गद्यात प्रामुख्याने आढळते.'बदानन्द 'व त्याचे मराठीतील शब्दशः भाषांतर 'जाणिजे ' या शब्दांची मराठी पत्रात्मक गद्यातील वारंवारिता मला फार सूचक व चिन्त्य वाटते. अशा प्रकारची लेखनपध्दती वा वाक्यरचना ही खास मराठमोळी नाही.

डॉ. सुधाकर पवार यांनी संपादिलेल्या शिवाजी महाराजांच्या तसेच अन्य शिवकालीन पत्रांचा अभ्यास करताना ही प्रवृत्ती जागोजाग आढळली. 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्य 'तील ही वाक्ये पाहा -

१.तुमचे बाबे हुजूर खबर मालूम जाली जे (पृ.३३)

२.ते मारीत लुटीत गर्दी केली.खटा होऊन पळूं लागले, ते विजापुरास पावविले. यानंतर सावंताचा निशाच करावा म्हणोन त्या प्रांतात शिरलों. तेहि येऊन पावले. (पृ. १९१)

३.ऐसे पंधरा रोज पालमेली करून सोळाशे लारीपैकी सारे लारी तोडविली.(पृ. १९१)

४.कौलनामा ऐसा ज.तुमचे बाबे म।। गोमाजी नायक एही. मालूम केले ज.विठोजी सिलंबकर साहेबांचे कौलाचे उमेदवार आहेती.(पृ. १९२)

५.बिनदाद (बिदानन्द) के कौलनाम वैसाजे (पृ. १९४)

६.ये बाबे कौल अस. (पृ. १९९)

७.तह म।। पन्नास हजार रुपये रास म।। काशी त्रिमळ २५००० व मातुश्री आईजी २५००० येणेप्रमाणे पाववावे. मो.सू.(पृ. १९९)

८.आजतागायेत जो काये गुन्हा तुम्हापासुनु जाहाला असेली.तो तमाम माफ केला असे (पृ.१९९)

९.या कामास आरमार वेगीने पाववावे (पृ. २०३)

१०.हें सविस्तर वर्तमान तुंम्हास कळावें म्हणोन लिहिले असे. कळले असावे. मोर्तब सुद. (पृ.२११)

'बदानन्द 'प्रमाणे 'मोर्तब सुद.'हा शब्दप्रयोगही येथे लक्षात घेण्याजोगा आहे. ऐतिहासिक पत्रांच्या व आजच्या मराठी पत्राच्या शेवटचा 'कळावे 'हा शब्दप्रयोगही या संदर्भात विचार करण्याजोगा आहे. तो फार्सी 'बदानिन्द 'चा शब्दशः अनुवाद आहे.

श्रीशिवशाहीचा लेखनालंकार' या ग्रंथात संपादिलेल्या शिवकालीन पत्रांतील पुढील रचना कर्मणी प्रयोगदृष्टया महत्त्वाची वाटते. (त्यांत शेवटी नोंदविलेले

पृष्ठांक यांच ग्रंथातील आहेत)

१) त्याची विले साहेबी करून देविली पाहिजे. सेवेसी श्रुत होय हे विनति (पृ.५९)

२)...त्याप्र।। यैव(ज) खरी (ज) ह।। वसूल घेतो.विदित जाले पाहिजे,है विनति (पृ.५९)

३) ।वि.देत जाले पाहिजे. सेवेसी श्रुत होय. वि (ज्ञापना) (पृ.६६)

४) सेवेसी श्रुत होये. कृपा कीजे हे विज्ञापना (पृ ७३)

५) सेवेसी विदित होये हे विज्ञापना (पृ. ७३)

६) सदरहु येवज सरकारात पावता करून कबज घेतल्यास तुमचे खत रद. (पृ.७७)

७) यथील कुशल जाणून स्वकीय कुशल संतोष पाववीत असिले पाहिजे (पृ. ८१)

श्री. मो.के. दामले यांनी केलेल्या कर्मणि प्रयोगविषयक विवेचनात पुराण कर्मणी व नवीन कर्मणी प्रयोगांविषयी तपशील दिला आहे. पुराण कर्मणीत 'इज ' प्रत्ययान्त रूपे आढळतात (ती यादवकालीन मराठीतही आहेत).नवीन कर्मणी प्रयोगात 'केला जातो ','धरिला जातो 'अशी रूपे आढळतात.(अशा प्रकारची रचना फारसीतही आढळते.) या दृष्टीने श्री. दामले[११]यांनी उपस्थित केलेल्या एका मुद्याकडे लक्ष वेधावेसे वाटते. ते म्हणतात, 'हा नवीन कर्मणि प्रयोग पुराण कर्मणि प्रयोगापासून निघाला आहे. संस्कृत कर्मणि प्रयोगामध्ये धातूस लागणाऱ्या 'य 'ह्या आगमापासून मराठीत 'ज ' येऊन 'करिज ', धरिज' ही कर्मणि अंगें होऊन त्यांपासून 'करिजेतो,धरिजेतो,बोलिजेतो, 'अशी प्रथमाख्याताची कर्मणि रूपें तयार होतात. या रूपांपासूनच पुढें 'केला जातो, धरिला जातो,बोलला जातो ' इ. नवीन रूपें उत्पन्न झाली आहेत ही नवीन रूपें कोणत्या काळी उत्पन्न झाली,हे भाषेतिहाससंशोधकांचे काम आहे[११]".

यादवकाळानंतर येणाऱ्या बहमनी,शिव आणि पेशवे या कालखंडांत येणारा फार्सीचा संपर्क,तिच्यात आढळणारी अशा प्रकारची कर्मणिप्रयोगात्मक रचना ही पुराण कर्मणी व नवीन कर्मणी यांतील अनुबंध जोडू शकते, असे मला वाटते.

**समारोप**

फार्सीच्या व्याकरणवैशिष्ट्यांनी मराठी भाषाही किती प्रभावित झाली,याची कल्पना वरील विवेचनावरून आलीच असेल.हा प्रभाव मराठीची प्रकृतिवैशिष्ट्ये अधिक संपन्न करणारा आहे. व्यक्तींचीच नव्हे गावांची नावेदेखील अ.तु.फा शब्दांनी सिद्ध झाली. आडनावंही व्यवसायनिदर्शक अ.फा. नामांपासून सिध्द झाली व त्यांतील अनेक नामे आजही प्रचलित आहेत.अ.फा समुदायवाचक नामांनी मराठीच्या 'नाम - क्षेत्रा 'त भर घातली. कितीतरी अ.फा. भाववाचक नामे मराठीत आली. खुद,जातीने या अ.फा.आत्मवाचक सर्वनामांचा मराठीत सर्रास प्रयोग रूढ झाला. फलाणा,फलाणाबिस्तानासारखी अनिश्चित सर्वनामे,कुल, तमाम सारखी संकीर्ण सर्वनामेही मराठीने स्वीकारली. विशेष्यानंतर विशेषण योजण्याची व इजाफतीचा प्रत्यय योजण्याची प्रवृत्ती मराठीने फार्सीपासून स्वीकारली. अनेक पूर्णांकवाचक,अपूर्णांकवाचक,संख्याक्रमदर्शक,

पृथकत्वदर्शक व अनिश्चित फार्सी संख्याविशेषणे मराठीत आली. अ.फा.नामांपासून अनेक मराठी क्रियापदे सिद्ध झाली आहेत आणि अ.फा. धातू आणि विशेषणांपासूनही काही मराठी क्रियापदे सिद्ध झाली आहेत.ती मराठीत एवढी रुळली की त्यांची प्रयोजक रूपेही मराठीने तयार केली. त्याचप्रमाणे अ.फा. शब्दांच्या साहाय्याने मराठीत काही संयुक्त क्रियापदेदेखील तयार झाली. 'मोर्तब सुद 'सारखी अ.फा.संयुक्त क्रियापदे तर मध्ययुगीन मराठीतही रूढ होती.

अव्ययांच्या प्रांतातही अ.फा.चा वावर मोठ्या प्रमाणावर मध्ययुगीन मराठीप्रमाणेच आधुनिक मराठीतही आहे. पूर्वगामी,पुरोगामी,द्विरुक्तियुक्त आणि संयुक्त शब्दयोगी अशी विविध प्रकारची सुमारे ७० - ७५ शब्दयोगी अव्यये मराठीत आहेत, त्यांपैकी पूर्वगामी शब्दयोगी अव्यये सुमारे ३०-३१ आहेत. पूर्वगामी शब्दयोगी अव्यये मूळ मराठीत नसताना हा प्रकार मध्ययुगीन मराठीने अगदी सहजपणे फार्सीपासून आत्मसात् केला. अनेक समुच्चयबोधक,विकल्पबोधक,स्वरूपदर्शक,न्यूनत्वबोधक,परिणामबोधक,अ.फा. उभयान्वयी अव्ययांचा समावेश मराठीत झाला आहे.हर्षद्योतक शोकद्योतक,प्रशंसादर्शक, तिरस्कारदर्शक,संबोधनद्योतक,प्रतिबंधद्योतक अशी अनेक अ.फा.उद्‌गारवाचक अव्ययेही मराठीत सामावली.स्थल-काल-पौनःपुन्य-परिमाण-प्रकर्ष-आधिक्य-पर्याप्ति-श्रेणि-रीतिवाचक असंख्य अ.फा.क्रियाविशेषणे मराठीत आली.मराठीने बव्हंशी आपली लिंगव्यवस्था स्वीकारलेल्या अ.फा. शब्दांनाही लागू केली. वचनव्यवस्थेच्याबाबतीत असे म्हणता येत असले तरी अ.फा.ची किती तरी अनेकवचनी रूपेही मराठीत आली आहेत. अनेकदा याची कल्पना नसल्याने या अनेकवचनी रूपांचा वापर मराठीने एकवचनासारखा केला आहे ! अरबी अनेकवचन- प्रक्रिया फार्सीच्या माध्यमातून मराठीतही शिरली आहे. घ

द्वितीया / चतुर्थीचा 'ला ' प्रत्यय फार्सी ' रा 'प्रत्ययापासून आला असून वऱ्हाडी - अहिराणी बोलीत त्याने 'ले ' हे रूप धारण केले आहे. षष्ठीचा इजाफतीचा प्रत्यय हे फार्सीचे खास वैशिष्ट्य मराठीने मध्ययुगापासून स्वीकारले. फार्सीप्रमाणे त्याचा व अन्य विभक्तिप्रत्ययांचा लोप करण्याची प्रवृत्तीही काही प्रमाणात म.म.त आढळते.शब्दयोगी-साधित विभक्तीची मराठीची प्रवृत्ती तिने स्वीकारलेल्या अ.फा.शब्दांमध्येही आढळते.

फार्सीत सामान्यरूप नाही ते मराठीने स्वीकारलेल्या अ.फा. शब्दांना लिंग - वचन- व्यवस्थेप्रमाणे लागू केले आहे. भाषिक आदानप्रदानाचे हे मोठे नमुनेदार उदाहरण आहे.अ.फा. शब्दांपासून सिद्ध झालेल्या क्रियापदांची विविध काळांची रूपे मराठीने आपल्या प्रकृतीनुरूप साधली असून फार्सीची 'नेस्तनाबूद ' सारखी काही रूपे तशीच ठेवली आहेत. फार्सी कर्मणी प्रयोगात्मक रचनेचा प्रभाव म.म.तील पत्रात्मक गद्यावर दिसतो.

या सर्व बाबींवरून मराठीच्या रूपसिध्दीत फार्सीचे योगदान किती महत्त्वाचे आहे, याची सहज कल्पना येईल.

--------------

संदर्भ- टीपा

१) ऐप्र. पृ . ४०९-१०

२) कित्ता. पृ. ४१०

३) मबफास्व. पृ. २६८-९

४) कित्ता. पृ. २६९

५) कित्ता. पृ. २६९

६) कित्ता. पृ. २६९

७) कित्ता. पृ. २५०

८) PED,p.181, burhan: a convincing proof,barhan: joy, gladness

९) संशोधकाचा मित्र,भाग १, प्रा.ग.ह.खरे, भा.इ.सं.मंडळ प्रकाशन,१९५१,पृ.९१

१०) कित्ता. पृ. १०२-३

११) कित्ता .पृ. १०४

१२) ऐप्र.पृ. ४१०

१३) मुसलमानपूर्व महाराष्ट्रः खंड २,(मराठे व ब्राह्मण यांची उपनावे),पृ. २४३-४,२५३

१४)मबफास्व. पृ. २४१ ते २४३

१५) कित्ता. पृ. १२२

१६) फामको. प्रपृ.१५

१७) कित्ता.

१८) कित्ता

१९) मबफास्व,पृ. १२४-५

२०) PED: p.482 स्टेनगॅसने त्याचा अर्थ 'self 'असा दिला आहे.

२१) फामको,प्रपृं १५. ठळक टाइप माझा

२२) शामव्या.पृ.१००

२३) PED,p.556

२४) माबफास्व.पृ.१२४

२५) फामको पृ. ७६

२६) शामव्या. पृ.१००

२७) मबफास्व पृ. १२४-५

२८) PED,p. 156

२९) फामको. प्रपृ. १५

३०) मबफास्व . पृ . १२५

३१) फामको प्र पृ. १५

३२) कित्ता प्र पृ. १५

३३) फामको पृ. १६६

३४) मबफास्व पृ. १२५
३५) श्रीशिवाजीप्रताप,पृ. ७४
३६) होळकरांची कैफियत.सं.य.न.होळकर.पृ.९७
३७) मबफास्व, पृ. १२६
३८) PED.p.403
३९) ऐप्र.पृ. ४०५
४०) मबफास्व,पृ.१२३-४
४१) ज्ञानेश्वरी,राजवाडे प्रत, १८ - ६९०
४२) मबफास्व . पृ . १९४-७
४३) कित्ता. पृ . १२९
४४) कित्ता
४५) कित्ता
४६) कित्ता. पृ.१२७
४७) मपग. पृ. १८८
४८) मबफास्व. पृ. १२८
४९) कित्ता
५०) कित्ता पृ . १२९
५१) फामको.प्र.पृ.१२
५२) मबफास्व.पृ. १२९
५३) शामव्या. पृ .१२५
५४) मबफास्व पृ .१३०
५५) कित्ता पृ. १३०
५६) फामको पृ ११५-११७
५७) मबफास्व. पृ.४५५
५८) कित्ता पृ. १३०
५९) कित्ता. पृ. ७९९
६०) कित्ता. पृ. १३१
६१) कित्ता.
६२) शामव्या.पृ.१२९
६३) ऐप्र.पृ. ३८८
६४) फामको प्र.पृ १२
६५) कित्ता. पृ. ११६
६६) शामव्या.पृ.१३३
६७) कित्ता. पृ. १३४

६८) फामको प्र.पृ १६
६९)PED. p.1076,to cause,to pass,to live,to get along
७०) PED.p.383,to overrun,to invade
७१) PED.p.332, to be able
७२) PED.p. 757
७३) मबफास्व.पृ.१३५
७४) फामको,प्र.पृ १६
७५) शामव्या.पृ.५६९
७६) फामको,प्र.पृ १६
७७) कित्ता.
७८) अभिनव मराठी-मराठी शब्दकोश,भाग ५,पृ.६९,१०५
७९) मपग. पृ. १७७-२२८
८०) मबफास्व पृ. १४२ आणि फामको,प्र.पृ १७
८१) ऐप्र.पृ. ४०२
८२) फामको,पृ २८
८३) कित्ता प्र पृ. १८
८४) ऐप्र.पृ. ४०३
८५) कित्ता पृ. ४०४
८६) कित्ता पृ. ४०२
८७) फामको,पृ ११७
८८) ऐप्र.पृ. ४०२
८९) मबफास्व पृ. १४३
९०) ऐप्र.पृ. ४०२
९१) फामको,प्र. पृ १८
९२) मबफास्व, पृ. ५६१
९३) फामको,प्र. पृ १८
९४)मबफास्व,पृ.१४३
९५) ऐप्र.पृ. ४०२
९६) मबफास्व,पृ.१४३
९७) ऐप्र.पृ. ४०२
९८) फामको,प्र. पृ १९
९९) PED.p.193
१००) फामको,प्र. पृ १९ ; म.इ.साधने (प्रथमावृत्ती)१५/१५८
१०१) मबफास्व,पृ.१४३

१०२) मबफारख,पृ.१४३
१०३) ऐप्र.पृ. ४०२
१०४) फामको.प्र.पृ.१९
१०५) ऐप्र.पृ. ४०२
१०६) फामको.प्र.पृ.१९
१०७) मबफारख.पृ. १४३,एगा पृ.७९७
१०८) ऐप्र.पृ.४०२
१०९) फामको.प्र.पृ.१९
११०) मबफारख.पृ.१४४
१११) फामको.प्र.पृ.२०,म.इ.सा.(अनुक्रमे)१/१८४ आणि १०/१६४
११२) ऐप्र.पृ. ४०२
११३) कित्ता
११४) फामको प्र.पृ. २०
११५) मबफारख. पृ.१४४
११६) कित्ता पृ . ६६४
११७) कित्ता पृ . १४४
११८) कित्ता
११९) कित्ता पृ .७१५
१२०) ऐप्र. पृ . ४०२
१२१) मबफारख. पृ. १४४
१२२) ऐप्र. पृ . ४०२
१२३) फामको. प्र.पृ. २०
१२४) कित्ता
१२५) ऐप्र.पृ. ४०२
१२६) मबफारख प्र.पृ. १४४
१२७) फामको प्र.पृ. २०
१२८) ऐप्र. पृ. ४०२
१२९) कित्ता पृ. ४०२ आणि फामको प्र.पृ. २०
१३०) मबफारख. पृ. २०
१३१) ऐप्र.पृ. ४०२ आणि फामको प्रपृ.१८
१३२) मबफारख. पृ. १४४
१३३) कित्ता पृ. १४४ व ५०३
१३४) कित्ता पृ. १४४
१३५) मशरस. पृ. ६५

१३६) ऐप्र. पृ. ४०२
१३७) कित्ता
१३८) फामको. प्रपृ. २०
१३९) मबफास्व पृ. १४५
१४०) ऐप्र.पृ. ४०२
१४१) मबफास्व पृ. १४५
१४२) कित्ता पृ. १४५
१४३) ऐप्र. पृ. ४०२
१४४) कित्ता पृ. ४०२ व फामको प्र.पृ. २०
१४५) मबफास्व पृ.१४५
१४६) ऐप्र.पृ. ४०२ आणि फामको प्र.पृ. २०
१४७) मबफास्व. पृ. १४४
१४८) कित्ता पृ. १४५
१४९) ऐप्र.पृ. ४०२
१५०) ऐप्र.पृ.४०२ आणि मबफास्व.पृ.१४५
१५१) फामको. प्र.पृ. २०
१५२) ऐप्र.पृ. ४०२
१५३) फामको प्र.पृ. २०
१५४) मबफास्व.पृ. १४५
१५५) ऐप्र. पृ. ४०२
१५६) फामको प्र.पृ. २०
१५७) कित्ता
१५८) मबफास्व. पृ. १४५
१५९) फामको प्रपृ. २०
१६०) ऐप्र.पृ. ४०२
१६१) ऐप्र. पृ. ४०२ आणि फामको प्र.पृ. २०
१६२) मबफास्व.पृ. १४५
१६३) कित्ता पृ. १४५
१६४) ऐप्र.पृ.४०२.
१६५) फामको. प्रपृ. २०
१६६) ऐप्र.पृ.४०२,मबफास्व पृ.१४५
१६७) फामको प्र.पृ. २०
१६८) ऐप्र.पृ.४०२ आणि फामको प्रपृ. २०
१६९) मबफास्व पृ. १४५

१७०) ऐप्र.पृ. ४०२
१७१) फामको प्रपृ. २०
१७२) 'गिर्द ' हे फा.स्त्रीलिंगी नाम आहे (पाहा - फामको पृ. ५६)
१७३) ऐप्र.४०२आणि फामको प्र.पृ.२०
१७४) मबफास्व पृ. १४५
१७५) फामको प्र.पृ. १९ आणि म.इ.सा. ५. पृ.१३०
१७६) ऐप्र.पृ. ४०२ आणि फामको प्र.पृ. २०
१७७) मबफास्व पृ. १४५
१७८) फामको. प्र.पृ.१७
१७९) कित्ता
१८०) कित्ता . (ठळक टाइप माझा. )
१८१) फामको प्र.पृ. १७
१८२) म.इ.सा.खंड १ (प्रथमावृत्ती )वि.का.राजवाडे पृ. २४८
१८३) फामको प्र.पृ. १८
१८४) मबफास्व प्र.पृ. १४२
१८५) फामको प्र.पृ. १८
१८६) म.इ.सा.,प्रथमावृत्ती,खंड १०,पृ.१६४
१८७) फामको. पृ.२६
१८८) म.इ.सा. ,खंड १०, (प्रथमावृत्ती) वि.का.राजवाडे, पृ.१५६
१८९)म.इ.सा.,खंड १०,प्रथमावृत्ती, वि.का.राजवाडे, पृ.१५३
१९०) मबफास्व. पृ. १४२ ते १४६
१९१) मबफास्व.पृ.५०२
१९२) ऐप्र.पृ. ४०२
१९३) फामको प्र.पृ. १८
१९३) फामको प्र.पृ. १८
१९४) मबफास्व पृ. १४४
१९५) कित्ता पृ. १४४-५-६
१९६) फामको पृ. १८
१९७) मबफास्व पृ.१४३
१९८) ऐ प्र. पृ. ४०२
१९९) मबफास्व पृ. १४३
२००) फामको प्र.पृ. १९
२०१) मबफास्व प्र.पृ. १४५
२०२) फामको प्र.पृ. १९

२०३) मबफास्व.पृ. १४३
२०४) ऐप्र.पृ. ४०२
२०५) फामको.प्र.पृ.१९
२०६) PED.p.705
२०७) ऐप्र.पृ. २०
२०८) फामको, प्र.पृ. २० आणि फामको पृ.२४८
२०९) मबफास्व. पृ. ७७२
२१०) ऐ.प्र.पृ. ४०५
२११) कित्ता पृ. ४०२
२१२) मबफास्व.पृ.१५२
२१३) श्रीज्ञानेश्वरी,राजवाडे प्रत, पृ. २९०
२१४) फामको प्र.पृ. १७
२१५) मधग पृ. १७७-८,१८७
२१६) मबफास्व.पृ. १५२,१५८
२१७) मराठी शब्दसंग्रहमीमांसा, पृ.१८७
२१८) मबफास्व पृ.१५३
२१९) मसाछोब,सं.मोडक,पृ ५९
२२०) मपग पृ. २२१
२२१) मबफास्व.पृ.१५३
२२२) कित्ता पृ. १५३-४-५
२२३) कित्ता पृ. १५५
२२४) मपग पृ. २०६,२१९,२२७
२२५) व्युकों.पृ.१६९
२२६) मबफास्व.पृ.१५५-६
२२७) कित्ता पृ.१५६
२२८) ऐप्र.पृ. ४०२
२२९) फामको प्र.पृ. १७
२३०) ऐप्र.पृ.४०२,शामव्या.पृ २०८, मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे,पृ. २२६
२३१) मशस.पृ. ६७
२३२) फामको प्र.पृ. १६१
२३३) मबफास्व.पृ.१५७
२३४) फामको.पृ. ६
२३५) ऐप्र.पृ. ४०२
२३६) फामको. प्र.पृ. १७

२३७) मपग.पृ.९४
२३८) मशस.पृ.६९
२३९) शामव्या. पृ.२०८
२४०) मावफास्व.१५७-८
२४१) मपग.पृ. ९४
२४२) मशस.पृ. ७०
२४३) शामव्या पृ. २०८
२४४) मवफास्व. पृ.१४७-१५२
२४५) किस्ता पृ. १४७-८
२४६) PED p.1487
२४७) व्युको. पृ.७६८
२४८) मराठी शब्दसंग्रह-मीमांसा, पृ. १८७
२४९) मबफास्व.पृ.१४८-१५२
२५०) मपग.पृ. ९४
२५१) शामव्या.पृ. २१८-१९
२५२) ऐप्र.पृ. ४०१ व फामको प्र.पृ. १७
२५३) शामव्या पृ.२१८ ते २२०
२५४) Higher Persian Grammar,p.370
२५५) शामव्या.पृ. २१७
२५६) ऐप्र.पृ. ४०२
२५७) ठळक टाइप माझा.
२५८) फामको.पृ.१६
२५९) मबफास्व पृ. १५८-१६२
२६०) PED.p. 545
२६१) फामको. पृ. ११६
२६२) मबफास्व पृ. १५८-९
२६३) फामको पृ.९१
२६४) शामव्या. पृ. १७०-१
२६५) मबफास्व पृ. १५९-६०
२६६) किस्ता पृ. १६१
२६७) ऐप्र. पृ. ४०२
२६८) फामको. प्र.पृ. १६-७
२६९) मराठी शब्दसंग्रह-मीमांसा पृ. १७८
२७०) शामव्या.पृ. १७१

२७१) मबफास्व.पृ. १६१
२७२) कित्ता
२७३) शामव्या.पृ. १७१
२४) फामको प्र.पृ. २१
२७५) फामको पृ. २००
२७६) शामव्या. पृ. २३३,२३४,२३६,२३९
२७७) ऐप्र.पृ. ४१४
२७८) शामव्या. पृ. ४७०
२७९) मबफास्व पृ. ९९- १२१
२८०) ऐप्र. पृ. ४१४
२८१) मबफास्व. पृ. १००
२८२) PED.p.437
२८३) कित्ता पृ. २२३-४
२८४) कित्ता पृ. ७७८
२८५) मबफास्व . पृ. १००-१
२८६) कित्ता पृ. १०१
२८७) मपग. पृ. १७७ ते २२८
२८८) मबफास्व पृ. १०२ ते १०४
२८९) कित्ता पृ. १०३
२९०) मपग पृ. २२२
२९१) कित्ता पृ. २२०
२९२) कित्ता पृ. २२० ते २२४
२९३) कित्ता पृ. २२१(पत्र क्र.७१८)
२९४) कित्ता पृ. २२४
२९५) फामको. प्र.पृ. १२
२९६) पाहा - मपग पृ. २२१ (इ.स. १६४६ चे शिवकालीन पत्र)
२९७) फामको.प्र.पृ.१३
२९८) कित्ता
२९९) मबफास्व पृ. १०२ ते १०४
३००) फामको.प्र.पृ. १३
३०१) मबफास्व पृ. १०२ - ४ (पृ. १०३ वरील काब्बजात)
३०२) PED. p. 1206
३०३) मबफास्व,पृ. १०४
३०४) फामको. प्र.पृ १४

३०५) मपग पृ. ९९
३०६) कित्ता पृ. ९३-४
३०७) ऐप्र. पृ. ४०५
३०८) ठळक टाइप माझा.
३०९) फामको प्र.पृ. १४-५
३१०) कित्ता पृ. १४
३११) ऐप्र.पृ. ४०५-७
३१२) मपग,परिशिष्ट पाहा.
३१३) फामको प्र.पृ.१४
३१४) कित्ता
३१५) मबफास्व.पृ. १२९
३१६) मपग.पृ. ९४
३१७) एगा.पृ. ७९७-८०३
३१८) मबफास्व.पृ. १२९
३१९) फामको.प्र.पृ. १४-५
३२०) मपग.पृ. ९३
३२१) फामको.प्र.पृ. १५
३२२) कित्ता
३२३) मबफास्व. पृ. १२१
३२४) कित्ता पृ. ११८-१२२
३२५) कित्ता पृ. १२१-२२
३२६) कित्ता पृ. १२२
३२७) फामको प्र.पृ. १६
३२८) मबफास्व. पृ. १३४
३२९) शामच्या.पृ. ६१९-२०
३३०) ठळक टाइप माझा.

------------------

# प्रकरण चौथे
# साधित शब्द
# (शब्दसिद्धी)

प्रख्यात व्याकरणकार श्री.मो.के. दामले साधित शब्दांचे पुढील चार भेद / प्रकार मानतात' :१. उपसर्गघटित २. प्रत्ययघटित ३. समासघटित आणि ४. अभ्यस्त. याविषयी श्री.मो.के दामले यांनी जी विधाने केली आहेत,त्यांची सत्यासत्यता पारखायला हवी. यासाठी मूळ विधाने उद्धृत करीत आहे - 'या प्रत्येक भेदामध्ये संस्कृत,फारसी, अरबी व इंग्रजी या भाषांचा संबंध येण्याचा संभव आहे. तथापि उपसर्गघटित शब्दांमध्ये निवळ मराठीपेक्षांही संस्कृतचाच भरणा फार आहे. फारसी व अरबी यांचा कमी आणि इंग्रजीचाच मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. प्रत्ययघटित शब्दांमध्ये मात्र ह्या सर्व भाषांचा बराच संबंध पोंचतो. प्रत्ययघटित शब्दांचे कृदन्तें आणि तद्धितें असे पोटभेद करितात... तेव्हां या दोन पोटभेदांमध्ये या निरनिराळ्या भाषांतून आलेल्या शब्दांचा निरनिराळा उल्लेख करणें बरें. म्हणून प्रत्ययघटित शब्दांत संस्कृत कृदन्तें व तद्धितें अलग अलग सांगण्यांत येतील परंतु फारसी ,अरबी व इंग्रजी या भाषांतील प्रत्ययघटित जे शब्द मराठींत आले आहेत, त्यांच्यासंबंधानें असा फरक न करितां त्यांचा एकाच 'प्रत्ययघटित ' ह्या सदराखालीं उल्लेख करण्यांत येईल. कारण उघडच आहे की,**त्या भाषांतील शब्दांस मराठीमध्यें शब्दसाधनिकेचे दृष्टीनें फारसें महत्व नाही. आणि तसा फरक करण्यास अवश्य लागणारा त्या सर्व भाषांचा परिचयही प्रस्तुत लेखकास नाही.*** म्हणून त्यांचा सरसकट एकाच वर्गांत अंतर्भाव केला जाईल. **समासघटित शब्दांमध्ये ह्या या यावनी शब्दांचा फारसा संबंध नाही *** तर केवळ संस्कृत व मराठी ह्यांशीच आपली गाठ आहे आणि त्यातही विशेषेंकरून संस्कृत शब्दांशीच आपलें विशेष कर्तव्य आहे. कारण निवळ मराठी शब्दांचे समास संस्कृतांचे मानानें कमी आढळतात. साधित शब्दांचा अभ्यस्त शब्द म्हणून जो चवथा प्रकार त्याशीं संस्कृताचाही बहुतेक संबंध नाहींच. 'यांतील प्रत्येक प्रकाराच्या शब्दांचा सूक्ष्म अभ्यास केल्यानंतर असे जाणवते की या शब्दांच्या जडणघडणीत अरबी - फार्सीचे योगदान नगण्य तर नाहीच पण अत्यंत लक्षणीय असे आहे. श्री. दामले यांनी स्वतःच म्हटल्याप्रमाणे या भाषांचा त्यांचा परिचय नसल्याने त्यांनी या संदर्भात तशी विधाने केली असावीत. क्रमाने या प्रकारांचा विचार आहे व त्यानंतर फार्सीद्वारा मराठीत आलेल्या अरबी कृदन्तांचे विवरण केले असून मराठीतील अरबी - फार्सी समानार्थी व विरुध्दार्थी शब्दांचाही विचार केला आहे.

1 उपसर्गघटित साधित शब्द

अरबी - फार्सी उपसर्ग लागून मराठीत आलेल्या शब्दांचे प्रमाण मोठे आहे. काही अरबी उपसर्ग फार्सीच्या माध्यमातूनच म.म.त. आणि व.म.त. आल्याने तो फार्सीचाच प्रभाव असल्याचे मी मानले आहे व असे मानणे सयुक्तिक आहे, असे मला वाटते. राजवटी आल्या आणि गेल्या पण हा प्रभाव तसाच कायम राहिला.फार्सी मराठीशी किती एकरूप झाली,याची प्रचीती येथे येते. हे उपसर्ग पुढीलप्रमाणे आहेतः

(१) ऐन (अ.ऐन् = Flowing (water) inclining to one side[२] )

डॉ. पटवर्धन [३]यांनी या उपसर्गाची म.म. तील ऐनखर्च,ऐनजमा,ऐन-ज्वानी,ऐनहंगाम ही उदाहरणे दिली आहेत. 'भर ' या अर्थी तो योजिला जातो. डॉ. पवार[४] तो शिवशाहीतील पत्रात्मक गद्यात आढळत असल्याचा उल्लेख करतात व त्याचे ऐनजिन्नस हे उदाहरण देतात. बखरींत [५]. त्याची ऐनगल्ला,ऐनजिन्नस ही उदाहरणे आढळतात.श्री. दामले [६] यांनी ऐनदौलत,ऐनजबानी,ऐनआमदनी,ऐनहंगाम,ऐनजमा, ऐनखर्च,ऐनजिन्नस,ऐनजमाबंदी,ऐनदस्त,ऐनवसूल,ऐनगल्ला,ऐनकिंमत,ऐनसौदा,ऐनमोकासा इ. विपुल उदाहरणे दिली आहेत. तो मराठी शब्दांनाही लागतो, यावरून तो मराठी भाषकांत किती रुळला असेल याची कल्पना येते. ही उदाहरणेदेखील दामले यांनीच दिली आहेतःऐनउन्हाळा,ऐनहिवाळा,ऐनघाई,ऐनरंग इ. (यात दामले गफलतीने ऐनकर्ज हे उदाहरणही देऊन जातात ! वस्तुतः कर्ज हा अरबी शब्द असून तो फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला आहे.)

(२) कम (फा.कम्)

याचा अर्थ कमी असा आहे. डॉ.पटवर्धनांनी[७] त्याची म.म.तील कम्सल,कम्कुवत,कम्जात, कम्जोर,कम्तोल,कम्बख्त,कम्नशीब ही उदाहरणे दिली आहेत. डॉ. पवार[८] यांनी कमकुवत,कमजोर,कमनिखें ही उदाहरणे दिली आहेत. मला बखरींत[९] कमकुवत, कमजोर हे शब्द आढळले. मो.के. दामले[१०] त्याची कमजोर कमकूवत,कमबख्त, कमनजर,कमतोल,कमदस्त ही उदाहरणे देतात.

(३) गैर (अ. ग़ैर् = विना,चुकीचा,वाईट)

यातून अभावही सूचित होतो.डॉ. पटवर्धनांना[११] म.म.त हा उपसर्ग वैपुल्याने आढळला - गैरअमली,गैरकलजी,गैरकौली,गैरचाकर,गैरजप्त,गैरबर्दार,गैरमंजूर,गैरमाहीत,गैरमाकूल,गैरमोसमी, गैरवाजवी,गैरसनदी,गैरहंगामी,गैरहजर,गैरहिशेबी,गैरहुशार. मराठेशाहीतील पत्रांत[१२] गैरमाकूल,गैरमेहेबानी गैरमिरासी,गैररुजू हे शब्द आढळतात. गैरआदब,गैरआराम, गैरइतबार,गैरइमान,गैरमर्जी,गैरमाहीत,गैररस्ता,गैरराबता,गैरराह,गैरवाजवी हे अ.फा. शब्दांनी युक्त असलेले शब्द जसे बखरींत[१३] आढळतात त्याचप्रमाणे गैर हा उपसर्ग मराठी शब्दांनाही लागल्याचे दिसते. उदा.गैरगोष्ट,गैरचाल,गैरपध्दत,गैरभाषण,

गैरबात,गैरमान्य,गैररीत,गैरवळण,गैरसावध,आजच्या मराठीतही गैरसमज,गैरवाजवी, गैरशिस्त, गैरहजर हे शब्द सर्रास वापरले जातात. मो.के.दामले[४] यांनी ही यांतील अनेक उदाहरणे दिली आहेत. 'गैर ' चे अरबी मूळ 'घैर' आहे,असे दामले यांनी म्हटले आहे ते बरोबर नाही. अरबी कण्ठ्य 'गैन् ' पासून तो आला आहे,त्याला प्रा.ग.ह.खरे यांनी 'मध्यमप्राण' ही संज्ञा योजिली आहे, ती मी स्वीकारली आहे.

(४) दर

याविषयी थोडा खुलासा करणे आवश्यक आहे . 'दर ' हे फार्सी शब्दयोगी अव्यय असून त्याचा अर्थ 'आत ' असा आहे. तथापि त्याचा 'प्रत्येक' या अर्थी म.म.त. आणि व.म.त.वापर झाला असल्याने त्याचे मूळ फा. 'हर् ' हे असावे,हे मी बखरींविषयी केलेल्या संशोधनात प्रतिपादिले आहे[५]व त्याची दरकूच,दरमहा,दररोज,दरसदे,दरसाल ही फार्सी शब्दांची व दरघर,दरवर्षी,दरसेकडा ही फार्सी - मराठी संमिश्र शब्दांची उदाहरणे दिली आहेत. 'द्' चे रूपान्तर 'ह् 'मध्ये होत नाही तथापि 'दर् ' आणि 'हर् ' यांच्यामध्येही अदलाबदल, कोणत्या का कारणाने होईना,झाली आहे खरी.(मोडी 'द 'आणि 'ह ' या वर्णांच्या रूपांत साम्य आहे.) मौज अशी की ही प्रक्रिया केवळ बखरींतच नव्हे तर संपूर्ण म.म. आणि व.म. यांत सर्रास घडली आहे.मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात दरसाल,दरसवाद,दरकारकीर्दी,दरमाहे,दरोज,दरमजल ही उदाहरणे आढळतात[५](डॉ. पवार यांनी येथे दिलेली दरगाह,दराज ही उदाहरणे मात्र वरील संदर्भात योग्य नाहीत.) मो.के.दामले[७]यांनी याची दररोज,दरमहा,दरकुच,दरसाल, दरमुक्काम ही फार्सी शब्दयुक्त आणि दरदिवस,दररात्र,दरगाव,दरझाड,दरमाणशी, दरदिवशी इ. फार्सी - मराठी संमिश्र शब्दांची उदाहरणे दिली आहेत. मी वर केलल्या विवेचनास दामले यांचे विवेचन पुष्टिकारकच ठरते.ते म्हणतात- (दर )' हे जरी फारसींत शब्दयोगी अव्यय आहे तरी मराठीत त्याचा प्रत्येक या अर्थी विशेषणासारखा उपयोग होऊ लागल्यामुळे दरमाणशीं,दरदिवशीं,दरमणीं,दररुपयास,दरशेरास असे प्रयोग आढळतात तथापि 'दर ' आणि 'हर ' यांच्यामधील (मराठीतील) अदलाबदलीचा विचार त्यांच्या मनात आला नसावा,असे वाटते.

(५) ना (फा.ना )

मो.के.दामले[८]यांनी 'फारसी व अरबी उपसर्ग'या शीर्षकाखाली याचा समावेश करूनही त्याची व्युत्पत्ती संस्कृत 'न' पासून दिल्याचे पाहून आश्चर्य वाटते. फार्सीमध्ये 'ना 'हा अकरणदर्शक उपसर्ग असून फार्सी शब्दांमध्ये तो मूळातलाच आहे.दामले यांनी दिलेली सर्वच उदाहरणे अशा प्रकारची आहेत - नाउमेद,नापसंत,नाहक/नाहक्क,नादार,नाखूष, नादान,नालायक,नामर्द,नाइलाज,नाकबूल,नाराज,नादुरुस्त,नाशाबूद,नाशाबीत इ. डॉ. पटवर्धन[९] या उपसर्गाची म.म. तील पुढील उदाहरणे देतात -

नाइत्यफाक,नाइलाज,नाउमेद,नाकुवत,नातवानगी,नादीलत्खाई,नामर्दुमी,नामाफकत,
नामेहेर्बानी,नारजावंती मला बखरींत[illegible] या उपसर्गाची पुढील उदाहरणे आढळली -
नाइतेफाक,नाकबूल,नाकाबील,नाकार,नाखूष,नापसंत,नापाक,नाबूद,नामर्द,नामुराद,नामोश्की,
नामोहरम,नाहक. डॉ. पवार[illegible] यांनी मराठेशाहीच्या पत्ररूप गद्यातील नाकीर्दी,नादानगी,
नामेहेरबानी ही उदाहरणे दिली आहेत. डॉ. मु.श्री.कानडे[illegible] यांना शिवाजीमहाराजांच्या
पत्रांत नाकीर्द,नादान,नामूस,नामोहरम हे शब्द आढळले तर रामदासांच्या लेखनात
नाचार,नाल्याख हे शब्द आढळले. आजच्या मराठीतही फार्सी ना-उपसर्गयुक्त
नाइलाज,नाउमेद,नाखुषी,नामुश्की,नामोहरम,नाराज-जी,नाहक हे शब्द सातत्याने
वापरले जातात.

(६) ब (फा.ब् )

याचा मूळ अर्थ प्रमाणे,बरोबर असा आहे. डॉ.पटवर्धन[illegible] याची म.म. तील बअबू,
बजमियत ही उदाहरणे दिली आहेत. डॉ.कानडे[illegible] यांना शिवाजीमहाराजांच्या पत्रांत
बइनाम,बजानीब,बदस्तूर,बमुताबीक,बमोजिब हे शब्द आढळले. मला बखरींत[illegible] बजिन्नस,
बरोज,बजोर,बशर्त इ. शब्द आढळले.

(७) बर (फा.बर् )

हा फार्सी उपसर्ग म.म. प्रमाणेच व.म. तही आढळतो. बर्जोर,बर्तर्फ,बर्पा,बर्बाद ही त्याची
उदाहरणे डॉ.पटवर्धन[illegible] यांनी दिली आहेत. शिवकालीन पत्रांत तो डॉ.कानडे[illegible] व
डॉ.पवार यांना बरतरफ,बरहक्क,बरहुकूम या शब्दांत आढळला. मो.के.दामले[illegible] यांनी
वरील उदाहरणे देऊन आधुनिक मराठीतील बडतर्फ शब्दाचे फा.'बर्तर्फ' याच्याशी
असलेले साम्य दाखवून दिले आहे.मी बखरींत[illegible] बरकरार,बर्तर्फी,बरखस्त,बरदास्त,
बरदास्ती,बरबाद,बरहक,बरहुकूम ही उदाहरणे दिली आहेत.आजच्या मराठीत बडतर्फ,
बडदास्त,बरबाद,बरहुकूम हे नेहमीच्या वापरातील शब्द आहेत.

(८) बा (फा.बा)

फार्सीत 'बा 'या उपसर्गाचा अर्थ सह,बरोबर असा आहे. डॉ.पटवर्धन[illegible] यांनी त्याची म.म.
तील बा-जमियत,बा-वक्त,बा-वकूफ ही उदाहरणे दिली आहेत.तथापि याची शिवाजी
महाराजांच्या पत्रांतील वा मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यातील उदाहरणे डॉ.कानडे[illegible] व
डॉ.पवार देत नाहीत.बखरींतही मला त्याची उदाहरणे आढळली नाहीत[illegible]. यावरून तो
म.म.त फारसा प्रचलित नसावा, असे वाटते. तो व.म.त प्रचलित नसल्याने दामले[illegible]
यांनी त्याचा उल्लेखही केलेला नाही.

(९) बिला,बेला (अ.बिला)
या उपसर्गाचा अर्थ नकारात्मक आहे. बहुधा 'शिवाय ' या अर्थी तो मराठीत वापरला जातो. त्याची उदाहरणे म.म. प्रमाणेच आणि व.म.तही आढळतात. शिवाजीमहाराजांच्या पत्रांतील 'बिलाकसूर' हे उदाहरण डॉ.कानडे[३३] व डॉ.पवार या दोन्ही संशोधकांनी निर्देशिले आहे. मला बखरींत[३४] 'बेलाशक ' हा शब्द आढळला तो आजच्या मराठीतही वापरला जातो. दामले[३५] वरील उदाहरणाबरोबरच 'बेलाग ' हे उदाहरण देतात पण ते चुकीचे आहे . त्यातील फार्सी उपसर्ग 'बे 'हा आहे. 'बेलाग 'हा शब्द स्टेनगॅस[३६] देत नाही. त्याने दिलेल्या बेलाक शब्दाचा अर्थ बाग,फूल व भेट असा होतो पण त्यामुळे मराठीतील 'बेलाग ' च्या अर्थाचा उलगडा व्हायला मदत होत नाही. 'लाग ' या मराठी शब्दाला हा फार्सी उपसर्ग लागला असावा[३७] एवढेच फार तर म्हणता येईल. पण बिला/बेला उपसर्गाशी त्याचा सुतराम संबंध नाही. तो आहे असे मानल्यास 'बेलाग ' शब्दातील केवळ 'ग ' हा अर्थहीन वर्ण उरेल !

(१०) बे (फा.बे)
हा फार्सी उपसर्ग मात्र म.म. प्रमाणेच व.म.तही मोठ्या प्रमाणात वापरला गेल्याचे दिसते. त्यातून नकार सूचित होतो. डॉ.पटवर्धनांनी[३८] त्याची म.म. तील बेइतल्ला, बेइमान,बेकायदा,बेकरार,बेकसूर,बेकैद,बेखबर,बेगुमान,बे-जा,बेजाब,बेतक्शीर,बेताब, बेतालूक,बेदखल,बेदम,बेदर्द,बेदाणा,बेनिहायत,बेपर्वा,बेपाया,बेफाम,बेफिकीर,बेबंद,बेबाक, बेमालूम,बेमब्लग इ. असंख्य उदाहरणे दिली आहेत. मो.के. दामले[३९] यांची या संदर्भातील यादीही अशीच मोठी आहे . त्यांपैकी आजच्या मराठीत पुढील शब्द आढळतात -बेअक्कल,बेअब्रू,बेअदबी,बेइज्जती,बेइमान,बेदम,बेशक,बेफिकीर,बेफाम, बेवकूफ,बेसुमार,बेचारा(बिचारा),बेहद्द,बेगुमान,बेचिराख,बेजार,बेरोजगार,बेशरम,बेहिशेबी, बेहोष,बेकार,बेकायदा, इ. 'बे ' या उपसर्गाचा वापर म.म.त इतका बेसुमार होता की पृ.२७ प्रमाणे पृ.२९ वरही डॉ. पटवर्धन[४०] यांना आणखी एक लांबलचक यादी द्यावी लागली आहे ! त्यावरून या फार्सी उपसर्गाचे मराठीतील प्राबल्य आधिक जाणवते. त्याची,वरील उदाहरणांव्यतिरिक्त, पुढील उदाहरणे मला बखरींत आढळली -बेआब, बेइज्जत,बेइतबार,बेइलाज,बेकानू,बेकिलाफ,बेखातरी,बेजाबता,बेतर्दूद,बेदस्तूर,बेदाद,बेनिगा, बे-बर्कत,बेबाकी,बे-बुनियाद,बे-मुन्साफी,बे-मोहर,बेशिरस्ता,बे- हंगाम,बे-हिक्मत,बे- हुर्मत. हा उपसर्ग मराठीत एवढा रूढ झाला की काही मराठी शब्दांनाही तो लावला जाऊ लागला. डॉ.कानडे[४१]यांनी शिवाजीमहाराजांच्या पत्रांतील बेसंगपण,बेसंगपणा या शब्दांचा केलेला निर्देश मला या संदर्भात महत्त्वाचा वाटतो.

(११) ला (अ.ला)
नकार सूचित करणारा हा अरबी उपसर्ग फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला.

लाइलाज,लाचार,लाजवाब,लावलद ही त्याची म.म.तील उदाहरणे डॉ.पटवर्धन[१०]देतात. मला बखरींत[११] लाज (अ.लाइलाज), लाचार,लाचारी इ. शब्द आढळले.डॉ.कानडे[१२] व डॉ. पवार यांना मराठेशाहीतील पत्रांत याचा आढळ झाला नसावा कारण त्यांनी तशी नोंद केलेली नाही. मो.के.दामले[१३] लावारिस,लाचार ही उदाहरणे देतात. आजच्या मराठीतही हा उपसर्ग नाममात्रच आढळतो उदा. लाचार,लाचारी,लाजवाब इ.'लाइलाज ऐवजी 'नाइलाज 'हा शब्द आज अधिक प्रचारात आहे.तेथे 'ला' ऐवजी अधिक प्रचारात आहे.त्यातील 'ला 'ऐवजी आलेला 'ना 'हा उपसर्गही फार्सीचा आहे.

(१२) सर (फा. सर् )

मराठेशाहीतील पत्रवाङ्मयातील या उपसर्गाचे सरनोबत/सरनौबत हे एकमेव उदाहरण डॉ.कानडे[१४]व डॉ.पवार देतात,राज्यव्यवहारकोशातही[१५] एवढे एकच उदाहरण आढळते. पण याची आणखी उदाहरणे सापडतील असे मला बखरींच्या संशोधनावरून जाणवते. बखरवाङ्मयात[१६]पुढील उदाहरणे आहेत - सरणोबत,सरदेसकि,सरदेशमुख, सरदेशमुखी,सरदेसाई,सरनाईक,सरनायकी,सरपाटिल,सरलष्कर,सरसबनिस,सरसुभा, सरसुभेदार इ.मो.के.दामले[१७]यांनी या उपसर्गाचा निर्देश केला आहे पण त्यांनी दिलेल्या उदाहरणांत बरीच गल्लत झाली आहे.त्यांतली सरमोकादम,सरनौबत,सरसुभा,सरपंच, सरकारकून ही उदाहरणे बरोबर असली तरी सरकार,सरदार,सरपेच,सरजोर ही उदाहरणे योग्य नाहीत. त्यांतील पाहिले दोन शब्द मुळातलेच फार्सी असून त्यांत 'सर'. हा फार्सी उपसर्ग लागलेला नाही. पुढील दोन शब्दांतील 'सर ' या फार्सी शब्दाचा अर्थ डोके असा आहे. सर्पेच् व सर्जोर् ही त्यांची मूळ रूपे आहेत.(शिरपेच व शिरजोर ही त्यांची मराठी रूपे आहेत.)

(१३) हर (फा.हर् )

म.म.प्रमाणेच व.म.तही याचा सातत्याने वापर केला गेला आहे.डॉ. कानडे[१८] त्याची शिवकालीन पत्रांतील हरकारा,हरबकस ही उदाहरणे देतात तर डॉ.पवार[१९] मराठेशाहीतील पत्रमाङ्मयातील हरजो,हरसाल,हरएक,हरदोजण,हरएकबाब,हरजिन्नस ही उदाहरणे देतात. मला बखरींत[२०] याची विपुल उदाहरणे आढळली,ती अशी - हरइलाज,हरएक,हरघडी,हरजिन्नस,हरतऱ्हा,हरप्रयत्न,हरकामी,हरकारा,हरदु इ.दामले[२१] यांनी दिलेल्या उदाहरणांत जशी म.म.तील उदाहरणे आहेत तशीच व.म.तीलही आहेत -हररोज,हरवक्त,हरघडी,हरकामी,हरहुन्नरी,हरसाल इ[२२].

(१४) हम (फा.हम्)

हा उपसर्ग म.म. तही फार कमी प्रमाणात वापरला गेला,व.म.त तर तो ( 'हमरस्ता 'सारखा अपवादात्मक शब्द सोडल्यास ) फारसा वापरला जात नाही. मराठेशाहीतली

पत्रवाङ्मयातही तो केवळ 'हमसाई 'सारख्या शब्दातच आढळतो. दामले[६] त्याची हमचौरस,हमरंग,हमजास्त ही इतर उदाहरणेही देतात,ती आजच्या मराठीत फारशी प्रचलित नाहीत.येथे अरबी - फार्सीतून आलेल्या १४ उपसर्गांचा विचार केला आहे. दामले[७] म्हणतात त्याप्रमाणे ही संख्या 'कमी ' असली तरी त्यापासून झालेल्या शब्दांची संख्या बरीच मोठी आहे, हे येथे नमूद करायला हवे.

## II अरबी - फार्सीतून मराठीत आलेली तद्धिते

अरबी - फार्सी तद्धितांच्या साहाय्याने मराठीत किती विविध प्रकारचे शब्द सिद्ध झाले आहेत,याचा मध्ययुगीन व आधुनिक मराठीतील उदाहरणांच्या साहाय्याने पुढे सविस्तर विचार केला आहे.त्यांची प्रचंड व्याप्ती यावरून सहज लक्षात येईल. असे असतानाही श्री.मो.के.दामले[८] 'त्या भाषांतील शब्दांस मराठीमध्ये शब्दसाधनिकेचे दृष्टीनें फारसें महत्त्व नाही' असे तुच्छतेने म्हणतात,याचे दुःख वाटते.डॉ. पटवर्धन[९] यांनी मात्र फार्सीच्या या योगदानाला फार न्याय दिला आहे.'फार्शी - मराठी कोश 'च्या प्रस्तावनेत त्यांनी 'शब्दसिध्दी ' हा स्वतंत्र विभाग दिला असून एकूण प्रस्तावनेच्या तीस पृष्ठांपैकी बराच मोठा म्हणजे संपूर्ण नऊ पृष्ठांचा-जवळपास एकतृतीयांश-भाग यासाठी खर्ची घातला आहे व मध्ययुगीन मराठीतील शेकडो उदाहरणे देऊन मराठी शब्दांच्या जडणघडणीवर प्रकाश टाकला आहे. प्रस्तुत विवेचनास त्याचा फार उपयोग झाला असल्याने त्यांचे ऋण मानणे,हे मी माझे कर्तव्य समजतो.

### भाववाचक नामे

पुढील फार्सी प्रत्यय लागून मराठीतील भाववाचक नामे सिद्ध झाली आहेत -
आ- फार्सी अह् प्रत्ययाचे हे मराठी रूप होय.

(म.म.)खराबा,गलबा,गुजारा,पन्हा,यका,राबता,वोहोमा

(व.म)खराबा,राबता -

आई-फार्सीत 'रोशनाई ' हा एकच शब्द 'आई ' लागून झालेला दिसतो. मराठीत पुढील उदाहरणे आहेतः अमिराई,कदिमाई,गनिमाई,जबराई,जलदाई,दिरंगाई. 'यातील आई प्रत्यय निष्कारण आहे -
दुनियाई,दुरुस्ताई,नरमाई,नाजुकाई,बारकाई,सराफाई,सुस्ताई इ.' असे डॉ. पटवर्धन[१०] म्हणतात. त्यांच्या या मतातील उत्तरार्ध पटत नाही. दुनियाई,दुरुस्ताई यासारख्या उदाहरणांविषयी काहीशी साशंकता वाटली तरी नरमाई,बारकाई,किंवा सुस्ताई यांच्याविषयी ती वाटण्याचे कारण नाही. म.म प्रमाणेच व.म.तही भाववाचक नामांप्रमाणे या शब्दांचा उपयोग होतो. बखरीत या प्रत्ययाची दफणाई,पेशवाई,मोगलाई ही उदाहरणे आढळतात[११] शिवाय वर्तमान मराठीत हा प्रत्यय मराठी शब्दांना लागून महागाई,स्वस्ताई ही रूपे सिद्ध झाली आहेत.

आत - अरबी भाववाचक नामाच्या शेवटी येणारा 'अत् 'हा प्रत्यय मराठीत 'आत 'या प्रत्ययात 'परिणत झालेला दिसतो ', हे डॉ. पटवर्धन यांचे मत काही प्रमाणात मानता येते[५२],त्यांनी दिलेल्या उदाहरणांत रुजवात,सुरवात ही भाववाचक नामे योग्य असली तरी करामात,काबजात,जरुरात,तइकिकात,तालुकात,मुकामात यांतील 'आत 'हा मूळ अरबी अनेकवचनाचा प्रत्यय फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला असून ही भाववाचक नामांची उदाहरणे म्हणून देता येणार नाहीत.'सुरवात '(फा.शुरुआत्) यासारख्या फार्सी शब्दात हा प्रत्यय अरबी 'अत् ' प्रत्ययापासून आलेला नसून तो मूळ फार्सी शब्दातच आहे, हे मत मी यापूर्वी प्रतिपादिलेच आहे[५३]. व.म.तील 'रुजवात ' सारखे शब्द या 'आत 'प्रत्ययाचीच उदाहरणे होत.

ई - हा मराठी प्रत्यय फार्सी 'ई ' पासून आला असून तो म.म.त जसा लोकप्रिय होता तसाच आजच्या मराठीतही अत्यंत लोकप्रिय आहे.

(i) नामांना हा प्रत्यय लागून भाववाचक नामे तयार होतात-

| म.म[५४]. | म.म. | व.म. |
|---|---|---|
| | सुभेदारी | |
| कार्कुनी | | कारकुनी |
| कारखानिशी | सुरनिसी | कारागिरी |
| चाकरी | वजिरी,वतनदारी | गुन्हेगारी |
| दानाई | वतनी | दुश्मनी |
| देशमुखी | | दुही |
| पादशाही | | मजुरी |
| मिरासी | | मिरासदारी |
| मुतालिकी | | वतनदारी |
| सबनिशी | | |
| सरदेशमुखी | | |
| साहेबी | | |

(ii) विशेषणांना हा प्रत्यय लागून सिद्ध होणारी भाववाचक नामे अशी आहेत -

| म म[५५] . | व.म. | व.म. |
|---|---|---|
| अजीजी | इमानदारी | बदनामी |
| इतराजी | एकी | बारीकी |
| इषकबाजी | खुबी | बेइमानी |
| एकदिली | खुशी | मुजोरी |
| खुबी | गरमी | मेहेरबानी |
| खुशीरजावंती | गरीबी | लाचारी |

| म म | वम | वम |
|---|---|---|
| जाहांबाजी | दगाबाजी | हरामखोरी |
| दानाई | दिलगिरी | |
| दिलपाकी | दिवाळखोर | |
| दिलभरी | नरमी | |
| नामर्दी | नाखुशी | |
| बेआरामी | नादानी | |
| बेश्रमी | नाराजी | |

(iii) 'ई ' प्रत्ययाने भाववाचक नाम सिध्द करण्याचा आणखी एक प्रकार विशेषकरून म.म.त आढळतो - जुलूमजास्ती,जोरजबरी इ.

व.म. मध्येही 'जुलूमजबरदस्ती ' यासारखी या प्रकाराची काही उदाहरणे दिसतात. 'बळजबरी 'सारखी मराठी - फार्सी शब्दांची उदाहरणेही या संदर्भात देता येतील.

(iv) फार्सीतील 'ये - इ - मुसाहिबत ' ने किंवा साम्यदर्शक 'ई '- प्रत्ययाने भाववाचक नामे सिध्द केल्याचे 'हुसेनी 'सारख्या शब्दात आढळते. मराठी नाम व फार्सी नाम एकमेकास जोडून व त्यास 'इ ' प्रत्यय लावूनही किंवा मराठी नामासच 'ई ' प्रत्यय लावूनही काही भाववाचक नामे सिद्ध होतात. मराठीवरील अन्तर्गत फार्सी प्रभावाच्या दृष्टीने मला हा प्रकार लक्षात घेण्याजोगा वाटतो. तो म.म.प्रमाणे वम तही रूढ आहे. हे विशेष. उदा. गाऊगर्दी,यादवी इ.

(v) इति. राजवाडे यांचे फार्सी 'ई ' प्रत्ययाविषयीचे आणखी एक निरीक्षणही मला महत्त्वाचे वाटते.ते म्हणतात[६६], 'फार्सी 'च्या संसर्गाने मराठीला आणखी एक खोड लागली,ती ही कीं, फारशींतील शब्दसिद्धीचे प्रत्यय मराठी स्वीकारूं लागली. ये (उच्चार ई) प्रत्यय लागून फारशींत भाववाचक किंवा धंदावाचक नाम होतें. जसें दोस्त,दोस्ती. ह्या धर्तीवर मराठींतील नामें अशी होत -

वैद्यक,वैद्यकीःएक,एकीःदु,दुहीःबेक,बेकीःमांत्रिक,मांत्रिकीःवैदिक,वैदिकीःमधुकर,माधुक्री वगैरे.

ईयत

डॉ.पटवर्धन यांनी या प्रत्यायाचा उल्लेख 'अत् ' या अरबी प्रत्ययाच्या संदर्भात का केला ते कळत नाही. तो स्वतंत्रपणे अरबी 'ईयत 'प्रत्ययाखाली करणेच अधिक सयुक्तिक आहे. कारण 'अत् ' प्रत्ययाशी त्याचा संबंध नाही. त्यांनी निर्देशिलेली कैफियत, खसूसीयत,जाहलीयत,मालकीयत,वाकफीयत,वाहदीयत ही उदाहरणे मात्र निश्चितपणे लक्षात घेण्याजोगी आहेत. वर्तमान मराठीतही कैफियत,खासियत[६७] यासारखे या प्रत्ययाने सिद्ध झालेले फार्सी शब्द रूढ आहेत. 'खासियत ' शब्दाने तर आजच्या मराठीत आपले वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्मिले आहे.

बखरींत आढळणाऱ्या 'मीनगारी ' या शब्दात फारसी 'गारी 'हा प्रत्यय नसून फारसी 'कार + ई ' पासून सिध्द झालेला 'कारी ' हा प्रत्यय आहे. तो शब्द 'मीनाकारी 'या फारसी शब्दापासून आला आहे, हे मत मी या पूर्वीच मांडलेच आहे[४]. व.म.तही 'कशीदाकारी ' सारखी या प्रत्ययाची रूपे आढळतात. या प्रत्ययाचाही स्वतंत्र विचार राजवाडे,डॉ. पटवर्धन वा डॉ.सुधाकर पवार यांनी केलेला नाही.

की

'की' हा प्रत्यय फार्सीत नसल्याने ते 'गी चेच रूपान्तर असावे ' हे डॉ. मा.त्रं. पटवर्धन यांचे मत पटण्याजोगे आहे.यादवकालीन मराठीत हा प्रत्यय दिसत नाही,हे डॉ.तुळपुळे[५] यांचे मत तो प्रत्यय फार्सीच्या संपर्कानंतर आल्याची साक्ष देते. या संपर्कानंतरदेखील हा प्रत्यय दोन प्रकारे मराठीत अवतरला आहे व त्यापासून भाववाचक नामे सिद्ध झाली आहेत:

(अ) अ.फा. शब्द + 'की '

जामीनकी,दरम्यानकी,मर्दुमकी ही की - प्रत्ययान्त रूपे मूळ फार्सीत नसून ती अनुक्रमे ज़ामिनी,दर्मियानी,मर्दुमी अशी आहेत. हे मत मी[६] यापूर्वी मांडलेच आहे. 'गी 'प्रत्ययाचे 'की ' प्रत्ययात रूपान्तर होऊन या शब्दाचे हे वेगळेच मराठी अवतरण झाल्याचे दिसते. शिवाय 'मर्दुमी ' सारखी काही मूळ रूपेही म.म. ने जतन करून ठेवली आहेत[७] - खानकी,मुजावरकी,शहाजादकी

(आ)मराठी शब्द + 'की'

| मम | वम |
|---|---|
| आप्तकी प्रधानकी,मैत्रिकी, | भाऊबंदकी,माणुसकी |
| सरपाटेलकी | पाटीलकी,तोंडपाटिलकी |
| | गावकी,महारकी |

वर्तमान मराठीतही 'की ' हा प्रत्यय अत्यंत लोकप्रिय असून त्याची अन्य अनेक उदाहरणे देता येतील.गौज अशी की मूळ फार्सी ' गी ' चे 'की 'प्रत्ययात रूपान्तर होऊनही मराठीने तो प्रत्यय तसाच जपून ठेवला आहे ! त्याचे विवेचन 'गी ' प्रत्ययाच्या संदर्भात पुढे केले आहे.

गारी

'गार् ' आणि 'ई ' हे दोन फार्सी प्रत्यय मिळून मराठीतील 'गारी ' हा प्रत्यय सिद्ध झाला आहे. त्याच्याविषयी इति राजवाडे किंवा डॉ.पटवर्धन यांनी विवेचन का केले नाही ते कळत नाही. वस्तुतः फार्सीचा हा संयुक्त प्रत्यय मराठीत आला, ही बाब लक्ष वेधण्याजोगी आहे. म.म.त विशेषतः बखरींत- त्याची खिजमतगारी,गुन्हेगारी,माहितगारी रोजगारी ही उदाहरणे आढळतात. शिवकालीन पत्रांतील 'गुन्हेगारी' सारखी उदाहरणे निर्देशूनही डॉ.सुधाकर पवार यांनी या संयुक्त प्रत्ययाचा स्वतंत्र उल्लेख केलेला नाही[८].

गिरी

हे ही फार्सी संयुक्त प्रत्ययाचे उदाहरण होय फार्सी 'गर् ' आणि 'ई ' हे दोन प्रत्यय मिळून 'गरी ' हे रूप सिद्ध झाले. त्याचेच रूपान्तर मराठीत 'गिरी 'या प्रत्ययात होते व त्याने पुढील भाववाचक नामे तयार झाली आहेत -

| म.म. | व.म. |
|---|---|
| कारागिरी[७३] | कारागिरी |
| दिवाणगिरी | जादूगिरी[७४] |
| पेशवेगिरी | मुत्सद्देगिरी |
| बक्षीगिरी | मुलुखगिरी |
| बाजीगिरी | |
| मुत्सदगिरी | |
| शिपाईगिरी | |

वर्तमान मराठीत मराठी नामाला फा.गिरी प्रत्यय लागूनही काही भाववाचक नामे तयार झाली आहेतः गुंडगिरी,दादागिरी,बाबूगिरी, इ.

गी

(१) 'हा प्रत्यय मूळात अकारान्त शब्दालाच लागतो,जसे - बन्द - बंदगी ' हे डॉ. पटवर्धन[७५] यांचे मत पूर्ण सत्य म्हणून स्वीकारता येत नाही. फार्सीतील 'ह् ' कारान्त शब्दाचे भाववाचक नाम होताना त्यातील अन्त्य 'ह् ' चा लोप होऊन त्याला 'गी ' हा प्रत्यय लागतो. उदा. बंदह् + गी = बंदगी,पर्वानह् + गी = परवानगी.त्यांनी दिलेल्या अजुर्दगी ,खफगी,गिर्वीदगी,जिन्दगी,ताजगी,दारोगी,निवीसन्दगी,प्यादगी,पोख्तगी,बेमजगी, मर्दानगी,मान्दगी,रवानगी,शर्मिन्दगी,हरामजादगी या उदाहरणांतील मूळ फार्सी रूपे अजुर्दह्,ख़फ़ह्,गिर्वीदह्,ज़िन्दह्,ताज़ह्,दारोग़ह्,निवीसन्दह्,प्यादह्,पुख्तह्,बेमज़ह्,मर्दानह्, मान्दह्,रवानह्,शर्मिन्दह्,हरामज़ादह्,अशी 'ह्' कारान्त आहेत, अकारान्त नव्हेत.याची व.म.तील 'रवानगी ' सारखी उदाहरणे सांगता येतील. श्री.मो.के.दामल[७६] यांनीही असेच मत मांडले असून पुष्ट्यर्थ बंदगी, रवानगी, ताजगी ही उदाहरणे दिली आहेत.

(२) डॉ.पटवर्धन यांचे वरील मत काही म.भ.तील काही शब्दांच्या बाबतीत मान्य करायला हवे. उदा. उमेदगी,दुश्मनगी,बेमानगी,मेहमानगी,मेहेरबानगी.त्यांनी याच यादीत दिलेल्या कसीदगी,खुर्सदगी,नातवानगी या शब्दांना मात्र यापूर्वी क्र.१ मध्ये निर्देशिलेला नियम लागू पडतो.

(३) काही मराठी नामांनाही फार्सी 'गी ' प्रत्यय लागून भाववाचक नामे सिद्ध होतात - उदा. पटेलगी[७७].

(४) वरील क्र.२ च्या बाबतीत अधिक सूक्ष्म विचार करायचा झाल्यास असे म्हणता येईल की 'काही फार्सी शब्द मराठीत येऊन त्यांचे भाववाचक नाम होतानाही "गी ' प्रत्यय लागत असला तरी मूळ अरबी-फार्सी शब्दांत तो लागतोच असे नाही . उदा.

| मूळ अ. / फा. शब्द | | त्याचे फार्सी भाववाचक नाम | | म. म. |
|---|---|---|---|---|
| विदाअ् | > | विदाई | > | बिदागी |
| मिह् मान् | > | मिह् मानी | > | मेहमानगी |
| मिह् र् बान् | > | मिह् र् बानी[४] | > | मेहरबानगी |

शाई,शाही

'शाही ' चा अर्थ राज्य असा आहे फार्सी शाह् शब्दाला 'ई ' प्रत्यय लागून हा प्रत्यय सिद्ध झाला. त्याच्या साहाय्याने भाववाचक नाम तयार होते. याचे दोन प्रकार आहेत:

१) फा.शब्द + शाही

| म.म. | व.म. |
|---|---|
| अदलशाही,इदलशाही,काफरशाही,निजामशाई (ही) | नोकरशाही, हुकुमशाही |

२) म.शब्द + शाही

| म.म. | व.म. |
|---|---|
| भाऊशाही | लोकशाही |
| शिंदेशाही | शिवशाही |
| शिवशाई | दडपशाही |

**काही भाषिक आदान - प्रदान**

(१) ता

हा प्रत्यय फार्सीचा नाही,तो मराठीचाच आहे व तो संस्कृतपासून व्युत्पादिता येतो. तथापि, अत्यंत,अल्प प्रमाणात का होईना,तो काही अरबी-फार्सी शब्दांना लागल्याचे म.म. त आढळते.उदा. मालकता[**].'मालिक् ' हा अरबी शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला,त्याला फार्सीचा ई. प्रत्यय लागून 'मालिकी ' हे रूप सिद्ध झाले[*]. वर्तमान मराठीत त्याचे 'मालकी ' हे रूप प्रचलित आहे.

(२) पण / पणा

हा प्रत्यय अपभ्रंश 'प्पण ' पासून मराठीत आला. तो अरबी - फार्सी शब्दांना लागून म.म.त तसेच व.म.त भाववाचक नामे तयार झाली आहेत: अजुर्दपणा ,खावंदपणा, निमकहरामपणा,पेशवेपणा,फर्जीपणा,बहाद्दरपणा,बारीकपणा व हुजरेपणा ही बखरींतील उदाहरणे मी या संदर्भात निर्देशिली आहेतच[*]. कमजोरपणा,नादानपणा, शिरजोरपणा यासारखी व.म.तील अनेक उदाहरणेही येथे देता येतील

ई

'फार्सी 'ई ' या प्रत्ययाने मराठीत नामे व विशेषणेही सिद्ध झाली आहेत:

१) नामे : अर्जी,अब्बारी,आबादी,इतराजी,इभ्रमी,खर्ची,चाकरी,तयारी,मस्ती,शिपाई,स्वारी

ही नामे म.म.त - विशेषतः बखरींत[?]आढळतात.त्यांपैकी इतराजी,चाकरी,तयारी,मस्ती, शिपाई,स्वारी ही आजच्या म.राठीतही आढळतात. (शिवकालीन पत्रात्मक गद्यात[?] मिरासी,चाकरी,साहेबी,जमनिसी,सरदेशमुखी,सुरनिशी इ. विपुल उदाहरणे आहेत.)
(२) विशेषणे :या संदर्भात डॉ.पटवर्धन[?]यांनी म.म.तील अमली,अरमानी,कबजी,जबाबी ,हौशी ही विशेषणे निर्देशिली आहेत.बखरींत[?]मला अकबरी,आजारी,गैबी,पादशाही ही उदाहरणे आढळली. आजच्या मराठीतही अमली,आसमानी,आजारी,जबरी,हजरजबाबी, हौशी ही विशेषणे वापरली जातात.

**स्थान/स्थलदर्शक नामे**

आबाद : मराठीत या प्रत्ययाची असंख्य उदाहरणे आहेत. म.म.तच नव्हे तर व.म.तही ती आढळतात. बहुधा व्यक्तिनामास लागून हा प्रत्यय येतो व तो एखाद्या गावाचा / शहराचा निर्देश करतो. फार्सीतील 'आबाद् ' या प्रत्ययापासून तो सिद्ध झाला आहे. म.म.त अकबराबाद,अमदाबाद,औरंगाबाद,कातराबाद,दौलताबाद,फरकाबाद,महमदाबाद, हुसंगाबाद,हैदराबाद ही स्थानदर्शक नामे जशी प्रचलित होती[?] तशीच अदिलाबाद, उस्मानाबाद,खुल्ताबाद,निजामाबाद,फरीदाबाद,मखमलाबाद यासारखी असंख्य स्थानदर्शक नामे आजच्या मराठी भाषेतही प्रचलित आहेत. त्यांत मोमिनाबादऐवजी अम्बाजोगाई व एदलाबादऐवजी मुक्ताईनगर असे काहींचे नामपरिवर्तन किंवा नामान्तरही झाले आहे.

आण,आन : फार्सी 'आनह् 'या प्रत्ययापासून हा प्रत्यय मराठींत आला असावा.डॉ. पटवर्धन[?] याचा उल्लेख का करीत नाहीत ते कळत नाही कारण म.म.त या प्रत्ययाने सिद्ध झालेले अनेक शब्द आहेत. मी बखरींतील इराण,तुरकाण,दुराण,फिरंगण हबसान ही उदाहरणे माझ्या ग्रंथात[?] दिली आहेत. श्री.मो.के. दामले[?] हा प्रत्यय 'स्थान ' या शब्दाचा शेष असावा,असे म्हणतात.(म्हणजेच, वरील विवेचन लक्षात घेता,फार्सी शब्दांत 'स्तान 'चे ते रूप असावे,असा याचा अर्थ घेता येईल.)तथापि सं. स्थान किंवा फा.स्तान् या शब्दाचे रूप बदलत बदलत त्याचे 'आण ' किंवा 'आन ' असे रूप झाले असावे, हे मत भाषाविज्ञानदृष्ट्या मला फार दूरान्वयाचे वाटते. संस्कृत शब्दांचे प्राकृतीकरण होताना क्,ग्,च्,ज्,त्,द् या वर्णांचा लोप होऊन त्यांतील स्वर शिल्लक राहतो,ही उच्चारप्रक्रिया लक्षात घेतली तरी त्या जोडाक्षरातील स् हे व्यंजनही नाहीसे होते हे मान्य करवत नाही. त्यापेक्षा फार्सीमधील 'आनह् 'या प्रत्ययापासून वर उल्लेखिलेल्या शब्दांत 'आम् ' किंवा 'आण ' ही रूपे सिद्ध झाली असणे अधिक संभवनीय व सयुक्तिक आहे.

खाना :घर या अर्थाच्या फा. 'खानह् ' पासून मराठीत आलेला हा प्रत्यय लागून म.म. आणि व.म.त अनेक स्थानदर्शक नामे सिद्ध झाली आहेत. हा फार्सी प्रत्यय मराठीत अत्यंत लोकप्रिय झाला आहे.डॉ.पटवर्धन[?] त्याची अदब्खाना, अजायब्खाना,घुसल्खाना,

दारूखाना इ. उदाहरणे देतात तर इति.राजवाडे[९१]यांनी त्याची गाडीखाना,हतीखाना इ. उदाहरणे देतात. शिवकालीन कागदपत्रांत याची विपुल उदाहरणे आढळत असतानाही डॉ.सुधाकर पवार[९२] यांनी 'अबदखाना' सारख्या एखाद्याच उदाहरणावर काम भागविले आहे. श्री.रा.गो.काटे यांनी संपादिलेल्या शिवकालीन 'राज्यव्यवहारकोशा'[९३]च्या सूचीत त्याची पुढील उदाहरणे दिली आहेत:
आबदारखाना,आलमखाना, उसुल्खान,जमखाना,जर्मखाना,जवाहीरखाना,जामदारखाना, जिरात्खाना,तालिमखाना,पेशखाना,फरासखाना,फीलखाना,मुदबखखाना,शरबतखाना, बंदीखाना,शराबखाना,शिकारखाना,पुतुर्खाना,हौदखाना इ.
बखरीत याची पुढील उदाहरणे आढळतात,ती मी[९४]दिली आहेत:
आबदारखाना,खवासखाना,खेळखाना,गौखाना,घुसलखाना,जवाहीरखाना,जामदारखाना, तालिमखाना,तोफखाना,दिवाणखाना,नगारखाना,मुदबखखाना.इति. राजवाडे[९५] यांनी आबदारखाना,आतषखाना,खलबतखाना,संदूकखाना इ. ऐति.कागदपत्रांत आढळणारी इतर वैशिष्ट्यपूर्ण उदाहरणेही दिली आहेत. आजच्या मराठीत तर याची असंख्य उदाहरणे आहेत. वानगीदाखल काही उदाहरणे पुढे देत आहे:आसुरखाना,तोफखाना, दवाखाना,दिवाणखाना,पागलखाना,पायखाना,फरासखाना,भटारखाना,मोदीखाना, सिल्लेखाना,शिकारखाना,शिंदीखाना इ.
गा :फार्सी 'गाह्' (स्थळ ) या प्रत्ययापासून मराठीत 'गा ' हे रूप सिद्ध झाले. डॉ. पटवर्धन[९६] यांनी ऐति. कागदपत्रांतील 'इदगा,कम्बर्गा (सेनामध्य ), खाब्गा (निद्रागृह), जागा,दर्गा,पागा,'यांचा निर्देश केला आहे. बखरीतही मला कमरगा,जागा,निमजगा, पागा हे शब्द आढळले[९७] डॉ.सुधाकर पवार[९८] यांनी शिवकालीन पत्रांत अभ्यास करताना या प्रत्ययाची नोंद घेतल्याचे आढळले नाही. राज्यव्यवहारकोशाच्या[९९] सूचीतही फक्त 'पागा' हाच शब्द आढळला. 'गा' प्रत्ययाचे मूळ 'गाह् ' हे रूपही क्वचित आढळल्याची नोंद डॉ.पटवर्धन[१००] यांनी 'किब्लेगाह' सारखे उदाहरण देऊन आवर्जून केली आहे.
दान : फा. 'दान् ' पासून मराठीत आलेला हा लोकप्रिय प्रत्यय. 'दान् ' हे फार्सी 'दाश्तन् ' या क्रियापदाचे रूप असून 'दाश्तन् ' चा अर्थ बाळगणे व दानचा अर्थ बाळग,बाळगणारा असा आहे. यातूनच स्थानदर्शक वा पात्र असाही सूचक उल्लेख केला गेला आहे. 'कलमदान ' म्हणजे लेखणी ठेवण्याचे पात्र. इति.राजवाड्यांनी[१०१] याचे 'तावदान 'सारखे उदाहरण दिले आहे.डॉ.पटवर्धन[१०२]म.म.तील अंगुस्तदान, कलम्दान,गुलदान,जुज्दान,चिरागदान,शामदान ही अन्य उदाहरणे देतात.डॉ.पवार[१०३] केवळ त्याचा उल्लेख करून पुढे जातात. मी बखरीतील[१०४] कलमदान,चिराखदान, तावदान यांचा निर्देश केला आहे,शिवाय 'पानदान 'सारख्या शब्दात तो प्रत्यय मराठी शब्दासही कसा लागतो,त्याकडे लक्ष वेधले आहे. 'राज्यव्यवहारकोशा'त'[१०५] या प्रत्ययाने साधलेले पुढील शब्द आढळतात. कलम्दान,कुजदान,जूजूदान,तांबूलदान (म. तांबूल अ फा.दान् ) इ.'पानदान ' सारखा शब्द आजच्या मराठीतही रूढ आहे .

दाणी/दानी : फार्सीमध्ये 'दाणी 'असा प्रत्यय नाही. मराठीतील 'दाणी ' हा प्रत्यय म्हणजे फार्सी 'दान् 'प्रत्ययाचेच स्त्रीलिंगी रूप होय.(फार्सीत असे पुल्लिंगी वा स्त्रीलिंगी प्रत्ययाचे रूप बदलण्याची प्रथा नाही.) डॉ.पटवर्धन[७५]यांनी याची अत्तरदाणी,पिकदाणी, चहादाणी ही उदाहरणे दिली आहेत.मी बखरींतील 'पिकदाणी 'हे रूप निर्देशिले आहे ते सं.पिज् +फा. दान् + ई या प्रक्रियेने सिद्ध झाले आहे[७६].डॉ. पवार यांना शिवकालीन पत्रांत याची उदाहरणे आढळलेली दिसत नाहीत[७७]: पण शिवकालीन मराठीत तो नव्हता असे नाही. राज्यव्यवहारकोशाच्या सूचीत 'डीकदानी 'सारखी रूपे नोंदविली आहेत[७८].आजच्या मराठीत 'अत्तरदाणी',गुलाबदाणी सारखे शब्द तर रूढ आहेतच पण 'मच्छरदाणी 'सारखे शब्ददेखील रूढ आहेत. फार्सी प्रत्ययांचा मराठी शब्दनिर्मितीवर खोल ठसा कसा उमटला होता, याचे हे द्योतक आहे. स्त्रीलिंगी रूप सिद्ध करण्यासाठीदेखील फार्सीच्या 'ई ' प्रत्ययाचाच उपयोग केला गेला,याकडेही लक्ष वेधणे आवश्यक आहे, असे वाटते.

स्तान : संस्कृत आणि फार्सी या एकाच आ भाषाभगिनी असल्याने फार्सी 'स्तान' आणि संस्कृत 'स्तान' या शब्दांचे मूळ एक असले तरी मराठी शब्दांत आलेल्या फार्सी शब्दांतील 'स्तान' हा शब्द फार्सीपासून आला आहे,हे लक्षात घ्यायला हवे. डॉ.पटवर्धन यांनी या प्रत्ययाची कबरस्तान,तुर्कस्तान,हिंदुस्तान ही उदाहरणे दिली आहेत[७९]. सं.स्थान आणि फा.स्तान यांच्याविषयी गल्लत होण्याची शक्यता असल्याने याविषयी मी बखरींच्या[८०] संदर्भात मांडलेले मत पुन्हा उद्धृत करीत आहे.या 'दोन्ही शब्दांचे स्वरूपही सारखेच असल्याने कधी कधी फार्सी'स्तान'ऐवजी संस्कृत स्थान हा शब्द वापरला जातो.उदा.अर्बस्थान,मूळ 'स्तान'हा फार्सी प्रत्ययही मराठी बखरींत आढळतो,उदा. हिंदुस्तान(< हिन्दुस्तान).येथेही संस्कृत 'सिंधुस्थान'चे फार्सी रूपान्तर 'हिन्दुस्तान'असे झाल्याची प्रक्रिया व्युत्पत्तिदृष्ट्या लक्षात घ्यावीच लागते.तथापि यासारख्या सर्व मराठी शब्दांतील 'स्तान'हा प्रत्यय फार्सीपासूनच आला,असे म्हणणे दुराग्रहाचे ठरेल.'आजच्या मराठीतील अरबस्तान,बलुचीस्तान,अफगाणिस्तान,पाकिस्तान या शब्दांतील 'स्तान'हा प्रत्यय फार्सीपासूनच आला आहे.

**अल्पत्वदर्शक नामे**

क,चा / च्या

वस्तू,व्यक्ती वा स्थल इ.चे लहानपण वा लघुत्व/अल्पत्व दाखविण्यासाठी फार्सीत पुढील प्रत्यय शब्दांना लागतात -

१.क् २. ह् ३. केह् ४. चेह् (क्र. ३ आणि ४ ही क्र.१ आणि २ यांचीच विस्तारित रूपे आहेत.)यांतील 'क् ' आणि 'चेह् ' हे फार्सी प्रत्यय प्रामुख्याने म.म. व व.म.त अनु. 'क ' आणि 'चा ' या रूपांत आले आहेत. 'ह् ' आणि 'केह् ' या प्रत्ययांचा मराठीत

फारसा वापर झाल्याचे आढळत नाही. डॉ. पटवर्धन[११२] यांनी 'क 'प्रत्ययाची बदक व जम्बूरक ही उदाहरणे दिली आहेत. गालीचा हे 'चा' प्रत्ययाचे उदाहरणही स्वीकारण्याजोगे आहे.'बगिचा' शब्दात मात्र ते चा (फा.चह्) या प्रत्ययाऐवजी 'इचा ' असा प्रत्यय मानतात,तो मूळ फार्सीत नाही. 'बगिचा ' शब्दाचे स्टेनगॅसने[११३] दिलेले मूळ रूप 'बागचेह्'असेच आहे व त्याचा उच्चार 'बागचा 'असा त्याने दिला आहे.त्यात 'इचा' या प्रत्ययाचा कोठेही निर्देश नाही. मराठीकरण होताना त्याचे 'इचा ' असे एक रूप झाले असावे,असे फार तर मानता येईल पण त्यातील मूळ फार्सी प्रत्यय 'चेह् ' हाच होय. बखरींत 'क '( फा.क् ) प्रत्ययाची अभ्रक (<फा. अब्र् + क ),'दस्तक' (फा. दस्त् + क् ),चाबुक,रंजक त्याचप्रमाणे 'चा '(फा.चह् )प्रत्ययाची गालिचा,बागबगिच्या मोर्चा व 'च्या ' प्रत्ययाची 'निमच्या 'इ. उदाहरणे आढळतात,त्यांचा निर्देश मी केलाच आहे[११४]. बंदूक,बंदूख हे शब्दही मराठी बखरीत प्रचलित आहेत. 'बंद् ' या फार्सी शब्दाच्या अनेक अर्थापैकी the handle of a knife,the hilt of a sword हे अर्थ शस्त्रद्योतक असून ते स्टेनगॅसने[११५] दिले आहेत त्याचप्रमाणे 'बुंदुक ' या शब्दाचा अर्थ a musket आणि 'बुंदुक् ची 'या शब्दाचा अर्थ Musketeer,rifle-man असा दिला आहे. त्याच्या आधारेही त्या शस्त्राचे लघुत्व दर्शविण्यासाठी 'बंदुक 'हा शब्द प्रचलित झाला असावा काय,असा एक तर्क मनात येतो; पण हा तर्कच असल्याने 'क 'प्रत्ययाच्या उदाहरणांत मी 'बंदूक 'या शब्दाचा समावेश केलेला नाही. दस्तक,रंजक सारखे अपवाद वगळता आजच्या मराठीत अभ्रक,गालिचा,चाबुक,बदक,बगीचा,बागबगीचा हे सारेच शब्द वापरले जातात. ' पायचा /च्या' हा शब्द विजारीच्या एका भागासाठी वापरतात,त्याचाही येथे उल्लेख करायला हवा. त्यातून लघुत्व सूचित होते.

**नामसाधित कर्तृवाचक शब्द**

कर,कार : हे फार्सी 'गर् ' या प्रत्ययाचे मराठीकरण होय. बखरीत क्वचित आढळणारे शिकिलकर (फा.सैकल्गर् ) सारखे उदाहरण मी[११६] या संदर्भात दिले आहे तथापि या प्रत्ययाचा निर्देश राजवाडे[११७], डॉ. पटवर्धन[११८] व डॉ.पवार[११९] मात्र करीत नाहीत. त्याची नोंद घ्यायला हवी,असे मला वाटते.'राज्यव्यवहारकोशात'[१२०] त्याचे 'कार ' हे दुसरे रूप ही शिकल्कार या शब्दात निर्देशिले आहे, तेही चिन्त्य आहे. आजच्या मराठीत हा शब्द 'शिकलगार ' या रूपात प्रचलित असल्याने त्यात मूळ फार्सी 'गर् ' हा प्रत्यय नसून 'गार् 'हा प्रत्यय असावा,असा आभास निर्माण होतो. म्हणून त्याची नोंद येथे मुद्दाम केली आहे.

गर (फा.गर् ) :या प्रत्ययाची काही उदाहरणे मध्ययुगीन व वर्तमान मराठीत आढळतात. डॉ.पटवर्धन[१२१]यांनी कारीगर,जादूगर,जीनगर,बाजीगर,सौदागर ही उदाहरणे दिली आहेत. 'राज्यव्यवहारकोशात[१२२] ' कर्दगर,बाजेगर,सौदागर ही उदाहरणे आहेत.

'जिनगर ' चा उल्लेख राज्यव्यवहारकोशात आढळतो[१२३], तो फा. जनगार् पासून आला असल्यास त्यात गर् ऐवजी 'गार् ' हा प्रत्यय असावा. स्टेनगॅस[१२४] या शब्दाचे मूळ 'जन् गार् 'असे देता व त्याचा अर्थ 'योद्धा 'असा देतो पण तो 'जंग् 'पासूनच सिद्ध झाले असणे अधिक संभवनीय.

गार (फा.गार् ) : हा प्रत्यय मध्ययुगीन मराठीप्रमाणेच वर्तमान मराठीतही फार मोठ्या प्रमाणात योजिला जातो. डॉ. पटवर्धन[१२५] यांनी याची कमानगार,कल्हईगार,कारीगार, किमयागार,खिदमतगार,गुन्हेगार,जादूगार,नकारगार,मदतगार,माहीत् गार,शिकल्गार ही म.म.तील उदाहरणे दिली आहेत.डॉ.पवार[१२६]शिवकालीन पत्रांतील गुन्हेगार,रोजगार, पाळेगार ही उदाहरणे देतात. (यातील रोजगार हा नामसाधित कर्तृवाचक शब्द नाही.) मी[१२७] बखरींतील कामगार,खिजमतगार,माहीतगार ही उदाहरणे दिली आहेत.आजच्या मराठी भाषेतही किमयागार,गुन्हेगार,जादूगार,मददगार,माहीतगार हे शब्द आढळतात.

ची : तुर्की भाषेतील 'ची ' प्रत्ययापासून हा फार्सीत आला, फार्सीच्या माध्यमातून तो मराठीत आला व त्याने 'ची ' व 'जी ' ही दोन रूपे धारण केली -
(१) 'ची' प्रत्ययाचे डॉ. पटवर्धनांनी[१२८] दिलेली उदाहरणे दशी- खजान् ची,तबल् ची, तास् ची, तोफ् ची, नगारची, नशेक् ची, नर्फाची,मशाल् ची.
(२) 'ची 'चे रूपांतर 'जी ' या प्रत्ययातही होते.खजान् जी,दिवाणजी,मशाल् जी,मियांजी ही डॉ.पटवर्धनांनी दिलेली उदाहरणे तर मला[१२९]बखरींत आढळलेली उदाहरणे अशी- दिवाणजी,नगारजी,मशालजी. वर्तमान मराठीत ची -प्रत्ययान्त रूपांऐवजी जी - प्रत्ययान्त रूपे जास्त आहेत. उदा. तब्बलजी,दिवाणजी, मुनीमजी इ.

बान : हा प्रत्यय फार्सी 'बान् ' पासून मराठीत आला तो मूळ फार्सी शब्दांनाही लागतो. उदा.निगाहबान् .म.म.प्रमाणेच व.म. तही तो सर्रास वापरला जातो. डॉ.पटवर्धन[१३०] यांनी याची म.म. तील पासबान,मेहेर्बान ही उदाहरणे दिली आहेत. बखरींत[१३१] व आजच्या मराठीत मेहेरबान हा शब्द प्रचारात आहे. मो.के.दामले[१३२] यांनी मेहेरबान, मेजबान ही उदाहरणे दिली आहेत पण ती 'वाण 'या प्रत्ययाच्या संदर्भात नोंदविली आहेत.

वान : काही मराठी अभ्यासकांनी 'बान् 'आणि'वान् ' या दोन फार्सी तद्धितांत गल्लत केली आहे. ते दोन स्वतंत्र प्रत्यय असून एकमेकांची रूपे नाहीत मो.के. दामले[१३३] यांनी 'वान 'प्रत्ययाखालीच मेहेरबान हे उदाहरण दिले आहे व त्यासोबत 'वान ' प्रत्ययाची बागवान,सारवान ही उदाहरणे दिली आहेत. डॉ.पटवर्धन[१३४] या बाबतीत काटेकोर वाटतात.त्यांनी हे दोन्ही प्रत्यय स्वतंत्र दिले आहेत व 'वान 'प्रत्ययाची बागवान,दर्वान, सार्वान ही उदाहरणे दिली आहेत. (राज्यव्यवहारकोशात निर्देशिलेल्या 'निगाहवान्' या

शब्दातही फा. वान प्रत्यय नसून तो. 'बान् ' आहेत.) राज्यव्यवहारकोशातील[१५] 'वित्तेवान 'शब्दाचाही ' या संदर्भात विचार करायला हवा. बखरीत 'दौलतवान 'हा शब्द आढळतो[२५]. काही वेळा फा.बान् हा प्रत्यय मराठीत 'वान ' हे रूप धारण करतो. उदा. बागवान शब्दाचे मूळ फारसी रूप बागबान हे आहे पण म.म.त आणि सध्याच्या मराठीतही बहुधा त्याचे 'बागवान ' हे रूपच स्वीकारले जाते. तेव्हा अशा वेळी मूळ फारसी प्रत्यय 'वान् 'आहे की 'बान्' हे तपासून घ्यायला हवे आजच्या मराठीत ताकदवान -सारखे शब्द वापरले जातात,त्यांतील तद्धित फा. वान् हे आहे, हे लक्षात घ्यायला हवे.

**विशेषणे / क्रियाविशेषणे/ नामे**

पुढील फारसी तद्धितांपासून विशेषणे,क्रियाविशेषणे वा नामे सिद्ध होतात :
आना (फा.आनह्)/इनाः मी बखरींतील[१७] जखमाना,जनाना,दस्ताना,मोताना ही उदाहरणे दिली आहेत.मो.के.दामले[१८] यांनी दिलेली रोजीना,सालिना महिना,छबीना ही उदाहरणे बरोबर आहेत तथापि त्यांत त्यांनी दिवाणा,नजराणा,अंगुशताना यासारख्या शब्दांचा केलेला समावेश योग्य वाटत नाही. नजराणा,अंगुश्ताना ही विशेषणे नसून नामे आहेत.रोजीना (रोजचा पगार इ.)सालिना (वर्षाचा पगार इ.) , छबीना (फा. शबानह् : रात्रीचा) यांतील काही विशेषणांचे / क्रियाविशेषणांचे पुढे नामांत रूपांतर झाले आहे. 'शबानह्'या फारसी शब्दाचा अर्थ 'रात्रीचा 'असा असताना रात्री काढलेल्या मिरवणुकीस 'छबीना ' म्हणू लागले. त्यानंतर कोणत्याही वेळेस काढलेल्या देवाच्या मिरवणुकीस 'छबिना ' म्हणू लागले.रोजीना (फा. रोजानह् ),सालिना (फा.सालानह्),छबीना (फा.शबानह्)यासारख्या शब्दांत फा. आनह् या प्रत्ययाचे मराठी 'ईना' या प्रत्ययात रूपांतर झाले आहे, हे लक्षात घ्यावयास हवे.

ईन (फा.ईन्) : या प्रत्ययाच्या बाबतीत मराठीत दोन प्रक्रिया घडल्याचे दिसते-
(अ) हा प्रत्यय स्वरान्त होऊन काही शब्दांत तो कायम राहतो[१९] - ताबीन,संगीन. डॉ.पटवर्धन[१९] यांनी याविषयी विवरण करताना म.म.तील 'संगीन 'शब्दाबरोबरच 'रंगीन ' चाही उल्लेख केला आहे.
(आ) काही वेळा मूळ फारसी विशेषणातील अन्त्य 'न् ' चा लोप होतो. उदा. जरी (फा. जरीन्).मूळ 'जरी' हे विशेषण असूनही आजच्या मराठीत त्याच्यापुढे 'चा 'प्रत्यय लावून 'जरीचा /ची /चे ' सारखी रूपे सिद्ध केली जातात,तेव्हा विशेषणाचेही आणखी विशेषण होते ! एका अर्थाने ती पुनरुक्तीही आहे.

गीन (फा.गीन् ) : म.म.त तसेच व.म.तही हा प्रत्यय क्वचित् आढळतो.मो.के. दामले[१८] यांनी याचे 'सुरमह् गीन ' हे उदाहरण दिले आहे.

मन्द : फा. मन्द् पासून हा प्रत्यय मराठीत आला,त्यापासून म.म.त अकलमंद, आर्जूमंद,एहसानमंद,कसल् मंद, दौलतमंद,नियाज् मंद,फिकीर् मंद,बहरामंद, रजामंद अशी विशेषणें सिद्ध झाल्याचे डॉ.पटवर्धन[illegible]नमूद करतात. बखरींत[illegible] मात्र 'दौलतमंद' सारखी तुरळक उदाहरणे मला आढळली. मो.के.दामले[illegible]या संदर्भात अकलमंद, दौलतमंद याबरोबरच दानिशमंद हेही उदाहरण देतात.

वंत/वंद : या प्रत्ययाविषयी मूळातून विचार करणे आवश्यक होत, तसे घडलेले दिसत नाही. वंत/वंद हा प्रत्यय मराठीत दोन प्रकारे आलाः

(अ)तो कधी कधी फार्सी 'मन्द् 'या प्रत्ययाचे 'वन्त ' यात परिवर्तन होऊन येतो. उदा. गरजवंत,दरदवंत,फिकिरवंद(फा. फिक्रमन्द्),रजावंत (फा.रजामन्द् ).डॉ. पटवर्धन[illegible]यांनी हा सूक्ष्म भेद लक्षात घेतला नसावा,असे वाटते. त्यामुळे त्यांनी 'खुदावंद[illegible]' चाही अन्य उदाहरणांबरोबर समावेश केला आहे. मला बखरींत[illegible]याची अवकलवंत,दौलतवंत, हुन्नरवंत /हुन्नरवंद अशी उदाहरणे आढळली. 'गरजवंत 'हा शब्द वर्तमान मराठीतही आहे.

(आ) 'वन्द् ' या फार्सी तद्धितापासून 'खुदावंद 'सारखे शब्द मराठीत आले पण आज त्यांचा उपयोग विशेषणाऐवजी नामासारखाच होतो. खुदाबरोबरच खुदावंद हा शब्दही वापरला जातो.

वर (फा.वर् ): या प्रत्ययापासून म.म. व व.म.त विशेषणे व नामे सिद्ध झाली आहेत पण याची उदाहरणे फार नाहीत.

(अ) विशेषण - जोरावर,तालेवर,नामवर[illegible](ग्रामीण मराठीत 'तालेवरचे' 'तालेवार ' असे रूप होते.)

(आ) नाम - जनावर

वार : फार्सी 'वार् ' या प्रत्ययाचे हे मराठीकरण होय.त्याचा अर्थ endowed with, possessed of, full दृढ असा असून बखरींत[illegible] त्याची अजमासवार,उमेदवार, तपशीलवार,नावनिशीवार,नाणेवार,जिन्नसवार,लपेटवार,विल्हेवार अशी कितीतरी उदाहरणे आढळतात.डॉ. पटवर्धन[illegible] यांनी म.म. तील असामीवार,इस्मनवेशीवार, उमेदवार,कलम्वार, कैदवार,खुलासेवार, बख्तवार,बयानवार,बाबतवार शिस्तवार ही उदाहरणे दिली आहेत. राज्यव्यवहारकोशात[illegible] 'सादीलवार 'सारखे शब्द आढळतात मो.के. दामले[illegible] असामीवार,इसमवार,खानेवार,तपशीलवार,सालवार,विल्हेवार,बेतवार इ. उदाहरणे देऊन मराठी शब्दासही हा फार्सी प्रत्यय करा लागतो ते स्पष्ट करण्यासाठी नाववार,पद्धतवार, प्रतवार,असामीवार,इस्मनवेशीवार,संगतवार या शब्दांचे दाखले देतात. यांतील उमेदवारसारख्या फार्सी विशेषणाचे वर्तमान मराठीत नामात

रूपान्तर झाले आहे.

शीर (फा.सर् ): या प्रत्ययापासून विशेषणे सिद्ध झाली आहेत. डॉ.पटवर्धन[13]यांनी म.म.तील अदबशीर,आरामशीर,कायदेशीर,दाखलेशीर,नफेशीर,फाकेशीर,मसलतशीर, मोहीमशीर,वक्तशीर, हंगामशीर,हवाशीर ही उदाहरणे देली आहेत. मी ही बखरींत आढळणारी वक्तशीर,मर्यादशीर,मोहीमशीर ही उदाहरणे दिली आहेत. दामले[14] मात्र या प्रत्ययाची नोंद का घेत नाहीत, ते कळत नाही. दुर्लक्षिण्याजोगा हा फार्सी प्रत्यय खचितच नाही सध्याच्या मराठीत या प्रत्ययाने सिद्ध झालेले कायदेशीर,बेकायदेशीर, मजेशीर,वक्तशीर,हव़ेशीर हे शब्द प्रचलित आहेत.

सीर (फा.सर्) : श् > स् हे म.म.तील एक सर्वसामान्य ध्वनिपरिवर्तन आहे. त्यानुसार 'शीर ' प्रत्ययाचे 'सीर' प्रत्ययात रूपान्तर झाले की फा.सर् प्रत्ययाचे मराठीकरण होताना प्रथम 'सीर' हे रूप झाले व त्यांनतर 'शीर' हे रूप झाले,हा विचार करण्याजोगा प्रश्न आहे.'सीर 'हे रूप फा.सर् या रूपाला जुळते व अधिक जवळचे रूप आहे.या प्रत्ययाची बखरींत[15] आढळणारी आदपसीर,मोहीमसीर ही उदाहरणे मी दिली आहेत तथापि अन्य अभ्यासक त्याची फारशी नोंद घेत नाहीत.

**क्रियावाचक धातुसाधित नामे**

या संदर्भातील पुढील प्रक्रिया म.म. व व.म.त आढळतात -

(१) धातु + आ (फा.अह् ) : अंदेशा,गुजारा[16]

(२) धातु + आक (फा.आक्) : खुराक,पोशाक,पोषाक

(३) धातु + ईश (फा.इश् )

याच्या चार प्रक्रिया म.म./ व.म.त आढळतात :

(i) धातू + ईश : आजमाईश,कशीश,खाईश, निगारीश,साजीश[17] आजही मराठीत 'फमाईश ' सारखा शब्द वापरतात.

(ii) धातू + इस, ईस (फा.ईश्) : कोशीस,नवाजीस,नालीस,मालीस,बक्शीस,रंजीस ही म.म तील उदाहरणे डॉ.पटवर्धन[18] यांनी दिली आहेत. मला बखरींत ईश प्रत्ययान्त रूपांपेक्षा ईस- प्रत्ययान्त रूपे जास्त आढळली. ती अशी[19] - कमाइस,गुंजाइस, नेवाजीस,फरमाईस.

(iii) धातू + स,ष (फा.ईश्) :यात ईश प्रत्ययातील 'ई 'चा लोप होऊन पुढील रूपे सिद्ध होतात. डॉ.पटवर्धन[20] यांनी म.म. तील अज्मास,आरास ही दिलेली उदाहरणे आजच्या मराठीतूनही देता येतील. मला बखरींत[21] या दोन उदाहरणांबरोबरच खवायष-खायष(फा. ख्वाहिश्),परवरष (फा. पर्वरीश् ) ,फरमास (फा. फर्माइश्) ही उदाहरणे आढळली.

(iv) धातू + श् , स् + इ : यातील शेवटचा 'ई ' प्रत्यय मराठीत लागतो,तो मूळ फार्सी शब्दांत नाही. याची उदाहरणे मला बखरींत आढळली. ती अशी - करोशी,करोरी (फा.कोशिश् ),बाळपरवेशी (म.बाळ + फा. पर्वरिश्)

**धातुसाधित कर्तृवाचक शब्द (नामे)**

नाम + धातू : फार्सीत नामास धातू लागून कर्तृवाचक शब्द (नामे) सिद्ध होतात. असे काही धातू पुढे दिले आहेत. त्यांच्या मूळ क्रियापदांचाही निर्देश केला आहे.

अंदाज (फा.अंदाज् < अंदाख्तन् ) : डॉ.पटवर्धन[१२] याची म.म.तील पुढील उदाहरणे देतात : गोलंदाज,जालंदाज,तिरंदाज,बरकंदाज. मो.के.दामले[१३] यांनीही या प्रत्ययाची गोलंदाज,तीरंदाज,बरकंदाज ही उदाहरणे दिली आहेत.आजच्या मराठीतही 'गोलंदाज ' आहे पण तो रणभूमीवर नसून क्रिकेटच्या मैदानावर आहे ! डॉ.पटवर्धनांनी मराठी शब्दाला फा.अंदाज् हा प्रत्यय लागून काही शब्द सिद्ध झाल्याचे सांगितले आहे. (उदा. घरंदाज) पण घरंदाजसारख्या शब्दाचा उपयोग आज नामासारखा होत नसून विशेषणासारखा होतो, हे ध्यानात घ्यायला हवे.

आवर (फा.आवर् < फा. आवर्दन्) : 'आवर्दन् ' या क्रियापदाचा अर्थ आणणे असा असून 'आवर् ' हे त्याचे धातुरूप आहे. म.म. त याची जोरावर,दिलावर ही उदाहरणे आढळतात[१४].

कन्द (फा. कन्द् ): या प्रत्ययाचे म म तील 'मोहरकंद 'हे उदाहरण डॉ. पटवर्धन[१५] देतात पण ते मला बखरींत आढळले नाही. मराठीत हा प्रत्यय क्वचितच वापरला गेला आहे.

आवेज/ऐवज (< आवीज् < फा. आवीख्तन् ) : दस्तऐवज,दस्तावेज,दस्तैवज अशी उदाहरणे म.म.त आहेत[१६]वर्तमान मराठीत 'दस्तावेज'या शब्दाने एक वेगळी महत्त्वपूर्ण अर्थच्छटा धारण केली आहे. डॉ पवार[१७] शिवकालीन पत्रात्मक गद्यात 'आवेज' आढळत असल्याचा उल्लेख करतात पण त्याची उदाहरणे मात्र देत नाहीत.

कश (फा. कश् < कशीदन् = ओढणे ) : याचे मूळ स्वरूप मला[१८] बखरींत 'तरकश'(फा.तीर् कश्)या शब्दात आढळले. याचेच पुढे 'कस'मध्ये रूपान्तर झाले. (श् >स् हे म.म.तील सर्वसामान्य ध्वनिपरिवर्तन होय.) त्याचे विवरण पुढे केले आहे.

कस (फा. कश् ) : याची म.म.तील उदाहरणे डॉ.पटवर्धन[१९] यांनी पुढीलप्रमाणे दिली

आहेत - 'अकेरा,ताकेस,बार्कस,त्याच धर्तीवर गाजेकस,जोरकस '.शेवटी डॉ.पटवर्धनांनी उल्लेखिलेले दोन्ही शब्द आजच्या मराठीतही आढळतात. 'जोरकस ' हे विशेषण / क्रियाविशेषण म्हणून वापरले जाते.

कून/कोन (<फा.कुन् < फा.कर्दन् = करणे): 'कारकून 'हा शब्द म.म. व व.म.त प्रचलित आहे. बखरींत क्वचित् 'कारकोन'असेही त्याचे रूप होते.राज्यव्यवहारकोशात[५०] 'कार्कून ' हा शब्द आहे.डॉ.पटवर्धन यांनी 'कार्कून ' हे एकच उदाहरण दिले आहे. त्याच्या जोडीला मी बखरींतील 'सरकारकून ' हे उदाहरणही दिले आहे[५१].

खा (फा.ख्वाह् < फा.ख्वाश्तन् = इच्छिणे) :डॉ. पटवर्धन[५२] याचा निर्देश करीत नाहीत मात्र 'खाह् ' चे विवेचन करताना तनखा,दिलखा ही म.म.तील उदाहरणे देतात.या - बरोबरच खातरखा(खातिर् ख्वाह्) हे आणखी एक उदाहरण मला बखरींत आढळले[५३].

खाह/ख्वाह (फा. ख्वाह् ) : हे जवळपास फारसीच्या मूळ स्वरूपात स्वरान्त होऊन मध्ययुगीन मराठीत अवतरले आहे[५४]. उदा. खातर्खाह,खैरखाह् ,दौलतखाह. (मला[५५] बखरींत याचे 'खैरखाह ' एवढेच उदाहरण आढळले.)

खोर (फा. खुर् < फा.क्रि.खुर्दन् = खाणे) : 'खुर् ' हा धातू असून त्याचा अर्थ 'खा ' असा आहे. 'खाणारा ' हा मो.के.दामले[५६] यांनी दिलेला अर्थ त्या शब्दाच्या संदर्भावरून येणारा अर्थ होय,हे लक्षात घ्यायला हवे. डॉ.पटवर्धन[५७]म.म.तील पुढील उदाहरणे देतात -
कज्जेखोर,चुगलखोर,जिदखोर,तक्रारखोर,तुफानखोर,दगेखोर,दावेखोर,नशाखोर,फजीतखोर, मिजासखोर. मला बखरींत[५८]दगेखोर,दिवाळखोर, हरामखोर ही उदाहरणे आढळली. डॉ.सुधाकर पवार[५९]यांना मराठेशाहीतील पत्ररूप गद्यात 'हरामखोर 'हे एकच उदाहरण कसे आढळले याचे आश्चर्य वाटते. मो.के.दामले[६०] यांनी त्याव्यतिरिक्त खूनखोर, हलालखोर ही उदाहरणे दिली आहेत. आजच्या मराठीतही चुगलखोर,तक्रारखोर, दंगेखोर,दिवाळखोर,मिजासखोर,लाचखोर,हरामखोर हे शब्द आढळतात.

**धातुसाधित कर्तृवाचक शब्द**

(i) धातू + इन्दा (फा.अन्दह् ) : डॉ.पटवर्धन यांनी मूळ फारसी 'अन्दा 'शब्द निर्देशिला आहे,तो 'अन्दह् 'असा हवा. 'इन्दा 'हे त्याचे मराठीकरण व त्याची म.म.तील उदाहरणे अशी[६१] - निशिंदा,परिंदा,पोशिंदा,फार्मिंदा,बाजिंदा,शार्मिंदा,साजिंदा. आजच्या मराठीतही पोशिंदा,साजिंदा हे शब्द वापरतात.

(ii) धातू + ना/णा (फा.नह्) : म.म.तील उदाहरणे - दाना,तवाना[८२].आजच्या मराठीत 'ताजातवाना 'हा शब्द वापरतात. बखरींत 'दाणा ' असे 'दाना 'याचे रूप आढळते[८३]. डॉ.पटवर्धन यांनी ते निर्देशिलेले नाही. न् >ण् हे म.म.तील एक सर्वसामान्य स्वरूपाचे ध्वनिपरिवर्तन होय.

गरी/गिरी : फा.गिरफ्तन् या क्रियापदाचा अर्थ 'धरणे 'असा आहे,याचा मूळ धातू 'गीर् ' हा आहे. त्याला पुन्हा फार्सीचा 'ई ' प्रत्यय लागला की 'गिरी ' हे रूप सिद्ध होते. ही प्रक्रिया अशी मांडता येईल : फा.धातू गीर् + फा.त. ई = गिरी. यापासून बखरींत[८४] 'असमानगिरी 'सारखा शब्द सिद्ध होतो.डॉ.सुधाकर पवार[८५] यांनी शिवकालीन पत्रांतील 'जहागिरी ' सारख्या शब्दाचा उल्लेख केला आहे.राज्यव्यवहारकोशात[८६] अफताबगिर्या हे 'अफ्ताबगिरी ' या नामाचे अनेकवचनी रूप : तसेच 'बाजेगरी ' हे थोडे बदललेले (म्हणजे 'गिरी 'ऐवजी 'गरी 'असे झालेले) रूप आढळते.

गिऱ्या (फा.गीर् = धर,<गिरफ्तन् = धरणे) : मुद्दामच याचा वेगळा उल्लेख केला आहे. 'अबदगिऱ्या 'सारख्या बखरींत[८७] आढळणाऱ्या शब्दातून,अबदागिरी धरणाऱ्या व्यक्तीचा निर्देश होतो. त्याची नोंद अन्य अभ्यासकांनी घेतल्याचे आढळले नाही.

गीर (फा.धा. गीर् < फा.क्रि.गिरफ्तन् = धरणे) : याची विपुल उदाहरणे म.म. आणि व.म.त आहेत.
(i) म.म.तील पुढील उदाहरणे डॉ.पटवर्धन[८८] देतात -
अब् दागीर,अस्मानगीर,जहांगीर,दस्तगीर,दामन् गीर,दिलगीर आणि त्याच धर्तीवर तमास् गीर,दुवागीर.मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात पुढील उदाहरणे आढळतात[८९] - दस्तगीर,बारगीर,हवालगीर.बखरींतील पुढील उदाहरणे मी दिली आहेत - अबदागीर,अफदागीर,अलमगीर,जागीर,दिलगीर,दुवागीर,बारगीर. (यांतील दिलगीर हे विशेषण आहे.)मो.के.दामले[९०] अबदागीर,आलमगीर ही उदाहरणे देतात.

गुजर/गुजार(फा.धा.गुजार् = फा.क्रि.गुजाश्तन् = ठेवणे) : हे विशेषकरून म.म.त प्रचलित होते.डॉ.पटवर्धनांनी[९१]त्याची नई-गुजार,गिले-गुजार,गोश् गुजार,नजर् गुजार, मालगुजार,शुक्रगुजार ही उदाहरणे दिली आहेत. बखरींत[९२] नजर-गुजर,शुकरगुजारा हे शब्द आढळतात.सध्याच्या मराठीत तो 'मालगुजारी 'सारख्या शब्दात क्वचित् आढळतो.

गो (फा.धा.गो < फा.क्रि.गुफ्तन् = बोलणे) : हा म.म.त थोडाफार प्रचलित असावा असे डॉ.पटवर्धनांनी[९३]दिलेल्या तपशीलावरून वाटते.कानुगो,रास्तगो,सख्त् गो यासारखी त्यांनी दिलेली उदाहरणे बखरींत[९४] आढळत नाहीत.डॉ पवारांना[९५]शिवकालीन पत्रात्मक

गद्यात आढळलेला दिसत नाही. आजच्या मराठीत तर याचा मागमूसही लागत नाही.

तरास(फा.धा.तराश्<फा.क्रि.तराशीदन्[१९६]= छिलणे,कापणे to smoothen, cut) : हाही फार अल्प प्रमाणात म.म.त आढळतो.उदा.जबां-तरास,कलम्तरास,संग्-तरास, सुंब-तरास[१९७].बखरीत व मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात तो आढळत नाही[१९८].श् > स् ही म.म.तील सामान्य व्यंजन-प्रक्रिया होय.

तलब (फा.धा.तलब् < फा.क्रि.तलबीदन्[१९९]=बोलावणे,मागणे,शोधणे To search,call): हाही म.म.त फार अल्प प्रमाणातच आढळतो. उदा. ज्यादा - तलब, रजा - तलब[२००].

दान/दां (फा. धा.दान् < फा.क्रि.दानिश्तन्) : दान् चा अर्थ 'जाण 'असा असून म.म.तील कदर् दान,कारदान[२०१]या शब्दांना अनुक्रमे कदर जाणणारा(बाळगणारा), काम जाणणारा असे त्याचे अर्थ होतात. बखरीत कदरदां,करदान ही रूपे मला आढळली[२०२]. डॉ.पवार[२०३]याचा केवळ उल्लेख करतात पण शिवकालीन पत्रांतील त्याची उदाहरणे देत नाहीत.

दार(फा.धा. दार् < फा.क्रि.दाश्तन्) : हा फार्सी धातू मराठीत अत्यंत लोकप्रिय आहे. 'दाश्तन्'चा अर्थ जवळ असणे,बाळगणे,धारण करणे असा आहे. म.म.च नव्हे तर व.म.तही त्याची विपुल उदाहरणे आढळतात. डॉ.पटवर्धनांनी[२०४]अजुर्दार,कबिलेदार, छान्दार,तर्‍हेदार,दमदार,नोक्दार ही उदाहरणे दिली आहेत तर राज्याव्यवहारकोशात[२०५] आबदारखाना,कमानदार,कमाविशदार,हवा्लदार,खासदार,जमातदार,जामदार,जुमलेदार, कमान्बार्दार,दफ्तरदार,नेजदार,पल्लोदार,पोतदार,बर्खुरदार,बागदार,बुटेदार,मजमुदार,मजूर्दार, महाल्दार,शराब्दार,सर्पदार,हुकुमबर्दार इ. शब्द आढळतात.शिवकालीन पत्रात्मक गद्यात येणारे पुढील शब्द डॉ.पवार[२०६] यांनी दिले आहेत -
जामदार,जुमलेदार,ठाणेदार,दिवटीदार,माहालदार,मिरासदार,मोकळदार,सुभेदार,हवालदार, हुदेदार.मला बखरीत पुढील उदाहरणे आढळली[२०७] -
अमलदार,कमानदार,कमावीसदार,खजानदार,चोपदार,जिम्मेदार,तकशीरदार,तगारदार,ताबेदार, पोतदार फौजदार. आजच्या मराठीतही 'दार' हा धातू लागून सिद्ध झालेले असंख्य शब्द वापरले जातात. बदलत्या काळाचा वा राजवटींचा कोणताच परिणाम त्यावर झालेला नाही - इनामदार,इज्जतदार,जमादार,जमीनदार,जामिनदार,फौजदार, मामलेदार,मिरासदार,मोतदार,सरदार,सुभेदार,हवालदार इ.

दोज(फा.धा.दोज्<फा.क्रि.दोख्तन् = शिवणे,to sew,to pay, to perform[२०८]):याची डॉ.पटवर्धनांनी[२०९] म.म.तील पुढील तीन उदाहरणे दिली आहेत- चर्मदोज,जमीन्

दोज,हवादोज.डॉ पवारांना[२१०] मराठेशाहीतील पत्रवाङ्मयात याची उदाहरणे आढळली नाहीत आजच्या मराठीतही तो वापरला जात नाही.मो.के.दामलेही[२११]तो नोंदवीत नाहीत.

नवाज (फा.धा.नवाज् < फा.क्रि.नवाख्तन् = काळजी घेणे,पाळणे,वाजवणे to soothe, caress,play,treat humanely[२१२]) : याची डॉ.पटवर्धन[२१३] गरीब् नवाज,चंग-नवाज, तासे-नवाज, ही उदाहरणे देतात.त्यांपैकी 'गरीब नवाज 'हे उदाहरण मलाही बखरींत[२१४] आढळले. एकनाथांच्या 'अर्जदास्त 'सारख्या पत्रात्मक भारुडांत[२१५] 'बंदेनवाज ' हा शब्द (बहमनीकाळात)आढळतो. खरे तर शिवशाहीतील पत्रात्मक गद्यात तो आढळावयास हवा तथापि डॉ.पवार[२१६]यांनी त्याचे उदाहरण दिलेले नाही.यांची आजच्या मराठीत 'शहनाईनवाज 'सारखी अपवादात्मक उदाहरणे आढळतात.

णवीस/णिवीस (पाहा-नवीस) : फा.'नवीस्'या धातूची णवीस/णिवीस ही रूपे म.म.त-विशेषतः बखरींत आढळतात. त्यांची वेगळी नोंद अभ्यासकांनी घ्यायला हवी होती,ती मी घेतली आहे.[२१७] उदा. चिटणवीस, चिटणिवीस,फडणवीस.

णीस (फा. धा. नवीस्. पाहा-नवीस /नीस) : सध्याच्या मराठीत चिटणीस,फडणीस ही आडनावे आढळतात. बखरकाळात ती पदे होती. बखरींतील[२१८] चिटणीस,फडणीस या शब्दांप्रमाणेच कापडणीस हे (मराठी नाम् + फार्सी धातू असलेले) संमिश्र रूपही मी नोंदविले आहे. दामल[२१९] यांनी 'णीस 'हा प्रत्यय नोंदविला नसला तरी 'फडणीस 'हे ' उदाहरण मात्र 'नवीस 'चे विवेचन करताना दिले आहे.

नवीस,निवीस - नीस (फा.धा.नवीस् < फा.क्रि.नवीश्तन् = लिहिणे[२२०]) : मराठीतील अत्यंत लोकप्रिय फार्सी धातू तो म.म.प्रमाणेच व.म.तही असंख्य शब्दांत आला आहे -
डॉ.पटवर्धन[२२१] - अख्बार-नवीस,नकल्-नवीस,वाक्नीस
डॉ.पवार[२२२] - सबनीस,वाकेनवीस,मदतनीस
मी[२२३] याचे बखरींतील 'निवीस 'हे वेगळे रूपही निर्देशिले आहे -खासनवीस,वाकनवीस, फडनवीस आणि चिटनिवीस 'नीस 'ची बखरींतील मला आढळलेली उदाहरणे अशी - अकबरनीस,कारखानीस,पागनीस,पारसनीस,पोतनीस,वाकनीस इ.'नीस 'आणि 'नशीन ' यांच्यामध्ये गल्लत होऊ नये यासाठी मी या संदर्भात पूर्वी केलेले विवेचन महत्त्वाचे असल्याने ते येथे उद्धृत करतो - 'हत्तीनीस ' या बखरींत आढळणाऱ्या शब्दाचा अर्थ 'हत्तीवर बसण्याचा मान असलेला मातबर माणूस 'असा आहे .'नशीन 'ऐवजी 'नीस ' हे चुकीचे रूप वापरले असावे असे वाटते. 'पालखीनवीस ' या शब्दाचा अर्थ 'ज्याला पालखीचा मान आहे असा बडा सरदार 'असा आहे.येथेही वस्तुतः 'नशीन ' हाच प्रत्यय हवा. 'तख्तनशीन' शब्दाचे मात्र बखरींत 'तखतनीस ' असेही रूप आले आहे.

त्यावरून 'नशीन'ऐवजी 'नीस' या प्रत्ययाची गल्लत झाली असावी किंवा तो वापरण्याचा प्रघात पडला असावा असे दिसते.मात्र ही लकब फक्त मराठीतच आढळते[२२४]'

नशीन(फा.धा.नशीन् < फा.क्रि.निशस्तन् = बसणे) : हा म.म.तच वापरल्याचे आढळते त्याची विपुल उदाहरणे डॉ.पटवर्धन[२२५]देतात - किल्लेनशीन,खातर् नशीन,गोशेनशीन, जन्नतनशीन,तख्तनशीन,दिल् नशीन,पडदेनशीन,पालखीनशीन,बेहेस्तनशीन,मस्नदनशीन. याबरोबरच ते 'गादीनशीन 'असे मराठी-फार्सी संमिश्र उदाहरणही देतात.मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात डॉ.पवार[२२६] यांना याचे एकही उदाहरण कसे आढळले नाही,ते कळत नाही. बखरींत[२२७]मात्र मला तखतनशीन,फौजनशीन हे शब्द आढळले.

नुमा(फा.धा.नुमा ? < फा.क्रि. नमूदन्[२२८] = दाखविणे, to show): हा प्रत्यय म.म.तच आढळतो व तोही फार अल्प प्रमाणात.मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात[२२९] व बखरींत त्याची उदाहरणे आढळत नाहीत.डॉ.पटवर्धन यांनी त्याची म.म.त आढळणारी पुढील उदाहरणे दिली आहेत - किब्लेनुमा,खुशनुमा,फलक्नुमा.
मो.के दामले[२३०] ही याचा उल्लेख करीत नाहीत.

पर्दाज (<फा.क्रि.परदाख्तन्?= पूर्ण करणे,finish[२३१]) : डॉ.पटवर्धन याचे मूळ दर्शवीत नाहीत तथापि त्याचा 'कर' असा अर्थ देऊन 'कार्पर्दाज' हे उदाहरण देतात.स्टेनगॅसने परदाख्तन् या क्रियापदाचा वरीलप्रमाणे अर्थ दिला आहे. हा प्रत्यय म.म.त. क्वचित् आढळतो व व.म.त तर आढळतच नाही.

पर्वर (फा.धा.पर्वर् = पाळ, nourish[२३२]) : हा प्रत्यय मला बखरींत[२३३] व डॉ.पवार यांना मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात आढळला नाही.मात्र डॉ.पटवर्धन[२३४] यांनी तो निर्देशिला आहे व त्याचे 'गरीबपर्वर ' हे म.म.तील उदाहरणे दिली आहे.

परस्त : याचा 'भज 'असा अर्थ डॉ. पटवर्धन[२३५] देतात व त्याची म.म.तील पुढील उदाहरणे देतात-बुत्परस्त, हक्परस्त.मला तो बखरींत आढळला नाही व डॉ. पवारांनीही[२३६] त्याचे शिवकालीन पत्रात्मक वाङ्मयातील उदाहरण दिलेले नाही.

पाश(फा.धा. पाश् < फा.क्रि. पाशीदन् = शिंपडणे ,to sprinkle,to scatter[२३७]) : म.म.तही त्याची उदाहरणे क्वचितच आढळतात.डॉ.पटवर्धन[२३८] यांनी 'गुलाब् - पाश ' हे उदाहरण दिले आहे. सध्याच्या मराठीत तर तो लुप्तच झाला आहे.

पिजीर : याचा 'स्वीकार 'असा अर्थ देऊन डॉ.पटवर्धन[२३९] 'सूरतपिजीर 'हे म.म.तील

(क्वचित् आढळणारे) उदाहरण देतात.

पैबन्द : याचा 'जोड 'असा अर्थ देऊन डॉ.पटवर्धन[२०]यांनी म.म.तील 'अबद - पैवंद ' हे उदाहरण दिले आहे तथापि म.म.त देखील त्याचा वापर कमीच झाला असावा असे बखर व मराठेशाहीतील पत्रात्मक वाङ्मय यांचे अवलोकन केल्यास जाणवते.

पोश/पोस(फा.धा.पोश् < फा.क्रि.पोशीदन् = झाकणे,आच्छादणे,to cover,to dress[२१]) : याची म.म.तील कुल्हापोश,खानपोश,गर्दपोस,पलंगपोस,पायपोस,बख्तरपोस, शिलेपोस ही उदाहरणे डॉ.पटवर्धन[२२] यांनी दिली आहेत तर मला[२३] बखरींत पायपोस,बख्तरपोस,शिलेपोस ही उदाहरणे आढळली. आजच्या मराठीतील 'पायपोस ' सारख्या शब्दात या प्रत्ययाचे उरलेसुरले अस्तित्व जाणवते.

फराज(फा.धा.फराज् < फा.क्रि.फराख्तन्, अफराख्तन् = उंचावणे to elevate, exalt[२४]) : याचे सर्फराज किंवा सरफराज असे एकमेव उदाहरण म.म.त आढळत[२५]

फरोश(< फा.धा.फरोश् < फा.क्रि.फरोख्तन् = विकणे, to sell[२६]) : हा प्रत्यय मला बखरींत आढळला नाही.डॉ.पटवर्धनांनी[२७] त्यांची म.म.तील बुत्फरोश,मेवेफरोश ही उदाहरणे दिली आहेत.

बन्द(फा.धा. बंद् < फा.क्रि.बस्तन् = बांधणे) : याचे सादृश्य संस्कृत 'बंध 'शी दिसले तरी म.म. त तो जेव्हा अरबी-फार्सी शब्दांना जोडून येतो,तेव्हा तो फा.बंद् पासूनच आला आहे, हे मान्य करायला हवे. याचे डॉ.पटवर्धनांनी[२८] 'नालबंद ' सारखे उदाहरण दिले आहे.मी बखरींतील[२९] कमरबंद,किल्लेबंद,नालबंद,बाजूबंद,फौजबंद ही उदाहरणे दिली आहेत. डॉ.पवार[३०] मात्र त्याचा उल्लेख करीत असले तरी ऐतिहासिक पत्रात्मक वाड्मयातील उदाहरणे देत नाहीत. डॉ.पटवर्धनांनी या संदर्भात 'पगडबंद ' हेही एक उदाहरण दिले आहे,त्याचा खुलासा करायला हवा. यातील पगड (पगडी) हा शब्द जरी संस्कृतपासून आला असला तरी त्यापुढील 'बंद 'हा प्रत्यय फार्सीपासूनच आला असावा. मराठवाड्यात शिरूर ताजबंद हे गाव आहे,तेथे निजामाच्या पगड्या(ताज)बांधल्या/तयार केल्या जात. पगडबंद व ताजबंद यामागील प्रक्रिया समानच आहे.

बर्दार/बारदार(फा.धा.बर्दार्,फा.कि.बर्दाश्तन् = आणणे,उचलणे) : मराठेशाहीतील पत्रांत हा प्रत्यय आढळत असल्याचा उल्लेख डॉ.पवार[३१] करतात पण उदाहरणे देत नाहीत. डॉ.पटवर्धनांनी खास-बर्दार,चौरी-बर्दार,निशाण-बर्दार,बंदूक-बर्दार,हुकूमबर्दार ही विपुल उदाहरणे दिली आहेत. 'बर्दार ' ऐवजी 'बारदार 'ची चवरीबारदार,निशाणबारदार अशी

अनेक उदाहरणे मला बखरींत[२५२]आढळली.

बर/भर(फा.धा.बर् < फा.क्रि.बुर्दन् = आणणे,नेणे, to carry,bear,bring[२५३]) : डॉ.पटवर्धन[२५४] याचा 'नेणे 'या अर्थाबरोबर 'हरण करणे 'असा अर्थ देतात,तो त्यांनी दिलेल्या दिलभर,पैगम्बर या उदाहरणांना तितकासा लागू पडत नाही. या संदर्भात स्टेनगॅसचे वरील अर्थ मला अधिक योग्य वाटतात.बखरींतही पेगंबर,पैगंबर ही उदाहरणे आढळतात.एकनाथकालीन मुरारीमल्ल बासाच्या 'दर्शनप्रकाश 'सारख्या ग्रंथात 'पेगांबरी मत ' हा उल्लेख आढळतो.आजच्या मराठीतील 'पैगंबर 'या शब्दाशिवाय याचे दुसरे उदाहरण देता येत नाही.

बाज(फा.धा. बाज़् < फा.क्रि. बाख्तन् = खेळणे) : म.भ.त हा प्रत्यय जितका लोकप्रिय होता तितकाच तो आजच्या मराठीतही लोकप्रिय आहे. डॉ.पटवर्धनांनी[२५५] म.म.तील निर्देशिलेल्या आतस्बाज,इश्कबाज,कत्तल्बाज,कायदेबाज,कुर्रेबार,जहाँबाज,दगल्बाज, दारूबाज,नजर्बाज,नफेबाज,निशाबाज,निशाणबाज,मन्सुबेबाज या उदाहरणांपैकी मला बखरींत[२५६] कतलबाज,दगाबाज मनसबाबाज ही उदाहरणे आढळली. डॉ.पवार[२५७] या प्रत्ययाचा उल्लेख करतात पण मध्ययुगीन पत्रात्मक गद्यातील उदाहरणे देत नाहीत. आजच्या मराठीत कावेबाज,कुर्रेबाज,जहांबाज,दगाबाज,नशाबाज या शब्दांबरोबरच 'रंडीबाज 'सारखा मराठी-फार्सी-संमिश्र शब्दही आढळतो.याची चित्तेबाज,रांडबाज, पक्षीबाज़ ही बखरींतील उदाहरणे ही मी दिली आहेत[२५८].

बीण/बीन(फा.धा.बीन् < फा.क्रि. दीदन् = पाहणे,to see,look[२५९]) : दुर्बीण, तमासबीन,बारीकबीन ही या संदर्भातील म.म.मधील उदाहरणे डॉ.पटवर्धन[२६०] यांनी दिली आहेत.बखरींत[२६१] मला दुर्बीण,दुरबीन ही उदाहरणे आढळली.

बोस(फा.धा.बोस् < फा.क्रि.बोश्तन् = चुंबणे) : म.म.त[२६२] 'कदम्बोस' सारखा शब्द क्वचित आढळतो.

भीण(पाहा- बीण) : बीण/बीनचे 'भीण' असेही रूपान्तर होते.मला बखरींत[२६३]'दुरभीण' असे रूप आढळले. ब् >भ् किंवा भ् > ब् हे म.म.तील सर्वसामान्य स्वरूपाचे ध्वनिपरिवर्तन होय.

माल(फा.धा.माल् < फा.क्रि.मालीदन् = पुसणे, to rub,polish[२६४]) : याची म.म.तील गोश्माल,दस्तमाल,पायमाल,रुमाल ही उदाहरणे डॉ.पटवर्धन[२६५] देतात. डॉ.सुधाकर पवार[२६६] याचा मराठेशाहीतील पत्रवाङ्मयाच्या संदर्भात उल्लेख करतात पण

उदाहरण मात्र देत नाहीत.बखरीत[illegible] गोशमाल - गोषमाल,रुमाल हे शब्द आढळतातच पण 'हातरुमाल 'सारखा मराठी - फार्सी संमिश्र शब्दही आढळतो. रुमाल व हातरुमाल हे दोन्ही शब्द आजच्या मराठीत वापरले जातात.

याब(फा.धा.याब् < फा.क्रि. याफ्तन् = मिळविणे) : डॉ. पटवर्धन[illegible] कामयाब,बारयाब ही उदाहरणे देतात तर बखरीत[२४१] 'पायाब 'हे उदाहरण आढळते.

रुबा(फा.धा.रूब्,फा.क्रि.रुबीदन् = हरण करणे,लुटणे,to seize,rob,plunder[illegible]) : हा प्रत्यय म.म.त क्वचित् आढळतो.डॉ.पटवर्धन[illegible] त्याचे 'दिलरुबा ' हे उदाहरण देतात. त्यांनी दिलेल्या दुसऱ्या 'केरबा 'या उदाहरणाचा उलगडा होत नाही.

रूब्(फा.धा.रूब् < फा.क्रि.रूबीदन् = झाडणे, धूळ काढणे, to wipe,sweep, dust[illegible]) : 'झाडू ' हा म.म.त[illegible] व व.म.त प्रचलित असलेला शब्द फा.जारुब् चे मराठीकरण होय !

रेज(फा.धा.रेज् < फा.क्रि.रेख्तन् = ओतणे, to pour,diffuse,scatter[illegible]) : डॉ.पटवर्धनांनी[illegible] दिलेले 'रंगरेज 'हे म.म.तील उदाहरण आजही व.म.त आढळते. रंगाऱ्यांना 'रंगरेज ' म्हणतात.

शिकन(फा.धा.शिकन् <फा.क्रि. सुकुस्तन्/शिकस्तन् = फोडणे,to be broken or torn up[illegible]) : 'बुतशिकन ' हे म.म. त आढळणारे उदाहरण. याचा वापर म.म.तही क्वचितच झाला. आजच्या मराठीत तो आढळत नाही.

### III सामासिक शब्द

सामासिक शब्दांची निर्मिती हे जसे मराठी भाषेचे वैशिष्ट्य आहे तसेच ते फार्सी भाषेचेही आहे.शब्दसंग्रहाच्या जडणघडणीत सामासिक शब्दांचे योगदान लक्षणीय असते. मराठी भाषेने संस्कृतची समासव्यवस्था स्वीकारली. असली तरी तिला स्वतःचे मराठमोळे रूप देण्याचाही प्रयत्न केला. मराठीचा फार्सीशी संपर्क आल्याने मराठीवर फार्सीच्या सामासिक शब्दनिर्मिति -प्रक्रियेचाही महत्त्वपूर्ण प्रभाव पडल्याचे जाणवते. असे नसते तर एवढ्या मोठ्या प्रमाणावर अरबी-फार्सी शब्दयुक्त सामासिक शब्दांचे आगमन मराठीत झालेच नसते. या सामासिक शब्दांत अरबी-फार्सी शब्दांचा जसा भरणा आहे, त्याचप्रमाणे अरबी/फार्सीच्या जोडीला असंख्य मराठी शब्दही आले आहेत. अरबी - फार्सी शब्दांचे योगदान घेताना मराठी भाषेला संकोच वाटलेला नाही तर एक प्रकारचे आपलेपणच वाटलेले दिसते. मराठी समासव्यवस्थेत फार्सीची समासव्यवस्थाही

बेमालूमपणे मिसळली आहे. अव्ययीभावापासून बहुव्रीहीपर्यंतच्या साऱ्याच समास-प्रकारांत अरबी-फार्सीचा वावर कसा दिसतो, त्याचा विचार पुढे अनेक उदाहरणांच्या साहाय्याने केला आहे. हा अनुबंध वरवरचा नसून मराठीच्या प्रकृतीशी व गाभ्याशी नाते सांगणारा आहे;पण त्याचा जसा विचार व्हायला हवा होता,तसा झाला नाही असे मला वाटते. मात्र याबाबतीत इति.राजवाडे,डॉ.पटवर्धन[१३] व श्री.मो.के.दामले यांनी दिलेल्या योगदानाची कृतज्ञतापूर्वक नोंदही अवश्य घ्यायला हवी.

(१) अव्ययीभाव समास :

संस्कृत अव्ययीभाव समासाच्या उदाहरणांपेक्षा मराठीत अरबी-फार्सी शब्दयुक्त समासाची उदाहरणे अधिक असून विपुल आहेत. मध्ययुगीन मराठी साहित्यात (विशेषतः पत्रात्मक गद्य वाङ्मयात व बखरींत) हे प्रमाण नजरेत भरण्याजोगे आहे. 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्या'च्या भाषिक पाहणीत डॉ.सुधाकर पवार[१४] यांनी ही बाब सरळसरळ मान्य केली आहे. ते म्हणतात, 'संस्कृत अव्यये ज्यांत आहेत अशा शब्दांपेक्षा यावनी म्हणजे फारसी किंवा अरबी शब्दांचे सामासिक शब्द या पत्रव्यवहारात अधिक प्रमाणात आढळतात. उदा. हरयेक,हरजिन्नस,दरसवाद,दरसवदे,कुलबाब,कुलकानू,दरमजल,बितपशील बरहुकूम,बेइमान,दरहरसाल,दरमाहे,दरोज,दरकारकीर्द.संस्कृत अव्ययीभाव तर जवळजवळ नगण्यच आहे. 'आचंद्रार्क ' सारखा एखाददुसरा दुसरा शब्द आढळतो. यथा,प्रति,आ इ. अव्ययांनी युक्त सामासिक शब्द आढळत नाहीत. छत्रपतींच्या पत्रांखेरीज उत्तरकालीन पत्रव्यवहारात मात्र प्रतिपक्षी,प्रतिवर्षी यासारखी उदाहरणे आढळतात.'

श्री.मो.के.दामले यांनी या पूर्वीच मांडलेले मतही माझ्या वरील विधानास साहाय्यभूत ठरते.ते म्हणतात[१५],'पुढील(४२८)अंकांत सांगण्यात येणारे समास वर्ज्य केले असता निवळ मराठी शब्दांचे संस्कृत पद्धतीचे समास मराठींत नाहींतच असें म्हटलें असतां चालेल. संस्कृतशिवाय जे अव्ययीभाव समास मराठींत दिसतात,ते दोन प्रकारचे आहेत (अ) 'यावनी ' म्हणजे फारसी किंवा अरबी. जसें दरकूच,दरमजल,दररोज, बिनधोक, बिनहरकत,बिनतकरार,बेलाशक,बेमालूम,बेशक,बेक़ायदा,बरहुकूम,बजिन्नस,गैरकायदा इ. टीप - 'हर 'युक्त समास 'हरवक्त,हररोज,हरहमेष 'इ. शब्दांतील 'हर ' हे मूळ विशेषण आहे.त्यास अनुसरून या शब्दांचा कर्मधारय समासांत अंतर्भाव झाला पाहिजे परंतु ह्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणेच उपयोग होत असल्यामुळे ह्यांस अव्ययीभाव म्हणणें बरें. (आ) 'संकीर्ण ' म्हणजे निरनिराळ्या भाषांतील शब्द एकत्र येऊन झालेले. जसें :- दरदिवस,दरवर्ष,बिनअपराध,बिनतोड,हरदिवस,हरघडी इ.'

श्री दामले यांनी 'अ ' मध्ये दिलेले बिनधोक हे उदाहरण 'आ ' मध्ये समाविष्ट करायला हवे. 'आ 'विषयी पुढे 'संमिश्र अव्ययीभाव' या प्रकाराविषयी विवेचन करताना विचार केलाच आहे.बखरींत मला[१६] या प्रकाराची पुढील उदहरणे आढळली - अहततहत,अलहदतहद,गैरवाजवी,गैरहजीर,गैरमाहीत,दरसाल,दरमजल,दरमहा,दरसदे,

बजोर,बजिन्नस,बिनजरी,बरहक,बरहुकूम,बरबाद,बेमालूम,बेवसवसा,बेफिकीर,बेहोष,
बेहुशार,बेखबरदार,बेलाशक,हरतऱ्हा,हरवक्त इ.

संमिश्र अव्ययीभाव

या प्रकारास श्री.मो.के. दामले[१८१] 'संकीर्ण 'म्हणतात व त्याचे सोदाहरण स्पष्टीकरण करताना "संकीर्ण ' म्हणजे निरनिराळ्या भाषांतील शब्द एकत्र येऊन झालेले,जसें :- दरदिवस,दरवर्ष,बिनअपराध,बिनतोड,हरदिवस,हरघडी 'इ.'ही माहिती देतात. वस्तुतः या प्रकारात अरबी/फार्सी आणि मराठी या भाषांतील शब्द एकत्र येऊनच सामासिक शब्द सिद्ध झाले असल्याने त्यासाठी 'संमिश्र ' ही संज्ञा योजणे अधिक समर्पक ठरेल असे मला वाटते.

मला[१८२] बखरींत या प्रकाराची पुढील उदाहरणे आढळली : दरसेकडा,बिनघोरी, बिनबोभाट,बिनव्याजू,बिनहत्यार,बेसावध इ.

आजच्या मराठीतील गैरलागू,गैरवर्तन,गैरवर्तणूक,दरशेकडा,बिनबोभाट,बिनव्याजी,बेबनाव, हरघडी अशी या प्रकाराची कितीतरी उदरहरणे देता येतील.

विभक्त्यन्त अव्ययीभाव

या सामासिक शब्दांना तृतीया किंवा सप्तमी या विभक्तींचे अनुक्रमे इ,एं,ने आणि इं हे प्रत्यय लागतात. यात अरबी-फार्सी शब्दयुक्त तसेच अरबी-फार्सी व मराठी असे संमिश्र सामासिक शब्द आढळतातः

(i) रस्तोरस्तीं,सालोसालीं,जागोजागीं

(ii) आजरोजीं,दरदिवशीं,दरवेळीं,बिनव्याजी,हरप्रकारें,गैरमार्गाने / गैरमार्गे

द्विरुक्तिघटित अव्ययीभाव

फार्सीच्या या नवीन प्रकाराकडे इति. राजवाडे[१८३] यानी प्रामुख्याने लक्ष वेधले. ते म्हणतात,'फारशीवरून मराठींत दोनचार समास करण्याच्याहि नवीन पध्दती आल्या. फारशींत दोन शब्दांच्या मध्यें अलीफ म्हणजे आ येऊन एक समास होतो,जसें बराबर. ह्याच धर्तीवर मराठींत पटापट,सटासट,सरासर,घराघर वगैरे सामासिक शब्द होतात. फारशींत कित्येक शब्दांच्या मध्ये वाव म्हणजे उ किंवा ओ येऊन समास होतो; जसें, दार-उ-दार, घर-उ-घर,रान-उ-रान = दारोदार,घरोघर,रानोरान वगैरे.'

इति.राजवाडे यांनी येथे दिलेली घरोघर,दारोदार व रानोरान ही उदाहरणे बरोबर असली,तरी ती मराठी शब्दांची आहेत व त्यांच्यामध्ये फार्सी वाव(उच्चार : उ किंवा ओ) आला आहे फार्सी शब्दांची बरोबर (< बर् - उ - बर् ) , जागोजाग (जाय्गाह् - उ - जाय्गाह् ), सरोसरा (सर् - उ - 'सर् ) ही बखरींतील उदाहरणे मी[१८४] दिली आहेत. श्री. दामले यांनी या संदर्भात प्रतिपादिलेल्या मतात एक दुरुस्ती करायला हवी.

ते[१७९] म्हणतात,'मराठीमध्ये प्रति या अव्ययाचा उपयोग न करितां पुढील नामच द्विरुक्त होऊन अव्ययीभाव समास होतात. मात्र त्या नामाच्या प्रथमोक्तीच्या वेळीं त्याच्या अन्त्यास **ओ हा आदेश होतो**.जसे : घरोघर,जागोजाग,गांवोगांव,दारोदार,घडोघडी इ.' हा आदेश फार्सी 'वाव्' मुळे मिळाला आहे, हे विसरून चालणार नाही.

(२) **तत्पुरुष समास**

या समासातील पहिल्या पदाच्या विभक्तीचा(म्हणजे विभक्तिप्रत्ययाचा)लोप झालेला असतो व त्या विभक्तीचेच नाव त्या समासाला देतात.मराठीत दोन्ही पदे अरबी/फार्सी असलेले किंवा एक पद अरबी/फार्सी आणि दुसरे मराठी (संमिश्र) - असे सामासिक शब्द मध्ययुगापासून[१८०] आढळतात :

तृतीया तत्पुरुष - खजानपुर,प्यादेमात,फौजबंद,रोजगारसंपन्न,हत्यारबंद इ.

चतुर्थी तत्पुरुष - आरामस्थान,आरामक्षेत्र,कमरगुर्दा,कमरबंद,कमरशाल,कलमदान,
कबूतरखाना,खाणेखर्च,गोरकपण,जेरबंद,दिलभरंवसा,शिरपेच,
सरकार-उपयोगी,सरकारकाम,हातरुमाल इ.

पंचमी तत्पुरुष : (शब्दयोगीसाधित)

मराठेशाहीतील पत्रात्मक गद्यात,शिवकालीन/शिवाजी महाराजांच्या पत्रांत[१८१] त्याचप्रमाणे दप्तर-वाङ्मयात बहुधा अनेक पत्रांच्या प्रारंभी 'अजर 'हा शब्द येतो तो 'अज् रखखाने ' या फार्सी शब्दांचा संक्षेप वा संक्षिप्त रूप आहे. 'अज् 'चा पासून असा अर्थ आहे व या दोन्ही शब्दांचा अर्थ 'कचेरीपासून असा 'आहे.(काही वेळा हे मूळ पूर्ण शब्दही वापरले गेले आहेत.)या 'अज्' ने पंचमी विभक्तीचे कार्य साधले आहे असे मला वाटते. अभ्यासकांच्या विचारार्थ हा मुद्दा नोंदवून ठेवीत आहे कारण त्याचा असा विचार यापूर्वी कुणी केल्याचे माझ्या वाचनात नाही.

षष्ठी तत्पुरुष - अरबी/फार्सीतून मराठीत आलेल्या सामासिक शब्दांमध्ये या समासाचे प्राबल्य आढळते.

(i)दोन्ही पदे अरबी/फार्सी -

इनामखर्च,इनामजमीन,इनायतनामा,उष्टरखाना,कलमबंदी,कौलनामा,खजीना-अमदानी, खरेदीखत,खुशखरेदी,जमावबंदी,तोफखाना,दप्तरखाना,दर्याकिनारा,दरबारखर्च,दायाखाना, दारूखाना,दवाखाना,नगारखाना,पागा-सरंजाम,हुकूमनामा इ.

(ii)एक पद अरबी/फार्सी तर दुसरे मराठी -

ऐवजभरणा,कमावीशपत्र,करारपत्र,करारभंग,कायदेभंग,कारकूनमंडळ,कारकूनलोक,किल्लामोजणी, कोतवालचावडी,खासगीखर्च,खासगीगांव,गर्दनछेद,गाडीखाना,गुलाबपाणी,जकातनाका, जप्तीचिठी,जमीनमोजणी,जासूदजोडी,ताकीदपत्र,तापीकिनारा,परतालुका,परमुलूख,भोजनखर्च, राजदरबार,राजमहाल,सरकारवाडा,शेतगल्ला इ.

सप्तमी तत्पुरुष - इतिहासजमा,किल्लेबंद,घर-कैद,घर-फितूर,पाण-बुरुज,बाजारबसवी, रणजखमी,सरकार-जमा,सरकार-भरणा,स(सा)रे दरबार इ.

उपपदतत्पुरुष समास - या तत्पुरुष समासातील दुसरे पद हे धातुसाधित असून त्याचा स्वतंत्र उपयोग होत नाही, अशी श्री.दामले[illegible] यांनी व्याख्या केली आहे.मराठीतील या प्रकारच्या अरबी /फार्सी सामासिक शब्दांकडे वैयाकरणांचे लक्ष गेलेले दिसत नाही त्यामुळेच श्री.दामले यांच्या यादीत 'बाजारबसवी ' या शब्दाचा अपवाद वगळता एकही उदाहरण आढळत नाही आणि त्या सामासिक शब्दाचा समावेशही माझ्या मतानुसार सप्तमी तत्पुरुष समासात होतो.अरबी /फार्सी क्रियापदे, त्यांचे धातू व त्यापासून सिद्ध होणारी धातुसाधिते यांची कल्पना नसल्याने असे घडले असावे.मला तर अशा प्रकारच्या सामासिक शब्दांची(मध्ययुगीन मराठीपासून वर्तमान मराठीपर्यंतची पाहणी करताना)फार मोठी यादी आढळली.यातील प्रमुख फार्सी क्रियापदे,त्यांचे धातू इ. लक्षात घेतल्यास या सामासिक शब्दांचा समावेश उपपद तत्पुरुष समासात का करायला हवा ते लक्षात येईल. यासाठी त्यांतील काही पुढे देत आहे -

| फार्सी क्रियापद | धातू |
|---|---|
| अन्दाख्तन् (=फेकणे) | > अंदाज् |
| कर्दन् (=करणे) | > कुन् (म.कून) |
| गिरफ्तन् (=धरणे,घेणे) | > गीर् |

दानिश्तन् ( जाणणे)>दान्
दाश्तन्(= बाळगणे,जवळ असणे )>दार्
नविश्तन् (= लिहिणे)> नवीस् (म.णवीस/नीस/णीस)
निशस्तन् (=बसणे)> नशीन्
बस्तन् (=बांधणे)> बन्द्
मालीदन् (= मळणे,पुसणे)> माल्
उदाहरणे -

अबदागीर,अमलदार,इजारदार,इनामदार,इमानदार,कतलबाज,कदरदान,कर्जदार,कामदार, कारकून,किल्लेदार,खबरदार,चिटणवीस/चिटणीस,चोप(ब)दार,जमादार,जमीनदार, जहागीर,तख्तनीस,तमासगीर,पालखीनशीन,फौजबंद,बाजूबंद,बारगीर,मिरासदार,मुद्देकरी, रुमाल,शिकिलकर/शिकलग(गा)र,सौदागर इ.

टीप - येथे एका बाबीची नोंद घ्यायला हवी, असे वाटते.अव्ययीभाव आणि नञ तत्पुरुष या समासाच्या संदर्भात काही उदाहरणे समान असल्याचे जाणवते.
श्री मो.के दामले[illegible]यांनी 'बिन 'आणि 'बे ' उपसर्गयुक्त सामासिक शब्दांचा समावेश अव्ययीभाव समासात केला आहे व केवळ 'ना 'उपसर्गयुक्त समासिक शब्दांचा समावेश नञ तत्पुरुष समासात केला आहे. डॉ.पटवर्धन[illegible] यांनी निषेध वा अभाव व्यक्त करणाऱ्या

साऱ्याच गैर,ना,बे उपसर्गयुक्त सामासिक शब्दांचा समावेश नञ तत्पुरुष समासात केला आहे. त्या त्या शब्दांचे त्या त्या सामासिक शब्दाच्या संदर्भातील कार्य लक्षात घेऊन त्यांचा समावेश एक वा अनेक समास - प्रकारात करावा लागतो. ही एक अपरिहार्यता आहे, हे लक्षात घ्यायला हवे.

### नञ तत्पुरुष समास

या सामासिक शब्दांत निषेध किंवा अभाव व्यक्त करण्यासाठी प्रारंभी काही अव्यये/ उपसर्ग येतात. अशा मराठीतील अरबी-फारसी शब्दयुक्त सामासिक शब्दांची संख्याही फार मोठी आहे. त्यांपैकी काही पुढे देत आहे -

अनमाहीत,कमकुवत,कमजोर,गैरआदबी,गैरआराम,गैरइतबार,गैरइमान,गैरमर्जी,गैरवाजवी, गैरशिस्त,गैरसनदी,गैरसमजूत,गैरहजेरी,नाइतेफाक,नाइलाज,नाकबूल,नाकार,नाखुषी, नापाक,नामर्द,नाभुशादी,नामोहरम,नाहक,बिनघोर,बिनजरी,बिनबोभाट,बिनहत्यार,बेअदबी, बेआराम,बेइमान/नी,बेइज्जती,बेखबर,बेचिराख,बेफाम,बेफिकीर,बेरोजगार,बेलाशक,बेशक, बेशिस्त,बेहोष इ.

डॉ. पटवर्धन[११] यांनीही 'गैर ,ना व बे हे उपसर्ग लागून नञ तत्पुरुष सामासिक नामे सिद्ध होतात' असे मत मांडून अनेक उदाहरणे दिली आहेत.त्यांतील काही निवडक उदाहरणे अशी -

(i) गैर-अब्रू,गैरकिफायत,गैरनफा,गैरफायदा,गैरमेहनत,गैरमेहेर्बानी,गैरमोसम,गैररहा, गैररांबता,गैरवाका,गैरहंगाम,गैरहुर्मत

(ii)नाउमेद,नाकुवत,नातवानगी,ना-दौलत्खाई,नामर्दुमी,नामाफकत,नामेहेर्बानी, ना-रजावन्दी.

(iii) बेअक्कल,बेअब्रू,बेइतबार,बेइलाज,बे-कानू,बेकिलाफ,बेखातरी,बेजाबता,बेतर्दूद, बेदस्तूर,बेदाद,बेदावा,बेदुवा,बेवक्त,बेशिरस्ता,बेहंगाम,बेहिक्मत,बेहिशेब,बेहुर्मत. त्यांनी बिला,बिन या उपसर्गांनी सिद्ध झालेल्या सामासिक शब्दांचा येथे का उल्लेख केला नाही ते कळत नाही.त्याचप्रमाणे ही सर्वच सामासिक नामे नसून नाउमेद, नाकुवत,बेअक्कल,बेइलाज,बेहिशेब यासारखी अनेक विशेषणेही यात आहेत.हे लक्षात घ्यायला हवे . खरे तर 'गैर व ना हे उपसर्ग लागून नञ तत्पुरुषाची सामासिक विशेषणे होतात.हे त्यांनी[१२] यापूर्वीच सांगून त्याचीही विपुल उदाहरणे दिली आहेत.विस्तार टाळण्यासाठी ती पुन्हा येथे देत नाही. डॉ सुधाकर पवार[१३] यांनी गैरमाकूल,बेशक इ. या कर्मधारय समासात समावेश केला आहे,तो मला योग्य वाटत नाही.

### कर्मधारय समास (समानाधिकरण तत्पुरुष):

या समासाच्या विग्रहात दोन्ही पदांस एकच विभक्ती लागते व त्यातून विशेष्य-विशेषणभाव किंवा उपमानोपमेय भाव सुचविला जातो. याची अरबी / फारसी शब्दयुक्त

किंवा अरबी / फार्सी + मराठी अशी दोन्ही प्रकारची उदाहरणे आढळतात :
गगनमहाल,गुलबदन,चाकरमनुष्य,चाकरमाणूस,चाकरलोक,जरीपटका,दरूणीमहाल,दूरदेश,नेकनजर, नेकसल्ला,बुलंदअलकाब,मोमदिल,लालगड,सर्जेराव (फा.शर्जा = गरजणारा सिंह)[२४], साफदिल इ.

## द्विगु समास

हा कर्मधारय समासाचाच एक प्रकार असून त्यातील पहिले पद संख्या/गणनावाचक असते. याची अरबी /फार्सी वा अरबी /फार्सी + मराठी (संमिश्र) अशा दोन्ही प्रकारची उदाहरणे मध्ययुगापासून मराठीत आढळतात.एकदिल,एकबेरजी,चहुतर्फ/चौतर्फा, च्यारकुब्बा,च्यारीतर्फ,चौबुर्जी,चौमहिना,तिमजला,तिसाला/तिनसाल्यं,तीनरुख,दुमजला/ली,दुतर्फा,पंचहजारी,पंजाब(<पंज्-आब् )बारमहा,सप्तहजारी,हफ्तहजारी(फा.हफ्त् = सात)इ. श्री.मो.के.दामले[२५] यांनी मात्र 'दुमजला ','तिमजला' या सामासिक शब्दांचा बहुव्रीही समासाच्या संख्यापूर्वपद या प्रकारात समावेश केला आहे.

## मध्यमपदलोपी समास

यातील पहिल्या पदाचा दुसऱ्या पदाशी असलेला संबंध दाखविणारा शब्द गृहीत असतो. श्री.दामले यांनी याची अरबी/फार्सी शब्दयुक्त घोडेस्वार (फा.सवार्) आणि पंक्तिबारगीर (फा. बार्गीर) ही उदाहरणे दिली आहेत. बखरीत[२६] याची शिकंदर, नशीबवान,सांडणीस्वार,सुतरनाल,सुतरस्वार इ.उदाहरणे आढळतात.

## (३) द्वन्द्व समास

या समासातील दोन्ही पदे प्रधान असतात. त्याचे (अ) इतरेतर (आ)समाहार आणि (इ) वैकल्पिक असे तीन प्रकार असून त्यांचे उपप्रकारही आहेत. त्यांची
(i) अरबी - फार्सी शब्दयुक्त त्याचप्रमाणे (ii) संमिश्र म्हणजे अरबी/फार्सी व मराठी अशी सामासिक शब्दांची उदाहरणे मध्ययुगीन मराठीपासून आधुनिक मराठीपर्यंत आढळतात. (i)मध्ये अरबी/फार्सी शब्दयुक्त व (ii)मध्ये अरबी/फार्सी + मराठी उदाहरणे दिली आहेत.

(अ) इतरेतर द्वन्द्व : यातील पदे 'व 'या समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययाने जोडलेली असून ते अव्यय गृहीत असते.

(i)अत्तर-गुलाब,आमखास,उजूतवाजू,किल्ली-कुलूप,जमाखर्च,जीनखोगीर,जेर-जबर, जोर-जुलूम,तवा-तोबरा,तीर-कमान,तर्कश-कमान,निशाण-नगारे,फितवा-फांदडा,फंद-फितूरी,फौज-सरंजाम,सही-शिक्का,हकीम-दिवाण इ.

(ii)घोडा-मैदान,दाणा-चारा,नौबत-चौघडा,मर्यादा-अदब,मान-मरातब,सरदार-मानकरी इ. (यांतील मैदान,दाणा (<दानह् ),नौबत,अदब,मरातब,सरदार हे शब्द अरबी/फार्सीतून

मराठीत आले आहेत.)

'समानार्थी द्वन्द्व ': हा इतरेतर द्वन्द्व समासाचा एक वेगळा प्रकार कल्पावा,असे मला वाटते.यातील दोन्ही पदे प्रधान असून त्यात
(i) एक अरबी - फार्सी शब्द त्याच अर्थाच्या अरबी / फार्सी शब्दाला जोडून सामासिक शब्द तयार होतो किंवा
(ii)एका अरबी/फार्सी शब्दास समानार्थी मराठी शब्द जोडून सामासिक शब्द तयार होतो.याची उदाहरणे अनुक्रमे अशी[२१७] -
(i)अवलिया -फकीर,कर्ज - वाम,कानू - कायदा,कायदेकानू,तजवीज-तयारी,दिवाण - वजीर,फौज-लष्कर,सल्ला-मसलत,हशम-चाकर,हुशारी-खबरदारी इ.
(ii)अभय-कौल,आयव्यय-जमाखर्च,इतराजी-अवकृपा,ईश्वरी-खुदाई,किल्लेकोट,गडकिल्ले द्रव्य-खजीना,धनी-खावंद,न्याय-इनसाफ,पदार्थ-जिन्नस,रोखा-पत्र,वस्ती-आबादी,सेवा - चाकरी इ.
या प्रकारच्या सामासिक शब्दांची चाहूल इति.राजवाडे यांना लागली होती म्हणूनच त्यांनी याविषयी पुढील विवेचन करून ठेवले आहे. फार्सीतून मराठीत आलेल्या चार नवीन पध्दतींपैकी दोन पध्दतींचा उल्लेख मी द्विरुक्तिघटित अव्ययीभाव समासात केला आहे.उरलेल्या दोन पध्दतींचा समावेश द्वन्द्व समासात करायला हवा. 'हे चारी प्रकार ज्ञानेश्वरीत नाहीत हे सांगायला नकोच 'हे राजवाडे[२१८] यांचे विधान फार महत्वाचे आहे. त्यापूर्वी द्वन्द्व समासात आलेल्या या दोन नवीन पध्दतींविषयी ते म्हणतात,'फारशी जेव्हां महाराष्ट्रात सर्वत्र पसरली,त्या वेळी लोकांच्या तोंडांत एकाच अर्थाचे फारशी व मराठी असे दोन शब्द एकदम येऊं लागले. उदाहरणार्थ, घरदार,चीजवस्त,कागदपत्र, शेतजमीन,देहेगाव,दानधर्म,भेटमुलाकत,सरदारमानकरी,प्रांतमुलूख,वेळवखत,वगैरे.येथे दार,चीज,कागद,जमीन,देह,दान,मुलाकत,सरदार,मुलूख व वखत ह्यांचा अर्थ घर,वस्तु पत्र,शेत,गाव,धर्म,भेट,मानकरी,प्रांत व वेळ असा अनुक्रमे आहे.'
राजवाडे यांनी प्रतिपादिलेले मत बरोबर असले तरी त्यांनी दिलेली काही उदाहरणे चुकीची आहेत. 'घरदार 'यातील दोन्ही शब्द मराठीच आहेत. शेत म्हणजे जमीन असा अर्थ कसा घेता येईल? प्रांत म्हणजे मुलूख असाही अर्थ होत नाही.भेटमुलाकत, वेळवखत,चीज-वस्त ही त्यांची उदाहरणे बरोबर आहेत.

(आ)समाहार द्वन्द्व : या 'समासात त्यांतील पदांच्या अर्थाशिवाय आणखी तशाच प्रकारच्या अर्थाचा अंतर्भाव होतो',अशी व्याख्या श्री.मो.के.दामले[२१९] यांनी केली आहे. षष्ठी तत्पुरुष समासाप्रमाणेच या समासाची अरबी / फार्सी शब्दयुक्त असंख्य उदाहरणे आढळतात.

(i)दोन्ही पदे अरबी/फारसी - अमीर-उमराव,अस्मानी-सुलतानी,आयषआराम(ऐषआराम), इमाने-इतबारे,इराणीतुराणी,कजियाकफावत,कस्त-मशागत,करारमदार,कायदेकानू, कुलबाब,कुलकानू,खबरबातमी, खुशीरजावंदी,गरीबगुरीब,गोळागोळी(फा.गोलह्), जामानिमा,जाबजबाब,जायाजखमी,डागडुजी,तहरह,ताजातवाना,दिलदिलासा,नोकरचाकर, जखमाना-मोताना,जागा-मैदान,दाणा-दारु,दारुगोळा,पीरमुर्छा (फा.पीर् मुर्शद्),फंदफितूर, बागबगीचा,सरकारदरबार

(ii) संमिश्र (अरबी/फारसी + मराठी / सादशब्द) - कबेला - खटला,कहीकथाडी, कागदपत्र,कागदबिगद,किल्लेकोट,खर्चवेच,खातेपोते,गर्दीधुंदी,घासदाणा (फा. दानह् ) चीजवस्त,डेराराहुटी,तारखीपारखी दावघाव,फलाणा बिस्ताना,दाणापाणी,दाणापैका, बाडबिशाद,यादीबुदी,सेवाचाकरी इ.

(इ) वैकल्पिक द्वन्द्व : या सामासिक शब्दांतील दोन पदांतील अथवा,अगर,किंवा इ. उभयान्वयी अव्यये लोप पावलेली असतात. याची उदाहरणे अशी-
असलनकल/अस्सल - नक्कल,कंपेश (फा.कम् - बीश् = कमी अधिक),कमीजाजती/ कमजयाद/कमीजास्त,कावादावा,कुलुपकिल्ली,जदीदकदीम,जवाबसवाल/सवालजवाब, जाबसाल,जमाखर्च,जेरजबर,दादफिर्याद,दारमदार/दारोमदार,नफा-नुकसान,नफातोटा, नरमगरम,फतेशिकस्त,फायदातोटा,हलाली - हरामी इ.

(४) **बहुव्रीही समास** : या 'समासातील कोणतेही पद प्रधान नसून सर्व सामासिक शब्द तद्भिन्न अशा एका निराळ्या नामाचे विशेषण असतो 'अशी याची व्याख्या श्री.दामले यांनी केली आहे.या संदर्भात मराठीत आलेले जहापन्हा,जिन्नतमकान,ताजा कलम, थोरला महाल (=पहिली पत्नी )मुलूख मैदान,पांढरपेशा हे सामासिक शब्द लक्षात घेण्याजोगे वाटतात.त्यात जहान् ,पनाह्,महल्,जन्नत्,मकान्,मुल्क्,मैदान्,पेशह् हे अरबी/ फारसी शब्द आले आहेत.

## IV अभ्यस्त शब्द

शास्त्रीय मराठी व्याकरणकार श्री.मो.के.दामले''' यांनी अभ्यस्त शब्दांचे तीन प्रकार मानले आहेत : (अ) पूर्णाभ्यस्त (आ)अंशाभ्यस्त (इ)अनुकरणवाचक.
मराठीच्या शब्दसंग्रहात जवळपास या सर्वच प्रकारांत अरबी-फारसी शब्द समाविष्ट झाले आहेत पण तसा उल्लेख दामले आपल्या विवेचनातका करीत नाहीत.ते कळत नाहीत. अभ्यस्त शब्दांची उदाहरणे पुढे दिली आहेत व काही ठिकाणी संदर्भासाठी कंसांत माझ्या 'मराठी बखरींतील फारसीचे स्वरूप 'या ग्रंथातील पृष्ठांक दिले आहेत.
(अ) **पूर्णाभ्यस्त शब्द** - या प्रकारात त्याच शब्दाची पुनरावृत्ती होते :
(i) नामे :- काबिलकाबिला (३७९),गोळागोळी (फा.गोलह् ४७१).जंगलाजंगल/जंगले-

जंगल् (फा.जंगल् ४९७),जागजागा/जागजागा/जागोजाग (४७२),दरदर,नजरानजर, पुरजे पुरजे (५८२),पुस्त-दर-पुस्त (५८२),मजल-दर-मजल,महालोमहाली,महिनोमहिने, मालामाल,रस्तोरस्ती (७०४),रूबरू(७०८),सिलसिला,हुकमाबरहुकूम ६१४),हुकमेहुकूम इ.

(ii)विशेषण - आबादीआबाद,कुलबाब,कुलकानू (४००),खासी खासी/खासे खासे(४१९), छानछान,जराजरा,जराबाजरा(४६६),ताजी ताजी/ताजे ताजे,जोर बेजोर (४८६),नामी नामी(५५४),निमेनिम/निमेनिमे (५६०),मातबर मातबर (६६२) इ.

(iii)क्रियाविशेषण - एकाएकी/एकाएकीच (फा.यकायक - ३६३),वारंवार(?फा.वार् वार् , ७२६)इ.

(iv)उद्‌गारवाचक अव्यय - छान छान ! वाहवा ! (फा.वाह् वाह्,७२६)

(v)शब्दयोगी अव्यय - बराबर (६१४),बरोबर (६१५)

**(आ)अंशाभ्यस्त शब्द** - याची व्याख्या श्री.दामले[११] यांनी अशी केली आहे - 'एका शब्दाचे मागें किंवा पुढे त्याच्याशीं एक दोन अक्षरांचे यमक जुळणारा किंवा निदान एकाद्या व्यंजनाचा अनुप्रास जुळणारा दुसरा शब्द जोडण्यांत येऊन जो एक शब्द तयार होतो त्यास अंशाभ्यस्त शब्द असे म्हणतात. या ठिकाणच्या मूळ शब्दाशी यमक जुळणारा जो नवीन शब्द त्याचे मागें किंवा पुढें येतो,तो प्रचलित मराठी भाषेंत रूढ नसला किंवा त्याला कांही अर्थ नसला तरी त्यास हरकत नाहीं.

जसे :- दाणादुणा,लहानसहान,शेजारीपाजारी इ.' यांतील 'दाणादुणा 'या शब्दातील मूळ फार्सी शब्द 'दानह् 'हा आहे. अशा शब्दांना अलीकडे 'सादशब्द 'ही (echo-words)म्हणतात. काही अरबी - फार्सी शब्दांच्या उच्चारांशी साम्य असलेले असे अनेक शब्द मध्ययुगीन मराठीत प्रचारात होते व आजच्या मराठीतही त्यांची संख्या लक्षणीय आहे.त्यांची काही उदाहरणे पुढे देत आहे -

अदलाबदल,अरकशी-दरकशी,अलबत्था-गलबत्था,अलाणाफलाणा,आवाईतवाई,आब-जाब,करारमदार,कागदप‌त्र,दावा-दावा,खर्चवर्च/खर्चव्यर्च/खर्चबिर्च,खातीपोती/खातेपोते, गरीबगुरीब/गोरगरीब,गूलगलवा,धावदाव,चेहरामोहरा,जेरजूर,तयारीबियारी,तहरह, तारखीपारखी,तालेमाले,दगादुगा/दगाबिगा,दिलदिलासा,नोकझोक,फलाणाबिस्ताना, फितवाफांदडा,यादीबिदी/यादीवुदी,रफेदफे,सामानसुमान,हिशेबकिताब,हिशेबटिशेब,हिसाब-किताब इ.

**(इ)अनुकरणवाचक शब्द** : ध्वनीच्या अनुकरणाने भाषेत काही शब्द तयार होतात, त्यांना आजकालच्या भाषावैज्ञानिक परिभाषेत ध्वन्यनुकारी शब्द म्हणतात. मराठीतील पुढील अरबी/फार्सी शब्द नादानुरोधाने निर्माण झाले असावेत,असे त्यांची मूळ रूपे पाहिल्यावर जाणवते -

कट्टा (कत्अ),खटा(कत्अ) ,खर्खरा/खरखरणे/खरारा (खार्खार्),गरगशा (गर्गशह् ),
गरारा (गर्गरह्),गलबल/गलबा (गल्बह्),घोगा (गोगह् =ओरड,ओरडा),जर्जर (जर्रह्),
ताशेर (तासह्),दमामा(दम्दमह् ),धमधमा,डफ (दफ् )इ.

**फार्सीद्वारा मराठीत आलेले अरबी साधित शब्द : कृदन्ते**

मराठी शब्दसिध्दीच्या संदर्भात हा महत्त्वाचा मुद्दा असूनही त्याचा विचार एक-दोन अपवादात्मक वैयाकरणांव्यतिरिक्त मराठीत अन्य कुणीही केल्याचे आढळत नाही.हे दोन वैयाकरण म्हणजे कृष्णशास्त्री गोडबोले आणि मो.के.दामले. त्यांनी अनुक्रमे 'नवीन मराठी व्याकरण 'व 'शास्त्रीय मराठी व्याकरण 'या ग्रंथांत याचा विचार केला.त्यांच्यापैकी मो.के.दामले यांचा अरबी-फार्सी भाषांचा 'परिचय 'नसल्याने आपण याबाबतीत गोडबोल्यांचा केवळ अनुवाद केला असल्याचे त्यांनी स्वतःच मान्य केले आहे.ते म्हणतात[५७],'फारसी व अरबी भाषांतून जे साधित शब्द मराठींत आले आहेत,त्यांचा या अध्यायांत समावेश करावयाचा आहे.पूर्वी सांगितलेच आहे(५८०)कीं,कृष्णशास्त्री गोडबोले यांनी आपल्या नवीन मराठी व्याकरणात अशा प्रकारच्या शब्दांचा चांगलाच संग्रह केला आहे.गोडबोल्यांच्या पेक्षा या दिशेने अद्यापि कोणी अधिक परिश्रम केलेले दिसत नाहीत. फारसी व अरबी यांचा परिचय असलेल्या मराठी विद्वानाचे हातून हें काम पूर्ण होईपर्यंत गोडबोल्यांनीच केलेल्या कामगिरीनें समाधान मानून येथेंही इतरांप्रमाणे त्यांचाच अनुवाद करणें भाग आहे'.गोडबोल्यांचा मागोवा घेत मी[५८] बखरींच्या अनुषंगाने याविषयी 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप ' या ग्रंथात विवेचन केले आहे.या सर्व बाबींचा पुनर्विचार करून,त्यास थोडी पुस्ती- दुरुस्ती जोडून,त्यातील मराठी उदाहरणांना डॉ.पटवर्धन यांच्या 'फार्शी - मराठी कोशा'तील पृष्ठांचे संदर्भ देऊन ,मी पुढील मांडणी केली आहे.तौलनिक भाषाध्ययनासही ती उपयुक्त ठरेल,असा विश्वास वाटतो. डॉ.पटवर्धन यांनी या विषयाचा विचार का केला नाही याचा उलगडा मात्र होत नाही.

फार्सी ही आर्यभाषेच्याच एका उपशाखेतील - 'इंडोइराणियन ' शाखेतीलं- भाषा आहे तर अरबी ही सेमिटिक भाषा आहे. दोन्ही भाषांच्या प्रकृतीत यामुळेच भेद असणे स्वाभाविक आहे.बरेचसे अरबी शब्द फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले असल्याने त्यांची निर्मिति- प्रक्रिया कशी घडत गेली, ते समजावून घ्यायचे असेल तर अरबी शब्दांच्या मूळ जडणघडणीच्या विविध प्रकारांची माहिती घेणे फार आवश्यक आहे.अनेक अरबी शब्दांचे मूळ त्रिवर्ण (क्वचित् चतुर्वर्ण )धातूंत आढळते.त्यांच्यापासून अनेक अरबी शब्द सिद्ध झाले आहेत,तेच पुढे फार्सीत व फार्सीतून मध्ययुगीन मराठीत गेले.त्यामुळे अरबी भाषेची शब्दनिर्मिति-प्रक्रिया ओघानेच फार्सीने व पुढे मराठीनेही (त्या शब्दांच्या संदर्भात)स्वीकारली,असे म्हणावे लागते.मराठीकरण होताना अरबीचे हे सर्वच प्रकार वा सर्वच रूपे मराठीत आली असे नाही. त्यांतील जी रूपे व जे प्रकार मराठीत आले,त्यांचाच विचार येथे सोदाहरण केला आहे .

अरबी साधित शब्दांचे एकुण तेरा प्रकार आहेत त्यांपैकी फक्त आठच प्रकार फार्सीच्या माध्यमातून मराठीत आले आहेत.ते पुढे दिले आहेत-मराठी उदाहरणांपुढील कंसांतील आकडे डॉ.पटवर्धन यांच्या फार्सी -मराठी कोशातील पृष्ठांचे आहेत. जे मत/उदाहरण मला योग्य वाटत नाही,त्यासंबंधी प्रत्येक प्रकाराच्या शेवटी टीपेत विचार केला आहे.

<u>प्रकार =१</u>

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण |
|---|---|---|
| उदा. प्-फ्-ब् | फाफिब् | म.प्.फू.ब् |
| १. अ्-म्-ल् | ———— | मअ्मूल्>म.मामूल (१९२) |
| २. अ्-ल्-म् | ———— | मअ्लूम्>म.मालूम (१९३) |
| ३. अ्-श्-क् | आ्शिक् > म.आशक (१४) | मअ्शूक्>म.माशूक(१९३) |
| ४. क्-द्-र् | ———— | मक् दूर्>मगदूर (१८०) |
| ५. क्-व्-म् | काइम् >म.कायम (३३) | |
| ६. ग्-फ्-ल् | गाफिल् >म.गाफल,गाफिल(५६) | |
| ७. ग्-र्-र् | ———— | मग् रूर् >मगरूर |
| ८. ज्-क्-र् | ———— | मज्कूर् >म.मजकूर(१८०) |
| ९. ज्-ब्-त् | ———— | मज्बूत > म.मजबूत(१८०) |
| १०. ज्.म्.न् | ज्ञामिन्>म.जामीन (७७) | मज्मून >म.मखमून (१८१) |
| ११. ज्-ल्-म् | ज़ालिम्>म.जालीम (७८) | |
| १२. ज्-ह्-र् | ज़ाहिर्> म.जाहीर (७८) | |
| १३.न्-ज्-र् | नाज़िर्>म.नाझर | मन् ज़ूर् >म.मंजूर |
| १४. म्-ल्-क् | मालिक्>म.मालक(१९२) | |
| १५. ल्-य्-क् | लाइक् >म.लायक (२२३) | |
| १६. स्-ह्-ब् | साहिब् >म.साहेब (२५१) | |
| १७. ह्-क्-म | हाकिम् >म.हकीम | |
| १८.ह्-म्-द् | ———— | मह् मूद >म.महमूद |
| १९. ह्-स्-ल् | हासिल >म.हंशील,हशील, हंसील (२६२) | महसूल् (१८९) |

टीप :

१. अ् - ल् - म् पासून आलिम हे रूप होते हे मान्य तथापि ते मराठीत आढळत नसल्याने दिले नाही.

२. अ-म्-र् पासून 'आमीर 'हे रूप सिध्द होत असल्याचे श्री.मो.के.दामले[**] यांनी व मीही दिले आहे तथापि याविषयी पुनर्विचार करताना जाणवले की त्यापासून अमीर हे रूप सिद्ध होत नाही.त्याचे मूळ अमीर् या अरबी शब्दातच असल्याने तेही येथे दिले

नाही.

३. श्री.मो.के.दामले यांनी श्-ह्-र् या त्रिवर्ण धातूचे शाही शाहिर् व त्यापासून सिद्ध झालेले मराठी शाहीर हे रूप दिले आहे तथापि शाहीर या शब्दाचे मूळ फार्सी शायर् हा शब्द आहे. त्यामुळे त्याचाही या प्रकारात समावेश केलेला नाही.

४. श्री.दामले[१४४] यांनी '(अ) स्वरांत नियमित होणारे फरक 'या शीर्षकाखाली जे विवेचन केले आहे,ते या प्रकारात बसत नाही. शिवाय त्यांनी दिलेल्या गजब,रजब,कवम,या त्रिवर्ण धातूत स्वर नाहीत,त्यांत 'व 'हा अर्धस्वर आहे.

<u>प्रकार - २</u>

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा. प्-फ़्-ब् | मुप् फ़् फ़िब् | मुपफ़् फ़ब् | तप् फ़ीब् |
| १. अ् -र् -फ़् | - | - | तअ्रीफ़्>म.तारीफ(९६) |
| २. अ्-ल् -म् | मुअ्ल्लिम्>म.मालिम (१९३) | - | तअ्लीन्>म.तालीम(९९) |
| ३. क़्-द् -म् | - | मुक्दम्>म.मोकदम, मुकादम(१९६) | - |
| ४. क़्-र् -र् | - | मुक्रर्र् > म.मुकरर, मुकर (१८६) | - |
| ५. क़्-स्-म् | - | - | तक़् सीम्>म. तक्षीम(८६) |
| ६. क़्-स्-र् | - | - | तक़् सीर् >म.तकसीर, तक्षीर (८६) |
| ७.ज़्-फ्-र् | - | मुज़फ्फर् > म मुजाफरखाना | - |
| ८. ज्-व्-ज़् | - | - | तज्वीज़् >म.तज्वीज ,तजवीज (८७) |
| ९. न्-ब्-ह् | - | - | तन् बीह् >म तबी(९०) |
| १० र्-त्-ब् | - | - | तर् तीब् >म.तरतीब(९१) |
| ११ र्-ब्-ब् | मुरब्बी>म.नुरब्बी(२०३) | - | |
| १२ ल्-म्-अ् | - | मुलम्मअ् >म.मुलामा(२०४) | |
| १३ स्-द्-अ् | | - | तस्दीअ्>म.तसदी,तस्दी(९५) |
| १४ ह्-म्-द् | - | मुहम्मद् >म.महमद. | |
| १५ ह्-र्-म् | - | मुहर्रम्>म.मोहरम(२०१) | |
| १६ ह्-स्-ल् | | - | तह् सील्>म.तहसील |

टीप :

१) श्री.दामले यांनी क-र्-र् या त्रिवर्ण धातू 'तकार 'हा शब्द या प्रकारात सामाविष्ट केला आहे पण तो यात बसत नाही,त्यामुळे मी त्याचा या प्रकारात निर्देश केला नाही.

२) ज़्-फ्-र् पासून सिद्ध होणारा 'मुज़फ्फर ' किंवा ह्-स्-ल् पासून सिद्ध होणारा 'मुहस्सिल् 'हे शब्द मराठीत वापरात नसल्याने मी त्याचा समावेश या प्रकारात केला नाही. श्री .दामले यांनी तो केला आहे.

प्रकार - ३

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा.फ्-क़्-थ् | मुफाक़िथ् | मुफाक़्थ् | मुफाक़्बत/मुफाकथा |
| १ अ-फ़्-व् | | मुआफ़्>म.माफ(१९१) | |
| २.अ्-म्-ल् | | | मुआमलत्> म.मामलत (१९१) |
| ३.क़्-ब्-ल् | | - | मुक़ाबलह्>म.मुकाबला (१९७) |
| ४.न्-स्-ब् | मुनासिब्>म.मुनासब(२०१) | | |
| ५.ब्-द्-ल | | - | मुबादला > म.मुबादला/ मोबदला(२०८) |
| ६.ब्-र्-क् | | मुबारक्>म.मुबारिक (२०२) | |
| ७ ल्-ज़्-म् | | - | मुलाज़मत् >म.मुलाजमत (२०३) |
| ८.व्-क़्-फ़् | मुवाफ़िक़्>म.माफक (१९.१) | | |
| ९.स्-फ़्-र् | मुसाफ़िर् >म.मुशाफर (२०४) | | |

टीप :

ल्-क्-य् पासून मुलाकात् >म.मुलाखत हे उदाहरण श्री.दामले यांनी दिले आहे व ते मीही दिले होत पण पुनर्विचार करता ते या प्रकारात बसत नसल्याने त्याचा वर समावेश केलेला नाही.

प्रकार - ४

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा फ्-क़्-थ् | मुफ् क़िथ् | मुफ् क़्थ् | इफ्क़ाथ् |
| १ अ्-म्-न् | | | ईमान्>म.इमान (१७) |
| २.क़्-र्-र् | | - | इक़रार्> म.इकार (१५) |
| ३ न्-स्-फ़् | मुन् सिफ़् >म.मुन्सफ(२०१) | | इन् साफ़् >म.इन्साफ(१६) |
| ४.र्-व्-द् | - | | इरादह्>म.इरादा(१८) |
| ५.र्-स्-ल | - | | इर् साल् >म.इर्साल, इरसाल(१८) |
| ६ स्-ल्-म् | मुस्लिम् >म.मुस्लिम (205) | | |

टीप -

१.या प्रकारात श्री.दामले यांनी व मी[१९७]न्-श्-अ >मुन्शी आणि न्-व्-ब् >मुनीब्>म.मुजीब यांचा अन्तर्भाव केला होता पण पुनर्विचारान्ती ते या प्रकारात बसत नाहीत,असे माझे मत झाले आहे.

२. त्-ब्-र् पासून इअ्तिबार (>म.इतबार(१५))असे रूप होते पण ते या प्रकारात बसत नाही.श्री.दामले[१९८] यांनी द्-ब्-र् पासून इदबार हे सिद्ध झालेल रूप या प्रकारात समाविष्ट केले आहे तथापि तेही या प्रकारात बसत नाही व मराठीत प्रचारात नाही.

३. ज्-र्-य् पासून सिद्ध झालेल्या 'मुजरा 'या शब्दाचा अन्तर्भाव श्री.दामले[१९९]यांनी व मी केला होता पण पुनर्विचार केल्यावर तो या प्रकारात बसत नसल्याचे लक्षात आहे.त्यामुळे वरील कोष्टकात त्याचा समावेश केलेला नाही.

प्रकार - ५

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा.प्-फ़्-ब् | मुतफ़् फ़िब् | मुतपफ़् फ़ब् | तपफ़् फ़ुब् |
| १. अ्-ल्-क़् | मुतअ़ल्लिक़्>म.मुतालीक(२००) | | तअ़ल्लुक़्> म.तालूक(९९) |
| २.क्-ल्-ब् | - | | तकल्लुब>म.तकलुबी(८६) |
| ३.स्-द्-य् | मुतसद्दी>म.मुत्सद्दी.मुतसद्दी(१९९) | | |

प्रकार - ६

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा.प्-फ़्-ब् | मुतपाफ़िब् | मुतपाफ़ब् | तपाफ़ुब्(तपाफ़ुल्) |
| १.फ़्-व्-त् | | | तफ़ावुत् |

टीप :

श्री.दामले यांनी व मी दिलेली पुढील उदाहरणे या प्रकारात बसत नाहीत असे पुनर्विचारान्ती जाणवले.

१. क्-व्-य् >तक़ावी>म.तकावी,तगाई

२. म्-श्-य् >तमाशी >म.तमाशा,

३. ल्-श्-य् >तलाश् >म.तलाष,तलास.

प्रकार - ७

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा.प्-फ़्-ब् | मुप्तफ़िब् | मुप् तफ़ब् | इप् तिफ़ाब् |
| १. अ्-ब्-र् | | मुअ़्तबर्>म. मातबर(१९०) | इअ़्तिबार्>म.इतबार(१५) |
| २. क़्-स्-र् | | मुक़्तसर>म.मुख्तसर (१९७) | |
| ३. ख़्-य्-र् | | | इख़् तियार >म.अखत्यारे (१) |

टीप :

श्री. दामले यांनी व मी दिलेली पुढील उदाहरणे या प्रकारात बसत नाहीत असे पुनर्विचारान्ती जाणवल्याने त्यांचा समावेश वरील कोष्टकात केलेला नाही.

अ़-द्-द >मुअतद >मुहताज >मोताद.

ख्-य्-र् >मुख्यार >म.मुख्तार (१६७).

द-अ़-अ़ >मुदआ़ >म.मुद्दा.

<u>प्रकार - ८</u>

| मूळ धातू | कर्तरी विशेषण | कर्मणी विशेषण | क्रियावाचक नाम |
|---|---|---|---|
| उदा.प्-फ़्-ब् | मुस् तप् फ़िब् | मुस् तफ़्ब् | इस्तिपफ़ाब् |
| १. अ़-म्-ल् | - | - | इस्तिअ़्माल्>म.इस्तमाल(१९) |
| २. क़्-ब्-ल् | मुस्तक़्बिल(२०५) | | |

**समानार्थी जोड-शब्द**

मराठीत अरबी -फार्सीतून आलेल्या शब्दांचेही तीन विभाग पडतातः

- (अ)दोन्ही शब्द अरबी/फार्सी : अक्कल-हुशारी,अवलिया फकीर,कजिया-कफावत,करार - जाबता,कर्ज-वाम,कानुकायदा,कानू-जाबता,कायदेकानू/कैदकानू,कौल-करार,खातर - तसली,खुदा परवरदिगार,गिल्ला-शिकवा,तजवीज-तयारी,दरबार-कचेरी,दिवाण-वजीर, फौज-लष्कर,शक-अंदेशा/आंदेश,सल्लामसलत,हशम-चाकर,हिल्ला-हरकत,हशम-चाकर,हिल्ला-हरकत,हुशारी-खबरदारी इ.

(आ)पहिला शब्द अरबी/फार्सी,दुसरा मराठी : इतराजी-अवकृपा,कारकून-लिहिणार, किल्लेकोट,खबरबात,जखमी घायाळ,जरा जरा,तिल तिल,तारीफ गौरव,नौबत-चौघडा, नौबत-डंका,पोशाख वस्त्रे,मामूल वहिपवाट इ.

(इ)पहिला शब्द मराठी,दुसरा अरबी/फार्सी : अभयकौल,आयव्यय-जमाखर्च,ईश्वरी-खुदाई,कपडालत्ता,कष्ट-मेहनत,काज-कारभार(फा.कार्बार),कामकष्ट-मशागत,कुटुंब-कबिला,गड-किल्ला,गोडीगुलाबी,द्रव्यखजिना,द्रव्यदौलत,द्रव्यमत्ता,धनी-खावंद,धनी-मालक,न्याय-इन्साफ,पक्की मजबूत,पदार्थ जिन्नस,पढे-फाजल,पाट नहर,बळजोरी/जबरी,मर्यादा-अदब,युक्ति-मसलत,वस्ती-आबादी,वाणी-बकाल,सेवा चाकरी,स्नेह-मुर्वत इ.

यांतील जे शब्द बखरींत आले आहेत त्यांचे संदर्भ मी माझ्या ग्रंथात[१८*] दिले आहेत.

**विरुद्धार्थी जोडशब्द**

परस्परविरोधी अर्थाचे जोडशब्द वापरण्याची प्रवृत्ती अनेक भाषांत आढळते. ही प्रवृत्ती मराठीत आलेल्या अरबी - फार्सी शब्दांच्या बाबतीतही दिसते.त्यांची त्रिविध रूपे आहेत-

(अ)दोन्ही शब्द अरबी/फारसी : अमीर-गरीब,अस्मान-जमीन,अस्सल-नक्कल,अहद-तहद,अहाली-मवाली,आमखास,आमद-रफ्त,आशक-माशूक,कपेश(फा.कम्-बीश),कमी-जाजती(किंवा कमीजास्ती),करारजमा,कावा-दावा,किल्ली-कुलूप,गरम-नरम,जदीद-कदीम,जमा-खर्च,जमीन-आसमान,जाबसाल,जेर जबर,दाद-फिर्याद,दार-मदार(किंवा दारोमदार),नफा-नुकसान,नरम-गरम,फत्ते-शिकस्त,मर्द-नामर्द,रदबदली,राजी-बिराजी (=सुखदुःख),राबता-गैरराबता,वक्त-बेवक्त,हकनाक/हकनाहक,हजेरी - गैरहजरी,हलाली-हरामी,हुद्देदार-चाकर इ.

(आ)अरबी/फारसी आणि मराठी शब्द : नफा - तोटा

(इ)मराठी शब्द आणि अरबी/फारसी शब्द : उत्पन्न -खर्च,नवे-कदीम,बारीक-मोटा.

याशिवाय दोन मराठी शब्दांत एक अरबी/फारसी उपसर्ग येऊनही 'उपयोग - गैरउपयोग' सारखे काही विरुद्धार्थी जोडशब्द तयार झाले आहेत.

**तर - तमभाव**

फारसीमध्ये तर-तमभाव (तारतम्याचा गुण)दर्शविण्यासाठी 'तर 'आणि 'तरीन् 'हे दोन प्रत्यय योजितात. दोन व्यक्तींमध्ये वा वस्तूंमध्ये तुलना करावयाची असल्यास विशेषणास 'तर 'हा प्रत्यय योजितात (तसा तो संस्कृत भाषेतही योजितात)आणि दोनपेक्षा अधिक व्यक्तींमध्ये/वस्तूंमध्ये तुलना करताना विशेषणास 'तरीन् 'हा प्रत्यय योजितात.'तर ' हा प्रत्यय संस्कृत आणि फारसी या दोन्ही भाषांत समान असल्याने येथे एक गोष्ट स्पष्ट करायला हवी व ती मी यापूर्वी बखरविषयक[१११] विवेचनात केली होती.जेव्हा हा प्रत्यय अरबी - फारसी शब्दांना जोडून येतो तेव्हा तो फारसीपासून आला,हे मानायला हवे. बखरींमध्ये 'तरीन् 'हा प्रत्यय आढळत नाही. डॉ.पटवर्धन[११२] यांनी याविषयी केलेले मध्ययुगीन मराठीच्या संदर्भातील विवरण उपयुक्त असल्याने ते येथे उद्धृत करीत आहे - "विशेषणाचा तारतम्यभाव तर् व तरीन् या प्रत्ययांनी दाखविला जातो. तर् हा प्रत्यय कम्तर,जूदतर,बर्तर,बेहतर[११३],बेहेत्तर व मेहतर (=श्रेष्ठतर )या शब्दांत आढळतो.उदा. 'पादशाही कमतर पडली असे पाहून ' (सभासद २०).'जूदतर'... रवाना करत पाठवावे' (साने - पयाद,१८७).'पादशाही हुकूम बर्तर म्हणोन'(चित्रगुप्त ७०) 'तरीन् 'प्रत्ययाचे कम्तरीन् हे एकच 'बंदे कम्तरीन '(अत्यंत हलका सेवक,राजवाडे १५/९९). 'याखेरीज सिबन्दीचे कम्तरीन पन्नास लक्ष देणें आहे.'(राजवाडे १२/८७) .

आजच्या मराठीत 'बेहत्तर/बेहेत्तर ' हा शब्द प्रचलित आहे,त्याचप्रमाणे डॉ.पटवर्धन यांना 'तरीन 'या प्रत्ययाचे 'कम्तरीन ' हे एकच उदाहरण असल्याची खंत होती ती उणीव 'बेहतरीन 'या शब्दाने भरून काढली आहे !

### अकरण रूप

नकार दर्शविण्यासाठी अरबी - फार्सीत गैर,ना,बद,बे, बिला/बेला,ला हे जोडतात. (यांतील गैर,बिला,ला हे अरबी उपसर्ग आहेत.) यातील 'गैर 'व 'ना' हे उपसर्ग मराठीत विशेष प्रचलित आहेत त्यांचा विचार उपसर्गांच्या व नञ तत्पुरुष समासाच्या संदर्भात तपशीलाने केलाच आहे. मध्ययुगीन मराठीप्रमाणेच आधुनिक मराठीतही ही अकरण रूपे वापरली जातात -

१) गैर - गैरफायदा,गैरवाजवी,गैरसमज(म.समज),गैरहजेरी इ.

२) ना - नाइलाज,नाकबूल,नापसंत,नामोहरम,नाराज इ.

३) बद - बदनामी,बदसल्ला,बदचाल(म. चाल)

४) बे - बेअक्कल,बेइज्जत,बेकार,बेरोजगार,बेशिस्त

५) बिला/बेला - बेलाशक

६) ला - लाचार

मध्ययुगीन मराठीतील अकरण रूपाची विपुल उदाहरणे डॉ.पटवर्धन[२४] यांनी दिली आहेत.त्याचप्रमाणे मी ही बखरीतील[२५] फार्सी अकरण रूपांचे तपशील विस्ताराने दिले आहेत. जिज्ञासूंनी ते मूळातून पाहावेत.

### समारोप

अरबी/फार्सीचा मराठीच्या शब्दसिद्धीशी फार निकटचा संबंध आहे. असंख्य अ.फा. उपसर्गांच्या व तद्धितांच्या साहाय्याने मराठी शब्द तयार झाले आहेत. त्यांचा सविस्तर तपशील या प्रकरणात दिलाच आहे. मराठी समासांची मूलभूत प्रकृती 'सु-संस्कृत' आहे,त्यांचे मूळ संस्कृत व्याकरणात आढळते पण अव्ययीभाव,तत्पुरुष,कर्मधारय,द्वन्द्व, द्विगु,बहुव्रीही या समासांचे प्रकार-उपप्रकार यांतही अ.फा. शब्दांचे साहाय्य लाभले आहे. मराठीच्या प्रकृतीशी फार्सी कशी एकरूप झाली, याचे चित्र यातून स्पष्ट होत जाते. अनेक मराठी अभ्यस्त शब्दांच्या जडणघडणीतही फार्सी भाषा अलिप्त राहिली नाही. अरबीसारख्या सेमिटिक वंशाच्या भाषेची शब्दसिद्धी फार्सीने स्वीकारल्यामुळे ती ओघाने पुढे मराठीनेदेखील कशी स्वीकारली आहे,याचा विचार या प्रकरणाच्या शेवटी केला आहे. सेमिटिक,इंडोइराणियन व आर्यभारतीय भाषांचे काही प्रवाह यांचा संगम या शब्दसिद्धीच्या रूपाने येथे झाल्याचे जाणवते. याशिवाय अकरणदर्शक,तरतमभावदर्शक, समानार्थी व विरुध्दार्थी अ.फा.शब्दांनीही मराठी साधित शब्दांचे दालन समृद्ध केले आहे.

-----------------

संदर्भ-टीपा

१) शामव्या.पृ . ३८७
*ठळक टाइप माझा.
२) PED,p,876
३) फामको प्र.पृ. २९
४) मपग . पृ. ८९
५) मबफास्व.पृ. ३६४
६) शामव्या.पृ. ३९४
७) फामको.प्र.पृ. २७
८) मपग,पृ. ८९
९) मबफास्व, पृ. ३७०-३७१
१०) शामव्या,पृ. ३९४
११) फामको, प्र.पृ. २७
१२) मपग.पृ. ८९
१३) मबफास्व पृ. ४४१
१४) शामव्या.पृ . ३९४-९५
१५) मबफास्व.पृ. ५१७
१६) मपग .पृ. ८९
१७) शामव्या.पृ. ३९५
१८) कित्ता.
१९) फामको.प्र.पृ. २९
२०) मबफास्व.पृ. १८४
२१) मपग.पृ. ८९
२२) मशस.पृ. ६६ आणि पृ. ५४
२३) फामको.प्र.पृ. २७
२४) मशस.पृ. ६६-६७
२५) मबफास्व.पृ. ६०७-६१६
२६) फामको प्र.पृ. २७
२७) मशस.पृ. ६७ आणि मपग.पृ.८९
२८) शामव्या.पृ. ३९५
२९) मबफास्व , पृ. ६१३-६१६
३०) फामको.प्र.पृ. २७
३१) मशस.पृ ६७ आणि मपग पृ. ८९.
३२) मबफास्व.पृ. ६१८-२९

३३) शामव्या.पृ. ३९५
३४) मशस.पृ. ६७ आणि मपग.पृ. ८९
३५) मबफास्व.पृ. ६३८
३६) शामव्या.पृ. ३९६
३७) PED.p.224
३८) मबफास्व , पृ. ६३८
३९) फामको.प्र.पृ. २७
४०) शामव्या.पृ. ३९५-६
४१) फामको.प्र.पृ. २९
४२) मशस.पृ. ६७
४३) फामको.प्र. पृ. २७
४४) मबफास्व.पृ. ७१५
४५) मशस.पृ. ६९ आणि मपग.पृ. ८९
४६) शामव्या.पृ. ३९६
४७) मशस पृ. ७० आणि मपग.पृ. ८९
४८) राव्यको, सूची, पृ. २८
४९) मबफास्व.पृ. ७६२-६८
५०) शामव्या.पृ. ३९६
५१) मशस.पृ. ७१
५२) मपग.पृ. ८९
५३) मबफास्व.पृ. ८०१
५४) शामव्या.पृ. ३९६
५५) मशस पृ.७१ आणि मपग.पृ. ८९
५६) शामव्या.पृ. ३९६
५७) कित्ता.पृ. ३८७
५८) कित्ता, पृ. ३८७
५९) फामको.प्र.पृ. २२-२९
६०) कित्ता.पृ. २२
६१) मबफास्व.पृ. १७१
६२) फामको.पृ. २३
६३) मबफास्व.पृ. १७१
६४) फामको.प्र.पृ. २२.मबफास्व पृ.१७२ व मपग.पृ.९०
६५) कित्ता
६६) ऐप्र पृ. ४०८

६७) फामको, प्र.पृ. २३
६८) मबफास्व,पृ. १७३
६९) याकाम,पृ. २७४-५
७०) मबफास्व,पृ. १७२
७१) पाहा-मर्दुमी,फामको,पृ. १८५
७२) मपग,पृ. ९०
७३) मबफास्व,पृ. १७३,फामको,पृ. १६२
७४) फामको,पृ. ७६ पाहा- जादूगिरी.
७५) फामको,प्र.पृ. २२
७६) शामव्या,पृ. ७७१
७७) फामको,प्र.पृ. २२
७८) PED,p.1354
७९) पाहा-मबफास्व,पृ. १०४
८०)PED.p.1143
८१) मबफास्व,पृ.१७४
८२) किता,पृ. १७७
८३) मपग,पृ. ९०
८४) फामको,प्र पृ. २३
८५) मबफास्व,पृ.१७७
८६) फामको,प्र.पृ. २३ व मबफास्व,पृ. १७४
८७) फामको,प्र.पृ. २३
८८) मबफास्व,पृ. १७५
८९) शामव्या,पृ. ५४०
९०) फामको,प्र पृ. २३
९१) ऐप्र,खंड.८,पृ.४०९
९२) मपग,पृ. ९०
९३) राव्यको,पृ. २-३१
९४) मबफास्व,पृ. १७४
९५) ऐप्र.खंड ८,पृ. ४००
९६) फामको,प्र.पृ. २३
९७) मबफास्व,पृ. ३७४
९८) मपग,पृ. ९०
९९) राव्यको.सूची,पृ. १७
१००) फामको,प्र.पृ. २३

१०१) ऐप्र.खंड ८ पृ. ४००
१०२) फामको.प्र.पृ. २३
१०३) मपग.पृ. ९०
१०४) नबफास्व.पृ.१७४
१०५)राव्यको.सूची.पृ. ४,१०,१२
१०६) फामको.प्र.पृ. २३
१०७) मबफास्व.पृ. १७५
१०८) मपग.पृ. ९०
१०९) राव्यको.पृ. ३६
११०) फामको.प्र.पृ. २३
१११) मबफास्व.पृ. १७५
११२) फामको.प्र. पृ.२३
११३) PED.p.148
११४) मबफास्व.,पृ. १७६
११५) PED pp.201.202
११६) मबफास्व.पृ. १७६
११७) ऐप्र खंड ८.पृ.४००
११८) फामको.प्र.पृ. २३
११९) मपग.पृ. ९०
१२०) राव्यको.सूची.पृ. २७
१२१) फामको.प्र.पृ. २३
१२२) राव्यको.सूची अनु.पृ. ३,२०,३०
१२३)राव्यको.सूची.पृ. १०
१२४) PED.p.374
१२५) फामको.प्र.पृ. २३
१२६) मपग.पृ. ९०
१२७) नबफास्व.पृ.१७६
१२८) फामको.प्र.पृ. २३
१२९) मबफास्व.पृ. १७६
१३०)फामको.पृ. २३
१३१) मबफास्व.पृ. १७६
१३२) शामव्या.पृ ४७०
१३३) कित्ता
१३४) राव्यको.पृ. ४८

१३५) राव्यको,पृ. २३
१३६) मबफास्व,पृ. १७६
१३७) कित्ता
१३८) शामव्या,पृ.४७२
१३९) मबफास्व,पृ. १७७
१४०) फामको,प्र.पृ. २४
१४१) शामव्या,पृ. ४७२
१४२) फामको,प्र.पृ. २४
१४३) मबफास्व,पृ. १७७
१४४) शामव्या,पृ. ४७२
१४५) फामको,प्र. पृ.२४
१४६) PED,p449 स्टेनगॅसने त्याचा अर्थ Lord बरोबरच Possesser असाही दिला आहे.
१४७) मबफास्व,पृ. १७७
१४८) कित्ता व शामव्या पृ. ४७२
१४९) मबफास्व,पृ. १७८
१५०) फामको प्र.पृ. २४
१५१) राव्यको,पृ. ५०
१५२) शामव्या. पृ. ४७२
१५३) फामको,प्र.पृ. २४
१५४) शामव्या,पृ. ४७२
१५५) मबफास्व. पृ. १७८
१५६) फामको,प्र.पृ. २४ आणि मबफास्व,पृ.१७८
१५७) फामको,प्र.पृ. २४
१५८) कित्ता
१५९) मबफास्व,पृ. १७८
१६०)फामको प्र.पृ. २४
१६१) मबफास्व,पृ. १७८
१६२) फामको प्र.पृ.२५ आणि मबफास्व.पृ. १७९
१६३) शामव्या,पृ. ४७३
१६४) फामको,प्र.पृ. २५ आणि मबफास्व.पृ. १७९
१६५) फामको,प्र.पृ. २५
१६६) फामको प्र.पृ. २५ आणि मबफास्व.पृ. १७९
१६७) मपग पृ. ९०

१६८) मबफारस्व,पृ. १८०
१६९) फामको. प्र.पृ. २५
१७०) राव्यको,पृ. ४९
१७१) फामको.प्र.पृ. २५ आणि मबफारस्व पृ.१८०
१७२) फामको प्र.पृ. २५
१७३) मबफारस्व .पृ. १८०
१७४) फामको,प्र.पृ. २५
१७५) मबफारस्व,पृ. १८०
१७६) शामव्या,पृ. ४७३
१७७) फामको,पृ. २५
१७८) मबफारस्व,पृ. १८०
१७९) मपग,पृ. ९०
१८०) शामव्या,१७३
१८१) फामको,प्र.पृ. २५
१८२) कित्ता
१८३) मबफारस्व,पृ. ५२५
१८४) मबफारस्व,पृ. १८०
१८५) मपग,पृ. ९०
१८६) राव्यको,पृ. १३,५४
१८७) मबफारस्व,पृ.१८०
१८८) फामको,प्र.पृ. २५
१८९) मपग.पृ. ९०
१९०) शामव्या,पृ. ४७३
१९१) फामको. प्र.पृ. २५
१९२) मबफारस्व.पृ. १८०
१९३) फामको,प्र.पृ. २५
१९४) मबफारस्व,पृ. १८०
१९५) मपग,पृ. ९०
१९६) PED,p.291
१९७) फामको,प्र.पृ. २५
१९८) मबफारस्व, पृ. १८०,मपग,पृ.९०
१९९) PED p.818
२००) फामको,पृ. २५
२०१) कित्ता

२०२) मबफास्व,पृ. १८०
२०३) मपग,पृ. ९०
२०४) फामको, प्र.पृ. २५
२०५) राव्यको,सूची २-३१
२०६) मपग पृ.९०
२०७) मबफास्व,पृ. १८०
२०८) PED.p.541
२०९) फामको प्र.पृ. २५
२१०) मपग.पृ. ९० व मबफास्व पृ.१८०
२११) शामव्या.पृ.४७२-४७५
२१२) PED.p.1429
२१३) फामको, प्र.पृ. २६
२१४) मबफास्व,पृ. १८०
२१५) एगा.पृ . ७९७
२१६) मपग.पृ.९० व पृ. २२९-३१
२१७) मबफास्व.पृ. १८१
२१८) कित्ता
२१९) शामव्या.पृ. ४७३
२२०) PED.p 1436
२२१) फामको,प्र.पृ. २६
२२२) मपग.पृ. ९०
२२३) मबफास्व,पृ. १८०
२२४) कित्ता,पृ.१८१
२२५) फामको पृ. २६
२२६) मपग,पृ. ९०
२२७) मबफास्व,पृ.१८०
२२८) PED.pp.1425,1427
२२९) मपग,पृ.९० व फामको पृ.१८१
२३०) शामव्या,पृ.४७३
२३१) PED.p 241
२३२) कित्ता पृ. २४५
२३३) मबफास्व.पृ. १८१ व मपग,पृ. ९०
२३४) फामको,पृ. २६
२३५) कित्ता

२३६) मबफास्व,पृ.१८१ आणि मपग,पृ.९०
२३७) PED.p.231
२३८) फामको,प्र.पृ. २६
२३९) कित्ता
२४०) फामको. प्र.पृ. २७
२४१) PED p. 260
२४२) फामको.प्र.पृ. २६
२४३) मबफास्व,पृ.१८१
२४४) PED.p.80
२४५) फमको प्र.पृ. २६ आणि मबफास्व,पृ.१८१
२४६) PED.p.923
२४७) फामको,प्र.पृ. २६
२४८) कित्ता
२४९) मबफास्व,पृ. १८१
२५०) मपग,पृ.९०
२५१) कित्ता
२५२) मबफास्व,पृ.१८१
२५३) PED.p 173
२५४) फामको,प्र.पृ. २६
२५५) कित्ता
२५६) मबफास्व,पृ. १८१
२५७) मपग.पृ. ९०
२५८) मबफास्व,पृ. १८१
२५९) PED.p 551
२६०) फामको,पृ. २६
२६१) मबफास्व,पृ. १८१
२६२) फामको,प्र.पृ . २६
२६३) मबफास्व,पृ. १८१
२६४) PED.p.1144
२६५) फामको,पृ.२६
२६६) मपग,पृ.९०
२६७) मबफास्व,पृ. १८१
२६८) फामको,पृ.२६
२६९) मबफास्व पृ. १८१

२७०) PED.p 569
२७१) फामको,प्र.पृ. २६
२७२) PED.p 591
२७३) फामको,प्र.पृ. २६
२७४) PED.p.601
२७५) फामको,प्र.पृ. २६
२७६) PED.p.689
२७७) फामको,प्र.पृ. २७
२७८) मपग,पृ.९१
२७९) शामव्या,पृ.४८१
२८०) मबफास्व,पृ. १८७
२८१) शामव्या पृ. ४८६
२८२) मबफास्व,पृ. १८७
२८३) ऐप्र,पृ. ४०९
२८४) मबफास्व,पृ. १८७
२८५) शामव्या,पृ.४८६-८८,ठळक टाइप माझा.
२८६) मबफास्व,पृ. १८७-८८, मपग,पृ.९१
२८७) पाहा - मपग,परिशिष्ट पृ.१७७-२२४
२८८) शामव्या,पृ.४९०
२८९) कित्ता .पृ. ४८६,४९२
२९०) फामको प्र.पृ.२९
२९१) कित्ता
२९२) कित्ता प्र.पृ. २८
२९३) मपग पृ. ९१
२९४) फामको पृ. २४४
२९५) शामव्या पृ. ५०४
२९६) मबफास्व,पृ.१८९,७३८
२९७) कित्ता पृ.१९५-९६
२९८) ऐप्र पृ.४०९
२९९) शामव्या,पृ. ४९६
३००) कित्ता . पृ. ५२२-५३४
३०१) कित्ता . पृ.५२२
३०२) कित्ता . पृ. ४७०
३०३) मबफास्व,पृ. १६६-१७१

३०४) शामव्या.पृ ४७६
३०५) कित्ता , पृ. ७७७
३०६) कित्ता , पृ.७७८,मबफास्व पृ. १६९
३०७) शामव्या.पृ. ४७८ व मबफास्व पृ.१६९
३०८) शामव्या. पृ.४७८
३०९)कित्ता , व मबफास्व पृ.१६९
३१०) मबफास्व .पृ. १९४-१९७
३११) कित्ता , पृ. १८६
३१२) फामको प्र.पृ. १२
३१३) मबफास्व पृ.६३९
३१४) फामको प्र पृ. २८-२९
३१५) मबफास्व .पृ.१८४

---------------

# प्रकरण पाचवे
# अ र्थ वि चा र

**प्रास्ताविक**

शब्दांच्या अर्थात कालमानानुसार होणारे परिवर्तन आपल्याला भाषेच्या अंतरंगाच्या एका वैशिष्ट्यपूर्ण दालनाचे दर्शन घडविते आणि यासाठीच भाषावैज्ञानिक अध्ययनात अर्थविज्ञानाचे एक आगळेवेगळे महत्त्व आहे. भारतीय भाषांचा विचार करता या अध्ययनक्षेत्रात डॉ. बाबूराम सक्सेना आणि डॉ.मलिक हरदेव बाहरी या हिन्दी भाषावैज्ञानिकांनी त्यांच्या (अनुक्रमे)'अर्थविज्ञान' आणि 'Hindi Semantics' किंवा 'हिन्दी अर्थविज्ञान' यासारख्या ग्रंथांच्या रूपाने मोलाची भर घातली आहे .मराठी भाषेत अशा प्रकारचा एकमेव प्रयत्न झाला, तो म्हणजे डॉ.अनुराधा पोतदार यांनी गेल्या शतकात १९५३ -५४ च्या सुमारास पुणे विद्यापीठास सादर केलेला व पीएच्.डी.पदवीसाठी मान्य झालेला मराठी अर्थविज्ञानाविषयक मौलिक प्रबंधयानंतर या स्वरूपाचे काम मराठीत झाले नाही.

मराठीत आलेल्या अरबी - तुर्की - फार्सी भाषांच्या शब्दांच्या अर्थात अनेक परिवर्तने झाली आहेत,त्यांचा विचार होणे अगत्याचे आहे,याची जाणीव डॉ.पोतदार आणि डॉ.शं.गो.तुळपुळे यांनी 'अर्थविज्ञान आणि मराठी भाषा' या लेखात[१] करून देताना म्हटले होते, 'फारसीसारख्या परभाषेचा परिणाम मराठीवर कितपत,झाला तें अजमाविण्याचें एक साधन म्हणजे 'फारसी-मराठी कोश ' हे डॉ.माधवराव पटवर्धनांनी उपलब्ध करून दिले.' तथापि या कोशाच्या प्रस्तावनेत डॉ. पटवर्धनांनी अर्थवैज्ञानिक विचार केलेला नाही. तो करणे अगत्याचे असल्याने 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप 'या माझ्या ग्रंथातील 'अर्थप्रक्रिया 'या प्रकरणाच्या रूपाने या अध्ययनक्षेत्रात मी पहिले पाऊल टाकले. हा ग्रंथ १९७३ साली प्रकाशित झाला तथापि या अध्ययनशाखेकडे आजवर कुणी फारसे वळले नाही. डॉ.देवीसिंग चौहान यांनी काही फार्सी शब्दांविषयी व त्यांच्या अर्थाविषयी स्फुट लेख लिहिले. माझा ग्रंथही केवळ बखरींतील अरबी-तुर्की-फार्सी शब्दांपुरताच मर्यादित होता. त्यामुळे मध्ययुगीन व वर्तमान मराठीतील अशा शब्दांचा सम्यक् अर्थवैज्ञानिक विचार झाला नव्हता. त्याचे महत्त्व जाणवावे,या दृष्टीने मी रविवारच्या 'महाराष्ट्र टाइम्स' च्या 'मैफल' पुरवणीत 'अर्थाअर्थी' हे सदर १९९४ साली पाच - सहा महिन्यांसाठी लिहिले व या अर्थ-परिवर्तनांचा छोटासा आलेख रेखाटण्याचा प्रयत्न केला.

या ग्रंथालाही या प्रकरणाची स्थलमर्यादा असल्याने यात या विषयाच्या केवळ महत्त्वाच्या अंगांनाच स्पर्श करता येईल.त्याच्या सखोल संशोधनासाठी स्वतंत्र संशोधन-प्रकल्पच घ्यायला हवा,एवढी प्रचंड सामग्री आज उपलब्ध आहे.पण गेल्या अर्धशतकाचा अनुभव व

अरबी - फार्सी जाणणाऱ्या मराठी अभ्यासकांचा अभाव लक्षात घेता,हे महत्त्वाचे दुर्लक्षित क्षेत्र यापुढेही तसेच राहील का, अशी चिन्ता वाटू लागते.मराठीत आलेल्या अ.तु.फा शब्दांच्या बाबतीत घडलेल्या विविध अर्थप्रक्रियांचा विचार पुढे केला आहे.

**अर्थाचे स्पष्टीकरण**

परकीय भाषेतील शब्द एखाद्या भाषेत येतात,त्यावेळी त्यांचे अर्थ अपरिचित असल्याने काय घडते,याचा विचार मी 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप '[' या ग्रंथात विस्ताराने केला आहे. अरबी-तुर्की-फार्सी शब्द मराठीत येताना अर्थ स्पष्टीकरणाची प्रक्रिया मला तीव्रतेने जाणवली.मूळ अ.तु.फा.शब्द व त्याचा मराठी प्रतिशब्द हे जोडून वापरण्याची प्रथा त्यातून रूढ झाली.असे होणे अत्यंत नैसर्गिक व स्वाभाविक होते. याचा थोडा विचार मी 'साधित शब्द' (शब्दसिध्दी) विषयक प्रकरणात केलेला असल्याने येथे पुनरुक्ती न करता काही महत्त्वाची उदाहरणे देतो -

शब्दांपुढे संदर्भाचे संक्षेप व पृष्ठक्रमांक कंसांत दिले आहेत -

अभय कौल (संभाच २७),आयव्यय जमाखर्च (सच ३३८),इतराजी अवकृपा(मसाछोब १०३),ईश्वरी खुदाई (शिप्र ६७),कारकून लिहिणार(धारा १६),बळकट जबरदस्त(शिप्र ८६)जराजरा तिल तिल(विवि १७७),तारीफा गौरव (सच १३६),धनी खावंद (शाब ४७),धनी मालक (दाह १६),नौबत डंके (भाब १६५),न्याय इनसाफ (शह १६५),पक्की मजबूत (शिप्र २),पदार्थ जिन्नस (सच २४२)पढे फाजल (होथै १८६),मर्यादा अदब(ब्रच ३३),रोखा-पत्र(सच १७५),वस्ती आबादी (होकै१०९),वाणी बकाल(सच१२९),सेवा चाकरी(शिप्र ७४).

**अर्थसंकोच**

मूळातला शब्दार्थ व्यापक असताना तो कमी होण्याची प्रक्रियाही मराठीत आलेल्या अरबी - तुर्की - फार्सी शब्दांच्या बाबतीत घडते. तिची असंख्य उदाहरणे आहेत.अरबी -फार्सी बहुवचनी/अनेकवचनी शब्द अनेकदा मराठीत एकवचनी अर्थाने वापरल्यानेही अर्थसंकोच झाला आहे.

| शब्द | अ.तु.फा.शब्द व मूलार्थ | अर्थसंकोच |
|---|---|---|
| अवलाद | अ.वल्द्चे अव = मुले | मूल |
| अवाई | फा. आवा : ध्वनी | अफवा,भुमका, |
| असामी | अ.इस्म् चे अव = नावे | व्यक्ती |
| आमदार | अ. आम् = सर्वसामान्य, | |
| | फा.दार् = बाळगणारा | विधानसभा/परिषद सदस्य |
| आरवा | फा. रूह् चे अव = आत्म | आत्मा |
| आवाज | फा. आवाज् = ध्वनी | तोफेचे बार (मम) |

| | | |
|---|---|---|
| उधी | अ. ऊदी = लाकडाचा | पीराजवळ ऊद जाळून त्याचा प्रसाद म्हणून घेतलेला अंगारा |
| उमराव | अ.अमीर्चे अव = अनेक सरदार | सरदार |
| करोळ | तु. करावुल् = संरक्षक | बंदूकस्वार |
| काफर | अ. क़ाफ़िर् =\| नास्तिक,अश्रध्द | इस्लामी धर्मग्रंथावर विश्वास न ठेवणारा |
| किनार | फा.किनार् = कूस,बगल,किनारा | साडीचा पदर |
| खलक | अ. खल्क़् = लोक | खालच्या जातीचे लोक |
| खासदार | अ.ख़ास्स् = वशिष्ट (लोक), फा.दार् = बाळगणारा | लोकसभा/राज्यसभा सदस्य |
| खुषबो | फा.ख़ुश्बो = सुगंध | सुगावा (मम) |
| खैरात | अ. खैर् चे अव = चांगल्या वस्तू, चांगली कामे | दानधर्म |
| गनीम | अ.ग़नीम् = शत्रू,लुटारू | मुसलमानांनी मराठ्यांसाठी योजिलेला शब्द(म.म.त मराठ्यांनी स्वतः-साठी हा शब्द वापरला आहे !) |
| गुमास्ता | फा.गुमाश्तह् = प्रतिनिधी | मुनीम (वम) |
| जनावर | फा.जान् वर् = (सजीव)प्राणी | साप,वाघ (प्रादेशिक) |
| जमादार | अ.जम्अ्+फा.दार्= सैन्याच्या तुकडीवरील अधिकारी | छोटया तुकडीवरील अधिकारी |
| जेबंद | फा.ज़ेर्बंद् =खालील पट्टा | जीन आवळून धरण्याचा पट्टा |
| तावदान | फा.ताब्दान् = खिडकी | खिडकीतील काच |
| दौलतजादा | फा.दौलत्, अ.ज़ियाद् = अधिक संपत्ती | (वम)तमाशात प्रोत्साहनार्थ दिलेली रक्कम |
| पैगंबर | अ. पैग़ाम् +फा.बर् = प्रषित | इस्लामधर्मसंस्थापक हजरत मुहम्मद |
| पेशवे | फा.पेश्वा = पुढारी,नेता | (मराठ्यांचे) प्रधान |
| फद्यां | अ.फ़िद्य=खंडणी | एक नाणे |
| फारकत | अ. फ़ारिग्,ख़त्=मुक्तिपत्र | सोडचिट्ठी |
| फौजदार | अ.फौज्+फा.दार्=सैन्य बाळगणारा | एक पोलीस अधिकारी |
| बांग | फा.बांग् =पुकारा, | प्रार्थनेसाठी मशिदीत यावे म्हणून केलेला पुकारा |

| | | |
|---|---|---|
| बालेकिल्ला | फा.बाला=उंच,अ.कल्अह्=उंच किल्ला | १ पहाडी किल्ल्यातील पोटकिल्ला (मग)<br>२. स्वामित्व असलेली खास जागा/परिसर (वम) |
| मामलत | अ.मुआमलत् : कार्य,गोष्ट | तालुक्याच्या वसुलीचे काम |
| मुकादम | अ.मुकद्दम् = प्रमुख पुढारी | मजुरावर देखरेख करणारा |
| मोतदार | मुतअहिहद् = काळजी घेणारा | घोड्याची देखभाल करणारा नोकर ,साइस |
| वतन | अ.वतन् = जन्मभूमी | स्थावर/जंगम मालमत्ता, वंशपरंपरागत इनाम/काम |
| वस्ताद | अ.उस्ताद् = गुरू | तालमीतील/संगीतातील गुरू |

**अर्थच्युती**

मराठीत आलेल्या काही अरबी -तुर्की - फार्सी शब्दांचा अर्थ पूर्णपणे लुप्त झाल्याचे आढळते.असे का घडले असावे,याची कारणे काही वेळा सांगता येतात तर काही वेळा सांगता येत नाहीत.

i.) इतिहासकाळात रूढ असलेले अनेक हुद्दे पुढे नाहीसे झाले पण ते हुद्दे धारण करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या घराण्यात तेच शब्द आडनावांप्रमाणे पुढे तसेच रूढ झाले.त्यामुळे हुद्दे गेले तरी ही आडनांवे तशीच चालत राहिली आणि अशा आडनावांना मग अर्थच उरला नाही. अनेक व्यावसायिकांच्या बाबतीतही असे घडले. हुद्दे वा व्यवसाय दर्शविणाऱ्या अशा अरबी तुर्की,फार्सी शब्दांचा अर्थ कालान्तराने लोपला. त्यांची फार मोठी यादी देता येईल पण येथे वानगीदाखल काही उदाहरणे देतो-
अत्तार,इनामदार,काशीद,कारखानीस,खासगीवाले,खासनीस,चिटणीस,जकातदार, जकातनीस,जकाते,जमादार,जामदार,डबीर,तबीब,दफेदार,पागे,पागनीस,पेशवे,फड्णीस, फरास,बक्षी,मिरासदार,मिरधे,मुतालीक,शिकलगार,शिलेदार,सरंजामे,सरदार,सुभेदार,हरकारे, हसबनीस,हेजीब.

ii)अनेक अरबी-फार्सी शब्दयुक्त व्यक्तिनामांचाही अर्थलोप झाला आहे-
खुशालचंद,खुशालसिंग (<फा.ख़ुश्हाल् =सुस्थिती),दर्याबाई(<फा.दर्या=समुद्र), फकीरचंद,फकीरजी(<अ.फ़क़ीर),,फत्तेसिंग(<अ.फ़त्ह्=विजय), बाजीराव(फा.बाज़ी=खेळ,डाव,सरशी),वखतचंद(<अ वक़्त=समय),सर्फोजी <शरीफ़जी (अ.शरीफ़् : प्रामाणिक),सर्जेराव(फा.शर्जा=उग्रसिंह) .सुलतानराव(अ.सुल्तान्=राजा),हंबीरराव(अ.अमीर् =प्रतिष्ठित व्यक्ती,श्रीमंत माणूस), हिंमतराव(अ.हिंमत् =साहस,ताकद),हैबतराव(अ.हैबत्=धाक,दरारा.)

**अर्थभ्रंश**

काही अरबी-फार्सी शब्दांतील मूलार्थ मराठीत नाहीसा झाला असून (कधी कधी त्याऐवजी त्यांच्याशी संबंध नसलेला)वेगळाच अर्थ त्याला प्राप्त झाला आहे-

| शब्द | अ.फा.मूलार्थ | अर्थभ्रंश |
|---|---|---|
| अवलाद | अ.औलाद् =प्रजा,कुळी | अर्वाचीन मराठीत शिवीसारखा प्रयोग |
| अवलिया | अ. औ़लिया =ईश्वराचे मित्र,संत | लुच्चा,लबाड,उपद्व्यापी |
| इरसाल | अ. इर्साल् =पाठवणूक,पाठवायची रक्कम | बेरकी. |
| इसम | अ.इस्म्=नाव | मनुष्य,व्यक्ती |
| कंगाल | फा. कंगालह्=चिक्कू | भिकारी,दरिद्री |
| कारभार | फा. कार् - उ -बार्=कामकाज | नसता उद्योग |
| खलबत | अ.ख़ल्वत् =एकांतीचे बोलणे | कूट कारस्थान,गुप्त योजना वा विचारविनिमय |
| गुर्मी | फा.गर्मी =उष्णता | मग्रूरी. |
| गुलाम | अ. ग़ुलाम् =दास | लहान मुलासाठी कौतुकाने वापरायचा शब्द |
| फरासखाना | अ.फ़र्राश्+फा.ख़ानह् :अस्तरणागार | तुरुंग,चौकी |
| फाजिल | अ.फ़ाज़िल् =अधिक | चावट |
| वस्ताद | अ.उस्ताद्=गुरू | कावेबाज,धूर्त |
| शेतखाना | अ.सिह्हत् ,फा.ख़ानह्=आरोग्यगृह | पायखाना |
| हरकत | अ.हर्कत्=हालचाल | आक्षेप. |
| हाल | अ. ह़ाल्=स्थिती | दुर्दशा. |

**अर्थहीनत्व**

ही एक वेगळीच अर्थप्रक्रिया . याविषयी संशोधन करताना मला जाणवली.'अर्थप्रशस्ती 'मध्ये मूलार्थ सामान्य असताना त्यात अधिक चांगल्या अर्थाची भर पडते तर या प्रक्रियेत त्याच्या उलट घडते.

'कारागिरी 'हा शब्द मराठीत फार्सी 'कार्गीरी 'या शब्दापासून आला व त्याचा अर्थ 'कौशल्य ,करामत,कसब 'असा डॉ.पटवर्धन' यांनी दिला आहे.तथापि 'कला आणि कारागिरी' असा शब्दप्रयोग मराठी समीक्षेत करतात त्यावेळी 'कारागिरी' या शब्दाला कृत्रिमतेची अर्थच्छटा प्राप्त होते. 'बुजुर्ग 'या शब्दाचा अर्थ 'थोर , वृध्द ''असा असताना त्यापासून सिध्द झालेल्या 'बुद्रुक' या शब्दाचा एक अर्थ ' क्षुद्र, नगण्य' असाही होतो. 'लाचार 'या शब्दाचा मूलार्थ 'निरुपाय' असा आहे तथापि 'लाचारी 'या शब्दातून

पराकोटीची अगतिकता प्रकटते.हप्ता हा शब्द फारसी 'हफ्तह्' म्हणजे आठवडा या अर्थाचा असतानाही शिपाई वा दादालोक 'हप्ते' वसूल करतात त्या वेळी या शब्दाचा दोष नसतानाही त्याला अकारण हीनत्व स्वीकारावे लागते!

बकाल 'हा मूळचा अरबी बक्काल् म्हणजे भाजीविक्या 'असून 'बकाल वस्तीत' त्याची काय अवस्था होते ! 'वकीली 'या शब्दाचीही वकीली करणे या वाक्प्रचारात तशीच अवस्था झाली आहे.

अर्थविस्तार -

अर्थविस्तार हा अर्थविज्ञानाचा महत्त्वाचा घटक आहे.मराठीत आलेल्या अरबी-तुर्की-फारसी शब्दांच्या बाबतीत 'अर्थविस्तार 'ही प्रक्रिया प्रामुख्याने घडते. बखरींतील [६] अशा शब्दांच्या बाबतीत ती का घडते, याविषयी मी केलेले विवेचन अन्यत्रही लागू पडत असल्याने ते येथे पुन्हा उद्धृत करीत आहे . आवश्यक तेथे थोडाफार बदल केला आहे .- 'कायदा ' आणि 'कानून 'हे समानार्थी शब्द आहेत.'नियम 'असा त्यांचा अर्थ आहे पण त्यांच्या सामासिक साहचर्यामुळे 'नियम व तत्सम गोष्टी इ 'अशी भर त्यांच्या अर्थात पडली आहे 'तवा 'आणि 'तोबरा' यांचे अर्थ आपल्याला माहीत आहेत पण मराठेशाहीच्या काळात 'तवा -तोबरा चालणे 'या वाक्प्रचारात मात्र घोड्यास दाणा व शिपायांना शिधा मिळणे म्हणजे पर्यायाने सैन्यातील सर्वांची उदरनिर्वाहाची व्यवस्था होणे असा अर्थविस्तार झाला आहे.'दाणादाण 'हा शब्द फारसी 'दानह् 'या शब्दाच्या पुनरावृत्तीने सिध्द झाला आहे . 'दानह् 'म्हणजे धान्याचा कण.'दाणादाण 'या शब्दाचा अर्थ मात्र 'अन्नास मोताद,(आणि त्यामुळेच) परागंदा,विकीर्ण 'असा झाला आहे. अशा प्रकारच्या अर्थविस्ताराच्या प्रक्रियेमुळे शब्दास मूलार्थापेक्षाही अधिक प्रभावी असा अर्थ व्यक्त करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते. या प्रक्रियेच्या मुळाशी अनेक कारणे आहेत. त्यांपैकी व्दिरुक्ती,समास,शब्दसिध्दी व संदर्भ (इतिहास) ही कारणे प्रमुख होत.केवळ 'जागा 'या शब्दाचा अर्थ 'स्थळ 'किंवा 'ठिकाण 'एवढाच मर्यादित आहे पण 'जागोजाग' अशी व्दिरुक्ती झाल्याने 'ठिकठिकाणी' असा अर्थविस्तार त्यात झाला आहे.शिवकाल व पेशवेकाल या कालखंडांत 'जिनबंदी'या शब्दाचा मूलार्थ 'जीन बांधणे 'एवढाच राहात नाही तर त्यातून अर्थविस्तार-प्रक्रियेमुळे 'युध्दाची सिध्दता ' असा व्यापक अर्थ व्यक्त होतो.'जेर्'या फारसी शब्दाचा अर्थ 'खाली' आणि 'जबर्' चा अर्थ वर असा आहे पण मध्ययुगात 'जेरजबर पाहणे ' म्हणजे एकमेकांचे सामर्थ्य अजमावणे होय 'मजल ' (फा.मंज़िल)चा अर्थ टप्पा असा आहे पण 'दर' हे शब्दयोगी अव्यय वापरून 'मजल दर मजल 'असा प्रयोग केला तर 'एकामागून एक टप्पे गाठत' असा व्यापक अर्थ त्यातून व्यक्त होतो 'पर्दाफाश 'हा शब्द अलीकडे मराठी भाषेत रूढ होऊ लागला आहे . वृत्तपत्रीय लेखनात,विशेषतःविदर्भ-मराठवाड्यात,तो फार प्रचारात आहे .'पर्दह् 'म्हणजे पडदा,'फाश् 'म्हणजे फाड(णे),पण त्याचा अर्थ अधिक व्यापक होऊन रहस्यस्फोट

,रहस्यभेद अशा प्रकारचा अर्थ त्याला प्राप्त झाला आहे.

संदर्भामुळे वा इतिहासामुळेही काही शब्दांत अर्थविस्ताराची प्रक्रिया घडते.'हुसेनी 'या शब्दाचा मूलार्थ 'हुसेनविषयक' एवढाच असला तरी 'हुसेनच्या काळात घडले तसे यादवी युध्द' असा अर्थ त्यातून व्यक्त होतो.'मोगलाई' व 'पेशवाई 'या शब्दांच्या बाबतीतही असेच घडले आहे.मोगलांच्या वा पेशव्यांच्या काळात घडलेल्या घटनांचे संदर्भ या शब्दांच्या अर्थांना लाभतात व आजच्या काळातही तसे काही घडले तर आपण त्यासाठी हे फार्सी शब्द आजही वापरतो. अशा शब्दांचा विचार जसा अर्थविस्तार या प्रक्रियेत करता येतो तसाच साम्यमूलक अर्थप्रक्रियेतही करता येतो. अशा शब्दाच्या अर्थाला मग विशिष्ट काळाची मर्यादा व बंधन उरत नाही. मध्ययुगीन व वर्तमान मराठीत अरबी-तुर्की-फार्सी शब्दांची असंख्य उदाहरणे अर्थविस्ताराचे विवेचन करताना देता येतील तथापि स्थलमर्यादेस्तव तेवढा 'विस्तार 'करीत नाही.

| शब्द | अ.तु.फा.शब्द व मूलार्थ | अर्थविस्तार |
|---|---|---|
| अराबा | अ.अराबह्=तोफेचा गाडा | तोफखाना |
| आमखास | अ.आ़म् - उ - खास्स्:सामान्य व विशेष | दोन्ही वा सर्व प्रकारचे दरबार |
| आरास | फा.आरायिश्=सजविणे | वस्तूंची चित्ताकर्षक मांडणी,सजावट |
| एकदिल | फा.यक् दिल् = एक ह्रदय | एकमत,स्नेह |
| कजाग | तु.क़ज़्ज़ाक़्=कझाक लोक | (वम) भांडखोर,खाष्ट(स्त्री) |
| कत्तल | अ.क़त्ल्=मारणे | कापाकापी,हिंसा |
| कबूलकतबा | अ.क़बूल् =मान्य, किताब्=पुस्तक,लेख | कबुली लेख,करारनामे इ. |
| कमकसर | फा.कम्=कमी,अ.कसर्=उणीव | कमीत कमी,अजमासे |
| कंपेश | फा.कम् - बीश्उकमी,जास्त | अजमासे |
| कसूर | अ. क़ुसूर् =उणीव,दोष | हयगय |
| कहर | अ.क़हर्=ईश्वरी क्षोभ,कोप | गहजब,अनर्थ,पराकाष्ठेचा अत्याचार |
| कायदा | अ.क़ाइदह्=नियम | शिरस्ता,वहिवाट |
| कारखानदार | कार्ख़ानह् दार्=कारखान्याचा मालक | उद्योगपती |
| किमया | अ. कीमियाअ्=रसायन(शास्त्र) | गूढ विद्या,अजब कौशल्य |
| कुमक | तु.कुमक् = मदत करणारी तुकडी | मदत,साहाय्य |
| जंगी | फा.जंगी=युध्दविषयक | प्रचंड,मोठे |
| जडजवाहीर | फा.ज़र्:सोने,जवाहर्=रत्ने | संपत्ती |

| | | |
|---|---|---|
| जबान | फा. ज़बान्=जीभ | वचन,(दिलेला) शब्द. |
| ताशेरा | अ.तास़ह् पासून: ताशाचा आवाज | बंदुकीचा मारा,फैर झाडणे,खूप रागावणे. |
| दरुनी महाल | फा.दरूनी,अ.मह़ल=आतील महाल | अन्तःपुर. |
| दुही | फा.दूई =द्वैत | यादवी,अन्तःस्थ कलह |
| निमकहराम | फा.निमक्हराम्:मिठास न जागणारा | स्वामिद्रोही,कृतघ्न |
| पायबन्द | फा.पाय्बन्द्:घोड्याचे मागील पाय बांधण्याची दोरी | अटकाव |
| पायमल्ली | फा. पाय् माली=पायाने तुडविणे | न जुमानणे,पालन न करणे |
| फकीर फुकरा | फा. फ़ुक़रा - अ.फ़क़ीर चे अव | भिकारी व तत्सम लोक |
| बरखास्त | फा.बर्ख़ास्त्=उभे राहिले | (दरबार,सभा,इ.)संपणे,रद्द करणे |
| बिरादरी | फा.बिरादरी =भाऊपणा | नाते |
| बेचिराख | फा. बीचिराग़्=दीपहीन | उध्वस्त |
| रव | फा.रव् =जाणे | चाल |
| रहदारी | फा.राह्दारी =रस्तापट्टी | ये-जा ,वाहतूक |
| लवाजमा | अ. लवाज़िमह्=आवश्यक वस्तू | परिवार |
| वाहवा | फा.वाह् वाह् =भले ! | शाबासकी,प्रशंसा |
| शेखी | अ.शेख़्=प्रमुख | बढाई,प्रौढी |
| सल्लामसलत | सलाह् मस्लहत उपदेश,योग्य विचार | विचारविनिमय |

**अर्थप्रशस्ती**

अरबी - फार्सी शब्दाचा मूलार्थ सामान्य असतानाही त्याला जेव्हा गौरवाची,प्रतिष्ठेची या मूलार्थापेक्षा उच्चतर छटा प्राप्त होते,त्या वेळी ही प्रक्रिया घडते.मराठीत आलेल्या अनेक अरबी-फार्सी शब्दांच्या संदर्भात ही प्रक्रिया घडली आहे-

| शब्द | त्याचा अ.तु.फा.अर्थ | अर्थप्रशस्ती |
|---|---|---|
| अब्रू | फा.आब् -रू:चेहऱ्याचे पाणी,मुखच्छबी | प्रतिष्ठा,इभ्रत |
| अस्सल | अ. अस्ल् =मूळचे,खरे | जातिवंत |
| अहवाल | अ.ह़ाल् (स्थिती) चे अव. | वृत्तान्त,कैफियत,हकीकत |
| आब | फा.आब्=पाणी | प्रतिष्ठा,इज्जत,इभ्रत |
| इतमाम | अ.इह्तिमाम् =व्यवस्था | सन्मान |
| इनायत | अ.इनायत्=मदत | कृपा |
| इमान | अ.ईमान् =श्रध्दा | वचन,एकनिष्ठा,सचोटी |
| ऐवज | अ.इवज़् =बदला | द्रव्य,मालमत्ता |
| कसोशी | फा.कोशिश्=प्रयत्न | पराकाष्ठा |
| कारागीर | फा.कार्गीर्=(काम घेणारा)कामकरी | कुशल,कसबी,व्यावसायिक |

| | | |
|---|---|---|
| कीर्द | फा. कर्द् = केले | रोजचा जमाखर्च नोंदण्याची वही. |
| खानदानी | फा.ख़ान्दान् =घराणे | उच्च कुलीन |
| गरीब | अ.ग़रीब्=दीन,लाचार | शांत,सुस्वभावी |
| जादू | फा.जादू=यातुविद्या,चमत्कार,चेटूक | मोहिनी. विलक्षण प्रभाव |
| दर्जेदार | फा. दर्जह् = स्तर | उच्च स्तराचा,उंची |
| दस्तावेज | फा. दस्त् आवीज् = प्रमाणपत्र | ऐतिहासिक महत्त्वाचे प्रमाण , |
| मानदंड | | |
| पोक्त | फा.पुख्तह्=पिकलेला | प्रौढ |
| बुजुर्ग | फा.बुज़ुर्ग = वृध्द | (विशिष्ट क्षेत्रातील )आदरणीय (व्यक्ती) |
| मिसल | अ.मिसाल्=साम्य | दर्जा(कोणी कोणत्या ठिकाणीअसावे, याविषयी दरबारात केलेली व्यवस्था) |
| मेजवानी | फा.मेज़्बानी =भोजन,आतिथ्य | थाटाचे जेवण |
| वजन | अ.वज़न् = गुरुत्व | प्रतिष्ठा,महत्त्व. |
| शक्कल | अ.शक्ल् =चेहरा,व्यवस्था | युक्ती. |

**अर्थाचे प्रत्यक्षीकरण**

या प्रक्रियेत भाषेतील शब्द वा त्यातील घटक त्याच्या मूलार्थाऐवजी यापासून सूचित होणाऱ्या विवक्षित वस्तूचा,व्यक्तीचा किंवा क्रियेचा निर्देश करतात.

| शब्द | अ.तु.फा.शब्द व मूलार्थ | प्रत्यक्षीकरण |
|---|---|---|
| अबदागीर | फा.आफ्ताब्गीर् =सूर्यपान | एक सन्मानचिन्ह |
| इजाफा | अ. इज़ाफ़ह्=आधिक्य,वाढ | (वाढविलेला)तनखा,नेमणूक (मम) |
| उमेदवार | अ.उम्मीद्,फा.वार्=आशा बाळगणारा,इच्छुक | (निवडणुकीसाठी वा विशिष्ट जागेसाठी ) इच्छुक |
| कमानदार | फा.कमान्दार्=तीरंदाज | हाडवैद्य |
| कलगी | तु.कल्ग़ह्=शिखर | १.शिरपेचावरील तुरा २. लावणीचा एक प्रकार |
| कही | फा.कही=सामुग्री | दाणावैरण वगैरे मिळवून आणणारी लष्करी तुकडी |
| कित्ता | अ.किताब्=पुस्तक | प्रतलेखनाची वही/पुस्तक |
| खून | फा.ख़ून्=रक्त | हत्या |
| खुषकी (चा मार्ग ) | फा.ख़ुश्क् = कोरडा | जमिनीवरील मार्ग |

| | | |
|---|---|---|
| गल्ला | फा.ग़ल्लह्=धान्य,पीक | उत्पन्न,मिळणारा पैसा,(दुकानातील)उत्पन्नाची पेटी |
| चंदी | फा.चन्द् =थोडेसे | घोड्याचे रोजचे खाद्य |
| दप्तर | अ.दफ़्तर्=लेखी कागदाचा गठ्ठा | १.कचेरी २.मुलांची पाटीपुस्तके ठेवण्याची पिशवी ३.ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह (उदा.पेशवे दप्तर) |
| दस्तक | फा. दस्तक्=लहानसा हात | एखाद्याच्या करवी/हस्ते पाठविलेला परवाना |
| दस्ती | फा.दस्त् =हात | हातरुमाल |
| निमा | फा.नीमह् | आतून घालायचा अर्धा अंगरखा(बनियनसारखा) |
| निशाण | फा.निशान्=खूण | ध्वज |
| पागा | फा.पाय् गाह्=पाय ठेवण्याची जागा | घोडी ठेवण्याची जागा. |
| बस्ता | फा.बस्तहः बांधलेले(गाठोडे) | लग्नाचे कापडचोपड इ. |
| मोर्चा | फा.मूर्चह् =तोफेसाठी केलेला उंचवटा,रोख | विशिष्ट मागणीसाठी एकत्र आलेला जमाव किंवा त्याची मिरवणूक. |
| मुलुखगिरी | अ.मुल्क्,फा. गीरी=प्रदेश घेणे | खंडणीसाठी मराठ्यांनी/पेशव्यांनी केलेली मोहीम |
| मोहीम | फा. मुहिम्म्=महत्त्वाचे/अंगीकृत कार्य | (मम)स्वारी, (वम)अभियान |
| मोहोर | फा.मुहर् =शिक्का | राजमुद्रा असलेले सोन्याचे नाणे. |
| रुमाल | फा.रू=तोंड,माल्=पुसणे | तोंड इ. पुसण्याचे वस्त्र |
| रोजनिशी | फा.रोज्-नवीसी उरोजचे लेखन | दैनंदिनी |
| शहरपन्हा | फा.शहर् पनाह्=नगररक्षक | तटबंदी,कोट |
| शिरपाव,सरोपा | फा.सर्-उ-पा=डोके व पाय | सन्मानाचा पोशाख |
| संगीन | फा. संगीन्=वजनदार,मजबूत,कठीण | बागनेट |
| सरंजाम | फा.सर् अंजाम् =व्यवस्था,शेवट | मनसबदारास दिलेली जहागीर. |

**अर्थाचे विशेषीकरण**

ही एक वैशिष्ट्यपूर्ण अर्थप्रक्रिया असून मराठीत आलेल्या काही अरबी-तुर्की-फार्सी शब्दांच्या बाबतीत ती घडल्याचे जाणवते. या प्रक्रियेत अ.तु.फा. शब्दाच्या मूलार्थाचे रूपान्तर मराठीत एका विशेष अर्थात होते. 'कागद' हा शब्द अरबी 'काग़ज़्' या शब्दापासून सिध्द झाला. त्याचा paper हा मूलार्थ आहे तथापि ग्रामीण मराठीत त्याला 'पत्र ' हा विशेष अर्थ प्राप्त झाला. 'पडदा 'हा मराठी शब्द फार्सी 'पर्दह् 'या शब्दापासून सिध्द झाला,त्याचा curtain हा अर्थ आहे पण त्याला'गोशा' हा विशेष अर्थ प्राप्त झाला. फा.'गोशह्'या शब्दाचा मूलार्थ कोपरा असा आहे पण त्याला 'बुरखा /पडद्याची चाल' असा विशेष अर्थ प्राप्त झाला. 'रियाद् 'किंवा 'रियाज़् 'या अरबी शब्दाचा अर्थ व्यायाम

किंवा अभ्यास आहे पण संगीताचे नियमित अध्ययन व सादरीकरण यांचा सराव असा विशेष अर्थ त्याला प्राप्त झाला व आजच्या मराठीत तो याच अर्थाने प्रचलित आहे.
'फर्माइश्' या फारसी शब्दाचा मूलार्थ 'आज्ञा,मागणी'' असला असाला तरी त्याला पुढे 'विशेष आवड व तिची मागणी' असा विशिष्ट अर्थ प्राप्त झाला. अशा प्रकारे झालेले अर्थाचे विशेषीकरण हा फारसी-मराठीच्या अनुबंधातील एक लोभसवाणा पदर आहे.

**साम्यमूलक अर्थप्रक्रिया**

दोन व्यक्ती,वस्तू वा स्थल किंवा प्रसंग यांच्यामधील समानता हे या अर्थप्रक्रियेचे अधिष्ठान होय.त्यांतील साधर्म्य वा साहचर्य यांच्यामुळे त्या शब्दाच्या अर्थाची व्याप्ती त्या विशिष्ट व्यक्ती,प्रसंग,वस्तू वा स्थल यांच्यापुरती मर्यादित न राहता ती आणखी वाढते.

या संदर्भात मी यापूर्वी मध्ययुगीन मराठी साहित्याच्या संदर्भात जे म्हटले होते ते आजही तितकेच समर्पक असल्याचे जाणवते [८] -

ऐतिहासिक व्यक्तीच्या नावांचे सामान्यीकरण होत असतानाही हीच प्रक्रिया घडते. 'शिकंदर नशीबवान 'या शब्दातून प्रतीत होणारे साम्यही अशाच प्रकारचे आहे. जेव्हा बखरनवीस एखाद्या तोफेचे नाव 'किलेकुशाद ' (=किल्ला उध्वस्त करणारी <अ.कल्अह्,फा.कुशाःकिल्ला उघडणारी)होते असे म्हणतो तेव्हा तोफेच्या त्या विशेषनामातून जाता जाता त्या तोफेची 'कर्तबगारी 'देखील प्रकट होते [९] ! 'सर्जेराव ': या किताबातील 'सर्जा' या शब्दाचा मूळ अर्थ 'गरजणारा उग्र सिंह ' असा आहे. त्यावरून ज्या व्यक्तीला असा किताब दिला आहे ती व्यक्ती किती पराक्रमी असेल,याची कल्पनाच केलेली बरी ! 'गुल्बदन्' म्हणजे 'गुलाबासारखा नाजूक देह धारण करणारे !' हा शब्द एका विशिष्ट प्रकारच्या तलम कापडासाठी वापरत असत त्यावरून त्या कापडाच्या सुबकपणाची कल्पना येते [१०]. बखरीत एका गडाचे नाव 'अस्मानगड 'असल्याचे आढळते. केवळ नावावरूनच त्या गडाची भव्य आकृती आपल्या डोळ्यांसमोर तरळते.

या प्रक्रियेची अन्य उदाहरणे अशी -

| शब्द | अ.तु.फा.शब्द व मूलार्थ | साम्य दर्शविणारी अर्थप्रक्रिया |
|---|---|---|
| जवाहीरसिंग | फा.जवाहर्=रत्ने | व्यक्तिनाम |
| जव्हेरगज | - | हत्तीचे नाव. |
| दर्याभवानी | फा.दर्या | तोफेचे नाव |
| नगीनागड | फा. नगीनह्=रत्न | किल्ल्याचे नाव |
| मोमदिल | फा. मोम् दिल = मेणासारख्या हृदयाचा | नाजुक,कोमल. |
| शाई | फा.सियाही=काळेपणा | लेखनासाठी वापरला जाणारा कोणत्याही रंगाचा द्रव. |
| शेर | फा. शेर् =सिंह | शेर होणेउवरचढ होणे. |
| सर्द | फा.सर्द =थंड | दिङ्मूढ. |
| हिलाल | अ.हिलाल्=चंद्रकोर | चंद्रज्योत |

**अर्थच्छटा**

मराठीकरण होताना काही अरबी-तुर्की-फार्सी शब्दांना संदर्भानुसार विविध अर्थच्छटा लाभल्या आहेत. त्याविषयी मी पूर्वी 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप' या ग्रंथात विस्ताराने विवेचन केले आहे [११]. एकाच अरबी/तुर्की /फार्सी शब्दातून वेगवेगळ्या संदर्भात वेगवेगळ्या अर्थाच्या छटा प्रकट होतात. 'कधी कधी या छटा इतक्या सूक्ष्म असतात की त्यांचे स्पष्टीकरण करणेही अशक्य होते तथापि या सर्व छटा पाहता त्या शब्दाचे अर्थव्यक्तीकरणाचे सामर्थ्य किती तरी पटींनी वाढले आहे, हे लक्षात येते.' हे स्पष्ट व्हावे म्हणून काही निवडक उदाहरणे पुढे देत आहे. मध्ययुगीन मराठीतील संदर्भ शोधण्यास अडचण पडू नये म्हणून उदाहरणानंतर कंसांत ग्रंथाचा संक्षेप (पृष्ठक्रमांकासह )दिला आहे. अधिक तपशीलासाठी कृपया माझ्या 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप ' या ग्रंथातील अर्थप्रक्रियाविषयक प्रकरण पाहावे.

गुजरणे (फा.गुज़श्तन्>गुज़र् = जाणे )

१) लोटणे -'महिना पंधरा दिवस गुजरले'. (भाब १४५)

२) दाखल करणे - 'मजमू दप्तरी गुजरावे. ' (सच ३४०)

३) ओढवणे - 'प्राणन्त समय गुजरला. '(सावा १४७)

४) निधन पावणे - 'हजरत गुजरले '(शाब ४२)

जमणे (अ.जम्‌अ़=मिळणे,एकत्र येणे ) -

१)'खजीना जमू लागला '(धाशा ८५)

२) 'गाणें बहुत चांगलें जमलें. '(शाब ४६)

३) 'दौलत जमली.' (थोरा ४० ) (राज्य स्थिरस्थावर झाले असा अर्थ )

४)' नक्षा जमणार नाही.' (हौके १३९)

५)(वम )विडा चांगला जमला.

जागा (फा.जाय् गाह् =स्थळ ) -

१) पद,स्थान - 'बादशाहीची जागा इराणी-दुराणी यांस केवळ पायवाट जाहाली.' (पाब ११)

२) संधी - 'याजमुळें फितूर करावयास जागा जहाली.' (पेबबाग ३९)

३) अधिकारस्थान, पद - 'ज्या जागीं ब्राह्मणांचा इतबार होता, त्या जागा आमच्या हातास आल्या.' (गसाछोब ४७)

४) ठिकाणी,ठायी - 'नानाची निष्ठा स्वामींचे जागा फार. '(ब्रच ४)

दाणा (फा.दानह्= कण ) -

१. धान्याचा कण.

२. हरभरा - 'घोडयाचे दाणे भरडावे लागतील.' (हौके ४३)

३. अन्नधान्य - 'फडनिसाच्या वाडयात जाऊन दाणे मागितले. '(होके १३४)

नजर (अ. नज़र् =दृष्टी) -

१. दृष्टी (वम )

२. वासना (वम -वाईट नजर )

३. नजरेस येणे - निदर्शनास येणे 'इकडील-तिकडील मनुष्य जातीं-येतीं तो प्रकार अगदी नजरेस येत नाही. '(शिप्र. ११३)

४. नजर फिरणे - (वम )वृत्ती पालटणे

मजकूर (अ.मज़्कूर् =निर्दिष्ट) -

१. माहिती,हकीगत - 'उभयता महाराजाच्या मातोश्रिया बोलावून आणून मजकूर सांगितला.' (शाब १५)

२. वर उल्लेखिलेले - 'शके मजकुरी '(चेब ५१४)

३. प्रसंग - 'सर्वत्र मंडळी यास देवालयामध्ये मजकूर झाला तो सांगितला ' (वड ३२)

४. विचार - 'तुमचे चित्तांत काय मजकूर आहे ?' (भाब १३८)

मसलत (अ. मस्लहत्) -

१. सल्ला - लहान थोर सरदार यांणी निखालसत मसलत दिली. '(भाब १६४ )

२.उपाय,मार्ग - 'आम्हांस कांहीं मसलत सुचत नाहीं .' (भाब १४२)

३. स्वारी ,मोहीम - 'यास्तव लक्ष मसलती येकीकडे ठेऊन हिंदुस्थानाचे मसलतीस जावें.'(भाब ११३)

मातबर - 'मुअ़तबर् 'या अरबी शब्दाचा मूलार्थ थोर, प्रतिष्ठित असा आहे पण पुढील संदर्भात त्याला कशा अर्थच्छटा लाभल्या,ते पाहा-

मातबर लढाई(होकै १४४),मातबर लग्नसमारंभ(होकै ६९),मातबर किल्ला (होकै १८४) ,मातबर मुछदी (भाब ६)

**सारभूत शब्दसंहती**

या अर्थप्रक्रियेस 'अर्थसार 'असे दुसरेही एक नाव आहे. दोन किंवा अधिक शब्दांनी या शब्दसंहती सिध्द होतात हे शब्द म्हणजे जणू शब्दसंहतींचे घटक होत. या विविध घटकांच्या एकत्रीकरणाने या शब्दसंहतीतून एक सारभूत अर्थ प्रकट होतो. फार्सीत अशा अनेक शब्दसंहती असून त्या मराठीतही आल्या आहेत.

| शब्द | फा. शब्द व मूलार्थ | अर्थसार |
|---|---|---|
| खुशामत | फा.ख़ुश् आमद् =सुस्वागत | खोटी स्तुती |
| गनिमी कावा | फा. ग़नीम्=शत्रू,कावा = डाव | (लपूनछपून राहून )अचानक हल्ला करण्याची मराठ्यांची युध्दपध्दती. |
| चाकरपेशा | फा. चाकर्= सेवक,पेशह्=व्यवसाय | नोकरी करणारांचा वर्ग |
| चाकरमाने | फा.चाकर् | - |

| | | |
|---|---|---|
| ताजा कलम | फा. ताज़ह्. अ. क़लम् (ताजी लेखणी) | पत्र संपल्यावर त्यास जोडलेली पुस्ती. |
| दस्तुर खुद | फा.दस्तूर्. अ. ख़ुद् =स्वतःच्या हस्ताक्षराने लिहिलेले | खुद |
| नेस्तनाबूद | फा.नीस्त्=नाही,फा.नाबूद्=नव्हता | उध्वस्त |
| वाहवा | फा. वाह् वाह् =धन्य ! | प्रशंसा,तारीफ. |
| शाबास | फा. शाद्बाश् =आनंदी राहा ! | भले ! (प्रशंसा ) |
| शिक्कामोर्तब | फा. सिक्कह् -मुद्रा. फा.मुरत्तब्:तयार,सिध्द | मान्यता. |
| हैदोस | फा. हाय् दोस्त ! | गोंधळ,रणधुमाळी. |

**ग्राम्यतापरिहार**

काही अ.तु.फा. शब्दांतील अशिष्टत्व,अश्लीलत्व व त्यांतील बीभत्सपणा त्यांच्या सतत वापरामुळे हळुहळू नाहीसा होऊ लागतो. 'मादरचोद 'सारख्या काही शिव्यांचा या संदर्भात उल्लेख करता येईल. त्या येथे मूलार्थाने वापरल्या जात नाहीत. 'बेवकूफ ', 'बेअक्कल ','हरामखोर', 'हरामजादा' या शब्दांचेही तसेच आहे. 'मुडद्या 'ही अस्सल ग्रामीण शिवी ज्या फार्सी शब्दापासून निर्माण झाली तो मूळ शब्द 'मुर्दह् '(मृत )हा आहे पण त्याला जीवनानंतरही हा अवमान सहन करावा लागला !

**समारोप**

आजवर फार्सी मराठीतील अर्थवैज्ञानिक अनुबंधाची दखल घेतली गेली नव्हती. 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप 'या ग्रंथातील माझे या संदर्भातील विवेचनही सीमित होते. ही दखल या प्रकरणात संक्षेपाने घेतली आहे.

अ.तु.फा. शब्द मराठीत येताना म.म.त आणि व.म.त त्यांच्या अर्थामध्ये अनेक परिवर्तने झाली आहेत. अर्थसंकोच,अर्थच्युती,अर्थभ्रंश अर्थहीनत्व,अर्थविस्तार,अर्थप्रशस्ती अर्थाचे प्रत्यक्षीकरण व विशेषीकरण,साम्यमूलक अर्थप्रक्रिया,अर्थच्छटा,सारभूत शब्दसंहती व ग्राम्यतापरिहार या बारा अर्थप्रक्रियांत मी त्यांचे या प्रकरणात,उदाहरणे देऊन,विवेचन केले आहे. 'अर्थाचे स्पष्टीकरण 'या प्रक्रियेत मूळ अ.तु.फा. शब्दाच्या अर्थात परिवर्तन घडले नसले तरी अ.तु.फा. शब्दाचा मराठीतील अर्थ दर्शविणारा मराठीतील प्रतिशब्द देऊन मूलार्थ स्पष्ट केला आहे. यांतील काही प्रक्रिया परस्परविरुध्द असल्याचे दिसते. अर्थसंकोच होतो तसा अर्थविस्तारही होतो, अर्थप्रशस्ती होते त्याचप्रमाणे अर्थहीनत्वही येते. संशोधन करताना यांतील काही प्रक्रिया नव्याने माझ्या लक्षात आल्याने त्या मी

येथे नोंदविल्या असून त्यांचे नामकरणही मीच केले आहे. अर्थाचे स्पष्टीकरण,अर्थहीनत्व,अर्थच्छटा या त्या प्रक्रिया होत. मराठी अर्थविज्ञानात अ.तु.फा.शब्दांच्या या अर्थप्रक्रियांची नव्याने भर पडत आहे . वरील अन्य अर्थपरिवर्तनांचाही स्वतंत्र असा सम्यक् विचारच झाला नव्हता, तो या निमित्ताने झाला, याचे मला समाधान वाटते. या संदर्भातील मराठीच्या अर्थवैज्ञानिक संशोधनास अधिक गती मिळायला हवी कारण हे फार व्यापक क्षेत्र अद्यापि अत्यंत दुर्लक्षित आहे, हे येथे पुन्हा नमूद करावेसे वाटते. या प्रकरणातील विवेचन या कार्याची नांदी ठरो,हीच अपेक्षा

**संदर्भ-टीपा**

१. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, जु.ऑ.स. १९५३,पृ . ९
२. मबफारव, पृ. १९४-१९७
३. फामको , पृ. ३४
४. कित्ता , पृ. १६६
५. कित्ता, पृ. १५१
६. मबफारव पृ. १९९-२०१
७. उर्दू मराठी शब्दकोश संपा. श्रीपाद जोशी- डॉ.एन्.एस्. गोरेकर,म.रा. साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई,१९८९, पृ २८९
८. मबफारव, पृ. २३१
९. 'मुलुखमैदान ' या शब्दविषयीही असेच म्हणता येईल.
१०. हा शब्द फार्सी - उर्दू कवितेत नाजुक सुंदर स्त्रीसाठीही योजिला आहे.
११. मबफारव , पृ. २००-२३१

---

## प्रकरण सहावे

# शब्दसंग्रह

आजवर मराठीत आलेल्या अरबी-फारशी-तुर्की शब्दसंग्रहाविषयीचा विचार ज्या अभ्यासकांनी केला आहे,त्याचा परामर्श येथे घेतल्यास या विषयाच्या अध्ययनास त्याचा उपयोग पार्श्वभूमीसारखा होईल. इति. राजवाडे,डॉ. मा.त्र्यं.पटवर्धन, डॉ.म.अ.करंदीकर,स्वा.सावरकर,प्रा.कृ.पां.कुळकर्णी व डॉ. मु.श्री.कानडे यांचा या संदर्भात उल्लेख करता येईल. डॉ.ग.ह खरे व श्री.देवीसिंग चौहान यांनी काही फार्शी शब्दांची चर्चा आपल्या स्फुट लेखांतून केली आहे. (श्री. देवीसिंग चौहान यांचे लेख 'दक्खिनी हिन्दी व मराठी 'या पुस्तकात संगृहीत केले आहेत. )

इति.राजवाडे [१] यांनी 'मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां ' च्या आठव्या खंडाच्या प्रस्तावनेत या विषयाच्या चर्चेस केलेला प्रारंभ फार मोलाचा होता व आजही तो तितकाच उपयुक्त वाटतो.ते म्हणतात, 'शिवाजीच्या वेळेपासून ज्ञानेश्वरांच्या वेळेपर्यंतचे जे हे लेख दिले त्यांपासून (१)१२९० पर्यंत सर्व महाराष्ट्रात, व १३९५ पर्यंत,कदाचित् पुढेंहि काही काळापावेतो,महाराष्ट्राच्या ज्या भागांत स्वराज्य होतें तेथे शुध्द निर्मळ मराठी भाषा बोलण्यांत व लिहिण्यांत येते असे. (२)१२९० पासून १६५६ पर्यंत,म्हणजे शिवाजीचा अंमल सुरू होईपर्यंत,फारशी शब्दांचे मराठीत प्राधान्य होतें.(३)१६५६ पासून १७२४ पर्यंत फारशी शब्द जलदीनें कमी होत गेले आणि त्यापुढे(४)१७२८ पासून १८१८ पर्यंत मुसलमान संस्थानांशी झालेला पत्रव्यवहार व सरकारी दफ्तर ह्यांखेरीज इतरत्र फार्शी शब्द फारसे उपयोगांत नव्हते, असे चार सिध्दांत निष्पन्न झाले. पैकी फारशीचा अप्रतिहत प्रवेश मराठी भाषेंत 1290 पासून 1656 पर्यंतच्या काळांत जारीनें झाला.इ. स .१२९० पासून १३१८ पर्यंत महाराष्ट्रात यादवांचेच राज्य असल्यामुळे,फारशीचा प्रवेश मराठीत कांहींच झाला नसावा. १३१८ पासून मुसुलमानांकडे राज्याची सूत्रे गेल्यावर मात्र फारशी शब्द मराठीत येण्यास सुरुवात झाली व ह्या आगमनाची अखेर इ .स.१६५६ त झाली. म्हणजे सुमारें ३३८ वर्षे फारशीचे मराठीला निकट सान्निध्य होते.

'मराठीत कोणत्या प्रकारचे शब्द विशेष शिरले ' याविषयी इति. राजवाडे [२] यांनी म्हटले आहे - 'फारशी शब्द महाराष्ट्रांतील सर्व लहानमोठ्या जातींतील लोकांच्या कानावरून हमेश जाऊं लागले व व्यवहारांत जिकडेतिकडे फारशी शब्दांचा सुळसुळाट झाला. शास्त्र,धर्म,नीति,आचार इत्यादि महत्त्वाच्या प्रांतांत फारशी शब्द मुळीच शिरले नाहीत. बाजार,दरबार,फौज,अदालत,सराफी,जमीनजुमला,सावकारी वगैरे कारभाराच्या जागीं बोलल्या जाणाऱ्या जबानींत फारशी शब्दांचा अंमल मामूर झाला. उदाहरणार्थ, घरासंबंधीचे कांहीं फारशी शब्द देतों.

खाना,दार,सराई,इमारत,झनाना,दिल्लीदरवाजा,दालन,हौद,दिवाणखाना,ओसरी,महाल,ऐनेमहाल,

रंगमहाल,संदुकखाना,मुदबखखाना,आतषखाना,दिवाळ,देवळी,कप्पा,कप्पी,घुमट,जमीन, फरशी, तक्त,तक्तपोशी,हलका,कुलुप,खलबतखाना,किल्ली,छपर,आरक,,घुसलखाना, तालीमखाना,पिंजरा,पलंग,खुर्ची,मेज वगैरे. बाजार,दरबार,फौज,जमीन वगैरे संबंधानेंहि असेच शेंकडो फारशी शब्द देतां येतील. ते कोणच्याही फारशी किंवा मराठी कोशांत सापडण्यासारखे आहेत.[1] मराठींत फारशी शब्द शिरले आहेत, हे जगजाहीर आहे पण ते कोणत्या बाबींसंबंधाने विशेष शिरले आहेत, त्याचा तपशील वर दिला आहे.'

असंख्य फार्सी शब्द मराठीत आले हे मान्य करूनही केवळ तीन ऐतिहासिक पत्रांच्या आधारे मराठीतील फार्सी शब्दसंख्येचे प्रमाण कसे घटत गेले याविषयीच्या त्यांच्या निष्कर्षांविषयी डॉ.मु.श्री.कानडे[४] यांनी मांडलेले पुढील मत मलाही ग्राह्य वाटते - 'स्वराज्यापूर्वीची मराठी भाषेची फारसीग्रस्त अवस्था आणि तीतून राजाश्रयामुळे झालेली पूर्ववत् संस्कृतप्रचुर अवस्था यांचा राजवाडे यांनी जो आलेख काढला आहे, तो मराठी भाषेच्या इतिहासात चांगला प्रसिध्द आहे. पन्नास वर्षांच्या अंतराने लिहिल्या गेलेल्या तीन पत्रांतील फारसी - मराठी शब्दांचे प्रमाण कसे बदलत गेले, ते राजवाड्यांनी पुढीलप्रमाणे दाखवून दिले -

| पत्रलेखनाचे वर्ष इ.स. | पत्रातील मराठी व फारसी शब्दांची संख्या | मराठी शब्दांचे शेकडा प्रमाण |
|---|---|---|
| १६२८ | ३४+२०२ | १४.४ |
| १६७७ | ८४+५१ | ६२.७ |
| १७२८ | ११९+८ | ९३.७ |

स्वराज्याच्या स्थापनेनंतर आणि शिवाजी महाराजांनी तयार करवून घेतलेल्या राज्यव्यवहारकोशानंतर फारसी शब्दांचा वरचष्मा कमी झाला, ही वस्तुस्थिती असली,तरी केवळ तीन पत्रांतील मराठी-फारसी शब्दांच्या प्रमाणावरून परराज्याचा भाषेवरती केवढा परिणाम घडतो हा रोखठोक ताळा ' काढणे हे शास्त्रीय पध्दतीचे ठरणार नाही. ज्याप्रमाणे अर्जदास्त सारख्या एखाद्या स्फुट कवनावरून एकनाथांच्या किंवा एकनाथकालीन मराठी भाषेतील फारसी भाषेच्या प्रमाणासंबंधी सिध्दान्त मांडणे योग्य ठरणार नाही त्याचप्रमाणे राजवाड्यांचे एतत्संबंधी विवेचन विचारांना चालना देणारे असले तरी शब्दसंख्येबाबतचा त्यांचा निष्कर्ष निर्धास्तपणे स्वीकारता येणार नाही '.डॉ.मा.त्र्यं.पटवर्धन यांनी फार्शी-मराठी-कोशाची रचना करून या क्षेत्रात अव्दितीय कार्य केले. या कोशाची त्यांची प्रस्तावना त्यांच्या या क्षेत्रातील व्यासंगाची व अधिकाराची साक्ष देते. केवळ एकनाथांच्या 'अर्जदास्ता ' सारख्या भारुडावरून तत्कालीन भाषेवरील फार्सी शब्दांचे प्राबल्य मानता येत नाही, अशा आशयाचा विचार डॉ कानडे यांनी मांडल्याचा उल्लेख वर केला आहे.पण डॉ. पटवर्धन यानी मध्ययुगीन पत्रात्मक गद्याच्या संदर्भात केलेले विवेचन लक्षात घेतले की त्यात फार्सी शब्दांचे प्राचुर्य व बाहुल्य कसे होते, ते वेगळे सांगण्याची गरज उरत नाही. ते [५] म्हणतात,'महेश्वर दरबारच्या बातमीपत्रांपेक्षां दिल्ली येथील हिंगण्याच्या पत्रव्यवहारांत फार्शी शब्द अधिक

आहेत.पटवर्धनी दप्तरांतील पत्रांची भाषा हैदराबादेहून काळे यांनी पाठविलेल्या पत्रांच्या भाषेपेक्षां पुष्कळच कमी फार्शीप्रचुर आहे. हैदरअल्लीकडून अथवा जंजिरेकर शामलाकडून आलेल्या पत्रांत साहजिकच फार्शी शब्द पुष्कळ आहेत.ऐतिहासिक लेखसंग्रहाच्या सातव्या भागांत पेशव्यांच्या नांवाने परंतु नाना फडणिसांनी रचून इंग्रजांच्या बादशहास पाठविलेले पत्र छापले आहे. हे पत्र (अनुक्रमांक २५७५)नमुनेदार समजले जात होते. कारण इतरत्रही त्याच्या नकला उपलब्ध होतात. यात **फडणिसांनी फार्शी शब्दांचा पाऊस पाडला आहे.**[५]'असे म्हणून त्यांनी उतारा उदधृत केला आहे व हा वर्षाव कसा झाला आहे, ते सोदाहरण दर्शविले आहे. त्याविषयीचा त्यांचा निष्कर्ष असा - 'या लहानशा उताऱ्यांत एकंदर फार्शी शब्द ५७ आहेत.त्यांपैकी २० शुध्द फार्शी आहेत. **एकूण ५७ शब्दांपैकी आज मराठीत जिवंत असे ३० आहेत.**[६]

इति. राजवाडे आणि डॉ.भा.त्र्यं. पटवर्धन यांच्या या संदर्भातील विवेचनात फरक असा की डॉ.पटवर्धनांनी केवळ हे एकच पत्र उदधृत केले तरी अन्य दरबारच्या बातमीपत्रांचे व दप्तरांचे तपशीलही त्यांनी दिले आहेत शिवाय आजच्या मराठीत या फार्सी शब्दांची स्थिती काय आहे, तेही निर्देशिले आहे.

मराठीतील अरबी-फार्सी-तुर्की शब्दांच्या विषयवार वर्गीकरणाचा पहिला व चांगला प्रयत्न डॉ.पटवर्धन यांनी केला आहे. त्यात कारभार,युध्द,लष्करी सरंजाम
बांधकाम,पोशाख,गृहोपयोगी वस्तू, फळे, संगीत,लेखन इ. विभाग पाडून त्यांची उदाहरणे त्यांनी दिली आहेत.[७] ती पुरेशी बोलकी आहेत.

'मराठी शब्दसंग्रहमीमांसा 'हा डॉ.म.अ.करंदीकर यांनी १९४२ साली सादर केलेला प्रबंध.तो अद्यापीही अप्रकाशित आहे. या प्रबंधाचा अभ्यास मी डॉ. करंदीकर यांच्याकडील टंकलिखित प्रतीवरून केला आहे व त्यांच्या याविषयीच्या संशोधनाची नोंद 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप '[८] या माझ्या ग्रंथात घेतली आहे,ती अशी -'डॉ. करंदीकर यांनी आपल्या प्रबंधात मराठी शब्दसंग्रहातील शब्दसंख्या एक लाखावर असल्याचे मान्य केले आहे. यात इंग्रजीतून आलेल्या (भाषांतरित व मूळ इंग्रजी) शब्दांची संख्या १५५० आहे तर मराठीत आलेल्या फार्सी (तुर्की,अरबी व फार्सी)शब्दांची संख्या सुमारे २९०० आहे.'

डॉ. करंदीकर यांनी काढलेल्या निष्कर्षानुसार फारसी-अरबी शब्दांचे मराठीच्या एकुण शब्दसंग्रहातील प्रमाण शे.२.९६ इतके आहे.[९] स्वा.सावरकर[१०]यांनी 'तत्काल बहिष्कार्य असे काही परकी शब्द ' या लेखात पुढील अरबी /फार्सी शब्दांचा/शब्दप्रयोगांचा उल्लेख केला आहे.

शिवाय,खेरीज,हल्ली,जरूर,जरूरी,दिलगिरी,दिलगीर,कायम,कायमनिधि,अखेर,अव्वलपासून अखेरपर्यंत,अगर,अस्मान,जमीन-अस्मानाचेअंतर,जमीनजुमला,उमेदवार,जबाबदार, जबाबदारी,रकाना,शहीद,अरब समुद्र,मुष्कील,मदत,मददनीस,मेहेरबान,मेहेरबानी,खास अंक,अंदाजपत्रक,लायक,नालायक,सदर,सदरहू,तहाहयात,शिफारस,फक्त,इमारत,उमर,

मरहूम,बदल,बाबत,खुलासा,जखम,जखमी, मेजवानी,नजर,मालक,खात्री,हजर,गैरहजर, हजेरी,तयारी,पूर्वतयारी,खातर,खुद,जाहिरात,जाहीरपणे,जाहीर,इरादा,मार्फत,खलास,सबब इ. (यांत अ.फा. शब्दांना जोडून काही मराठी शब्दही आहेत.) या शब्दांना/शब्दप्रयोगांना त्यांनी काही पर्यायही सुचविले आहेत. यांपैकी किती शब्द आज मराठीत प्रचारात नाहीत, हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही. 'कायदा 'हा शब्दही त्यांनी बहिष्कार्य मानला आहे पण कायदेविषयक वा न्यायविषयक किती असंख्य शब्द आजही मराठीत रूढ आहेत, हे मी या प्रकरणात अन्यत्र दिलेल्या यादीवरून सहज लक्षात येईल. 'विधी 'हा पर्याय त्या मानाने बऱ्यापैकी योजिला जात आहे तरीही 'कायदा 'मात्र आजही बहिष्कृत झालेला नाही. प्रा.कृ.पां. कुळकर्णी[११]यांनी 'मराठी व्युत्पत्तिकोशा' च्या 'शब्दःउद्गम आणि विकास'या महत्त्वाच्या प्रस्तावनेत मराठी शब्दसंग्रहाच्या घटकांत सहावा घटक 'शिमी '(यहुदीमधून व महमदी धर्माच्या सेमिटिक लोकांच्या अरबी,फार्सी,तुर्की भाषांतून आलेले)शब्द ' हा मानला आहे.

मराठीत आलेल्या अरबी-फार्सी शब्दांच्या संख्येच्या बाबतीत प्रा.कृ.पां.कुळकर्णी[१२] म्हणतात,'मराठीचा शब्दसंग्रह अशा रीतीनें तत्सम,तद्भव,देशी,परकी(फारसी,अरबी, युरोपीय)इत्यादी शब्द- प्रकारांचा मिळून बनला आहे. ह्या शब्दसंग्रहांतील संख्या मोल्स्वर्थच्या कोशांत साठ हजार आहे. वा.गो.आपटे ह्यांची परिगणना पंच्याहत्तर हजार आहे. महाराष्ट्र शब्दकोशकारांची परिगणना एक लाखावर म्हणजे एक लक्ष बारा हजार एकशेतीस इतकी आहे. त्यांत परकी शब्द (फारसी,अरबी,तुर्की )एकोणतीसशें आहेत. पंधराशें शब्द युरोपियन भाषांतील इंग्रजीमधून आलेले आहेत.'

त्यानंतर या शब्दांच्या स्वरूपाविषयी अधिक विवेचन करताना 'अरबी - फारसी शब्द ' या उपशीर्षकाखाली ते[१३] म्हणतात,'शिमी भाषांपैकी **मराठी भाषेवर विशेष परिणाम करणाऱ्या भाषा म्हणजे अरबी फारसी ह्या होत.**[१४] तुर्की भाषेचा प्रत्यक्ष असा परिणाम झाला नाही. यादवकालात महमदीयांशी संबंध येण्यास सुरुवात झाली होती. त्या कालांतील नामदेव मात्र 'तुर्की मूर्ती फोडिल्या ' अशी तक्रार करतो. त्याच्या अभंगांत कांहीं फार्सी शब्द सांपडतात. 'व ' हें फारसी अव्यय तो वापरतो. बहामनीकालात हा संबंध फार दाट झाला. खुद्द मराठवाड्यांत फारसीची कारकीर्द सुरू झाली. ज्ञानेश्वरींत व महानुभवी वाङ्मयांत आढळणारें मराठी भाषेचें नितांत शुध्द स्वरूप कलुषित होऊ लागले. फारसी - मराठीचा संबंध जो बहामनीकालांत सुरू झाला तो पुढें पेशवाईतसुध्दां ढिलावला नाहीं. एकनाथी वाङ्मयांतील कांही अर्जदास्त वगैरे नमुने तर फारसीमयच आहेत. सरकारदरबारात फार्सी भाषा सुरू झाल्यामुळें सरकारी कागदपत्र फारसींत राहूं लागले. अर्जदारांच्या फिर्यादी 'काजी' पुढे जाऊन त्यांचा फैसला किंवा 'इन्साफ ' होऊं लागला. पत्र गेले व 'कागद ' आले. गोही गेली व साक्ष आली.[१५]मोकदमाचे अधिकारी झाले. वार्षिक वेतनाऐवजी सालिना मुशाहिरा मिळण्याचा सिलसिला पडला , बापाचे नांव पिते म्हणून न लिहिता 'बिन ' म्हणून

लिहू लागले, भ्रतार शब्द गेला व 'कोम' शब्द आला, पूर्वीचे बैसणाईत गेले व दरबारी आले, तसेच सवंदळी, दांडिवस, हाडपी, बारी, चवरघर, मांडारी, वेवकरू दिवटे, बडवे हे शब्द गेले. राईक पाईक, मांडलीक, राउत वगैरे हुदें पदव्या ऐकू येईनाशा झाल्या व त्यांच्याऐवजी हवालदार, जमादार, शिलेदार, ह्या पदव्या ऐकू येऊ लागल्या. राजकारण, बाजारहाट, व्यापारउदीम, पोषाख, खाण्याचे जिन्नस, वाङ्मय वगैरे व्यवहाराच्या प्रत्येक क्षेत्रांत फारसी शब्द आले.[१९]

मराठी बखरींत आलेल्या अरबी-फार्सी -तुर्की शब्दांची विषयवार विभागणी करून त्यांची सविस्तर यादी देण्याचे काम प्रथमतः मी 'मराठी बखरींतील फार्सीचे स्वरूप 'या ग्रंथात केले. हे शब्द सुमारे ४८०० आहेत. या कार्याची नोंद डॉ. मु.श्री. कानडे [२०]यांनी आपल्या ग्रंथात घेतली आहे. यांतील काही विषय/वर्ग गाळून व त्यांत काही नवीन विषयांची / वर्गांची भर टाकून म.म. आणि व.म.तील जास्तीत जास्त उदाहरणे देऊन सोबत त्यांच्या याद्या देत आहे. त्यावरून हे अरबी-फार्सी-तुर्की शब्द 'मऱ्हाटी 'जीवनाच्या सर्वांगांत कसे रुळले होते, याची प्रचीती येईल. या याद्या काही बाबतीत बऱ्याच मोठ्या झाल्या आहेत, पण त्या तशा दिल्याशिवाय त्यांची व्याप्ती व सर्वस्पर्शित्व कसे कळणार? यासाठीच या याद्यांत काही ठिकाणी विस्तार झाला आहे.तरीही हे लक्षात घ्यायला हवे की ही मराठीतील सर्वच अरबी - फार्सी - तुर्की शब्दांची परिपूर्ण नोंद नव्हे-तसे केले असते तर हा स्वतंत्र कोशच झाला असता या संग्रहाचे वर्गीकरण करताना मी स्थूल मानाने पुढील ३४ विषय कल्पिले आहेत पण अद्यापीही काही विषय उरले / राहिले असण्याची शक्यता आहेः

१)युध्द/लष्करी सरंजाम २)शस्त्रविषयक ३)स्थापत्य ४)शासनव्यवहार ५) लेखनविषयक ६)विधी ७) आर्थिक व्यवहार ८) नाणकवाचक ९) इतिहास/ ऐतिहासिक १०)कालगणना ११) कालवाचक १२) भूगोल/भौगोलिक १३) धर्म / धार्मिक १४)ज्ञान -विज्ञान- कला इ. १५) वैद्यक १६) सामाजिक जीवनव्यवहार १७) प्रपंचविषयक १८) खाद्यपदार्थ,पेये इत्यादी १९) फळफळावळ. २०) सुगंधी द्रव्ये २१) रंग २२) वस्त्रविषयक/पोषाख इत्यादी. २३) अलंकार २४) व्यावसायविषयक २५) बिरुदे / पदव्या इ. २६) कृषिजीवन २७) अवजारे २८)वनस्पतिविषयक २९) पशु,पक्षी,प्राणिविषयक ३०) वाहनविषयक ३१) संगीत ३२) वाद्यविषयक ३३) मनुष्यस्वभाव ३४) शरीर / शारीरिक / स्वास्थ्यविषयक.

**(१) युध्द / लष्करी सरंजाम**

अनुफा (रोजमुरा),अंबारी,अरबा(धुमश्चक्री),अराबा(तोफेचा गाडा),अर्गानगी(वेढा),अलम (निशाण),अलिगोल,अवसानखस्त(म.अवसान),अस्वार,अस्पस्वार(घोडेस्वार),अहदशर्त (तह),अहादी(शिपायापेक्षा वरच्या दर्जाचा स्वार),आजादी,आतशखाना(तोफखाना). आदमीप्यादा,आवई,आवाज(तोफेचे ध्वनी),इशारत,ईल्फा (रोजचा शिधा),उर्दू (सैन्याचा तळ/भाषा/बाजार),एलची (राज्याचा वकील),एल्गार(मोहीम,हल्ला),कज्जाखी(गनिमी

काव्याची लढाई ),कतलाम(सर्रास कत्तल),कत्तल,कबजी(ताब्यातील प्रदेश),कमरगाह (सेनामध्य),कमरबस्ता,कमरबंद,करारनामा,करोल,करोळी,कवायत,कही,काबिजात(कबीज,कलेला भाग),कबीज,काबू,किल्ला,किल्लेदार,किरसा(तंटा),कुफर(स्वामीद्रोह),कुफराण,कुमक,कूच,कूच-दर-कूच,कैद,कैदी,खच्ची,खडाजंगी,खतरा,खबर,खबर-बखर,खबरदारी,खर्कशा(तंटा), खलकंदा(बाजारबुणगे),खलबत,खलिता,खंजीर,खानेजंगी,खासखेल(सेनापती),खिलाफ, खुतू(शिरस्त्राण),खुफिया (गुप्त रीतीने),खेमा(मोठा तंबू),खेलखाना(फौजेतील बाजार), खोगीर,गनिमी,कावा,गनीम,गराडा(वेढा),गलबत,गर्दी(हल्ला),गस्त,गाजी(धर्मरक्षक योध्दा), गिरफदार,गिर्दनवाई (शहरकोटाचे संरक्षण),गुराबा(तारू/लढाऊ गलबत),गुर्गुज(गदा), गुलाम/गुलामगिरी/गुलामी,गुलडाग(तापलेल्या मुद्रेचा डाग),गूलगल्बा(बखेडा),गैबखबर (गुप्त बातमी),गैरसावध,गैरहुशार,गोळा/ळी,गोळादारू,चिलखत,चोरबातमी(गुप्तपणे काढलेली बातमी),छापा,जखमाना(घायाळांना दिलेला पैसा),जखमी,जंगी,जंगी सामान(युध्द-सामग्री),जंबिया,जरब,जंबुरक(लहान तोफ),जंबुरा,जमीदोज(भुईकोट), जमीन-दोस्त, जर्गा (वेढा),जवामर्द/र्दी जरीपटका (म.पटका),जामगी(तोफेचा काकडा), जायबंदी,जाया(जखमी),जासूद,जिनबंदी,जिरातखाना(शस्त्रागार),जिरे(चिलखत),जिरेटोप(शिरस्त्राण), जिलीब,जेब (ठार),जेर-जप्त(काबीज),जैयत,डेरा,डेरादांडा,डेराबांड,डेरारावटी,तंबी,तंबू, तबा(नष्ट होणे),तबीलदार(लष्करातील लाकुडतोड्या),तरकश(बाणांचा भाता),तलब-तनखा(पगारखर्ची ),तलबाना(रोजचा पगार),तलावा(टेहेळणी करणारी तुकडी),तवा तोबरा,तसनस (धूळधाण),तरफिया (समेट),तह,तहनाल(शस्त्राचे म्यान),ताब(शौर्य),ताबा ,ताबिन(अंकित),ताराजी,ताशिश(बंदुकीचा मारा),तिरंदाजी,तीर,तीरकमान,तीरदस्ता,तैवान ,तुरुंग,तेगा(रुंद पात्याची तलवार),तैनातजाबता,तैनाती(फौज),तोकजंजीर(गळसाखळी), तोडा/दा(लक्ष्य),तोफ,तोफखाना,तोफची,तोरादान,दगा,दगाफटका(म.फटका),दमदमा (तोफ ठेवण्याचा अंचवटा),दमामा(लहान बंदूक),दस्तान(अकरा शिपायांची तुकडी), दस्तानी,दाणादारूगोळी,दाणापैका(म.पैका),दाणावैरण(म.वैरण),दारु,दिम्मत(स्वाधीन असलेली फौजेची तुकडी),दिलेरी(शौर्य),दिलेरी-रुस्तुमी(शौर्य ),दुता(म्यान),दुमदारी (पिछाडीची फौज),दुरीदराज(परागंदा),दुर्बीण,दुश्मन,नजरकैद,नाजीब,नामोहरम(पराभूत, निराश),नालबंदी,निगेबानी(संरक्षण),निमचा,निशाणदार(निशाण धरणारा),निशाणबाज (नेमबाज),नेजा(भाला),नौबत,पल्ला,पल्लेदार,पलिता,पहारा(फा.पहरह),परस्ता(पिछेहाट), पाईक,पाऊप्यादा(पायदळातील सैनिक),पाणबरुज(म.पाणी),पायमल्ली,पायसिपाही (पायदळातील शिपाई),पासबान ,पुस्तपन्हा(साहाय्यक फौज),पेशकबज(कट्यार),पेशखाना (अगोदर),प्यादगान(पायदळ),प्यादा,प्यादेमात,फतेशिकस्त,फते,फन्ना(विनाश),फित्रतती(बंडाळी),फित्राने,फितूर,फितुरी,फौज,फंदफितुरी,बक्तर(चिलखत),बर्कंदाज(बंदुकधारी शिपाई),बंदी, बंदीखाना,बंदीवान,बंदुकी पेदा(बंदुकधारी सैनिक),बक्षी,बहादुरी,बागी,बाजारबुणगे (गैरलढाऊ लोक),बाजी,बाजू,बाडबिशाद(डेरे,राहुट्या इ.),बाडा(कनातीचा परीघ), बातमीनीस(अखबारनवीस),बार्गीर(धन्याचा घोडा बाळगणारा शिपाई),बारूद(दारू),

बालपरवेशी(मृतसैनिकांच्या मुलांची व्यवस्था),बिचवा (खांब नसलेला डेरा),बिनी(आघाडी) ,बिनीवाला,बुणगे (गैरलढाऊ लोक),बुरुजबंदी(बंदुकधारी शिपायांच्या तुकड्यांची रचना), मदतखर्च(मदत करण्यासाठी दिलेला पैसा),मलई(बंड),मर्दानगी,मर्दुमकी,मर्फा(नगारा), म्हासरा(वेढा),मात,मुकाबला,मुलुखगिरी,मुस्तेदी(सिध्दता),मेख,मेलकार(शस्त्रविद्या शिक्षक),मोताना(युध्दात गेलेल्यांच्या कुटुंबियांना दिलेली रक्कम),मोर्चा,मोहरम(पराभूत), मोहरा,मोहीम,रणजखमी,रसद,रिसाला(घोडदौड),रु(फौजेची आघाडी),रेजकदाणी(छरे ठेवण्याचे पात्र),रंजक,लष्कर,शबखून(रात्रीचा छापा),शर्तनामा(तह),शर्तमर्दी(शौर्य),शह (देणे),शहीद(हुतात्मा),शिकस्त,शिबंदी(हंगामी फौज),शिल(चिलखत),शिलेटोप(जिरेटोप), शुतरस्वार(उंटावरील स्वार),सफ(रांग),सप्तहजारी,सफेजंग(हल्ला),सरबत्ती,सरलष्कर, सरसुभा,सलक(सरबत्ती),सलतन(चतुरंग सैन्य),स्वार,स्वारी,स्वारीशिकारी(मोहीम), सालार(सेनापती),सिपत(ढाल),सुभेलष्कर,सुलतानढवा(हल्ला),सुलह,हरीप,हरोळी(आघाडी) ,हलकारा(जासूद),हल्ला,हुजरात(राजाची फौज),हेजीब इ.

### (२) शस्त्रविषयक

तमंचा,तरकश(बाणांचा भाता),तहनाल(शस्त्राचे म्यान),तीर,तीरदस्ता,तेगा(रुंद पातेची तलवार),तोफ,दुता(म्यान),नस्तर(लहान चाकू),निमचा,नेजा(भाला)नोक(टोक,अणी), नोकदार,पेशकबज(कट्यार),फिरंग(एक हत्यार),बंदूक,बर्ची(लहान भाला),बागदार(गुप्ती), म्यान,रान(जंबीयाचा डाव),सईफ(तलवार),संगीन(बंदुकीच्या टोकाचे तीक्ष्ण हत्यार), समशेर इ.

### (३) स्थापत्य

अजबखाना,अजायबखना,अंबारखाना,अदबखाना(तुरुंग),अर्क(पोटकिल्ला),अलमखाना (वाद्यशाळा),अलंग(संरक्षक भिंत),अलंग-नौबत(पहारा),असुरखाना(ताबूत करण्याची जागा),अस्तबाल,आबदारखाना,आरसेमहाल,आरामस्तान,आलिशान,इजायली(हलके), इदगाह,इमला,इमाद(खांब),इमारत,इमारती(लाकूड),इस्ताद,उश्टरखाना(उंटशाला), ऐनेमहाल,ऐने राजमहल,कबर,कबरस्तान,कबुतरखाना,कमान,कसरतखाना,किताबखाना, कुशाद(विस्तीर्ण ),कैदखाना,खबाला(टोलेजंग),खलबतखाना,खवासखाना,खाबगा,गचगिरी (चुनेगच्चीकरणे),गच्ची,गज,गजबाव(चुन्यात बांधलेली विहीर),गिलावा,गौखाना(गोठा), घुमट,घुसलखाना(स्नानगृह),चमन(बाग),चबुतरा,चुनेगच्ची (सं.चूर्ण+फा.गच्ची),चोबी (लाकडी),चोबीना(लाकूडकाम),चौथरा(फा.चौतरा),चौसोपा,छापखाना(फा.चापखानह् ), जकीरा(कोठार),जमखाना(वस्त्रागार),जमातखाना,जमीदोज(भुईकोट),जरखाना, जलोहखाना,जवाहिरखाना,जामदारखाना,जिनसखाना,जिनसी(कोठार),जिना,जिरातखाना (शस्त्रागार),जिलौखाना(समारंभस्थान),डाकघर(म.घर),डागडुजी,ढेलज(उंबरा), तख्तपोशी(कडीपाट),तख्ता(फळी),तक्ती(चकती),तगारे(लोखंडी टोपले),तबेला,तरफ

(लाकडी आधार),तहखाना,तहवील(अठरा कारखाने),ताकाबारी(खिडकीवरील तक्ता),
तारसखाना(पायखाना),तालीम/तालीमखाना,ताब्दान,तोफखाना,तोशखाना(कोठार),
थटीमहाल(गोशाला),दफ्तरखाना,दरज/द(भेग),दरजगिरी(दर्जा भरणे),दरवाजा,दर्ज/
दर्जा,दर्यामहल,दरूणी महाल(जनानखाना),दारुखाना,दालन,दवाखाना,दास्तान,दिवाण
(बैठक,सोफा-इ.),दिवाणखाना,दिवाल/र,दुकान,दुरुस्ती,नगारखाना,नोकरखाना,
नौबतखाना,पडदपोशी(आडोसा),पडदी,पागा,पाया(रफा.पाया),पीलखाना(हत्तीशाळा),पेच,
पूल,पूलबंदी,फरशी,फरसबंदी,फरादा,फरासखाना,फवारा(कारंजे),फळी,फत्याबुरुज(मोठा-
बुरूज),बारुदखाना,बालेकिल्ला(उपरकोट),बुनियाद,बुरूज,बोगदा,भूतखाना,मकबरा,मकान,
मजबूत/ती,मजला,मजालस(दरबार),मजिद/मशीद,मजालस(दरबार),मनोरा,मरमर
(संगमरवर),मर्दाना(पुरुषांची बैठक),मरामत/मरंमत,महल/महाल,महिरप(छोटी कमान),
मालखाना(कोठार),मुदपाकखाना(स्वयंपाकघर),मेहरप,मोदीखाना,मोर्चा(तटबंदी),मोरी(फा.मुरी),
रख्तखाना(वस्त्रालय,कचेरी),रोजा(दर्गा),रोशनदान,रंगमहाल,वहिली महाल(रथशाल),
वसा(लाकूड मोजण्याचेमाप),शफाखाना(रुग्णालय),शिकारखाना,शिकारगाह,शिल्लेखाना
(शस्त्रागार),शेतखाना,शुतरखाना,सदर(राज्यसभा,मुख्य कचेरी),सफल/सफील,
सरकारवाडा(म.वाडा),सरफखाना(तांबूलगार),सरबतखाना,सराई,सराफखाना,सालाबतकुवा(खंदक),
सायबान(छप्पर),सिहतखाना/सेतखाना,सुरकी (भाजलेली वीट),सुराख,सोपा,संगमरवर/
री,संगी/संगीन,सैतानखाना(पापगृह),हजारा(अनेक धारांचे कारंजे),हमाम(स्नानगृह),
हमामखाना,हवेली,हौद,हौदा इ.

## (४) शासन-व्यवहार

अबदार(जलशालेचा अधिकारी),अबाब(कर),अमदानी(उत्पन्न),अमनसभा(शांतीसभा),
अमलफैला,अमलहरकत,अमला(अधिकारी),अंमल,अमंलदार,अंमलबजावणी,अमानत,
अमिल(अधिकारी),अमीन(तहशिलदार),अमीनी,अमीर,अमीर-उमराव,अर्ज,अर्जदार,
अर्जदास्त,अर्जबाब,असामदार(वेतन घेणारा),असामीवार,अहकाम(सत्ता),अहदपैमान
(करार),अहदशर्त(तह),अहलकार(कारकून),असल अर्जी (मूळ अर्ज ),आम,आमदनी,
आमदार,आमखास,आमिल(आधिकारी),आवाजी(मतदान इ.),इजहार(जाहीरनामा),
इकरार(लेखी/तोंडी करार),इजाफा(नेमणूक),इजारत/इजारा(खंडाची पध्दती/मक्ता),
,इजारदारी(मक्तेदारी),इत्तला(सूचना),इनाम,इनाम-इकराम,इनाम-जमीन,इनामदार,
इनामत(बक्षीस),इनामपत्र,इनामवतनी,इनामी,इनायत(कृपा/बक्षीस),इनायतनामा,
,इसमनवीसी(नावानिशी),इसमवारी(नामानुक्रम),इस्तीफा,इस्तावा(दरसाल वाढत्या
साऱ्याने जमीन देणे),उजूर(तक्रार),उमराव,उमेदवारी,उरूबरू(प्रत्यक्ष उपस्थिती),उसूल
(उत्पन्न/जमा),एकसाली,ओहदा(हुद्दा),कचेरी,कज्जा,कतबा/कताबत/कताबती,कब्जा,
करारनामा,कारकीर्द,कारकून,कारखाना,कारभार/री,कारंदाजी(मुत्सद्देगिरी),काशीद,
किताब(पदवी),किस्तगारी(हप्तेबंदी),कीर्दआबादानी(लावणी,संचणी),कीर्दमहामुरी(लागवड

व वसाहत),कुलअख्त्यारी,कैद,कैदखाना,कोतवाल,कोतवाली,कौल,कौलकरार,खजानची,
खजीना,खबऱ्या,खलक,खलबत,खलिता,खरीफ,खवास(मानकरी),खाजगत/खाजगी,
खानेसुमारी,खामपट्टी(शेतजमिनीवरील कर),खारीज,खालसा,खाविन्द,खासदार,खासे
खुलासा,खुर्द(र्दी),खेनक(हातातून गेलेली जमीन,वेतन),खेरीजजमा(शेतसाऱ्याव्यतिरिक्त
घेतलेली पट्टी),खेरीजमक्त(रयतवारी),गस्त,गिर्दावरी(जकात-वसुली,बंदोबस्त),गुन्हा,
गुन्हेगार/री,गुलाम/गुलामगिरी/गुलामी,गैरकोली(न दिलेले अभय-वचन),गैरमहसूल,
गैरमंजूर,गैरमिराशी(वंशपरंपरा मालकी नसलेला),गैरविल्हा,गैरशिरस्ता,गैरशिस्त,
गैरसनदी,गैरहजेरी,गैरहिशेबी,गोशमाली,(कानउपाडणी),गोश्माली(शिक्षा),घरकैद(म.घर,
स्थानबध्दता),घरफितूर(यादवी),चक(हुकुमनामा),चश्मपोशी(डोळेझाक),चहारुम(चौथाई),चाकर,
चाकरपेशा,चाकरी,चिटणीस,चोपदार,चौरीबर्दार,चौकीदार(फ.दार),जकात,जकीरा(कोठार),
जप्तरप्त,जप्ती,जमनीस(वसुली अधिकारी),जमानत,जमाबंदी,जमावबंदी,जमीनदार/री,
जलावतन(हद्दपार),जलूस(राज्यारोहण),जहागीर,जागिरमनसब,जातइनाम,जाब्ता
(अधिकारपत्र),जायदाते(सनदी),जाहिरात,जाहीर,जाहीरणे,जाहीरनामा,जिरायत,जुर्माना,
जुलुमजास्ती,जुलूम,डावपेच,डौल(सही-शिक्क्याचा कोराकागद),डाक,डाकचौकी,
डाकबंगला,(इं.बंगला),तक्तरवा(चलसिंहासन),तकशीम/तक्षीम,तक्रार,तख्त,तख्तनशिनी
(राज्यारोहण),तगाई,तगादा,तगीरी(बडतर्फी),तजवत्रा(अफरातफर),तजवीज,तजावजा(अफरातफर/
परागंदा),तनखा,तपास,तफ्रिक(वर्गवारी,वाटणी),तरतूद,तरफबंदी(महसुलाची पध्दत),
तलब(पगार,बोलावणे),तलब-तनखा,तसरुफाती(ताबा,भोगवटा),तसलमात(अनामत),
तहकीक,तहकीकात(चौकशी),तहकुबी,तहरीर(कारकुनाच्या खर्चासाठी दिलेली रक्कम),
तहमुली(ढिलाई),तहसील,तहसीलदार,ताकीद,ताज,ताजदी(जुलूम),ताजीम(बहुमान),ताबा,
तामिल(अंमलबजावणी),तालुकदार,तुमारजमा(शेतसाऱ्याची रक्कम),तुरुंग,तैनात,दरक
(हुद्दा),दरखास्त,दर्जा,दरबंदी(पिकांची आणेवारी),दरबार,दरबारखर्च,दरबारी,दर्याफ्ती
(चौकशी),दस्त(सारा),दस्तअमल(गावाचा वसूल),दस्तऐवज,दस्तक पर्वाना,दस्तपंजा
(पर्वाना),दस्तरपत्त(बंदोबस्त),दस्ताबाकी(साऱ्याची दस्तुरी दाखल न केलेली रक्कम),
दस्तीबाज(करमुक्त),दस्तूर(कबुली सही),दस्तुरी(रस्तापट्टी),दस्तुरुल अमल(शिरस्ता),
दाद,दिम्मत(हवाला/ली),दिवाणी(मुलकी),दोही/द्वाही(जाहीर खबर,दवंडी),दौलत(राज्य),
दौरा,नजरकैद,नजारत(नाझराचे काम),नजूल(सरकारी गावठाणाचीजमीन),नफी
(बडतर्फी),नबाबत(वजिरी),नवीसंदगी(कारकुनी),नाग/गा (खंड ,गैरहजेरी),नानपरवेशी,
नामजाद(नियुक्त),नामदार,नायब(दुय्यम),नायबत(मुतालिकी),निजाम(व्यवस्था,व्यवस्थापक),
निमसरकारी,निशस्त(बैठक),निशाणी,नोकरशहा,नोकरशाही,परगणा,परवानगी,
परवानगी-रसानगी(बंदोबस्त),परवाना,पाचहजारी(फा.पंजहजारी),पादशाई/पादशाही,
पादशहा,पातशहाजादा(युवराज),पादशहाजादी,पायमल्ली(फा.पामाली),पेशकश(नजराणा,खंडणी),
.पेशवा,पेशवाई,पेशवागिरी,पैदास्ती(उत्पन्न),पैदास,पैबंदी(व्यवस्था),पैमाश(जमिनीची
मोजणी),पैरवी(अमलबजावणी),पोते(तिजोरी),पोशिंदा,फड(कचेरी),फडनवीस/फडणीस,

फर्मान,फर्जी(प्रधान),फरार/री,फुर्सदगी(भरपगारी रजा),फैलजामीन(शांततेने वागण्याची हमी),बडतर्फी,बदअमल(जुलूम),बदमस्ती(बंडखोरी),बदली,बंदखाना(तुरुंग),बंदगी,बंदा,बंदोबस्त, बरखास्त,बरतर्फ/बडतर्फ,बरहक(न्यायाने),बरहुकूम(प्रमाणे),बर्दास्त/बडदास्त(पाहुणचार, व्यवस्था),बहाल,बादशाह,बालायेश(बढती),बितर्जुमा(नियमानुसार),बेदखल(अधिकारच्युत), बैतलमाल(सरकारी खजिना),भालदार(भाला धारण करणारा शिपाई),भोजनखर्च (म.भोजन),मक्ता,मक्रमत(कृपा),मजमू(वसुलीचे काम),मंजुरी,मनसब(अधिकाराची जागा),मनाई,मलई(बंड),मलिक(राजा),मलिका,मशवरा,मसनद(गादी),मसलत,मसलतगार,मसाद (जमिनीची मोजणी),महकुबी(तहकुबी/बंदी)महजर(सनद),महसूल,महालकरी/महालदार, महालमुलूख,माफ/माफी,माफलात(बजावणी),मामला(तालुक्याची वसुली),मामलेदार, मामूल,मिसल(दर्जाप्रमाणे व्यवस्था),मीर(सरदार),मुजारियान(शेतकरी,खेडूत),मुताबत (बजावणी),मुत्सद्दी,मुलाजमत(नोकरी),मुलुखदारी(राज्यव्यवस्था),मेजवानी(नजराणा,विशेष भोजन),मोकासा(मुशाफिरांची मालमत्ता सुरक्षित ठेवण्याच्या अटीवर दिलेले गाव-इनाम) मोदीखाना,मोर्तब,मोरुषी(वंशपरंपरागत जमीन),मोहतरफा(एक कर),मोहतसदी (वजनमापांची तपासणी),मोहरी(सही-शिक्केदार),मोहरीर(देशपांड्यांचे काम),मोहोर (शिक्का),मोहोरबंद,मोसबा(हिशेबपत्र),येलची(राजदूत,वकील),रजा,रजाचिठी,रदबदली,रद्द, रद्दबातल,रफादफा,रमजानगाई(एक कर),रयत,रयतरजावंती(रयतेची खुशी),रयतवारी, रया,रयाअत,रवानगी(आगाऊ रक्कम,नालबंदी),रसानगी(मौखिक/लेखी परवानगी),रसूम इलाखा(कुलकर्ण्याचा हक्क),राजीनामा,रुईने(शिरस्त्याप्रमाणे),रुजू,रुतबा(दर्जा),लवाजमा, लुचपत(फा.रिश्वत),वजारत,वजीर,वतन,वतनदारी,वरावर्द(अंदाजपत्रक),वलीहद(युवराज), वसला(मोजणीसाठी पाडलेला जमिनीचा तुकडा),वसूल/वसूली,वाकनिशी (अखबारनविसाचे काम),वाटखर्च(म.वाट),शहजादा/दी,शहनशाह,शहा(राजा),शाही, शास्त(शिक्षा),शिक्का,शिक्कामोर्तब,शिस्त,शिस्तभंग(म.भंग),शुदामद/सुदामत(वहिवाट), शेरा,सक्तमजुरी,सक्ती,सनद,सनदशीर,सनदी(नोकरी इ. ),सरकार,सरकारस्वारी, सरकारी,सरपंच(म.पंच),सरफ-इ-खास(राजाच्या खर्चासाठी दिलेला विभाग),सरफईरात (पोटखर्च),सरफराजी(बढती),सर्फफास,सरंजाम,सरंजामदार,सरंजामशाही,सल्लागार, सल्लामसलत,सवलत,सादत,सानकइनाम(उदरनिर्वाहासाठी इनाम),सानिक दस्तूर (वहिवाटीप्रमाणे),सारा,साहेब,साहेबजादा(राजपुत्र),साहेबसुभा,सिबत(करार),सुभा,सुमारी, सुलतान,सुलातन-खत(राजपत्र),सुलताना(महाराणी),हक्क,हंगामी,हजीर मजलस (सभासद),हजेरी,हजेरी-गैरहजेरी,हप्ता,हप्तेबंदी,हुकूम,हुकूमत,हुकूमशाही,हुजूर, हुजूरपक्ष(म.पक्ष),हुद्दा,हुजूरपागा इ.

(५) लेखनविषयक

अर्ज,अर्जदार,अजातपत्र(म.पत्र),अनामतवही(कच्चे टिपण),अलकाब(मायन्यातील पदव्या), अहदनामा,इनामचिठी(इनामाची यादी),इनामपत्र,इनायतनामा,इलहाक(सही).

इल्तिमास(विनंती,अर्जी),इर्सालनामा,कतबा/कताबात(करारनामा),कब्ज,कब्जपत्र(मालकी हक्क दिल्याचा करारनामा),कबालपत्र(करारपत्र),कबूलकतबा,कबूलकागद,कबुलात (संमतिपत्र),करीणा,कलमबहादर,कागद/कागदी,कागदपत्र,किताब/किताबखाना, किताबत(लेख),कितेब(लेख),कित्ता,किरदार(जमाखर्च-वहीतील संदर्भ),कीर्द,कैफियत कौलपत्रक(म.पत्रक.कमी साऱ्याच्या जमीनीचा हिशेब),खत,खतकिताबत(पत्र),खतखतूत (कागदपत्र),खतबेजा(वचनपत्र),खतावणी,खबर-अखबार,खबर-बखर,खाका(खर्डा),खासा कागद(दौलताबादी कागद)खुलासेवार,गोषवारा,जबरा(मोठा टाईप),जबाब,जमानकतबा (जामीनपत्र),जलद-कलमी(कलम बहाद्दर),जामीन-खत(हमीपत्र),जुजदान(सुटे कागद ठेवण्याची वही,व्यासपीठ),जैल(मायना),डौल(सहीशिक्याचा कोरा कागद),तपशील, तमस्सुक(करार,सही-शिक्का),तरकीम,तर्जुमा(अनुवाद),तवारीख/तवारीकखाना,तक्ता, तक्वेत कौल(वासनपत्र),ताकीदचिठी,ताजा कलम,तारीख,तालीक(प्रत),तालीकचा (आज्ञापत्र),तुमार (यादी,हिशेबाचे कागद),दप्तर,दप्तरबंद,दफाते(लेखनवही),दरखास्त, दर्जाबनामा(उत्तरपत्र),दर्ज(दाखल,लिहिलेले),दस्कत(स्वाक्षरी),दस्तऐवज,दस्तक(परवाना), दस्तपंजा(परवाना),दस्ता(२४ कागदांचा गठ्ठा),दाखला(प्रमाणपत्र),दुकित्ता(पत्रे इ.), दौत,नकल/नक्कल,नक्शा,नवाजनाम(प्रशस्तिपत्र),नवाजशनामा(कृपापत्र),नामा (पत्र,खलिता),निखालसपत्र(रजिदपत्र),निमकी,नियाजमंद(अर्जदार),निविस्ता,निशाणी,निसबत, नुक्ता(टिंब),पर्वा(आधिकार पत्र),पारशी/फारशी(भाषा),पारसनीस,पैवस्ती(पत्र मिळाल्याची नोंद,पोच.),फर्दफर्माशी(एकेरीपत्र),फर्मान,फारकत(सोडचिठ्ठी),फेरिस्त(यादी),बखर,बयानवार (तपशीलवार),बाड(अ.बयाज),बातमीनीस(अखबारनवीस),बाब-बाबत,बार(नोंद),बार्निशी (सरकारदप्तरी नोंद),बि-कलम(कलमवार),बितर्जुमा(नियमानुसार),बितपशील,बिदानंद (कळावे),मकातीब(पत्रे),मजकूर,मजमून(मजकूर),मक्दूब(उपर्युक्त),मक्बूल(मान्य),मंजूर,मखदूर/ मगदूर,मन्सूर (राजाज्ञापत्रिका),मनाईपत्र,मनारोखा,मनाचिठी,मर्सूल(रवाना केलेले), मशारनिल्हे(उपरिनिर्दिष्ट),मस्विदा/मसुदा,मश्रीफ(व्ययलेख),मसादी(जमिनीच्या मोजणीचा खर्डा),मस्तूर(लिहिलेला),महजर(सनद),महब्बत अंजाम(सप्रेम),मायना,महवल मराम (विनंती),मिसाल(हुकूमनामा),मी रसानद(मी प्रविष्ट करतो),मुखत्यारनामा,मुचलका (हमीपत्र),मुद्दा,मुद्देसूद,मुन्शी(फार्सी पत्रव्यवहार करणारा),मुरक्का(सचित्र पुस्तक), मोजदाद,मोर्तब,मोर्तब सूद,मोसबा(हिशेबाचे टिपण),मोहरबंद,मोहरदार(गुळगुळीत कागद),याद/दी,याददास्त(सूची),यादबस्त,यादबूद(यादी),रकबाबंदी(जमाबंदीचा तक्ता), रकाना,रजमें,रवानगी -चिठी(लेखी परवानगी),रवासुदगी (पावती,जमाखर्च),रसीद(पावती) ,राजीनामा,रुका(पत्र),रुकार(नक्कल केल्यावर रुजवात घेतल्याबद्दल 'रु 'असे केलेले चिन्ह.),रुजवात(ताडून पाहणे),रुजुवातपत्र(तिजोरीतील रक्कम जमा केल्याचा दाखला), रोजकीर्द,रोखा,रोजनिशी,लिफाफा,वकीलनामा,वजा,वजाबाकी,वतनपत्र,वरख,वाका(हकीगत), वाजबुल अर्ज(लेखी आज्ञा),शरायती(काकपद)शाई,शाईशोक(टीपकागद),शाहिदीनामा (साक्षीपत्र),शिकस्त(रकाणे),शिकलबंद(जमाखर्चाचा तक्ता),शिक्का,शिक्कामोर्तब,

शिफारसपत्र,शुका(फर्मान),शेरा,सई सूद,सफरनामा,सामलातीपत्र(म.पत्र.मदतीसाठी पत्र),सरकतनामा,सरनामा,सही,सामीलनामा,सुलतानखत,हकीकतनामा,हमीपत्र,हरफ, हरफ-ब-हरफ(अक्षरशः),हशा(समास),हातरोखा(म.हात),हिशेब,हिस्सेरशी,हुकार (श्रीकाराप्रमाणे मुसलमानांचा प्रारंभी लिहावयाचा शब्द ),हुकुमनामा इ.

**(६) विधी**

अकत्यार/अखत्यार,अखत्यारपत्र,अखत्यारी,अदालत,अयाल(विधवेच्या नावापुढील पतिनामदर्शक शब्द),अशील,इकरारनामा,इन्साफ,कज्जा/कजिया,कबुलात(सम्मतिपत्र), कबुली,कबुलीजबाब,कानू,कानूकायदा,कानूजाबता,कायदा,कायदेपंडित(म.पंडित),कायदेबाज, कायदेभंग(म.भंग),कायदेशीर,कैफियत,कोम,खत(दस्तऐवज),खुलासा,गव्हाई(साक्षीदार),गुन्हा, गुन्हेगार/री,गैबीअर्जी(निनावी पत्र,अर्ज),गोही,गोहीदार(साक्षीदार),गौरशी(खोल चौकशी), जप्ती,जबानी,जबाब,जमानकतबा,जमानत,जमानतदार(हमीदार),जाबजबाब,जाबता(अधिकारपत्र), जामीन,जामीनखत,जामीनदार,जारी(लागू),जिमती(हमीदार),जिंमा,जिम्मेदारी,तकशीदार (गुन्हेगार),तक्रार,तक्रारअर्ज,तक्रीर(कैफियत),तबदिली(मालमत्तेचे हस्तांतरण),तलब (समन्स),तरफसानी(प्रतिपक्ष),तरक्रा(फिर्याद,तक्रार),तहकिकात(चौकशी),तहकूब,तहरीर(अपेक्षा), ताबा,ताबेदार,ताबी(मालकी),दफा,दरखास्त,दरहिकायत(डोळ्यांसमोर),दर्यापती,(चौकशी,निर्णय), दस्तक(परवाना),दाईमदई/दाईमुदई(वादी-प्रतिवादी),दाद,दादफिर्याद,दारमदार(करार), दावनगीर,दावा,दावेदार,दिवाणी(मुलकी),दुरुस्ती(नियमांची इ.),न्यायमनसुबी(म.न्याय, न्यायनिवाडा),नाजीर/नाझर(न्यायाधीशाचा चिटणीस),नालिश (फिर्याद),निवारसा (वारसाहक्काचा अभाव),पुरशीस(विचारपूस),पूस-गवस(खोल चौकशी),पेशकार (मदतनीस),पेशी,पैदास्ती(उत्पन्न),पैरवी(अंमलबजावणी),फरार/री,फारकत(सोडचिठ्ठी), फिर्याद,फैसलनामा(लेखी निकाल),फैसला,फौजदार,बयाणवार(तपशीलवार),बयान,बयान-अर्ज,बशर्त(अटीप्रमाणे),बक्षीसपत्र,बेकानू,बेकायदा,बेकायदेशीर,बेगुनाह,मंजुरी,मनसुबी (न्यायनिवाडा),मनाई,माफ/माफी,माल-जामीन,मियाद(मुदत),मियादी(मुदतीची),मीर (सरदार),मीर अदल(न्यायाधीश),मीरशिकार(शिकार-अंमलदार),मुकदमा,मुत्तार/री, मुख्यारनामा(अधिकारपत्र),मुचलका(हमीपत्र),मुजाईक(प्रतिबंध करणारा),मुजाका(प्रतिबंध, हरकत),मुतबन्ना(दत्तक),मुदई-इलई(आरोपी),मुदाई(दावेदार),मुद्दा,मुनका(निवाडा),मुन्साफ, मुन्सफी(न्यायनिवाडा),मुफ्तीगिरी(न्यायाधीशी),मुफाइजा(कृपापत्र),मुभा(परवानगी),रब्त(करार), रफेदफे(निकालात काढलेले),रवादार(अनुमोदक),रास्त-मामलगी(न्याय्य वर्तन),रुसूम (हक्क,पैका,कर),रोजनामा,लवाद,वकील,वतनजप्ती,वहीम,वारस,वारसा,वारिसदार,शयदीदार (साक्षीदार),शर्त,शराकतदार(वाटेकरी),शाहिदीनामा(साक्षीपत्र),शिकायत,सईसाक्ष(म.साक्ष, दस्तऐवजावर सही करून साक्ष देणे),सईसूद(साक्षीची सही केलेला दस्तऐवज), सक्तमजुरी,सजा,सज्जाद(गादीचा हक्कदार),सदर अमीन(दिवाणी न्यायाधीश), सरकारजमा,हक्क,हक्करसूम,हमी,हमीदार,हरकत,हरदू पक्षकार(म.पक्षकार,दोन्ही बाजूंचे

पक्ष)हवाला,हिस्सेदार इ.

### (७) आर्थिक व्यवहार

अजुर्दार,अजुरा(वेतन),अनामत,अफरातफर,अमानतदार,अमानतपत्र,अमीन(विश्वस्त),आदा (उत्पन्न),आमद,आमदनी,आवर्जा(हिशेबाची वही),एकरकमी,ऐनगल्ला,ऐपत,ऐपतदार, ऐवज,ऐवज-भरणा,कबज(रकमेची पावती),कबाला(सनदशीर विक्री),कबालपत्र(सनद), कफालत(हमी),कर्ज/कर्जाऊ,कर्जदार,कर्जबाजारी,करारदाद(ठराव),करारनामा,कवाला (सौदापत्र),किफायत/शीर किंमत,किंमती,किरदार(जमाखर्च-वहीतील संदर्भ),किराया, किस्त,किस्तबंदी,खतबेजा(प्रॉमिसरी नोट),खर्च,खर्चणे,खर्चवेच,खर्चिक,खर्चखरेदी, खरेदीफरोक्त,खुदखर्च(व्यक्तिगत खर्च),खुशखरेदी,गैरकिफायत(तोटा),गैरनफा(तोटा), चिल्लर,चिल्लरखर्च,चिल्लरजमा,जडजवाहीर,जमा/जमाखर्च,जमानत,जाबीहुंडी(म.हुंडी), जायदाद,तफावत,तबदिली(मालमत्तेचे हस्तांतरण),तसलमात(अनामत रक्कम इ.), तहबाजारी(दुकानाचे भाडे),तहरीर (कारकुनाच्या खर्चासाठी दिलेली रक्कम),तारीफ (जकातीच्या दराचे कोष्टक),ताहूद(मक्ता),तिजारत,दफिना(गुप्त धन),दफेरफे(कर्जाची फेड),दर(भाव),दरदाम(भाव),दरबारखर्च,दस्त(सारा),दस्तुरी(रस्तापट्टी),दाइमी(कायमची देणगी),दारबाकी(श्रीमंताकडील येणे),देणगी,देणेदार,दौलत,दौलतदार,धनदौलत(म.धन), तक्ती,शिरस्ता(जमिनीचा रोखीतील वसूल),नगद/नक्त,नजरगहाण,नजरगलबत (गलबतावरील कर),नफा,नफेबाजी,नादार,निमके(ओझ्याच्या अर्ध्या भागावरील जकात), निमखाई(अर्धेली),निरख(बाजारभाव),नुकसान,पेशगी(आगाऊ दिलेली रक्कम),पैदास,पोते (खजिना),पोतेझाडा,फरोक्त/ख्त,फद्या(एक नाणे),फाजिल(उत्पन्नातील वाढावा),फायदा, फारीक(पावता/चुकता,फेडलेले कर्ज),बदलमुशारा(जमिनीच्या रूपाने दिलेला पगार), बयाना(विसार),बहानक्त(गल्ल्याची नाण्यांत किंमत),बाकी,बाजार/बाजारपेठ/बाजारपेठी, बाजारबट्टा,बाद(वजा),बिछाईत,बिदागी,बिसात(मालमत्ता),बेकार/री,बेरीज,बैतलमाल (सरकारी खजिना),बोरी(सराफांची पैसे ठेवण्याची पिशवी),मक्ता,मक्तेदारी,मखलाशी (रकमा मांडून केलेली बेरीज),मजरावजा,मजुरी,मसादा(अर्थसाहाय्य),मश्रीफ(व्ययलेख), महिना(मासिकवेतन),माफक,मार्फत(मध्यस्थ),माल,मालअसबाब,माल-जमीन,मालत (मालमत्ता),मालमत्ता,मालकी,मावेजा,मिळकत(अ.मिल्कियत),मीना(हिशेब करताना वजा केलेला),मुलाफत खर्च(देणगी-खर्च),मुदतबंदी,मनाफा(नफा),मुनीम(गुमास्ता),मुबा(बक्षीस), मुशाहिरा,मेहनताना,मोजदाद,मोबदला,रक्कम,रंगाई(रंग देण्याची मजुरी),रत्तल(अर्धा शेर),रतीब,रदकर्ज(कर्जफेड),रयतवारी,रवानगी(बिदागी,आगाऊ रक्कम),रवासुतगी (जमाखर्च),रसीद(पावती),रातबा-मसाला(रोजचा खुराक व खर्च),रोख,रोखी,रोजकीर्द, रोजखर्डा,रोजगार,रोजंदारी,रोजमुरा(रोजची मजुरी),रोजी(एक दिवसाचे वेतन),रोजीना (दैनिक खर्च),लाजमा(कर),वजा,वजाबाकी,वजावाट,वजासूट,वसूल/ली,वसूलबाकी(वसूल न झालेली रक्कम),वायदा,वायदेबंदी,वासलात(हिशेब),शिकलबंद (जमाखर्चा तक्ता),

शिबंदीखर्च,शिल्लक,शिल्लकबाकी(हिशेब झाल्यावर उरलेली रक्कम),शिल्लकसाखळी (जमाखर्च तपासून काढलेला पडताळा),सदरताळा(खात्याचा रकमांचा मेळ),सरासरी, सायर(जकात),सालबेगमी,सौदा,हप्तेबंदी,हमी,हयात,हर्राज(लिलाव),हवाला,हिशेब, हिस्सेरशी इ.

### (८) नाणकवाचक

अकबरी,अश्रफी,इब्रमी/इब्रामी,कलदार,खुर्दा,चिल्लर,दिरम(दोन आण्यांचे चांदीचे नाणे), फद्या(एक नाणे),महमदी (एक नाणे), मोहोर (सोन्याचे नाणे),रेजगी(किरकोळ,चिल्लर नाणे),सतरामी(एक नाणे),हाली(निजामकालीन नाणे)इ.

### (९)इतिहास / ऐतिहासिक

अकबरशाही,अखबार,अखबारनवीस,अमदानी,आदलशाही/आदिलशाही,कारकीर्द, काफरशाई(काफरांचे राज्य),पेशवाई,पेशवेशाही,बखर,बादशाही,बेबंदशाही,भाऊशाही (म.भाऊ,भाऊसाहेबांची राजवट),रियासत(राजवट),वाका(हकीकत,एक इतिहासलेखन प्रकार),वाकेनीस(अखबारनवीस),शहनशाह,शहाजानी(शहाजहानकालीन),सुलतानी,हुसेनी.

### (१०) कालगणना

इसवी(खिस्ती सन),जलूशी(राज्यारोहणापासून मोजण्यात आलेला शक),तिसाला, महिना(मासिक वेतन ),रबिलाखर(चौथा अरबी महिना),रबिलावल(तिसरा अरबी महिना), रोज,रोजगुदस्त(काल),हिजरी(सन)इ.

### (११) कालवाचक

आयंदा/यंदा,आवंद,औंदा,गुदस्ता,फसली(अकबराने सुरू केलेली कालगणना),मोहरम, रज्जब,रमजान,वक्त,शाबान(आठवा अरबी महिना),सदी/सद्दी(शतक/अनुकूल काळ), सन,सफर(दुसरा अरबी महिना),सवाल(अरबी दहावा महिना),साल,सालगुदस्त,सालाना, सालाबाद,सालिना,सुरुसन/सुहुरसन,हप्ता,हिजरी(सन)इ.

### (१२) भूगोल/भौगोलिक

अखर/री(गावालगतची जागा),अफ्ताब,अरबस्थान,अलम(जग),अलम दुनिया,इलाखा, इराण,,इराणी,उत्तरतरफ(उत्तर दिशा),कसबा,काहूर(काळोख),किनारा,कुचडी(गल्ली), कुंज(नदीचे वळण),कुदरती(नैसर्गिक),कुलाबा(समुद्रात गेलेला जमिनीचा भाग),कुही (डोंगरी),कोहक(गुहा),खराबा(नापीक जमीन),खस्ती(चिखलाची जमीन),खाक,खुर्द, खुरासनी(खुरासन प्रांतातील),खुश्की,खुश्कीचा मार्ग,गर्द/गरद(धुराळा),गर्मा,गिर्दबगिर्द (चोहोबाजूंनी),गैरआबादी (ओसाड स्थान), गैरमोसमी,जंगल,जंजीरा,जमीन,

जवार/जव्हारी(शहराजवळची लहान खेडी),जहन्नम(नरक),जहान,जिराईत,जिल्हा,टप्पा,
डाकमार्ग(म.मार्ग),तलक(ओसाड),तलाव(फा.तालाब),तहसील,तालुका,तुफान,तुर्कान,दरवाजा
(प्रवेश मार्ग,वेस),दरसवाद(शिवारात),दर्या,दर्याई,दर्याविस(समुद्राकाठचा),दुआब(दोन
नद्यांच्या मधील प्रदेश),दुतर्फा/दोतर्फी,दुनिया,दुरस्ता,देह(गाव),देहात,दौर(परिसर,घेरा),
नजूल(सरकारी गावठाणाची जमीन),नहर(पाट),पंजाब,परइलाखा,परगणा,परतालुका,
परमुलूक/ख,पल्ला(फा.पलह्),पायाब(नदीचा उतार),पारशी,पूल,फरासीस,फासला,
फिरंगण,फिरंगी(युरोपीय,पोर्तुगीज),बंदर,बंदरकिनारा,बल्दा,बुल्दा(शहर),बादल,बाला(उंच),
बालेकिल्ल(उपरकोट),बालेघाट(म.घाट),बारिश,बिलंद/बुलंद,बुद्रुक,बुलंदी(उंची),मगरबी
(पश्चिमेकडील),मजल(विसाव्याचा टप्पा,जागा),मजरा(शेतकऱ्यांची वसाहत,वाडी),मतलई
(पूर्वेकडून वाहणारा वारा),महताप/ब(चंद्र,चंद्रज्योत),महल्ला/मोहल्ला(पेठ),महाल(जिल्हा,
पेटा),मुक्काम,मुल्कात(प्रांत-विलायत),मुलूक,मोगल,मोगलाई,मोगलाना,मोबार/री(खाडीचे
तोंड),मोसम,मोसमी(वारा,पाऊस),मोहल्ला,मौजा/जे(खेडे),येम(यमन),युनानी(एक
वैद्यकशाखा),रकबा(गावाच्या हद्दीतील जमीन),रपत्त(जाण्यायेण्याची वहिवाट),रस्ता,
रस्तेबंदी,रहदारी,रहा(मार्ग),राह,रिसाल(लहान टापू),रुख(दिशा),रुम(रोम),रुमाली रस्ता
(एकमेकांस काटकोनात छेदणारा रस्ता),रूमी(रोमन),लिवा(जिल्हा),वतन,वसाहत,
विलायत(मूळ देश,इंग्लंड)विलायती(परदेशी),वैराण,शहर,शहरबाजार,शहरपनाह(तटबंदी,
कोट),शिकारगाह(शिकारीची जागा),शिमाल(उत्तर दिशा),सदरबाजार,सबजीमंडी
(म.मंडी),सरहद्द,सर्द(थंड),सर्फफास,सितारा,हद्द,हद्दनामा,हबशी,हबसाण,हमरस्ता,हवाई,
हवा,हिंदुस्थान,इ.

### (१३)धर्म/धार्मिक

अंजुमन(पारशांची धर्मसभा),अल्ला,अल्ला हो अकबर,अलैकुम सलाम,अवलिया,
अवलिया-फकीर,आयत,आलावा,आशुरा(मोहरमचा दहावा दिवस),इन्शाल्लाताला,
इबादत,इमान,इमाम,इमान-कुराण-शपथ,इलाही,इस्लाम,इस्लामी,ईद,ईदगा/ईदगाह,
ईदी,उजू-तवाजू,उजू-नवाज,उदी,उरुस,उलेमा,कंदुरी,कबर,कलंदर(फकीर),कलमा
(इस्लाम धर्म सूत्र),कलामुला(प्रवचन),कलामेशरीफ,कसम,काजी,काजी शरा
(धर्मशास्त्रज्ञ),काफर,काफरशाही,काबा,किबलेगाह,कुदरत,कुर्बान,कुर्बानी,कुराण,कौल,खतीब,
खलिफा,खिलाफत,खुदा,खुदाई,खुदातरसी(ईश्वरभीरुता),खुदाताला,खुदावंद,खैर
खैरात,खोजा,गाजी(धर्मरक्षक,योध्दा),गिलाफ(पिरावर घालायचे वस्त्र ),गुरदा(फकीराच्या
साखळीची गदा),गैबी(पीर),गैबी आवाज,गैबीफकीर,गैबी वाद्य,गैरशेरा(धर्मशास्त्रबाह्य),
गोरकफण(अन्त्यविधी),चिरागबत्ती,चिल्ला(चाळीस दिवसांचा उपवास व ध्यान,समाधी),
छबिना,जबा(विधिपूर्वक हत्या),जमयेत/जमात,जमातखाना,जारत(पवित्र स्थानाला भेट),
जिझिया,जिन्नतमकान(स्वर्गवासी),जुजदान(धर्मग्रंथ ठेवण्याचे लाकडी आसन,व्यासपीठ),
जुलाबगार(ताबुताबरोबर तलवार-भाले नेणारे),जेब(ठार),ज्यारत,तबरुक(प्रसाद),

तलाक,तवलक(ईश्वरावर भरवसा),तवाफ(प्रदक्षिणा),तसदूक(दान),तसबी(जपमाळ),ताइफ, ताजिया,ताबूत,तुर्बत,दफन,दर्गा,दरवेश,दस्तगीर(ईश्वर),दस्तूर(पारशी धर्मगुरू),दायरा (मुसलमानांची स्मशानभूमी),दीन(इस्लाम),दीनइमान(धर्म),दीन-ए-इलाही,दीनदारी, दीनदुनिया(पारलौकिक व ऐहिक गोष्टी),दुनियाई(ऐहिक),दुनियादारी,दुवा,नईस(तिरडी), नबी,नमाज,नाजल(कुराण अवतरणे),नानकुराण(शपथ),नालसाहेब,निकाह,नौमुस्लिम, नौरोज(पारशी नववर्ष दिन),पर्वर्दिगार,पारशी,पीर,पारजादा,पेगंबर/पैगंबर,फकिराणा (फकिरासाठी इनाम-जमीन),फकीर,फाका(उपवास),फात्या(प्रार्थना),फेरिस्ता(देवदूत), बकरीद/बकरी ईद,बद्दुवा(शाप),बंदगी,बंदा,बंदी,बशारत(शुभ वार्ता),बांग,बिस्मिल्ला ,बुत्परस्त/स्ती,बुत्फरोश(मूर्तिविक्रेता),बुतशिकन/नी,बुरखा,बेहस्त,(स्वर्ग),मक्का,मन्नत/ मानत,मर्हुम(स्वर्गस्थ),मर्शिया,मलऊन(शापित),मशायख(धर्मात्मा),मसीहा(प्रेषित,तारणारा),महजब, महमदी(महमदाचा अनुयायी),मिबंर(मशिदीतील व्यासपीठ),मुकद्दर(ईश्वरनियोजित), मुजावर,मुंजेवार(गावाचा हक्कदार फकीर),मुतवली/ल्ली(मशिदीची देखरेख करणारा),मुफ्ती(फतवा देणारा,मोठा काझी),मुरीद(शिष्य),मुलाणा(धर्मगुरू),मुल्ला, मुसलमान,मुस्लिम,मेहेर,मोआजिब/मवाजन(बांगी),मोगल,मोमीन(कोष्टी),मोहतसीब (निवाडा करणारा धर्मशास्त्री,धर्माधिकारी),मोहरम,मौला(ईश्वर),मौलाना,रमजान, रमजानगाई,रसम(विधी),रसूल(पैगंबर)रोजा(उपवास,समाधी/कबर),वक्फ, वली,शमस्-उल्-उलमा(इस्लामधर्मशास्त्रज्ञ,शर्यतपन्हा),शरा(इस्लामधर्मशास्त्र-निर्णय), शरियत(इस्लाम धर्मशास्त्र),शादी,शहीद(हुतात्मा),शिजदा,शुकर,शेख,शेखचिल्ली (तपस्वी),शेरणी,सज्जाद(प्रार्थनेची चटई),सज्जादा,सतका(ओवाळून टाकलेली वस्तू), सद्दा(ताबुतापुढील निशाण),संदल,सलाम,सलामत बाषद(सुरक्षित राहो),सवाल(अरबी वर्षाचा दहावा महिना),सालगिरा(वाढदिवस),सुन्नी(मुसलमानातील धर्मपंथ),सुरा(अध्याय), सूफी,सैतान,सौगंध(शपथ),हकताला,हज,हजरत,हदीस,हराम,हलाल,हकीम शरा(काजी) ,हाफीज,हिजरा,हिजरात,हिंदू,हैदोस इ.

**(१४) ज्ञान-विज्ञान-कला इ.**

इलम,किमया,जरदोजी(कलाबतूचे काम),जिल्हई(भांडी इ. चकचकीत करण्याची प्रक्रिया) ,तर्बीयात(शिक्षण),नक्सगिरी(नक्षी करण्याची कला),नकासकाम,नजरबंदी(जादू,मोहिनी विद्या),नजूम(ज्योतिषविद्या),नक्षी(बेलबुट्टी),मिनेगारी,मुजरा,मुलामा,रमल(भविष्य वर्तविण्याची कला),वरख,सवाल,सवालजबाब,हुन्नर इ.

**(१५) वैद्यक**

आजार,इलाज,उदाईन(जंतुनाशक औषध),खत्ता(डोळ्यावरील लेप),जखमपट्टी(जखम भरणे),दवादारू,मलमपट्टी,मोगल बेदाणा,याकुती(एक औषध),युनानी(एक वैद्यकशाखा), शफा(इलाज),सालंमिश्री,हकीम इ.

## (१६) सामाजिक जीवनव्यवहार

अनारदान(भुईनळा),अफलाद/अफवाद/अहफाद(मुलीची प्रजा),अफवा,अब्दागिरी,अब्रू, अमनचमन(सुखसमृध्दी),अमनचैन,अरकशीबरकशी,अलाबला,अलायबलाय,अवकात,अश्करा (कीर्ती),अहाली-मवाली,आतषबाजी,आदाब,आदाब अर्ज,आदाबबंदगी,आफत,आस्मानी (दैवी आपत्ती),आब,आमदार,आबादानी,आबादी,आवई,आश्नाई(स्नेह),आशूक-माशूक, इज्जत,इज्जतदार,इतबार,इतमाम(लवाजमा,व्यवस्था),इत्तिहाद(सख्य),इन्कार,इन्किलाब,इन्सान, इंतजाम,इभ्रत,इलम,उजम(वैभव),एका,एकी,ऐपत,ऐषआराम,औकात,औरत,औलाद/ अवलाद,औराफ(लौकिक),कंगाल,कदमबोशी,कदर,कदरदानी,कदीम,कफारत(भांडण),कबिला,कबिलेदार, कमअस्सल(हीन कुळातला),कमइज्जत(अप्रतिष्ठा),कमजात(नीच),कमतरता/कमताई/ कमती,कर्कशा(भांडण),कर्जबाजारी,कलकल(वटवट),कसबचिठ्ठी(वेश्याव्यवसाय- परवाना),कसबी,कसरत,कस्तमशागत,कहर,काफला,कारखानदारी,कारागिर,किमया,किमयागार, किस्ती(होडी),किसान,कुदवा(आदर्श पुढारी),कुफराण(कुभांड),कुर्निसात/कुर्नीस,कुली (गुलाम,मजूर),कुस्ती,कुस्तीगीर,कुसूर(भांडण),खबरबात,खराबी(हलाखी),खलक(लोक),खवीस(भूत), ख्यालीखुशाली,खानदान,खानाजाद(दासीपुत्र),खुतखावणी(मालकीण),खिलतफाखरा,खुंम (कुळ,जात,लोक),खुमवार,खुशखबर,खुशाल,खुष्की(दुष्काळ),खून,खेलखाना(खानदान), खेशसोयरे(नातलग),खैर-आफीयत(खुशाली),खैर-खैरात,खैरीयत(खुशाली),गजलगोष्टी (गप्पागोष्टी),गपसप गप्प,गप्पा,गप्पाष्टक,गप्पागोष्टी,गमी(शोक),गरजू,गरमबाजारी(तेजी), गरमागरमी,गर्गशा(भांडण),गर्दी,गराडा,गरीब-गुरबा,गलबा(हल्ला),गलिच्छ(अ.गलीज), गहजब,गिराणी(महागाई),गुजर(निर्वाह),गुजराण,गुलगलबा(कडाक्याचे भांडण), गुलामगिरी,गुलामी,गुसल(आंघोळ),गैबी माणूस(तोतया),गैरअदबी,गैरअब्रू,गैरफायदा, गैरराबता(येण्याजाण्याची मनाई),गैरवाका(बनावट गोष्ट),गैरवाजवी,गैरराह/गैररीत/ गैरवळण(चुकीची पध्दत),गैरशिस्त,गैरसमजूत,गोडीगुलाबी,गोता(पेच),गोरगरीब,गोषा, घरंदाज,घोगा(ओरड),चमन(बाग),चिराखबत्ती,चीजवस्तू,छानछोकी(डामडौल),जडजवाहीर, जनानखाना,जनाना,जबरदस्ती,जबरी,जबाबदारी,जम(जुळवाजुळव),जमीनजुमला,जलूस (समारंभ,मिरवणूक),जशन(उत्सव),जाजती-जलाल(जूलूम),जादू(फा.जादू),जादुगिरी (मोहिनी,चेटूक),जाफत(मेजवानी),जरीपटका(म.पटका),जाहिरात,जिन,जिंद(पिशाच्च),जिमती (हमीदार),जिंमेदार,जोरी(जबरदस्ती),जोरू,जोहार,डफ(ब)घाई,डाक,डाकघर,डाव,डावफासा (म.फासा),डामडौल,डौल(ऐट),तंगी,तमीज(अदब),तरकी,तरीका,तलप(गंजीफाच्या खेळातील उपडपाती देणे),तलफ,तलाक,तलास,तवई(विनाश),तवाजा(बक्षीस),तस्फिया (समेट),ताइफा(जमाव),ताजीम खडी(उठून सलाम करणे),ताजीमतवाजू(आदरसत्कार), ताफा,तारबतार(उध्वस्त),तालीमबाजी,तालेवार(सुदैवी),तैवज(पानसुपारी,आतिथ्य),तोफा, तोफानायक,तोलदार,तोशिश(उपद्रव),तौर(रीत),थोरला महाल(म.थोरला.पहिली पत्नी), दखल(ढवळाढवळ),दगाबाजी,दंगल,दफन,दम(देणे इ.),दरम्यानकी(मध्यस्थी),दरम्यानदार (मध्यस्थ),दर्जा,दरुनी महाल(जनानखाना),दलाल/ली,दस्तगिरी(मदत),

दस्तदराजी(जुलूम),दस्तारबदल(पगडमाई),दस्तीबूज(गंजीफाच्या खेळातील शब्द),दस्तूर (वहिवाट),दाई,दाखला(प्रचीती),दाणादाण,दाणापाणी,दाब-आदाब(वंदन),दारनादार, दारमदार(भिस्त),दारूकाम,दावा,दास्तान(कथा),दिरंगाई,दुकान,दुकानदारी,दुनियादारी,दुरीदराज (परागंदा),दुश्मन,दुही(बेकी),नजराणा,नजरबंदी,नफेबाजी,नरद(सोंगटी),नवाजश,नवाब,नशा, नशियत,नाजरीबाजार(मिनाबाजार),नानकुराण(बेलभंडार),नानपरवेशी(संगोपन),नामदार,नामुस्की, नामोशी,नावाजणे,नाराह(बुध्दिबळातील राजाचा शह उठविणे),निकाह,निमकहरामी, निमकहलाली,निशापाणी,नोकरशाही,पडदा(गोषा),पडदेनशीन,पदर(फा.पिदर),पर्वरिश,परागंदा,परी, परेशानी,प्यादा(बुध्दिबळातील हलकी सोंगटी),पांढरपेशा,पायरव(दळणवळण),पायरवा (शिरस्ता),पारशी,पालखीनशीन,पिढीजाद(फा.जादह),पुस्त(पीडित),पेशा,पैदागिरी(उकळलेली रक्कम),पोशाखपट्टी(पोशाखासाठी द्यावयाचा कर),फकिरी,फजिती,फड(अ.फर्द)(कचेरी, आखाडा),फर्जंद(पुत्र,दासीपुत्र.),फर्माइश,फर्मानबाडी(वस्त्रांचा दरबार),फर्राशा (फरासखान्याचे सामान),फसाद(दंगा),बकाली(असंस्कृत),बजाजखाना(कापडबाजार), बदकौली(वचनभ्रंश),बदनक्ष(पाणउतारा),बदला,बदसल्लागार,बरकत,बरबादी,बर्दास्त/ बडदास्त(पाहुणचार,व्यवस्था),बराबरी/बरोबरी,बलवा (दंगा),बला,बलादुरी,बलामत(आळ), बहाणा,बाजार,बाजारी,बाजी,बाजू,बाडबिस्तरा,बातमी,बापजादा,बायक(गंजीफाच्या डावातील हुकूम),बिगारी,बिछाईत(मालमत्ता),बित्तंबातमी,बिदा/बिदाई,बिदागी,बिबी(कुलीन मुसलमान स्त्री),बिरादरी,बिलामत,बुजुर्ग,बुरखा,बुर्जी(राजाखेरीज इतर मोहरी मरणे), बेअदबी,बेअब्रू,बेआब,बेइज्जती,बेकार/री,बेकैदी(शिस्तीचा अभाव),बेगम(तु.बेगम),बेगमी (पुरवठा,वैपुल्य),बेगार/री(बेठीची पध्दत),बेपडदा,बेचिराख,बेबंदशाही,बेरंग,बेरोजगार, बेवारस,बेहबुदी(सुस्थिती),बेहाल(दुर्दशा),बेहुकमी(बंडखोरी),भाऊबंदकी(म.भाऊ),मगदूम,मदत, मयत,मर्यादा अदब(म.मर्यादा),मरातब/मरातीब,मवाशी(पुंड),मवेशी(गुरेढोरे),मश्वरा (सल्लामसलत),मसलत/मस्लतगार,महामुरी(समृध्दी),महिमान/मेहमान,माजी(भूतपूर्व), मातम,मातमपुरसी(सान्त्वन),मादी,मालक,मालिश,माहिती(परिचय,ज्ञान),माही(सन्मान-दर्शक चिन्ह),माशुक(प्रेयसी),मुकाबला,मुक्काम,मुजरा,मुजेरी(कुणबी,खेडूत),मुडदा(प्रेत), मुफसद(पुंड),मुबारकबादी(अभिनंदन),मुलाखत,मुलाणा(बलुतेदारांपैकी एक),मुल्लागिरी (मुलाण्याला मिळणारे वेतन),मुशाफरी,मुसलमान,मुसाफिर,मेजवानी,मेहमान,मेहमानगी/ मेहमानी,मैयत,मोगलाई मोतादी(दारिद्रय),मोर्चा,मोर्चेल,मोहतसीब(नियाडा करणारा धर्मशास्त्री),मोहरा(सोंगटी),यार/री,येबिन(नातू),रईस(श्रीमंत),रंगढंग,रंगबहार(मौज),रद्दी, रफीक,रफ्त(चाल,वहिवाट),रयत-रजावंदी(रयतेची खुशी),रयतानी,रवानगी(पाठवणूक), रसम(चाल),रस्मियात(वहिवाट),रहगुजरी(गैरवतनदार),रांगरंग(म.राग),राजीबिराजी(सुखदुःख), रिवाज,रिश्वत,रुसकत,रुतबा(दर्जा),रोजगुजारा,रोषणाई,रौनक(शोभा),लवंडा(मुलगा,गुलाम), लवंडी(दासी,रखेली,वेश्या),लवाजमा,लष्करभरती(म.भरती),लायकी,लुच्चेगिरी,वकालत/ वकिली,वजन(प्रतिष्ठा),वलद(पुत्र),वसाहत,वशिला,वस्ताद,वस्तादगिरी,वाली,वालीद(पिता,बाप), वाहवाह,विमा(फा.बीमा),शतरंज,शर्यत,शह(देणे),शहजादा/दी,शागिर्द,शागिर्दपेशा,

शादी,शान,शाबासकी,शाबुती(सुरक्षितपणा),शामियाना,शाही,शाहीर(अ.शाईर),शिकार,
शिफारस,शिरस्ता,शिस्त,शोहरत(प्रसिध्दी,लौकिक),सतकामतका(अमावस्येला नागाला
द्यावयाची वस्तू),सदरबाजार(छावणीतील बाजार),सफर,सफरी,सफाई,सरबराई,
सराफकट्टा/सराफा,सलामालकी,सल्ला,सानकरोटी(दूधभाताची,उदरनिर्वाहाची शपथ),
सलोखा,साफसुफी,सालस,सियारी(चेटकीण),सोडत(शर्यत),सोबत/ती,हंगामा(दंगा),हप्ता,
हल्कूम(कुस्तीचा डाव),हलाखी,हाल,हालहवाल,हवाला,हिस्सा,हुक्कातमाखू,हुकूमशाही,
हैदोस इ.

(१७) प्रपंचविषयक

अंगुस्तान,अत्तरदाणी,अफताबा(झारी),असबाब,आफ्करा(पेला),आबखुरा,आयना,आरास,
आलाबा,ऐनक,कचकल(मडक्याचा खालचा भाग),कंदिल,कबगीर/ल,कलई,कापूर,
किल्लेनुमा(होकायंत्र)किल्ली,कुती(पेटारा),कुमकुमा(काचेचा गोटा),फुलाबेदार(पकड),
कुरसी/खुर्ची,कुलूप,केरवा(चिनी मातीची भांडी),कैची,कैली(मापी),खरादणे(लाकूड
कातणे),खान/ना(ताट),खाना(कप्पा),खुजा(सुरई),गलोल(गोफण),गुबारा(फुगा),गुल
(ज्वालाग्राही पदार्थ),गुलकाडी(आगकाडी),गुलगेंद(पुष्पगुच्छ),गुलदान(काजळी काढण्याचे
पात्र),गुलदस्ता,गुलाबदाणी,चमचा,चरख,चरखा,चश्मा,चहादाणी,चाकू,चाबूक,चिराग,चिरागदान,
चिरागबत्ती,छबी(फा.शबीह्-चित्र),जंजीर,जर,जहर,जाजम,जाम(प्याला),जिनसाना,जिन्नस,
जिरे,जोडा,झगा,झाडू,डबा,डेग,डेरा,डोला(पोहर),तनुरात(तवा),तबक,तराजू,तवा(फा.ताबा),तसबीर,
तस्त,दप्तर,दाऊदखानी(गहू),दुर्बीण,देग,दुशोला(जोड मेणबत्ती),नईस(तिरडी),नस्तर
(लहान चाकू),न्याहरी(फा.नाहारी),पलंग,पलंगपोस,प्याला/पेला,पानदान(म.पान),पायपोस,
पासंग,पोतडी(फा.पोतह्),पोते(गोणे,फा.पोतह्),पिकदाणी(फा.दान्),फाणस(कंदील),बस्ता,
बरफदाणी,बालिस्त(कुशी)बोरिया(चटई,बैठक),मर्तबान(चिनी मातीची भांडी),मशक(पाणी
ठेवण्याची चामडी पिशवी),मशाल,मालमत्वेश,मालमसाला,मेज,मेण(फा.मोम्),मोम,मोमबत्ती
(म.बत्ती),मोहोर(शिक्का),रत्तल(अर्धा शेर),रस्सा,रस्सी,रिकाबी(बशी),रोगण(तेल),लेजीम,
लोह(दगडी पाटी),वजन,वर्तबान(बरणी),शस्त(अंगुस्तान),शामदान,शामियाना,शिशी
(बाटली),सतरंजी,संदूक,साबण,सामान,सामान-सुमान,सामान-सरंजाम(चीजवस्तू),
सुजना(सुवा,टोच्या),हमाम(उखळ),हमामदस्ता(खलबत्ता),हवाई(चंद्रज्योत),हिलाल
(टेंभा,मशाल),हुक्का इ.

(१८) खाद्यपदार्थ, पेये इत्यादी

अफू,कबाब,कव्हा(पेय),काबली,कुल्फी,कोफता,खमीर(आंबवण),खसखस,खसखसमांडा
(म.मांडा,अनारसा),खिमा,खिरापत,खुमारी,खुरचा(तुकडे),खुर्मा,खुराक,गर्दा(तंबाखूची,
भांगेची पूड),गुलकंद,गुलाबजांब-जामून(मिठाई),गुलाबशकर(गुलाबपाक),चपाती,चहा
(फा.चाय),चहापाणी(म.पाणी,अल्पोपहार),जर्दा,जाफरा/न(केशर),जिरे,तंबाखू,तंदुरी(रोटी

इ.),दर्याखोबरे,दाऊदखानी(गहू),दाणा(अन्न),दाणेदार,दारू,दारूचे फूल(निर्भेळ मद्य), नमक,नानकटाई,नोबत(उसाची गंडोरी),नाबदी साखर(खडीसाखर),नास्ता,पनीर,पुलाव/वा,फर्मास,बदामी हलवा,बर्फ,बर्फी,बर्फी-चुर्मा,बोजा(एक अमली पदार्थ),मालिदा,मसाला, माजूम(भांगेच्या वड्या),मालमसाला,मिश्री(साखर),मुगदमी(हलक्या प्रतीची साखर),मुरब्बा/मोरंबा,मैदा,मेवामिठाई,मेवेजात,रतीब/रातब(खुराक),रब्बा(अफूच्या पिशवीला चिकटलेला रस),रोगन(इराणातला चरबीसारखा पदार्थ),शराब,शहाजिरे,शकरपाळे(फा.शकर्पारा), शिरका(आसव),सजगुरा(धान्य),संजाबी(दरबारी विडा),सरबत,सिकंजी(थंड पेय),सिरका, हलवा.

### (१९) फळफळावळ

अंगूर,अंजीर,अनार,अलुबुखार,कबाबचिनी(एक फळ),कागदी(लिंबे इ.),खरबूज,खिसमिस, खिरा(काकडी),खुरमा(खारीक),गुलबदन(द्राक्षाची जात),गैरबर्दार(फळहीन,फळविरहित), जमरूद,जर्दाळू,टरबूज,तरकाकडी(म.काकडी,मोठी काकडी),तुरंज(नारंगी),तूत,नारिंग, नासपात/ती,पालज(फळवेलीची लागवड),पिस्ता,पोफळ(फा.पूफल्),बदाम,बेदाणा,मगज, मनुका,माजा(मायफळ),मेवा,रेशमी नरिंग,शकरनिंबू,शलगम,संत्रा,सप्तालू(फळ),सेब इ.

### (२०) सुगंधी द्रव्ये

अत्तर,अत्तर-गुलाब,अबीर,खस(वाळा),खुशबो(सुगंध,अत्तर),खुशबोई(सुगंधी वस्तू),जवादी (गंधमार्जारापासून मिळणारा सुगंधी पदार्थ),जाफरा/न(केशर),नखला(सुगंधी औषधी द्रव्य),बोय(सुगंध),मस्क/मश्क(कस्तुरी),मुश्कहीना इ.

### (२१) रंग

अबलक (चित्रविचित्र रंगाचा),अब्रश(ठिपक्याठिपक्यांचा),किर्मीजी,खाकी,गुलनारी (डाळिंबाच्या फुलाच्या रंगाचा),गुलाबी,जंबुदी/र्दी(पाचूच्या रंगाचे ),जर्द(सोनेरी),निमगोरा, प्याजी(कांद्याप्रमाणे गुलाबी रंगाचा),बदामी,रंग,रंगाई,रंगीत,रंगीन,रंगरोगण(तैलरंग), लाल,स्याली,सफेद,सब्ज(हिरवा),सुर्खी(तांबडया रंगाची),हुरमजी(कावेसारखा रंग) इ.

### (२२) वस्त्रविषयक / पोषाख इत्यादी

अतलस(रेशमी कापड),अस्तनी,अस्तर,इजार/विजार,उतार-पोषाख(म.उतार),एगान (एकेरी-जरतार),कनात,कफन,कफनी,कबाई(अंगरखा),कमरशाल,कलंदर(गर्भरेशमी कापड,तंबूचे आच्छादन),कलाबतू,कसा,कार्चोबी(वेलबुट्टीदार),काल्बूत(पगडी/कापड बेतण्यासाठी केलेली लाकडी आकृती),किनखाप(जरतारी,कापड),किनतान,किनार(लेस) ,कुडता/ती/ते,कुतनी कापड),गजया(खिसा),गजा-जें(आखूड पंचा),गर्दपोस(चादर),गलेफ, गालिचा,गाशा,गिर्दा/दी,गुलबदन(रेशमी कापड),गोरकपन,गोश-पेच(शिरोभूषण),चादर,

चारकुबा(किमती मुसलमानी पोशाक),चिक(बांबूचा पडदा),चीन (चूण),चुस्त(पायजामा इ.),जमखाना(जाजम),जरतारी(भरजरी),जर्दोजी,जर्बाब,जरीकाठी,जाजम,जामा(अंगरखा),जामानिमा(पोषाख),जेब(खिसा),झगा,झबले,झलदार झबा/ब्बा,झूल,तंग(चोळी इ.),तंबू,तमामी(जरतारी कापड),तशरीफ(बहुमानाचा पोशाख),तहदार(घडी न मोडलेले वस्त्र),तागा(कापडाचे ठाण),ताज,ताफ्ता(चमकणारे रेशमी वस्त्र),तिवाशी(तक्या),तुंबा(विजार),तोग(गळपट्टा),दरज/दरद(शिवणचीर),दशा(वस्त्राचे दोरे),दस्तरुमाल,दस्ताना(हातमोजा),दस्तार(पागोटे),दस्ती,दामकाठ(म.काठ-जरीची किनार),दाल(नक्षीदार विणलेला काठ),दावन,धडपा,धुमास(विशिष्ट प्रकारचे कापड),नखी(वस्त्राच्या कडेचा विनलेला भाग),नमदा(लोकरीचे कापड),नवार,नरमीना(रेशमी कापड),नक्षी,न्यहाल(गांदी),नाफा/नेफा,निमअस्तनी,निमा,पडदा,पन्हा(कापडाची रुंदी),पलंगपोस,पश्मी/ना(लोकरी वस्त्र),पायजमा,पारचा(रेशमी पोषाख),पिस्वाद(नर्तकीचा झगा),पैजार(मुसलमानी पध्दतीचे कापडा),बारदान,बिछायत,बिनजरी,बुटा,बुटी(नक्षी),बुट्टेदार,बुरखा,बोचके,बोरा/बोऱ्या(तरट),मखमल,मगजी(वस्त्राचा काठ),मलबूस(पेहेरलेला),मशरु(नमाज पढताना वापरायचे रेशमी वस्त्र)मसनद,मुकेस(भरजरी),मुलायम,मोजा,मोमजामा(मेणकापड),मोहमुदी(उंची सुती कापड),रजई,रफू,रुजामा(पातळ गादी),रुगरदा(कापसाने भरलेला तक्या),रुमाल,रेशीम,रेशीम-गाठ,रेशीमकंठी(रेशमाचा काठ असलेले वस्त्र),लक्तर,लत्ता,लिबास,लुंगी,विजार,शाल(फा.शाल),शालनामा(बेलबुट्टे असलेली शाल),शिरपाव,शिलेटोप(जिरेटोप),शेमला,शेरवानी,सकलाद,संजाब(वस्त्राचा रंगीत काठ),सदरा,सनीज(नवारीचा पट्टा),समला/सेमला,सलमा,सरपोस,सुरवार,हजबी(जनावराच्या पाठीवरून नेण्याची पिशवी),हशा,हशिया(कापडाची किनार),हातरुमाल(म.हात)इ.

(२३) अलंकार

कमरपट्टा,गहना,गोश्वारा(कुंडल),जगा(पागोट्यावर बांधण्याचा रत्नालंकार),जरकमर(सोन्याचा कंबरपट्टा),जरजरियान,जवाहीर,जेगा(पागोट्याला बांधावयाचा अलंकार),झुमका,तुरा(पागोट्याला लावायचा अलंकार),दागिना,दाल(चामड्याचा कमरपट्टा),दाली(तलवार अडकवण्याचा कमरपट्टा),नगीना,पर्गरी(कंठी),पहुंची (मनगटावरील अलंकार),पुंजी(घोड्याचा अलंकार),पेरोज(एक रत्न),पैलू,पैलूदार,बिलवर/बिलोरी,बुलाक(नाकातला अलंकार),मरमरी(आरसपानी),मरवारीद(मोती),मिना,मुरस्सा(रत्नजडित),मोहरा,याकूत(तांबडया रंगाचे रत्न),लाजवर्त(नीलमणी),लाल,शिरपेच,सरताज(मुकुटमणी),सरोसर(शिरोभूषण),सल(कंबरपट्टा),सुलाख(धातूची शुध्दता पाहण्यासाठी पाडलेले भोक),हमचौरस(बिल्वर इ.),हयकोल(स्त्रियांचा दागिना),हुरमजी इ.

(२४) व्यवसायविषयक

अत्तार/री/आतार,अरकशी(करवत्या),अरेकस(करवत्या),अव्वलकारकून,इजारदार

(मक्तेदार),इतमाम्या(व्यवस्थापक),इनामदार,कमानगार(हाडवैद्य),कर्णेकरी,कल्हईगार,कलाल,
कवाल,करबीणकसाब,कापडणीस,कारकुनी,कारखानदार,कारखानीस,कारागीर,काशीद,कुली
(गुलाम,मजूर),कोतवाल,खजानची,खजिनदार,खलाशी,खरादी(लाकडाचे कातीव काम
करणारा),खाजगीवाले,खानगीस(कारभारी),खानसामा,खारवा(कोळी),खिदमतगार,खौस-
खिदमतगार,गस्तगीर,गिर्दावार,गुमास्ता,चाकरपेशा,चाकरमाने,चाबुकस्वार,चोपदार,चौकीदार,
चौरीबर्दार,जकातदार,जप्तीदार,जमनीस,जमातदार,जमादार,जमीनदार,जमीनवीस,जर्गार
(सोनार),जरीबदार(जमीन मोजणारा),जल्लाद(फाशी देणारा),जव्हेरी/जोहरी,
जहागिरदार,जादुगार,जिलीबदार,जुलमदार,(ताबुताबरोबर तलवार,भाले नेणारे),जुलाहा,
जोहरी(रत्नपरीक्षक),डबीर(लेखक),तजकरनीस(सनदलेखक),तपासनीस तबलजी,तबाख
(अन्न विकणारा),तबीब (वैद्य),तबीलदार (लष्करातील लाकुडतोड्या),तबेलदार
(कुऱ्हाडवाला),तंबूरची,तरफदार(वसुली अधिकारी),तर्जुमान(दुभाषी,अनुवादक),तर्तूदकार,
तहसीलदार,ताकीददार(संरक्षक),तालुकदार,तासची,ताशेकरी,तुमारनवीस(जमाखर्च
लिहिणारा),तरेवाला,तैनातदार,तोफची,दप्तरदार,दप्तरी,दफेकरी(घोडदळातील कनिष्ठ
अधिकारी,पट्टेवाला),दबीर (राजचिटणीस),दर्जी,दराब(नाणे पाडणारा),दर्यावर्दी,
दर्वाजकरी(द्वारपाल),दर्वान,दर्वानकरी,दरोगा(कोतवाल),दलाल/ली,दवादगी(जासूद,
हर्कारा),दस्तानदार(कोठारी),दस्तारबंद(पगडीवाला),दस्तेकरी(विड्याची पाने सांभाळणारा
नोकर),दिदवान(पहारेकरी),दियाणजी(प्रधान),नकलनवीस,नकल्या,नकारसगार(नक्षीकाम
करणारा),नकीब(राजबिरुदे ललकारणारा भाट),नगारची/जी,नजुमी(ज्योतिषी),नवीसंदा
(लेखक,कारकून),नशेकची(व्यवस्थापक),न्यारगीर(शुध्द धातू काढणारा),नाखवा,नाखुदा
(तांडेल),नाजीर/नाझर(न्यायाधीशाचा चिटणीस),नालबंद,निकीबदार,निरखी(किंमत
ठरवणारा अधिकारी),निशाणदार(निशाण धरणारा),नोकर,नोबती(माहूत),पहिलवान,
प्यादा,पाईक,पागनीस,पागेदार,पाग्या,पायेदामी(पारधी),पारसनीस,पारादोज(चांभार),पासबान,
पेशकार(मदतनीस)पोतदार,पोतनीस,फडणवीस,फत्तेनगारची(विजयदुंदुभी वाजवणारा),
फराश,फौजदार,बकाल(उदमी),बजाज(कापडाचा व्यापारी),बद्रका(सशस्त्र संरक्षक),
,बंदुकी,बंदुकीपेदा,बबर्जी/बावर्ची(आचारी,खानसामा),बर्कंदाज(बंदुकधारी शिपाई),बागवान,
बाजारबुणगे(गैरलढाउ लोक),बाजिंदा(खेळाडू),बाजीगर,बारदार(बंदुकधारी शिपाई),
बारनीस,बिछायती(गैरदुकानदार),बिनीवाला(म.वाला),भालदार(भाला धारण करणारा
शिपाई),भिस्ती(पखाली),मक्तेदारी,मजमूदार/मुजुमदार(वसुली कारकून),मजूर,मनसबदार,
मर्फाची/मर्फेकरी(मर्फा वाद्य वाजविणारा),मलिकनवीस(राजचिटणीस),मावाजनेनवीस
(ताडून पाहून नक्कल करणारा),मशालची/मशालजी,महालेकरी/महालदार,महाली,
मामलेदार,मालगुजार,मालिम(शिक्षक),मिर्धा(नाईक),मिरासदार,मिस्त्री,मुकदम/मुकादम,
मुडदेफरास,मुतालिक(कारभारी),मुदबखा(आचारी),मुन्सफ(न्यायाधीश),मुन्शी(फार्सी
पत्रव्यवहार करणारा),मुनीम,मुश्रीफ(तपासनीस),मेणेकरी(मेणा वाहून नेणारा),मेवेफरोश
(फळविक्या),मेलकार(शस्त्रविद्या-शिक्षक),मोकाशी (मोकासा वसूल करणारा अधिकारी)

,मोतदार(साईस),मोदी(वाणी),मोर्तब बारदार(सरकारी शिक्के सांभाळणारा),मोसबेकरी (म.करी.हिशेब-तपासनीस),मोहतर्फी,रंगरेज,रंगारी,रफूकरी,रफूगार,राहदार(नाकेवाला), रिसालदार,वकील,वतनदार,वाकेनीस(अखबारनवीस),शागिर्दपेशा(नोकरचाकर),शाहीरकी/गीर(शाहिराचा पेशा),शिकलगार,शिकरी,शिक्केनीस(मुद्राधिकारी),शिपाई,शिरस्तेदार, शिरीनगार(हलवाई),शिलेदार,शुतुरवान(उंट हाकणारा),सईस/साईस(गाडीच्या घोड्यापुढे धावणारा शिपाई),सकेवरी(भिस्ती),संगतरास(पाथरवट),सजावल(ढालाईत), सदरबारगीर(न्यायालयातील पहारेकरी),सफाईगार/सफाई कामगार,सबजी-फरोष (भाजीविक्या),सबनीस,सरकतदार,सरकती,सरकानुगो,सरकारकुनी,सरखवास(मुख्य नोकर),सरखेल(स्वार पथकावरील अधिकारी),सरनोबत,सरपोतदार,सराफ,सर्बारी (हमाल),सलत्तनगर(चांभार),साकी(दारूचा प्याला भरून देणारा),साजिंदा,सारंगा, सारवान,सालदार,सुकाणूगीर,सुरनीस,सौदागर,हकीम,हजरनवीस,हजाम,हजारी,हमाल, हरकसबी,हर्कारा,हलकारा(जासूद),हलवाई,हशम,हशमनीस,हाकिम,हवालदार,हिलाल,हुजऱ्या, हुजुरबाजार इ.

## (२५) बिरुदे / पदव्या इ.

अक्लाब/अल्काब(मायना,पदव्यांची मालिका),अजाहत,अमानतपन्हा(श्रेष्ठतादर्शक पदवी), अमीरुल उमराव,आलमगीर,आलमपन्हा,आलिजा,आलिजाबहादुर(शिंदे),इज्जतपन्हा(श्रेष्ठ नामदार),किताब(पदवी),खलद अयाम दौलतहू(त्याच्या राज्याचा काळ चिरायू असो), खसुसीयत दस्तगाह,खासखेल(सेनापती),खुजस्ते बुनियाद(औरंगाबाद शहराची पदवी),गरीबनवाज,गरीबपरवर,घजनफरजंग(रणसिंह),जिले सुभानी(ईश्वराची छाया, पादशहाची पदवी),दर्यासागर,दर्यासारंग,दाम इकबालहू,दाम एखलासहू,दाम दौलतहू, दाम मुलूकहू,नेकनामदार,फत्तेलष्कर,फतेजंगबाहूर,बुलंदअल्काब,मदारुलमहा(कारभारी), ममलकतमदार(राज्याचा आधार),रफीअल्कदार(पदवी),रुस्तुमराव,रौनक अफजा, वालाकदर(उच्च पदवी),वालाजाह,शहाजंग(युध्दसम्राट)इ.

## (२६) कृषिजीवन

अवजार/औजार,किर्दसार(लागवडीची जमीन),किश्त/किश्तगारी(शेतीची कामे),कीर्दवा (शेतीचे उत्पन्न),कैल(धान्याचे माप),खरीप,खाब्रान(वाफा),गल्ला,दरसवाद(शिवारात), दाईमकुळ(कायमचे कूळ),नजूल(सरकारी गावठाणाची जमीन),पैदास,पैदास्ती(कृषि उत्पन्न),फसल(पीक),फसलखरीप,फसली(मोसमी),बागाईत,बिरजुमाल(समायकीतील शेत),मजरा(शेतकऱ्यांची वसाहत वाडी),मशागत,मुजारियान(शेतकरी,खेडूत),मुजेरी (शेतकरी,कुणबी),रब्बी(वासंतिक पीक),रयतभाग(कुळाचा वाटा),वसला(मोजणीसाठी पाडलेला जमिनीचा तुकडा),शब्ना(गुराचा हिरवा चारा),शिकमीदार(पोटहिस्सेदार), सकत जमीन(टणक जमीन),सबजाजर(गायरान),सरकतदार(भागीदारी),

सालकरी(म करी) इ.

## (२७) अवजारे

अरकस,अवजार,आरी,करवत,तबल(कुऱ्हाड),दावली(खुरपे),बर्मदान,बर्मा(गिरमिट),बागदार (विळी),रंधा,रंधागोल(म.गोल),रंधापट्टी(गिलावा साफ करण्याची पट्टी),रुमाली गज (कापड मोजण्याचा चौदा तसूंचा गज),रेशमाची आरी(रेशीम भरण्याचे चांभाराचे उपकरण),संदान/संदाणी(लोहाराची लहान ऐरण) इ.

## (२८) वनस्पतिविषयक

अंजीर,अनार,गुलअत्तर,गुलछब्बू(निशिगंध),गुलछडी(एक फूल),गुलजार(पुष्पवाटिका), गुलतुरा ,गुलबसे,गुलमखमल(झेंडू),गुलमेंधी(मेहंदी),गुलमोहर(झाड),तूत,नौशाकर (ऊस),पुदीना,बगीचा,बहार,बाग,बागबगीचा,बाबुना(औषधी वनस्पती),मलूल(निस्तेज), रेवस(एक वृक्ष),शगूफ(कळी,फूल),संदल(चंदन),सफेत मुसळी,सबजा,सबजी,सबर (कोरफडीची जात),सरु/सुरू,हजारी पान,हजारी माड,हजारी मोगरा इ.

## (२९) पशु,पक्षी,प्राणिविषयक

अकला,अनीन,अस्तबाल,अस्प,आयाळ,इराणी(घोडा,गाढव),इलाकी/खी(घोडा),उपलानी (साज न घातलेला घोडा),एक्का(एका बैलाची/घोड्याची गाडी),कजावा(उंटाचे खोगीर) ,कातार(उंटांची रांग),कबूतर,कारवान,किलावा(हत्तीचा गळपट्टा),कुमाइत(तांबूस रंगाचा घोडा),कोरडा(आसूड),खरमस्त(तापट घोडा),खरमस्ती(घोड्याची रग),खर्गोस(ससा), खवशी/सा(हौद्यातील मानकऱ्याची जागा),खशी(खच्ची),खार(सर्प),खुबी(गोगलगाय), खुराक,खोगीर,गामचाल(घोड्याची डौलदार चाल),गाशा,गुरजी(कुत्र्याची जात), गुलचिमणी(पिवळ्या पोटाची चिमणी),चरिंदा(चराई),चाबूक,जनावर,जाफराबादी(म्हैस), जिनखोगीर,जिनगर(खोगीर,लगाम),जिनसामान,जुरा(ससाणा),जेरबंद,झूल,तंग(खोगीर आवळण्याचा पट्टा),तंगतोबरा(घोड्याला लागणाऱ्या आवश्यक जिनसा),तस्मागर्दन(मान फिरवणारा घोडा),ताऊस(मोर),ताजाद (घोड्याच्या तोंडात घालण्याची चामड्याची वादी),ताजी(अरबी घोडा),ताबक(घोड्याच्या पायाचा रोग),तोबरा,दुम,दुमनी(जनावराची मागची तंगडी),नफ्फर(उंट),नमदा(खोगिरावरील गादी),नाल,पर,परिंद/दा,पालान (खोगीर),पायबंद,पील(हत्ती),पीलबाला(घोडा इ.),पुंजी(घोड्याचा अलंकार),पुश्तंक (जिनाचा पट्टा),पेशबंद(खोगिररास बांधावयाचा पट्टा),बदक,बाज(बहिरा ससाणा), बालातंगी(खोगीर कसण्याचा पट्टा),बोर[काळसर तांबूस रंगाचा (घोडा)],भारकस (जनावराच्या पोटाखालून बांधलेला पट्टा),मदार,मवेशी(गुरेढोरे),मादवान(घोडी), मादवान पागा,मुर्गी,याबू(ठेंगण्या घोड्याची एक जात),रहवर(वेगवान घोडा),रिकाबदाल (रिकिबीच्या जागी भोवरा असणारा घोडा),रिकीब,रेशीम किडा,लका/क्का(कबुतराची एक

जात),लगाम,शहामृग,शाहगोश(रानमांजर),शिकार(सराणा),शुतर,सनीन(घोड्याच्या डोक्यावरील तुरा),सर्जा,हुम्मा(काल्पनिक पक्षी),हुसैनी(समुद्रातील काळा मासा),हैवान, हौदा इ.

(३०) वाहनविषयक

गलबत,गुराबा(तारू,लढाऊ गलबत),गोदी,जंगी जहाज,जहाज,जिन्नसी गलबत(मालवाहू जहाज),दमन(गाडीचा टप),दमणी(लहान बैलगाडी),पालखी,बारकस/भारकस (मालवाहतुकीचे जहाज),भारबर्दारी(वाहतुकीची साधने),मसलंद(अंबारीचा मध्यभाग), महापा(स्त्रियांसाठी मेणा),म्याना(मेणा,पालखी),मालजहाज(मालवाहू जहाज),मालमोटार (इं.मोटार),लंगर,सुकाणू(गलबत वळविण्याचे साधन)इ.

(३१) संगीत

अमेज(मिश्र सूर),कलगीतुरा,कवाली,ख्याल(एक प्रकारचे गीत),ख्यालतमाशा(गाणे-नाचणे),खंजिरी,गजल,चंग(तंतुवाद्य),चीज,जलसा,डफगाणे(म.गाणे),तबलजी,तंबोरा/री,तमाशा,तंबूरची,तंबुरापेटी,तराणा,ताऊस(तंतुवाद्य),ताशा,तासा(वाजविण्याचा पेला) ,तुणतुणे,दरबारी कानडा,दर्दी,दौलतजादा,बिराणा(तबल्याच्या शाईवर पडणारी चीर), बुलंद,बेसूर,बैत(दोन सयमक ओळी),मर्शा(अ.मार्सिया उ शोकगीत),मिजरणी(नखी), मुजरा,मुकाबला,रियाज,शाई(तबला,मृदंग इ. ला लावण्याची),शाहिरी,समा(तंद्री), साजिंदा,साजिंदी,हलक(गवयाचा गळा),हुसेनी कानडा(म.कानडा,एक राग)इ.

(३२) वाद्यविषयक

अलगूज,कमांच(तंतुवाद्य),कर्णा,झांज,डफ,डफखेळ्या(मोठी टिमकी),ढोल,तबलक(लहान ढोल),तबला,तंबोरा/री,दमामा(नगारा),दायरा(टिमकी),नगारा,नफेरी(तुतारीसारखे वाद्य),नौबत(मोठा नगारा),मर्फा(नगारा),मशक(एक वाद्य),मुनादी(दवंडी),रबाब(तंतुवाद्ये), शहाजने,सतार,सनई,सरोद/दा,साहेबनौबत,सैदोन(नगारा)इ.

(३३) मनुष्यस्वभाव

अकदस,अकरम(दयाळू),अकसखोर,अक्कल,अक्कलमंद,अक्कलवंत,अक्कलहुशारी,अजिजी, अजीज,अजुर्दगी(रुसवा),अजुर्दा(दुःखी),अजुर्दपणा,अंगेज(धाडस),अदब,अदबशीर,अदल (न्याय),अदा,अदावत,अनात(मेहरबानी),अफलातून,अफसोस,अफिम्या,अमासुस्त(आळशी) ,अमिराई(श्रीमंती),अमिरी,अयब/ऐब,अयाश/ऐश,अरकाट(भांडखोर),अलगर्जी,अलुलकी, अश्रफ(अभिजात),अश्राप,आकरा,आर्जव,आरजू,आवारा,आशक,आशकी,आरजूमंद,आहमक, इतबार,इतराजी,इत्तिफाक,इत्येहाद(मैत्री),इब्लिस,इमान,इमानी,इरसाल,इरादा,इल्जाम, इश्क,इश्कबाज/जी,इस्तियाक(प्रेम,लोभ),उमदगी,उमदा,उमेद,एकदिली(सख्य),

एकरंग(सख्य),एकी,एहसान,ऐब,कचदिल,कज्जेखोर,कज्जेदलाल,कजाग,कमहिम्मत (भ्याड),कयास,करामती,करारी,कलंदर,कलमकसाई,कलमशाई,कलमबहादर,कवीदिल, कसबी,कसूर,कसोशी,काबल/काबिल,काबूकी(धूर्त),काबूकार(हिकमती),कायम जुबान (एकवचनी),कारंदाज,कारस्तानी(कार्यकौशल्य),काहिल(अपमानित),काहिली,काहूर,किमयागार, किलाफ(संशय,वैर),कुन्हा(मत्सर),कुफार(बदमाश),कुभे(दुर्गुण),कुर्रेबाज,कुवत,कैफ,कैफी, कोता,खोर(मत्सर),खजिल,खंदा,खप्पा/खफा,खप्पामर्जी,खपीप,खवीस(भूत),ख्याली(रंगेल) ख्यालीखुशाली(नाचगाण्यात रंगणारा),खाईश/खाहीश(इच्छा),खाका(बाणा),खाक्या, खातर/खातरी,खातरजमा,खुनशी,खुन्नस,खुनी,खुबी,खुशमस्करी,खुशमस्कऱ्या,खुशामत, खुशालचंद,खैरख्वाह,गइबती/गइबी(अजागळ),गंज/जी,गंजिफा,गदर(बंड),गदा(भिकारी), गंदकी(घाण),गफिष्ट,गरजवंत,गरजू,गर्क(तल्लीन),गरीबनवाज,गरीबपरवर,गरूर,गिरफ्तारी (काळजी),गुम/गुंगणे/गुंगारणे,गुंगी,गुबारा(संशय),गुमान(संशय),गुर्बत(नम्रता),गुर्मी,गुलजार (टवटवीत)गुलहौशी(विलासी),गुस्सा/घुसा,गैरइतबार,गैरइमानी,गैरकब्जी(परस्वाधीन), गैरत(लज्जा),गैरमर्जी,गैरमेहरबानी(अपकृपा),गैररहा(बदचाल),ग्लानीगिरफदारी,चलाखी, चुगलखोर,धुगली,छबीना,जंगली,जबर/रा(वरचढ),जबाबी/हजरजबाबी,जबेरताश (हजरजबाबी),जरबवान,जहरी,जहादील,जहाबाज,जहाँमर्द,जानी(जिवलग),जालीम,जाहालियत (मूर्खपणा),जिकीरखोर,जिद्द/दी,जुंभस,जुर्रत(धैर्य),जुलमी,जुवामर्द(शूर),जोरावरी(जूलूम), झोक,झोकदार,तक्रारखोर,तजुर्बेकार(अनुभवी),तबियती,तमा,तमाशबिनी(मौज पाहण्याची तटस्थ वृत्ती),तरकीब(चतुराई),तरबेज,तरफदारी,तरस(भय),तऱ्हेवाईक,तलख/तल्लख, तलफ,तलफी(व्यसनी),तलवृतमिजाजी(लहरीपणा),तवका(आशा),तवज्जे(लक्ष),तवर(आवेश),तसल्ली (समाधान),तुंद(अभिमानी),तुफानखोर/तुफानी,तैश(आवेश),तोलदार,तोश,तोहमत, दगाबाज,दंग,दर्दी,दहशत/धास्ती,दाणा(चाणाक्ष,जाणता),दानत,दानतदार/री,दानाई (शहाणपण),दारुड्या,दिगरजाण(जीवश्चकंठश्च),दिमाख,दिलआरामी(खुशाली),दिलखुलासा (मनमोकळेपणा),दिलखुशी(संतोष),दिलगर्मी(प्रेम),दिलगिरी(दुःख),दिलजमाई(खातरजमा), दिलजोई(सांत्वन),दिलदर्या(दानशूर),दिलदार,दिलपाक(शुध्द अंतःकरणाचा),दिलबर (मनोहर),दिलावर(शूर),दिलसफाई,दिलसा,दिलेर/री,दुदिला,दुरंदेशी(दूरदृष्टी),दुयागीर, दुश्मनी,दोस्त,दोस्ती,दोगला,ध्यानती,नकल्या,नखरा,नखरेबाज,नरमाई,नवाज(कनवाळू), नशाखोर,नाउमेद,नाकुवत,नाखुश,नाजूक,नातवान,नादान/नी,नादार,नामर्द,नामी, नामोहरम,(पराभूत,निराश),नाराज,नालायक,निमकहराम,निमकहलाल,नियत,निशाबाज,नेक (प्रामाणिक),नेकजात,नेकदार(प्रामाणिक),नेकनजर(कृपादृष्टी),नेकनाम(ख्यातनाम),नेकी, नोक/नोकझोक,पर्वा,परेशान/नी,पशेमान(पस्तावलेला,),पोख्त(प्रौढ),पोशाखी(दिखाऊ), फजील,फजीतखोर,फंदी,फरामोशी(विस्मृत),फरेब(लबाडी),फाजल(विद्वान),फाजिल(चावट),फाम (स्थिरचित्त),फिकीर,फित्रत,फिदा,बदख्याली,बदनजर,बदनामी,बदनियती,बदफैली,बदमस्त (धुंद),बदमाश,बहादुर/री,बाजारबसवी(म.बसवी),बारकाई,बावकूफ(शहाणा),बावखैराती (भटक्या),बिचारा,बिनधोरी(म.घोर),बिलंदर,बिशाद,बेइमान,बेखबर,बेफिकीर,बेफिकीरी बेबंद,

बेमुर्वत,बेशरम,बेवकूफ,बेहोष,मकरी(कुटीलपणा),मकसूद(हेतू),मक्मूर(धुंद),मखलाशी,मगरूर,
मजबूर,मजाक,मजाल(सामर्थ्य ,बिशाद),मतलबी,मनसबा/मनसुबा,ममनुनी(आजिजी)मर्जी,
मर्द/मर्दानगी, मशगुल,मस्करी,मस्कऱ्या(विदूषक),मस्त,मस्तवाल,मस्ती,मातबर,मासूम
(निरागस),मासलेदार/मासलेवाईक,माहीतगार,मिजाज,मिजास,मिन्नत/मिन्नतवारी,
मिस्किल,मुत्सदी,मुत्सद्देगिरी,मुरब्बी,मुर्वत/मुरवती,मुराद,मुलाहिजा,मेहनती,मेहरबान/नी,
मेहेरनजर,मोताद(लाचार),मोमदिल,मोहब्बत,मौज/जी,येखलास(मनाची शुध्दता),
येहसानमंदी(कृतज्ञता),रजावंदी(मान्यता),रंजीस,रया(भीड),राजी,राजीखुशी,रास्तगो(खरे
बोलणारा),रुबाब,रुस्तमी(शौर्य),रोब(दरारा),लाचार/री,लायक,लुच्चालुतरा,लिहाज,
वफादार,वसवसा(दरारा),वाकबगार,वाह्यात,शक्कल,शकी(संशयी),शरम,शरमिंदा,शहामत(धैर्य),
शान,शिताफी(चपळाई),शिरजोर,शेखी,शौकीन,सक्तगो(कडक बोलणारा),सखी(उदार),
सफाई(समर्थन),सबुरी,साधा(सरळवृत्तीचा),साफदिल,सुस्त,हजरजबाबी,हया(लज्जा),हरहुन्नरी,
हरामखोर,हरामखोरी,हलगर्जी,हलालखोर,हवस,हव्यास,हवालदिल,हिकमती,हिम्मतवान,हिरस,
हिशेबी,हुज्जतखोर,हुशार,हैराण इ.

## (३४) शरीर/शारीरिक/स्वास्थ्यविषयक

अकद,अक्कलदाढ(म.दाढ),आजार,आराम,आवाज,इजा,इलाज,उमर,उस्तवारी,कद
(अंगकाठी,उंची),कदम,कब्ज(मलावरोध),कमकुवत,कमजोर,कंबर,कहिर(थकलेला),खामन
(बुटका),खुबसूरत,खुराक,गर्दन,गर्मी(उपदंश),गलोल(लोंबणारा अवयव),गुना(चेहरा),
गुरदा(मुत्रपिंड),गुलबदन,गैरआरामी(बेचैनी),गोष/गोस्त(मांस),चरबी,चुंगल(पंजा),चेहरा,
चेहरामोहरा,चेहरेपट्टी,जखम/मी,जबान,जवान,जवानी,जान,जानजवान,जिनगानी,
जिंदगी/जिंदगानी,जुलाब,जुलूप(केसांची बट),जैफ,जईफ(वृध्द),जोर,जोश,तकलीफ,
तकवा,तजेला,तन,तंदुरुस्ती,तब्येत,तबियतमान्दगी(आजार),तबीब,तवाना/ताजातवाना,
तोशीस(त्रास),तसदी,तसू(दोन बोटांची लांबी),तहदम(बेदम),तहहयात,ताकत,ताजगी,
ताजुब,तारीफ,तालेवार(सुदैवी),ताव(राग),दम,दर्द,दराज(धिप्पाड),दवा,दवाखाना,दास्त(शुश्रुषा),
दिल,दीक(बेजार,आजारी),दीदार(चेहरा),नजर,नजरानजर,नजला(सर्दी),नजाकत,नाबालिक(वयात
न आलेला),नासूर(भरून न येणारी जखम),निगा,निगादास्त(शुश्रुषा),नूर(कांती),नौजवान,
पंजा,पिशाब(लघवी),बगल,बदसूरत,बारीक,बिमार/री,बुजुर्ग,बेआराम/मी,बेचैनी,बेजान
(निर्जीव),बेजार,बेहोशी,मय्यत,मलम,मलूल(निस्तेज),मांदा(थकलेला),मुर्दा/मुडदा,मेदगी
(थकवा),मौत,रग(मस्ती),रोदा(आतड्याची तात),लकब,लंगडा,लंड,लब(ओठ),लास/श
(प्रेत),वकूब,वजूद(अस्तित्व),वझ,वफात(मृत्यू),वाका(मृत्यू),शकल(चेहरा),शहारा(रोम),शिकम
(पोट),शिना(छाती),सरेमो(बालाग्र),सुरत,सुरतसांभाळ(समजू लागणे),हलक(कंठ),
हल्लक,हालत,हिम्मत,हुस्न,होश इ.

**समारोप**

फार्सी-मराठीच्या घनिष्ट अनुबंधाचे सकृत्दर्शनी व सत्वर जाणवणारे बाह्य रूप म्हणजे शब्दसंग्रह. बहमनीकालापासून मराठी शब्दसंग्रहाच्या बाह्य रूपातील हे परिवर्तन जाणवू लागले व उत्तरोत्तर शिवकाल-पेशवेकाल यांत हा प्रभाव वाढू लागला. राज्यव्यवहार-कोशामुळे तो काहीसां सीमित झाला पण पेशवेकाल, ब्रिटिश अमदानी, स्वातंत्र्योत्तर, काल या सर्व कांळात तो प्रथम बराच वाढला व नंतर स्थिर झाला. या अ.तु.फा. शब्दांनी मराठी शब्दसंग्रह समृध्द झाला व तो अनेक अंगांनी बहरला. मऱ्हाटी जीवनाची अनेक अंगे त्याने उजळून निघाली.(या प्रकरणात या अ.तु.फा.शब्दसंग्रहाची विभागणी जवळयास ३४ विभागात केली आहे.)भाषाविज्ञानाच्या दृष्टीने ही समृध्दीची वाटचाल होती, भाषाशुध्दीसारख्या काही चळवळींनी त्यावर सावट आले नाही कारण मराठी मातीत ही बीजे रुजली, अंकुरली आणि वाढली होती. ती एका अर्थाने आता 'मऱ्हाटमोळी'च झाली होती. आर्यभाषेच्या दोन वेगळ्या प्रदेशांतील शाखांचे हे पुनर्मीलन काहीसे आगळेवेगळेच नव्हते का? हआजही हे शब्द परके वाटत नाहीत. ते काढून टाकावेसे वाटत नाहीत, उलट अदा, अदाकरी, लज्जत, फर्माइश, आलिशान, रियाज, लाजवाब, शाही, रुबाब, इतमाम, लवाजमा, दिमाख, दिमाखदार, नजाकत, शानदार हे अ.फा.शब्द महाराष्ट्रात अत्यंत आत्मीयतेने वापरले जातात.फार्सी - मराठीचे हे रेशीमबंध किती अलगदपणे, हळुवारपणे विणले जात होते, याचेच ते निदर्शक होय.

------------------------

**संदर्भ-टीपा**

१) ऐप्र.पृ.३९६-३९७
२) कित्ता पृ. ४००
३) ठळक टाइप माझा.
४) मराठी शब्द- समीक्षा.पृ.४७-४८
५) फामको.प्र.पृ.४-५
६) ठळक टाइप माझा.
७) फामको . प्र.पृ. ६-७
८) मबफास्व.पृ.२३९-४०, मराठी शब्दसंग्रहमीमांसा(टंकलिखित प्रत).पृ. २८९
९) मशमी.पृ.४८
१०) समग्र सावरकर वाङ्मय,खंड ३.पृ.२५४-२६१
११) मच्युको.पृ.८५,१०३-४
१२) कित्ता.पृ. ९४
१३) कित्ता.पृ. १०३
१४) ठळक टाइप माझा.

१५) खरे तर 'साक्ष गेली व गोही (फा. गवाही)आली.
अधिकाऱ्यांचे मोकदम झाले असे येथे हवे.

१६) ठळक टाइप माझा.

१७) मशस पृ.४९

---

## प्रकरण सातवे
# वा क्प्र चा र

मराठीच्या भाषावैज्ञानिक अध्ययन -संशोधनात वाक्प्रकारांचा व्हावा तितका विचार झाला नाही.डॉ. शं.गो. तुळपुळे[1] यांनी ' प्राचीन मराठी वाक्प्रचार- वैभव ' या संशोधनपर लेखातून या अध्ययन क्षेत्राकडे लक्ष वेधले तथापि त्यांचा विचार यादवकालीन मराठी वाक्प्रचारांपुरता मर्यादित होता व त्यात फार्सीद्वारा मराठीत आलेल्या वाक्प्रचारांचा विचार केलेला नव्हता.(असे होणे अपरिहार्य होते कारण यादव- मराठीला फार्सीचा फारसा स्पर्श झालेला नव्हता.) खरे तर हे अध्ययनक्षेत्र फार व्यापक होते.त्याचे स्वरूप द्विविध होते:

१-अरबी -तुर्की- फार्सी शब्दांना मराठी क्रियापदे लागून त्यांतून जे वाक्प्रचार सिध्द झाले,त्यांची संख्या शेकड्यांच्याच नव्हे तर हजारांच्या घरात जाणारी होती.

२-काही वाक्प्रचार अनुवादाच्या स्वरूपाचे होते.त्यांचे स्वरूपही दोन प्रकारचे होते:

(अ) मूळ फार्सी वाक्प्रचारातील मूळ शब्द व कल्पना कायम ठेवून त्याच्या क्रियापदाचा मराठीत अनुवाद करून सिध्द झालेले वाक्प्रचार. उदा:- दम खुर्दन् = दम खाणे

(आ) मूळ फार्सी वाक्प्रचाराचा पूर्णपणे केलेला मराठी अनुवाद . क़सम् खुर्दन्= शपथ खाणे.

मराठीतील फार्सी वाक्प्रचारांचा इति. राजवाडे यांच्या ' मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनां'च्या आठव्या खंडाच्या प्रस्तावनेतील विचार या अध्ययनक्षेत्राच्या भावी संशोधनास चालना देणारा व प्रेरक होता पण त्याची कुणी फारशी देखल घेतली नाही. अरबी - फार्सीच्या व्यासंगाचा अभाव हेही त्याचे एक कारण असू शकेल.

इति. राजवाडे[१] यांचे मूळातले प्रतिपादन असे आहे-

' फारशी बोलणाऱ्या मुसुलमानांचे राज्य महाराष्ट्रावर ३५० वर्षे होते त्या अर्थी मराठींत फारशी शब्द यावे ही सामान्य गोष्ट आहे. फारशीच्या व मराठीच्या सान्निध्यांत विशेष जो आहे तो निराळाच आहे.तो विशेष हा .मराठीत बरेच विशिष्ट प्रयोग फारशीवरून आलेले आहेत.शपथ खाणें असा एक प्रयोग मराठीत करतात . शपथं गृह असा प्रयोग संस्कृतांत आहे. शफथ घेणें असा मूळचा प्रयोग पूर्वी होता व सध्यां चालू आहे परंतु खाणें ह्या क्रियापदाची शफथेशीं जोड देण्याची कल्पना फारशी प्रयोगावरून मराठींत आली आहे.फारशींत कसम खुर्दन् असा प्रयोग असतो .क़सम= शफथ;खुर्दन =खाणें. हाक मारणें असा एक मराठी प्रयोग आहे. ह्याला जुन्या मराठींत बोलावणें व संस्कृतांत निमंत्र असे शब्द आहेत उच्चैः निमंत्रण कृ असाहि संस्कृत प्रयोग होईल.परंतु निमंत्रण मारयति किंवा प्रहरति असा प्रयोग संस्कृतांत नाहीं .बांग जदन म्हणून फारशींत प्रयोग आहे .त्यावरून मराठीत हाक मारणे असा प्रयोग घेतलेला आहे. बांग= हाक किंवा आरोळी; जदन = मारणें .तसेंच याद दाश्तन ह्या फारशी प्रयोगापासून मराठींत घेतलें आहे. याद=आठवण आणि दाश्तन् = राखणें . असे शेंकडों प्रयोग फारशीवरून मराठींत घेतलेले आहेत '.उदाहरणार्थ,खाली कांहीं प्रयोग देतों.

रोघन मालीदन् = रोगण चोळणें
खाली कर्दन् = (घर) खाली करणें
राह् दादन् = रस्ता देणें
माफ कर्दन् = माफ करणें
हम्ला कर्दन् = हल्ला करणें
रद् कर्दन् = रद्द करणें
जमा शुदंन् = जमा करणें
सई कर्दन् = सई करणें, प्रयत्न करणें
बाजू गिरफ्तन् = बाजू घेणे
दोस्ती दाश्तन् = दोस्ती ठेवणें मैत्री करणें
तुहमत जदन् = माथीं मारणें
सुहबत् दाश्तन् = सोबत राखणें
सुहबत् रफ्तन् = सोबत जाणें
किलीद दादन् = किल्ली देणें
दूर कर्दन् = दूर करणें, काढणें
तमाशा नमूदन् = तमाशा दाखविणें
पुश्तक बर्दाश्तन् = उडी टाकणें
पुश्तक जदन् = उडी मारणे
हजीमत कर्दन् = हजामत करणें, कडक बोलणें
मना कर्दन् = मना करणें
जेर कर्दन् = जेर करणें
बीमैदान आवर्दन् = मैदानात आणणें, जाहीर करणें
कमर् बस्तन् = कंबर बांधणें
दम् जदन् = दम मारणें
नाखुन् गिरिफ्तन् = नखें काढणें
जाहीर साख्तन् = जाहीर करणें
जबरशूदन् = जबर होणें
पेष आमदन् = पुढें येणें
शबीना कश्तन् = छबीना काढणें
दस्त् दादन् = हात देणें, मदत करणें

आणीक अशी शेंकडों उदाहरणें देता येतील *.

मराठीत फार्सी शब्दयुक्त वा फार्सी वाक्प्रचारांची नोंद श्री य.रा. दाते व श्री .चिं.ग.कर्वे यांनी १९४२ साली आपल्या 'महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोशांत' घेतली व या कोशाच्या प्रस्तावनेत तसा निर्देशही केला. याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख येथे करायला हवा ;पण या कोशात दोन प्रकारच्या चुका

मला जाणवल्या :

१- वाक्प्रचार व वाक्संप्रदाय यांची सरमिसळ त्यात झालेली असल्याने त्यातला भेद अभ्यासकाच्या /वाचकाच्या लक्षात येत नाही[३].

२-अरबी,फार्सी तुर्की असा व्युत्पत्तीच्या संदर्भातील उल्लेख त्यांत नसल्याने कोणकोणते मराठी वाक्प्रचार अरबी, तुर्की , फार्सी शब्दांच्या साहाय्याने सिध्द झाले व कोणते मूळ फार्सी वाक्प्रचारांच्या द्वारा अनुवादित होऊन मराठीत आले,हे कळण्यास काहीच मार्ग नाही तथापि त्यामुळे या संपादकद्वयांनी त्या काळात केलेल्या अपार कष्टांचे महत्त्व कमी होत नाही.

मराठीत आलेल्या अरबी-तुर्की-फार्सी शब्दयुक्त वा फार्सीपासून अनुवादिलेल्या वाक्प्रचारांचे स्वतंत्र संकलन वा संपादन आजवर झाले नव्हते .फार्सी - मराठीच्या भाषिक अनुबंधाचा हा एक फार महत्त्वाचा घटक असल्याने तो प्रयत्न मी येथे केला. यापूर्वी ' मराठी बखरीतील फार्सीचे स्वरूप ' या ग्रंथात मी असा प्रयत्न १९७३ सालीच केला असल्याने हा मराठीतील पहिला प्रयत्न आहे असे म्हणता येणार नाही तथापि माझ्या त्या प्रयत्नाला बखर-वाङ्मयाची मर्यादा असल्याने व हा प्रयत्न यापूर्वी झालेला नसल्याने त्याचे पहिलेवहिलेपणदेखील एका अर्थाने मान्य करायला हवे.

मराठीच्या भाषावैज्ञानिक संशोधनाच्या तसेच फार्सी- मराठी अनुबंधाच्या संदर्भात आश्चर्य वाटण्याजोगी गोष्ट ही की, गेल्या व या शतकातील या अध्ययनक्षेत्रातले हे हाताच्या बोटावर मोजण्या इतकेच चारदोन प्रयत्न . त्यांत उर्दू भाषेतील एका प्रयत्नाची फार तर भर घालता येईल.हा प्रयत्न म्हणजे १९३३ साली बाबा-ए-उर्दू डॉ.अब्दुल् हक् यांनी प्रसिध्द केलेली ' मरेठी जबान पर फारसी का असर ' ही पुस्तिका .तिच्यात फार्सी वाक्प्रचारांचा उल्लेख केला आहे पण तोही जाताजाताच. त्यां- ची सविस्तर तपशीलवार सूची या ग्रंथात प्रथमच प्रसिध्द होत आहे. मराठीतील फार्सी शब्दसंग्रहाप्रमाणेच हे वाक्प्रचारही मराठी माणसाच्या अनुभवविश्वाच्या अनेकविध अंगांना स्पर्श करणारे आहेत. त्यांच्यामुळे मराठी भाषेच्या वाक्प्रचार-वैभवाची संपन्नता निश्चितच वृध्दिंगत झाली आहे.

## संदर्भ-टीपा

१-पुणे विद्यापीठ पत्रिका, क्र.३, पुणे विद्यापीठ,पुणे, पृ.१

२-ऐप्र. प्र. ४००-४०१

३-ठळक टाइप माझा.

४-कित्ता

५-महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश,प्र, पृ .२६-२७.

## वाक्प्रचार - सूची

### अ

| | | |
|---|---|---|
| अकलेचे तारे तोडणे | - | अविचाराने बोलणे |
| अकलेच्या वाटेने पाहणे | - | तर्क करणे ,विचार करणे |
| अकस असणे | - | वैरभाव असणे |

अकस मांडणे - शत्रुत्व पत्करणे

अक्कल गुंग होणे - निरुपाय होणे, दिङ्मूढ होणे

अक्कल नसणे - ज्ञान नसणे, शहाणपण नसणे

अक्कल पुढे धावणे - भलत्याच गोष्टीसाठी बुध्दी वापरणे

अक्कल विकत घेणे - नुकसान सोसून मग शहाणपण शिकणे

अक्कल विकून फुटाणे खाणे - थोड्या लाभाकरिता मोठे नुकसान करून घेणे

अक्कल सांगणे - सल्ला देणे, शहाणपणाच्या गोष्टी करणे

अखेर मारणे - परिणामी हितकर अशी गोष्ट करणे

अखेर होणे - संपणे

अगाही घेणे - अंदाज घेणे, आशा बाळगणे

अजब करणे - आश्चर्य करणे

अजमासाने खोगीर खाणे - केवळ अंदाजाने बोलणे

अजीजी करणे - गयावया करणे, विनवणी करणे

अजुर्दगी असणे - नाराजी असणे, रुसवा असणे

अत्तर गुलाब करणे - अत्तर लावून गुलाब पाणी शिंपडणे, सन्मान करणे

अत्तर जाळणे - अविचाराने उधळपट्टी करणे

अत्तराचे दिवे जाळणे - भरमसाट खर्च करणे .

अदब बजावणे - वंदन करणे, नम्रतापूर्वक उभे राहणे

अदब राखणे /चालविणे - सन्मान राखणे: आदर दाखविणे

अदावत घेणे /टाकणे - कुभांड रचणे

अदावत चालणे - वैर, शत्रुत्व असणे

अद्दल घडणे - केलेल्या कृत्याचा परिणाम भोगावा लागणे

अद्दल घडविणे - केलेल्या अपकृत्याबद्दल शिक्षा देणे, धडा शिकविणे

अनात करणे - कृपा, मेहेरबानी करणे

अनामत उचलणे - आगाऊ रकम घेणे

अनामत ठेवणे - विश्वासाने दुसऱ्याजवळ ठेव ठेवणे

अनीन उचलणे - लगामाचा इशारा देणे

अंदाजी तारे तोडणे - केवळ अनमानधपक्याने बोलणे

अंदेशा पाडणे - भीती वाटणे, संशय येणे

अंदेशा येणे - शंका वाटणे

अफवा पसरणे - भुमका, आवई उठणे, कंडी पिकणे

अफरातफर करणे - अपहार करणे

अफरातफरी होणे - विकीर्ण, परागंदा होणे

अफवा पिकणे - भुमका उठणे
अफूचा गाळावा घेणे - पैज लावणे
अब्रू कायम ठेवणे - प्रतिष्ठा टिकविणे
अब्रू घेणे - अप्रतिष्ठा करणे, बलात्कार करणे
अब्रू जाणे - अप्रतिष्ठा होणे
अब्रू नसणे - किंमत, महत्त्व नसणे
अब्रूच्या जुरतीने कस्त करणे - प्रतिष्ठेसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करणे
अब्रूला भिणे - प्रतिष्ठेस जपणे
अब्रू वाढणे - प्रतिष्ठा किंवा दर्जा प्राप्त होणे
अमलाफैला होणे - राज्यसत्ता प्रस्थापित होणे
अमानत करणे - सरकारात जमा करणे, तात्पुरते जप्त करणे
अमानत ठेवणे - सरकारात जप्त करणे , तात्पुरते जप्त करणे , ठेव ठेवणे

आवई उठणे - बातमी / अफवा पसरणे
आवई/ आवाई खाणे - दहशत घेणे
आवाज करणे - (तोफेचे वगैरे) बार काढणे
आवाज देणे - (फा. आवाज् दादन् )हाक मारणे
आसर पाडणे - परिणाम करणे,प्रभाव दाखविणे

इ

इजहार करणे - निवेदन करणे,सादर करणे
इज्जत खाणे - - अप्रतिष्ठा करणे
इज्जत खोवणे - अब्रू,प्रतिष्ठा किंवा थोरवी सांभाळण्याची ईर्षा धरणे
इज्जत घेणे - प्रतिष्ठा नष्ट करणे
इज्जत देणे - प्रतिष्ठा प्राप्त करून देणे
इतराजीत येणे - रागावणे,नाखुश होणे
इतराजीत होणे - अवकृपा होणे, नाराज होणे
इतल्ला करणे - माहिती कळविणे, सूचना
इनसाफ होणे - न्याय मिळणे
इनायत करणे - कृपा करणे, बक्षीस देणे
इभ्रत पडणे - वचक/दरारा बसणे
इमान /इतबार करणे - शपथेवर सांगणे
इमान उजवणे - आणभाकेतून मुक्त होणे
इमान करणे - निष्ठेची शपथ घेणे
इमान घेणे - अभिवचन घेणे

इमान गुंतणे - वचनबध्द होणे
इमान जाणणे - वचन पाळणे,एकनिष्ठ राहणे,निष्ठेची जाणीव असणे
इमान देणे - वचन देणे
इमान- प्रमाण करणे - वचन देणे, दिलेले वचन पाळणे
इमान- भाषण होणे - निष्ठेची बोलणी होणे
इमान सुटणे - निष्ठा नाहीशी होणे
इमाने इतबारे करणे - निष्ठेने करणे
इमारत असणे - एखाद्याच्या साहाय्यावर मदार असणे
इमारत उभी करणे - (राज्य इ.)स्थापन करून त्याची वाढ करणे
इमारत चालविणे - कामकाज चालवणे
इमारत फळा येणे - इच्छित कार्य सिध्दीस जाणे
इरसाल करणे - पाठविणे,सादर करणे ,दाखल करणे
इरादा करणे - ठरविणे
इरादा धरणे - हेतू बाळगणे
इरादा बांधणे - हेतू असणे, बाळगणे
इलम चालणे - मात्रा लागू पडणे
इशारा होणे,दर्शविणे - सूचना देणे,कळविणे
इष्कबाजी करणे - मौज,चैन ,प्रणय-विलास करणे

उ

उजरून लिहिणे - उलगडा करून लिहिणे
उजूलवाजू करणे - नित्यकृत्ये करणे (मूळ अर्थःप्रार्थनेसाठी हातपाय धुणे इ.)
उजूर करणे - सबब/निमित्त सांगणे
उजूर ठेवणे -निमित्त सांगण्याची व्यवस्था करून ठेवणे
उदीवर हात ठेवणे - उदीची शपथ घेणे
उमेद धरणे - आशा बाळगणे, अपेक्षा करणे
उमेदवार करणे - उत्तेजन,प्रोत्साहन देणे
उमेदवार होणे - वयात येणे,कर्तबगार होणे
उमेदवारी करणे - काम शिकणे,कामाचे प्रारंभीचे धडे गिरवणे
उमेदवारी मनात धरणे - आशा बाळगणे,अपेक्षा करणे
उमेदवारी शेवटास जाणे - आशा फलद्रूप होणे
उस्तवारी राखणे - व्यवस्था ठेवणे

ए

एकदिल असणे होणे - सलोखा असणे
एकदिल/एकदिली करणे - एकमत,सलोखा करणे

एकदील राहणे - सलोख्याने,एकमताने वागणे,
ऐदीने खाणे, मैदानी निजणे - आळसाने वेळ घालवणे
ऐब असणे - उणीव/दोष असणे
ऐब लागणे - डाग लागणे,अप्रतिष्ठा होणे
ऐब लावणे - दोषारोप करणे, ऐषआराम करणे, चैन करणे

क

कंगालात निघणे - कफल्लक होणे
कजा करणे - भांडणे
कजिया काढणे,कज्जा खंदून काढणे - भांडण उकरून काढणे
कज्या लागणे - वाद उपस्थित होणे
कट्टा होणे,कत्तल होणे - नाश पावणे
कद जिरवणे/मोडणे - गर्व हरण करणे,
कद पाहणे - सामर्थ्य आजमावून पाहणे,
कदर करणे - प्रतिष्ठा देणे,सन्मान करणे
कदर काढणे/सोसणे - त्रास सहन करणे
कंदुरी करणे - जत्रेस बकरे वगैरे बळी देऊन जेवण देणे
(गळ्यात) कफणी घालणे - विरक्त होणे
कबज करणे - ताब्यात घेणे
कबजी धरणे - पेचात पकडणे
कबर करणे - समाधी बांधणे
कबरबस्ती करणे - सिध्दता करणे
कबाब होणे - जळून राख होणे,
कमजोर पडणे - तुल्यबळ नसणे,
कमती पाहणे - दोष/उणीव /पाहणे
कमान वर चढणे - प्रतिष्ठा वाढणे,
कमाल करणे - परिसीमा गाठणे ,
कमाल होणे - पराकोटीस पोहोचणे ,पराकाष्ठा होणे,
कमी करणे - कामावरून काढून टाकणे,
कमी होणे - दोष आपल्याकडे घेणे,,
कमीजास्ती करणे - उचापत करणे,स्नेहात वितुष्ट आणणे,
कमीजास्ती होणे - बरेवाईट होणे,
कमी नसणे - बरोबरीचे(सामान योग्यतेचे) असणे,
कंबर कसणे -सिध्द होणे,
कंबरडे मोडणे - फार मोठा प्रहार करणे,निःपात, करणे,

कंबरबस्ता होणे - सिद्ध होण
कंबरबंदी करणे - सिध्दता करण,
कंबर बांधणे - (फा. कमर् बस्तन्)सिद्ध होणे
कंबर भरणे - कंबर फार दुखणे
कंबर वाकणे - कुबड निघणे अशक्त होणे,वय होणे
कंबर सोडणे - धीर खचणे,
करीणा जाहीर करणे - हकीकत सांगणे
करीणा होणे - अनर्थ होणे
कर्ज ओढणे - कर्जावर कर्ज काढणे
कर्ज फारीक करणे - कर्ज फेडणे
कर्ज लागणे - देणे असणे
कलम करणे - कापणे छाटणे
कलम- कुचराई करणे - लिहिताना काही मजकूर मुद्दाम गाळणे
कलमजारी चालणे - सैन्यभरतीस प्रारंभ करणे
कलम धरणे - सैन्यभरती सुरू करणे
कलमबंद करणे - लिहून घेणे ,कळविणे
कलाबूत ठोकणे - पत्र लिहून कळविणे,,जोडयात ठोकळे बसविणे
कवाईत्त करणे - डाव रचणे,युक्ती करणे,संचलन करणे,शारीरिक व्यायाम करणे
(ल.)यांत्रिक पध्दतीने काम करणे
कसर करणे - काटकसर करणे
कसर काढणे - एखाद्या गोष्टीतील तोटा दुसरीकडून भरून काढणे
कसर येणे - बारीक ताप येणे
कसर लागणे - कसरीचा किडा लागून कापड इ. खराब होणे
कसाले भोगणे - कष्ट सहन करणे
कासीद करणे - काढून घेणे
कसोशीत आणणे - जरबेत / दबावात आणणे
कस्त होणे - ठार होणे
कस्त घेणे - अंग चोरून दुसऱ्यास वाट करून देणे
कहर करणे - फार त्रास देणे
कहर वर्षणे - अनर्थ होणे
कहर होणे - अनर्थ घडणे
कही मारणे - मदत मिळू न देणे
कागद भेटविणे - पत्र देणे
कागद लिहिणे - पत्र पाठविणे

कागदी घोडे नाचविणे - अनावश्यक पत्रापत्री करणे,
काबू करणे - कब्जा करणे, संधी साधणे, आपला हेतू साध्य करणे,
काबूत असणे - आधिपत्याखाली / वर्चस्वाखाली,ताब्यात असणे,
काबू साधणे - ताब्यात घेणे,
काम बजावणे - काम पार पाडणे,
कायदा करणे / घालणे होणे - नियम ठरविणे,
कायदा चालणे - नियम रूढ होणे,
कारकीर्द फिरणे - राज्यक्रांती होणे,
कारभार करणे - नसता उपद्व्याप करणे,
कारभार सांगणे - व्यवस्था सोपविणे,
कारभारात पडणे - कामात लक्ष घालणे ,
कारस्थान चालणे - कारस्थान करणे,(कुटिल हेतूने )काही वेल करणे
कारेगर होणे - लागू पडणे, परिणामकारक ठरणे,
कावेशीत आणणे - गोत्यात आणणे,अडचणीत आणणे,
कित्ता गिरविणे - अनुकरण करणे,
कित्ता घालून देणे - उदाहरण घालून देणे ,
कित्त्यावर घालणे - लिहायला शिकविणे
किनारा घेऊन असणे - एखाद्या गोष्टीत प्रत्यक्ष भाग न घेणे,सहभागी न होणे,भाग घेण्याचे टाळणे,
किनारा पिछाडीचा करणे - माघार घेणे, पराङ्मुख होणे,
किंमत असणे - महत्त्व असणे,
किंमत करणे - मूल्य निश्चित करणे,मोल करणे,
किंमत कापणे - किंमत उतरवून सांगणे,
किलाफ ठेवणे - वैर,व्देषभाव बाळगणे,
किलाफ दूर करणे -वैर मिटविणे
किली घेणे - धडक / टक्कर घेणे,
किल्ल्याची हेजिबी करणे - बोलणे लावून किल्ले घेणे,
किल्ल्यात पाठविणे - कैद करणे,
किल्ल्यावर चढविणे - किल्ल्यात कैदेत ठेवणे,
किल्ला नेसविणे - किल्ल्याभोवतालचे रान जाळून टाकणे,
किल्ला बांधणे - जमावाची पध्दतशीर बळकट आवळून रचना कारणे,
किल्ली- कुलूप करणे - उघडझाप करणे,
किल्ली फिरविणे - युक्तीने बाजू फिरविणे,
किल्लेबंद होणे - किल्ल्यानिशी सिध्द होणे,

किस्सा चालणे - वाद होणे,
किस्सा तूटणे - वाद मिटणे,
किस्सा सांगणे - बाजू मांडणे,वार्ता निवेदन करणे,
किस्सा होणे - भांडण होणे,
कुचाचा नगारा वाजविणे - पलायन करणे,,काढता पाय घेणे,
कुफर तोडणे - फितुरी नाहीशी करणे,
कुमक करणे - साहाय्य करणे,मदत पाठविणे,
कुराण करणे - कुराणाची शपथ घेणे,
कुराण दरम्यान करणे - कुराणाची शपथ घेणे,
कुराणाची शपथ देणे - कुराणाच्या शपथेवर सांगावयास लावणे,
कुराणावर मोहर करणे - कुराणाची शपथ घेणे,
कुराणावर हात ठेवणे - कुराणाची शपथ घेणे,
कूच करणे - निघणे,
कैफ खाणे - निशापाणी करणे,
कैफियत सांगणे - आपली हकीगत सांगणे,
कोर धरणे - मत्सर करणे,
कोरबंदी करणे - रांगेत व्यवस्थित उभे करणे,
कौल पडणे - (देवतेची )अनुकूलता कळणे,
कौलात आणणे - अभयवचन देणे,
कौलास येणे - शरण येणे,

ख

खत फाडणे-संबंध तोडणे
खतावणीवर घालणे - कठीण कामाला लावणे,
खतावून ठेवणे - हिशेबवहीत नोंदवणे,
खत्ता करणे - हानी करणे,
खबर आणणे - माहिती/वार्ता मिळविणे,
खबर उडणे -बातमी उठणे/येणे,
खबर उडविणे - बातमी पसरविणे,
खबर करणे- वर्दी देणे / कळविणे,
खबर घेणे - समाचार घेणे, शिक्षा देणे,
खबर जाणे - वार्ता कळणे,
खबर जाहीर होणे - वार्ता कळणे,
खबरदार असणे - सावध असणे,
खबरदारी राखणे - सावध राहणे,

खबर पाठविणे - वार्ता कळविणे,
खबरबात पुसणे/विचारणे - हालहवाल विचारणे,
खबर -बातमी येणे-वार्ता कळणे
खबर लागणे - वार्ता कळणे,
खराब करणे - उध्वस्त/नष्ट करणे,
खराबहाल होणे - वाईट अवस्था होणे, विपन्नावस्था येणे,
खराबीस मिळविणे - दुर्दशा करणे,
खरेदी करणे - विकत घेणे,
(शरीर)खर्च घालणे - जिवापाड मेहनत घेणे,
खर्च चालविणे - उदरनिर्वाहासाठी वा अन्य गरजा भागविण्यासाठी रक्कम देणे
खर्च बसविणे - रक्कम लादणे,युध्दासाठी वगैरे झालेल्या खर्चाचा विशिष्ट वाटा घावयास भाग पाडणे
खर्चवेच चालणे - उदरनिर्वाहाची व्यवस्था होणे,
खर्च होणे - निधन पावणे,
खर्चाखाली येणे - फार खर्च होणे, त्यामुळे खचणे,
खर्चास देणे - खर्चासाठी रक्कम देणे,
खर्चास शेंडी फुटणे - फार खर्च होणे,
खर्ची घालणे - खर्च करून टाकणे,जमा-खर्चात नावेच्या बाजूस लिहिणे, वापरणे,
खर्ची पडणे - (एखाद्याच्या )कामी येणे,
खर्ची लिहिणे - रक्कम नावे मांडणे,
खलबत करणे - एकांतात विचारविनिमय करणे,
खलबत बसणे - विचारविनिमयासाठी एकत्र जमणे,
खलश पडणे - भांडण होणे, वाद होणे,
खलास करणे - मुक्त करणे, नाहीसे करणे, हत्या करणे,
खसखस पिकणे - हशा पिकणे,
खसलत काढणे - जाच सहन करणे,
खसाल्यातून मसाला होऊन निघणे - अतिशय कष्ट केल्यामुळे योग्यता वाढणे,
खस्त होणे - निधन पावणे, नष्ट होणे,
खस्ता खाणे - त्रास सोसणे,
खातरजमा करणे - खात्री करून देणे,
खातरतसलीम करणे - खात्री करणे,शहानिशा करणे,
खातरदारी करणे - आतिथ्य करणे,
खातरी घालणे - अंथरूण घालणे,,आजारी पडणे,
खात्रेस येणे - मनाचे समाधान होणे,खात्री पटणे,

खानाजोंद होणे - वाटणे,
खानेजंगी करणे - यादवी करणे,कलह करणे,
खनेसुमारी करणे - जनगणना करणे,
खामोश करणे - शांत करणे,
खारिज करणे - हद्दपार करणे, बाहेर काढणे, (खटला)निकालात काढणे,
खालसा करणे - सरकारजमा करणे, नष्ट करणे,
खाली करणे - सोडणे,
खाली पडणे- रिकामे होणे,
खाली होणे - वाया जाणे, नष्ट होणे,
खासगीचा उतारपोषाख देणे - बहुमान करणे,
खिजमतगारी करणे - सेवा करणे
खिपत देणे - पराभव करणे, फजित करणे,
खिरापत वाटणे - मुक्तहस्ताने उधळणे
खिलत होणे - अधिकार प्राप्त होणे, सन्मान होणे,
खिशात टाकणे - अपहार करणे, वर्चस्व प्रस्थापित करणे,
खिसा कातरणे - फसविणे,लुबाडणे,
खिसा गरम करणे - फायदा करून घेणे,
खिसा होणे - नुकसान होणे,
खुर्दा करणे - चुराडा करणे,
खुलासा करणे - माहिती सांगणे, तपशील देणे,समर्थन करणे,
खुशामत करणे - खोटी प्रशंसा करणे,
खुशाली करणे - संतुष्ट करणे,
खुषमर्जी होणे - प्रसन्न होणे,
खुषवक्त होणे - प्रसन्न असणे, होणे,
खून चढणे - हिंसेस प्रवृत्त होणे,
खैर असणे - कुशलक्षेम असणे,
खैरखैरात करणे - दानधर्म करणे,
खैर होणे - स्थिरस्थावर होणे, वाचणे,
खोगिरभरती करणे - अनावश्यक लोक/गोष्टी समाविष्ट करणे.
खोगीर लादणे- अंकित करणे,वर्चस्व प्रस्थापित करणे,
ख्याल करणे - खोडी काढणे, हल्ला करणे,
ख्यालीखुशाली करणे - चैन करणे
ख्याली लागणे - नादी लागणे.

ग

गम खाणे - शांतपणे सहन करणे

गमजा करणे - चैन करणे, प्रौढी मिरविणे

गमजा चालणे- स्वैर वर्तनास मुभा असणे,

गमजा न चालणे - स्वैर वर्तन चालू न देणे,

गमी करणे - शोक, दुःख,दुखवटा करणे,

गरक होणे- नष्ट,नाश होणे,

गरज ठेविनासे होणे - किंमत ,महत्त्व न देणे

गरज नसणे- आवश्यकता न भासणे,

गरज पडणे- आवश्यकता भासणे,

गरज पुरविणे - गरज भागविणे,

गरज लागणे - आवश्यकता भासणे

गरज होणे - नड नाहीशी होणे

गरदून जाणे - गांगरणे

गरम होणे - संतापणे

गरीब पाहणे - मवाळ असल्याचे हेरून गैरफायदा घेणे

गर्क होणे - बुडणे,अदृश्य होणे, मग्न होणे

गर्गशा लागणे - भांडण, वाद लागणे

गर्द होणे - धुळीस मिळणे

गर्दन मारणे - हत्या करणे

गर्दी करणे - दाटी करणे,गोंधळ करणे, जुलूम करणे

गर्दीत जाणे - निधन पावणे

गर्दीस नेणे - नाश करणे

गर्दीस मेळविणे - नाश करणे

गलफ होणे - अकारण बसणे, वर्चस्व होणे

गलबा होणे - गोंधळ माजणे

गलीमी करणे - (शत्रू असावध असताना )हल्ला करणे

गल्ला वाढविणे - व्यापारात भरपूर पैसा मिळविणे

गस्त करणे - फिरता पहारा करणे

गस्त येणे - भोवळ येणे

गळ्यातील कफनी काढणे - उदासीनता/विरक्ती सोडणे

गाजीचा पाजी बनणे - मोठया पदावरून खाली येणे

गायब होणे - गुप्त,बेपत्ता होणे

गारद करणे - नष्ट करणे

गारद होणे - नष्ट होणे
गायखुद होणे - नष्ट होणे,निष्प्रभ होणे
गायखुर्द होणे - महत्त्वशून्य होणे
गाशा गुंडाळणे - निघून जाणे, आवराआवर करणे
गाशा टाकणे - बस्तान बसविणे
गिरफदारीत असणे - चिंता वाटणे, काळजीत असणे
गुजरात कमावणे - अपार संपत्ती मिळविणे
गुजारा होणे - उदरहनर्वाह चालणे
गुंजाईश करणे - लबाडी करणे
गुदराण करणे - उपजीविका/निर्वाह करणे
गुफ्तगू करणे - गुप्त बेत आखणे
(मनात)गुबार असणे - द्वेष,वैरभाव बाळगणे
गुम होणे - नष्ट होणे
गुमान धरणे - तमा वाटणे
गुमान (मनात) येणे - काळजी,संशय वाटणे
गुमान राखणे - मोघम ठेवणे
गुमानात ठेवणे - मोघम ठेवणे
गुलगलबा होणे - गोंधळ माजणे
गुलदस्तात ठेवणे - दडवून ठेवणे,राखून ठेवणे
गुल देणे - मोठ्या खिळ्याचा वरील भाग तापवून त्याने डाग देणे, (ल)भडकावणे
गैरआदबी होणे - मानभंग, अपमान होणे
गैरमजा होणे - स्वारस्य नष्ट होणे
गैरमर्जी होणे - रागावणे, अवकृपा होणे
गैरवाका समजाविणे - खोटी किंवा बनावट माहिती पुरविणे
गैरविल्हेस पडणे - गडबडणे
गैरराह वर्तणे - चुकीच्या मार्गाने चालणे,वागणे
गोता खाणे - नुकसान होणे
गोत्यात येणे - संकटात सापडणे
गोरखपण करणे - उत्तरक्रिया करणे, दफनाचा विधी करणे
गोशमाल देणे - शिक्षा करणे
गोशमाली करणे - शासन करणे
गोळा वाजवणे - तोफेचा मारा करणे
ग्वाही देणे - साक्ष देणे, दुजोरा देणे

घ

(घर )कैद करणे - स्थानबध्द करणे,

(घर)फितूर होणे - आपसांत दुफळी माजणे

घावडाव पाहणे - अनुकूल काल-परिस्थिती पाहणे

घुस्सा भरणे - रागावणे

घोडा-मैदान जवळ असणे - कसोटीची वेळ येणे

च

(चढती )कमान करणे - एकसारखी प्रगती करणे

चश्म्यातून पाहणे - विशिष्ट दृष्टीने विचार करणे

चाकर राहणे /होणे - नोकरी करणे

चाकरी करणे - सेवाचाकरी मेहनत करणे

चाकरी नेकदार असणे - प्रामाणिकपणे सेवा करणे

चाकरी बजावणे - कामगिरी पार पाडणे

चाकरी सांगणे - नोकरीस ठेवणे

चाकरी हलाल करणे - प्रामाणिकपणे नोकरी करणे

चाकरी होणे - सेवा घडणे

(पोत्यास)चाकू मारणे - चाकूने पोते फाडून आतील धान्य काढणे

चादर फिरविणे - शरण आल्याचे जाहीर करणे

चादर लावणे - लक्ष्याचे निशाण रोवणे

चाप लावणे - पायबंद घालणे

चाबूक ओढणे - शासन करणे

चिटणिशी लिहिणे - चिटणिसाचे काम करणे, दप्तर इ. लिहिणे

चिराकदान करणे - रोषणाई करणे, दिवाबत्ती करणे

चिराखबत्ती करणे - दिवाबत्ती करणे, घराची देखभाल करणे

चिराग लावणे - रोषणाई करणे

चिल्लर देणे - अल्प प्रमाणावर देणे

चुगली करणे - चहाडी सांगणे

चेहरा उतरणे - अस्वस्थ, निराश होणे

चेहरा करणे - चेहरा साफ करणे

चैन मारणे - मजा करणे

चोप देणे - मारणे

चौगिर्द करणे - चारी बाजूंनी वेढणे

चौघडा आखर होणे - अखेरचा चौघडा वाजणे

चौमेखी करणे - चार बाजूस मेखा ठोकून त्यांस हातपाय दोरीने बांधून ठेवणे

छ

छक्केपंजे ओळखणे - डावपेच / लबाड्या जाणणे

छर्रे उडविणे - आवेशाचे भाषण करणे

छाप ठेवणे - वर्चस्व असणे

छाप मारणे - प्रभाव पाडणे, ठसा उमटविणे

छापा खाणे - हल्ल्यात सापडणे,

छापा मारणे/घालणे/टाकणे - हल्ला करणे

ज

जकात देणे - मालावरील कर देणे.

जखम कारागर होणे - जखमेचा परिणाम होणे

जखम पाहणे - जखम तपासणे

जखम बांधणे - औषधोपचार करून जखमेवर पट्टी बांधणे

जखम भरणे - जखम बरी होणे

जखम लागणे - विद्ध होणे

जखम वाहणे - जखम बरी न होणे, जखमेतून सतत रक्त वाहणे

जखम शेजेस येणे - जखम बरी होऊ लागणे

जखमाना देणे - जखमी लोकांना औषधोपचारार्थ मदत देणे

जखमेवर मीठ चोळणे - दुःखी माणसास आणखी त्रास देणे

जजिया घेणे - मुसलमानेतरांवरील डोईपट्टी वसूल करणे, अन्याय्य वसुली करणे

जंगजंग पछाडणे - बारकाईने सर्वत्र शोध घेणे

जंग देणे - पुष्कळ दिवस टिकणे

(शहर)जंगलादाखल होणे - (शहर )उध्वस्त ओसाड होणे

जप्त करणे - सरकारने (तात्पुरते )ताब्यात घेणे

जप्त बसविणे - अंमल बसविणे

जप्ती करणे - सरकारने (तात्पुरते)ताब्यात घेणे

(गावावर)जप्ती बसणे - सरकारी ताबा बसणे

जपत्तरफत्त असणे - दबाव/ दहशत असणे

जबानी देणे - साक्ष देणे

जबानी फिरविणे - पूर्वी दिलेल्या साक्षीचा मजकूर अमान्य करणे

जबानी सांगणे - तोंडी सांगणे ,जबानी देणे

जबे करणे - ठार मारणे

जमाखर्च न करणे - तमा न बाळगणे

जमाखर्च बरोबर असणे - नफा-नुकसान न होणे

जमाना उलटा असणे - विपरीत काळ असणे

जमाबंदी करणे, चालणे - (येणे असलेल्या)सरकारी पैशाचा हिशेब करणे
जमाव करणे - एकत्र करणे
जमिनीवर पाय नसणे - कल्पनाविश्वात वावरणे
जमिनीस पाठ लागणे - अंथरुणास खिळणे, आजारी पडणे
जमीन- अस्मान एक होणे - फार गर्व होणे
जमीन चालविणे - (इनाम) जमीन करणे
जमीन धरणे - अंथरुणाला खिळणे
जरब खाणे - धास्ती घेणे
जरब पडणे - वचक बसणे
जरब.पिणे - धास्ती घेणे
जरब पोहोचणे - धाक बसविणे
जरब बसविणे - वचक बसविणे
जरबेत राहणे - धाकात राहणे
जरबेस आणणे - नमविणे
जवामर्दी करणे - शौर्य गाजविणे, पराक्रम करणे
जळूष राखणे - प्रतिष्ठेचे रक्षण करणे
जहर घालणे - विषप्रयोग करणे
(नेत्रांत)जहर चढणे - राग अनावर होणे
जहांमर्दी करणे - पराक्रम करणे, पराक्रम गाजविणे
जागा घेणे - रिकामे पद स्वीकारणे
जागा भरणे - नियुक्ती करणे
जागा होणे - पद रिकामे असणे, संधी मिळणे
जाजती जलल करणे - जुलूम/अत्याचार करणे
जातीवर करणे - स्वतःच्या हिमतीने करणे
जातीवर मोबदले करणे - स्वतःच्या नावे कर्ज काढणे
जानी दुष्मनी असणे - हाडवैर असणे
जाब करणे - उत्तर देणे
जाबजबाब येणे - उत्तर येणे
जाब ठरणे - करार किंवा ठराव होणे
जाबता बसविणे - प्रघात पाडणे
जाब बोलणे - उत्तर देणे
जाबसाल करणे - बोलणे, वाटाघाटी करणे
जाबसाल पुसणे - प्रश्न विचारणे
जाबसालास येणे - बोलणे किंवा वाटाघाटी करावयास येणे

जाबाचा साल होणे - प्रश्नाचे उत्तर देणे
जामगी भरणे - तोफ डागणे
जामीन होणे - हमी देणे
जायांजखमी होणे - विध्द होणे
जाया देणे - आंदण देणे
जारी करणे - (कायदा इ. )अमलात आणणे, चालू करणे
जाहली करणे - रागावणे
जाहीर करणे - प्रकट करणे, सांगणे
जाहीरनामा करणे - (राजाज्ञा वा पक्षाचे निवडणूक-धोरण )प्रसिध्द करणे
जिकर निघणे - विषय निघणे
जिकिरीस येणे - कंटाळणे, अस्वस्थ/हैराण होणे
जिगजिग करणे - त्रास देणे
जिन ठेवणे - सावध होणे
जिन न उतरणे - सतत युध्द करणे
जिनबंदी करणे - लढाईची तयारी करणे
जिन्नस उडविणे - खर्चून टाकणे, संपविणे
जिमेस ठेवणे - जबाबदारी सोपविणे
जिम्मा घालणे - जबाबदारी सोपविणे
जियारत करणे - पवित्र स्थळाचे दर्शन घेणे
जुदाई वागविणे - परकेपणाने वागविणे
जुंभस खाणे - धास्ती घेणे, कचरणे
जुरत- मेहनत करणे - धैर्याने प्रयत्न करणे
जुलमाचा रामराम करणे - असाहाय्यतेने काम करणे , निरुपाय असणे
जुलूम-जबरदस्ती करणे - फार त्रास देणे
जुलुमजास्ती होणे - अन्याय होणे
जुवामर्दी चालणे - पराक्रमास अवसर सापडणे
जेर होणे - हतबल होणे,,पराभूत होणे
जेरजबर पाहणे - सामर्थ्य आजमाविणे
जेरदस्त करणे - हस्तगत करणे
जेरबंद उडविणे - चाबकाने झोडपणे
जेरबंद करणे - नियंत्रणात ठेवणे
जेरीस येणे - मेटाकुटीस येणे, थकणे
जोखीम उडविणे - अंगावर धोक्याचे काम घेणे
जोडे धरणे/सांभाळणे - हलकेसलके काम करणे

जोर करणे - वरचढ होणे
जोर देणे - भर देणे
जोर पडणे - वर्चस्व प्रस्थपित करणे
जोर पाहणे - शक्ती आजमाविणे
जोर लावणे - अधिक नेटाने प्रयत्न करणे

ट

टंचाई असणे - अभाव असणे, चणचण जाणवणे
टप्पा खाऊन येणे - पडल्यावर पुन्हा उसळून येणे
टप्पा खाणे - विसावा घेणे
टप्पे लावणे - मुक्काम करीत जाणे
टप्प्याटप्प्याने करणे - क्रमाक्रमाने करणे,
टप्प्यात येणे - आवाक्यात येणे, आटोक्यात येणे, माऱ्यात येणे

ड

डाक घालणे - टपालाची व्यवस्था असणे
डाक बसविणे - पत्रे जलद पोचविण्याची व्यवस्था करणे
डागडुजी करणे - दुरुस्ती करणे
डाग लागणे - कलंकित होणे
डाव करणे - पेचात टाकणे
डाव पडणे - अनुकूल परिस्थिती येणे
डाव फेडणे - (खेळात)आलेली बाजू फेडणे
डाव लागणे - (खेळात )बाजू अंगावर येणे
डाव साधणे - कपट करणे, सूड उगविणे
डाव हरणे - पराभव होणे
डेरा देणे - मुक्काम करणे
डेऱ्याचे दांडे होणे - दुर्दशा होणे
डौल धरणे - कल असणे
डौल चालविणे - लौकिक राखणे
डौल बांधणे - कारस्थान करणे

त

तकसीमी देणे - हवाली करणे, ताब्यात देणे
तकसीर माफ करणे - अपराधाबद्दल क्षमा करणे
तख्ती बसणे - राज्याधिकार ग्रहण करणे
तख्तनशीन होणे - राज्याधिकार ग्रहण करणे
तगिरीचे वस्त्र देणे - बडतर्फ करणे

तगेरी करणे - कामावरून बडतर्फ करणे, बदली करणे
तंग करणे - आवळणे, अडचणीत आणणे
तंगचाई पडणे - उणीव भासणे, अडचण पडणे
तंग होणे - बेजार होणे
तजविजीत पडणे - काळजी वाटणे
तजविजीने करणे - जपून वागणे
तजवीज करणे - मुक्रर करणे, योजून ठेवणे, व्यवस्था/बंदोबस्त करणे
तजवीज लावणे - व्यवस्था करणे
तजा उतरणे - जोड्यावरील भाग व्यवस्थित कापणे
तजा मोडणे - सगळीस मोड पाडणे
तनचाई असणे - चणचण / अडचण असणे
तनखा लावणे - पगार ठरविणे
तन देणे- (फा. तन् दादन) तोंड देणे, साहस करणे
तनाखोरी येणे - वीट येणे
तफावत करणे - मर्यादा राखणे
तफरका होणे - दाणदाण हैराण होणे
तबदील करणे - बदलणे
(घोडी)तबेल्यास लावणे - तबेल्यात ठेवणे
तब्येत फिरणे - आजारी पडणे,विचार बदलणे
तब्येत लागणे - एखाद्या गोष्टीत मन रमणे
तब्येतीने चालणे - एखाद्याच्या मर्जीने वागणे
तमा नसणे - पर्वा न करणे, किंमत न देणे
तमाशा दाखविणे - चोप देणे, शिक्षा करणे, धडा देणे
तमाशा पाहणे - काय चालले आहे ते तटस्थपणे पाहणे
तमाशा होणे - विपरीत प्रकार घडणे
तयारीस लागणे - सिध्दता करणे
तरजमा करणे - अनुवाद करणे
तरबतर बोलणे - विसंगत बोलणे
तरबितर करणे - पांगविणे, उध्वस्त करणे, दाणादाण करणे
तराह खाणे - विथरणे
तऱ्हा देणे - बदल करणे, फरक करणे
तऱ्हा तऱ्हा करणे - अनेक प्रकारे छळणे
तऱ्हेस जाणे - चमत्कारिक रीत्या वागविणे
तऱ्हेस भरणे - वाईट रीतीने वागणे

तलख करणे - त्रास,पीडा देणे
तलब चढणे - (पगाराची इ). बाकी थकणे
तलावा मारणे - टेहेळणीकरिता फेरी मारणे
तलाव्यास जाणे - टेहेळणी करणे
तल्लफ होणे - तीव्र इच्छा होणे
तवकल करणे - ईश्वरावर भरवसा ठेवणे
तवा तापलेला असणे - आयती संधी मिळणे
तवातोबरा चालणे - (शिपायांस अन्न व घोड्यांना दाणा मिळणे ).फौजेची निर्वाहाची सर्व व्यवस्था होणे
तश्रीफ देणे - सन्मानार्थ पोषाख देणे
तसदी करणे - त्रास , कष्ट देणे
तसबीर काढणे - चित्र रेखाटणे
तसलमात बजावणे - वंदन करणे
तसलमातीस देणे - संरक्षणाखाली ठेवणे, स्वाधीन करणे
तसलीम बज़ावणे - वंदन करणे
तहगीर करणे - बदलणे
तह घालणे'- वाटाघाटी करणे
तह देणे - तह ठरविणे, निर्णय देणे
तहसील लावणे - तसदी करणे,हाल करणे
ताईत करणे - एखाद्या गोष्टीपासून संरक्षण व्हावे म्हणून उपाय करणे
ताकीद करणे - कडक सूचना (हुकूम )देणे
ताजा कलम लिहिणे - पत्र लिहिल्यानंतर शेवटी आणखी पुस्ती जोडणे
ताजीम देणे (फा. तअजीम् दादन्)- वंदन करणे
ताजे करणे (फा. ताजा कर्दन् )- उत्साहित करणे
ताजे होणे (फा.ताजा शुदन् )- उत्साहित होणे
ताज्जुब/ताज्युब वाटणे - चमत्कारिक वाटणे ,नवल वाटणे
ताबेदारीस असणे - स्वाधीन असणे
तार बांधणे लावणे - खंड पडू न देता पुरवठा करणे
ताराज करणे - उध्वस्त करणे
तारीख सांगणे - इतिहासलेखनाचे काम सांगणे
तारीफ नसणे - वर्णन करता न येणे
तारीफ बोलणे - प्रशंसा करणे
तारेवरील कसरत करणे - अत्यंत् कष्टाचे काम करणे
तालामाला नसणे - प्रतिष्ठा/ दर्जा नसणे, ताळमेळ नसणे

तालीमखाना खेळणे - व्यायाम करणे
ताले शिकंदर असणे - नशीब बलवत्तर असणे
(मिशीवर )ताव देणे - प्रौढी मिरवणे
ताव मारणे - खूप खाणे
तावून सुलाखून घेणे - पारखून घेणे
ताशेरा ओढणे - बंदुकीच्या गोळ्यांची फैर झाडणे, टीका करणे, आक्षेप घेणे
ताशेरा देणे - फैर झाडणे
तिरंदाजी करणे - बाणांचा मारा करणे
तुफान करणे - एखाद्या मुद्यावर वादळ माजविणे, वाद करणे
तुफान घेणे - कुभांड रचणे
(तुरुंगाची)हवा खाणे - कैदेत असणे
तेज करणे - (फा. तेज् कर्दन् )धार लावणे
तेजाब काढणे - सोने गाळणे
तोफ करणे - तोफांच्या आवाजाने सूचना देणे
तोफखाना चालणे - तोफांचा मारा होणे
(तोंडाचा)तोफखाना चालणे - भरमसाट बोलणे, सतत बोलत राहणे
तोफा उजळणे - तोफांस बत्ती देणे
तोफेच्या तोंडी देणे - एखाद्याला संकटात लोटणे
(राखेचे)तोबरे देणे - फार त्रास देणे,कडक शिक्षा देणे
तोबा तोबा करणे - पश्चात्ताप करणे
तोरा न राहणे - महत्त्व नाहीसे होणे
तोरा मिरविणे - प्रौढी मिरविणे
तोसदान वाढणे - बडेजाव वाढणे

द

दखल घेणे - नोंद घेणे
दखल देणे - ढवळाढवळ करणे
(गुन्हा ) दखलपात्र असणे - ज्यावर कायदेशीर कारवाई करता येईल असा गुन्हा असणे
दखलरियासत होणे - आधिकार ग्रहण करणे
दगा करणे - फसविणे,
दगा खाणे - फसणे
दगा देणे - फसवणे
दगा पावणे - फसणे
(मनात )दगा येणे - फसवणूक करण्याचा विचार (मनात) उत्पन्न होणे

दगा होणे - फसणे, फसवणूक होणे
दंग होणे - गर्क होणे
दफन करणे - पुरणे
दफे करणे - हाकलून लावणे
दम काढणे - थांबणे, दम धरणे
दम कोंडणे - श्वास रोधणे, धैर्य खचणे
दम खाणे - विश्रांती घेणे
दम घेणे - विश्रांती घेणे
दमछाक होणे - दमणे , थकणे
दम छाटणे - गुदमरणे
दम टाकणे- धीर सोडणे
दम देणे - धाकदपटशा दाखविणे
दम धरणे - धीर धरणे
दम नसणे - सामर्थ्य नसणे
दम निघून जाणे - निधन पावणे
दम भरणे - धमकी देणे
दम राखणे - भरवसा मानणे
दम लागणे - धाप लागणे
दम सर्द करणे - दमवणे, नामोहरम करणे
दम साठणे - दम छाटणे, धाप लागणे
दमसांड करणे - विसावा घेणे
दम सुटणे - धीर खचणे
दम सुलाख होणे - दम खलास होणे
दमानी पडणे - गलबत पुढे सरू न शकणे
दमावर धरणे - न कंटाळता काम करणे
दमास येणे - थकणे
दरकार नसणे - आवश्यकता नसणे, पर्वा नसणे
दरकार पडणे - गरज भासणे
दरबारकचेरी होणे - राज्यकारभारविषयक कामकाज सुरु होणे
दरबार करणे - राज्यकारभार/ कामकाज पाहणे
दरबार जाणे - दरबारास जाणे
दरबार बरखास्त करणे - राज्यकारभारविषयक कामकाज समाप्त होणे
दरबार बुडणे - दरबार संपणे
दरबार भरविणे - आपल्या प्रशंसकाचा(वा अन्य स्वरूपाचा) मेळावा भरविणे

दरबार होणे - राज्यकारभारविषयक सभा होणे
दरबारास बसणे - राज्यकारभाराविषयक वा शासकीय कामकाज पाहणे
दरबिदर करणे - दारोदार हिंडावयास लावणे
दरम्यानगत करणे - जामीनकी पत्करणे, मध्यस्थी करणे
दरम्यान घालणे - मध्यस्थी करावयास लावणे
दरम्यान पडणे/ येणे - मध्यस्थी करणे
दरयाफ्त करणे - समजावून घेणे, आकलन करणे
दरफ्ती करणे - विचारविनिमय करणे
दरयाफ्ती होणे - विचार होणे
दरवाजा कोंडणे - प्रवेश बंद करणे
दर्या लागणे - जलप्रवास सहन न होणे
दस्त करणे - धरणे, कैद करणे, हस्तगत करणे
दस्तगिरी करणे - मदत करणे
दस्त बसविणे - अंमल बसविणे,सत्ता प्रस्थापित करणे, सारा बसविणे
दस्तावेज होणे - मुठीत सापडणे, पंजात सापडणे
दस्तूर सोडणे - प्रचलित नियमांविरुध्द वागणे
दहशत (धाशत) खाणे - घाबरणे, धाक बसणे
दहशत घेणे, पडणे, बसणे - घाबरणे, धाक बसणे
दाखल होणे - हजर होणे
दाखला घेणे - धडा घेणे
दाखला पुरणे - आधार सापडणे, पुरावा उपलब्ध होणे
दाखल्यास उतरणे - प्रचीती येणे
दाणा नसणे - अन्नधान्य संपणे
दाद करणे- दखल घेणे
दाद घेणे - दखल घेणे,न्याय देणे
दाद देणे - न्याय देणे ,पसंती/आनंद व्यक्त करणे
दाद न लागणे - न्याय न मिळणे
दाद मागणे - न्यायाची याचना करणे
दामदार ठरविणे - करार करणे , वाटाघाटी करणे
दारू पिकविणे - मद्य तयार करणे
दावा असणे - भांडण/ वैर असणे, हक्क असणे
दावा उगवणे/ घेणे - सूड घेणे
दावा तोडणे - कज्जा मिटविणे
दावा धरणे - वैर करणे

दावा लावणे,सांगणे - हक्क सांगणे
दावा साधणे - सूड उगविणे
दावा सुटणे - वाद मिटणे
दास्तान करणे - साठविणे
दिकत करणे - अडथळा आणणे
दिक होणे - खिन्न होणे
दिक्कत पडणे - अडथळा होणे
दिरिंग लागणें - उशीर होणे
दिल करणे - सख्य करणे
दिलजमाई करणे, होगे - सख्य होणे
दिलदिलासा देणे/करणे - धीर देणे, सान्त्वन करणे
दिल फाटणे - बेचैन होणे
दिलभरी करणे - विश्वास निर्माण करणे
दिलात नसणे - इच्छा नसणे
(साफ)दिलाने बोलणे - स्वच्छ मनाने उघड उघड बोलणे,मनात वैरभाव न ठेवता बोलणे
दिलासा करणे - हुरूप आणणे
दिवाण देणे - सरकारी कर किंवा सारा देणे
दिवाण पाहणे - वाद न्यायालयात नेणे
दिवाळखोर होणे - कफल्लक होणे
दीन चालती करणे/बोलणे - 'दीन' म्हणून युध्दगर्जना करणे
दीलभरी  करणे - सान्त्वन समाधान करणे
दुकानदारी करणे - बाजार मांडणे
दुकान पसरणे -पसारा मांडणे
दुकान माजवणे - दंगा करणे, गोधंळ करणे
दुकान मोडणे - व्यापार बंद करणे
दुकान वाढणे - व्यापार भरभराटीस येणे
दुमची उचलणे - उचलबांगडी करणे
दुमची पुरविणे - पिच्छा पुरविणे
दुमची सोडविणे - नामोहरम करून घालवून देणे
दुम निघणे - फार कष्ट होणे
दुमाला धरणे - आश्रय घेणे
दुमाला पुरविणे - संबंध तोडणे
दुमाल्यावर असणे - पाठपुरावा करीत जाणे
दुमाल्यावर पाठविणे - पाठलागासाठी / शोधासाठी पाठविणे

दुमाल्यास लावणे - पुस्ती जोडणे
दुरअमल होणे - वाईट वर्तन/व्यभिचार करणे
दुरबीण लावणे - दूरदर्शक यंत्राने पाहणे
दुरस्त वागणे - व्यवस्थितपणे वागणे
दुवा करणे - (फा. दुआ कर्दन् ) प्रार्थना करणे
दुवा देणे - आशीर्वाद देणे
दुष्मनी धरणे - वैर बाळगणे
दुस्मनीवरी येणे - वैर बाळगणे
दुही पडणे - फूट पडणे
दूर धरणे - एखाद्याबद्दल उदासीन राहणे
दोस्ती करणे - सख्य करणे
दोस्ती कायम करणे - स्नेहबंध दृढ करणे
दोस्ती चालणे - सख्य असणे,
दोस्ती जुळणे - सख्य होणे
दोस्तीत किलाफ/ खलेल येणे - स्नेहात वितुष्ट येणे
दोस्ती मानवणे - दोस्ती जमविणे
दौलत करणे - राज्य करणे
दौलत खाणे - राज्य नष्ट करणे
दौलत चालविणे - राज्यकारभार करणे
दौलतजादा देणे - जास्त पैसा देणे, बढती देणे,बैठकीत/ तमाशात कलावंतास पैसा देऊन प्रोत्साहन देणे.
दौलतजादा होणे - सरकारदरबारी प्रतिष्ठा वाढविणे
दौलत बुडणे - राज्य नष्ट होणे
दौलती खेरीज करणे - पदभ्रष्ट करणे, पदच्युत करणे

ध

धास्ती खाणे / घेणे - दहशत वाटणे, भीती वाटणे

न

नकाशा करणे - योजना करणे
नक्कल करणे - प्रत तयार करणे, दुसऱ्याचा अभिनय करणे, कॉपी करणे
नक्षा उतरणे - शिक्षा देणे, घमेंड जिरणे
नक्षा जमणे - कार्यक्रम/बेत पार पडणे,
नक्षा ठरणे - बेत ठरणे, कार्यक्रम आखणे
नक्षा राखणे - प्रतिष्ठा राखणे, कार्यक्रम/बेत पार पाडणे
नगद होऊन बसणे - दिवाळे निघणे

नगारा करणे - नगारा वाजविणे
(पोटाचा) नगारा भरणे - फार जेवणे
नगारा वाजणे - (लोकांत)प्रसिध्दी होणे
नजर असणे - लक्ष ठेवणे
नजर अस्मानास जाणे - गर्विष्ठ होणे, हावभरी होणे
नजर करणे - उपहार/भेट देणे
नजर चढून जाणे - गर्व वाटणे
नजर गुजराईस करणे - अवलोकन करणे
नजर गुजार करणे - परीक्षा पाहणे
नजर जाणे - पाहणे, दिसणे
नजर टाकणे - वरवर पाहणे
नजर ठीक नसणे - हेतू चांगला नसणे
नजर दाखविणे - अभिवादन करणे
नजर देणे - लक्ष ठेवणे, काळजी घेणे
नजर धरणे - इच्छा करणे
नजर न पुरणे - दृष्टीच्या कक्षेबाहेर असणे
नजर पडणे - दिसणे
नजर पोहोचणे - लक्ष घालणे
नजर फाकणे/फाटणे - हाव वाढणे
नजर फिरणे - प्रवृत्ती बदलणे
नजरबंद करणे - कैद करणे,स्थानबध्द करणे
नजरबंदी करणे - मोहिनी टाकणे, वश करणे
नजरबंदीत ठेवणे - स्थानबध्द करणे
नजर मरणे - सवयीचे होणे, त्याविषयीची संवेदना नाहीशी होणे
नजर मेजवानी करणे - भेट देऊन आतिथ्य करणे
नजर लागणे - दृष्ट लागणे
नजराणा करणे - भेट देणे
नजरानजर होणे - एकमेकास पाहणे
नजरेत आणणे - दृष्टीसमोर ठेवणे,ताब्यात ठेवणे
नजरेत धरणे - पर्वा करणे ,किंमत देणे
नजरेत भरणे - मनात ठसणे, पसंत पडणे
नजरेने पाषाण उलणे - वाईट नजर असणे
नजरेने पाहणे - आढळात येणे
नजरेस आणणे - दृष्टोत्पत्तीस आणणे

नजरेस नजर एक होणे - एकमेकांस पाहणे
नजरेस पडणे -दिसणे
नजरेस येणे - दिसणे, लक्षात येणे
नतीजा देणे -पारिपत्य करणे, शिक्षा करणे
नमुदास आणणे - नावारूपास आणणे , दाखविणे
नमूद करणे - नोंद घेणे
नरम गरीब बोलणे - नम्र भाषण करणे
नरम पडणे - मवाळ होणे, गर्वाचा पारा उतरणे
नरम येणे - मवाळ होणे,गर्वाचा पारा उतरणे
नवाजीस करणे - सन्मान करणे
नशा/ नशापणी करणे - अमली पदार्थाचे सेवन करणे
नशियत करणे - शिक्षा देणे, उपदेश देणे
नशीब उघडणे / फळफळणे - भाग्योदय होणे
नशीब फुटणे - आपत्ती येणे
नस्तर मारणे - कापणे
नाकाबली येणे - अपकीर्ती होणे
नाकिर्दीस येणे - ओसाड पडणे
नादानी येणे - अपकीर्ती होणे
नानपरवेशी देणे - सरकार चाकरीवर कोणी प्राणास मुकला असता त्याच्या बायकामुलांस उदरनिर्वाहासाठी उत्पन्न देणे.
नामजदी करणे - नेमणे
नामजादी पडणे - स्वारी होणे
नामुरादी येणे - अपयश येणे
नामोशी जाणे, येणे - अपकीर्ती होणे
नामोहरम करणे - पराभूत करणे
नारा नाचणे - एकाद्याचा पक्ष वरचढ होऊन त्याचाच गोंधळ सुरू असणे
नालबंदी चढणे - (पगाराची इ.) बाकी थकणे
नालबंदी चुकविणे - (पगाराची इ.) रक्कम देणे
नालबंदी वाटणे - मोहिमेवर जाताना शिपायांना खर्चासाठी आगाऊ रक्कम देणे
नालस्ती करणे - निंदा करणे, बदनामी करणे
निका लावणे - विवाह करणे
निसालसता करणे - खात्री पटविणे, निराकरण करणे
निगादास्ती करणे - काळजी घेणे, व्यवस्था करणे
निगाहबानी करणे - संरक्षण करणे

निमक खाणे - आश्रयास असणे
निमक खाण्याची शर्त करणे - खाल्ल्या मिठास जागणे
निमक हरामी करणे - कृतघ्न होणे
नियतशाबूदी करणे - वचन देणे
निशा करणे - पारिपत्य करणे, अदल घडविणे
निशाणी होणे - हद्द होणे
निशा देणे - सावकाराने ऐवज (रक्कम) पोहोचता करण्याची हमी देणे
नूर पालटणे - रंग/प्रवृत्ती बदलणे
नेपा सारणे - सरसावणे, पण करणे
नेस्तनाबूत करणे - नष्ट करणे, उध्वस्त करणे
नोकरी बजावणे - कामगिरी पार पाडणे
नौबत करणे/ काढणे - (नगारा वाजवून ) लढाईची सूचना देणे
नौबत गुदरणे - अरिष्ट येणे, प्रसंग गुदरणे
नौबत झडणे - नगारा वाजणे, कुचाची सूचना मिळणे.
नौबत पोहचणे - प्रसंग येणे, पर्यंत अवस्था येणे
नौबत येणे - प्रसंग येणे
नौबत होणे - नगाऱ्याने सूचना मिळणे
नौबत वाजविणे - चालून जाण्याची सिध्दता करणे
नौबतीवर गुजरणे - संकटात पडणे
न्याहाल करणे - कृपा करणे

प

पंजा चालविणे - पंजाने वार करणे
पंजाला येणे - (घोडा, माणूस इ.) तारुण्यात येणे
पडदा उघडणे - एखादी गोष्ट उघड करणे
पडदा उघडाविणे - लाज सोडणे
पडदा करणे - गोशा करणे
पडदा पाडणे - विषय संपविणे
पडदा राखणे - मर्यादा राखणे
(आड)पडद्याने बोलणे - अप्रत्यक्षपणे सुचाविणे.
पर फुटणे - समर्थ होणे
परवरष करणे - पालनपोषण करणे
परवानगी जाणे - हुकूम होणे, अनुज्ञा मिळणे
परागंदा करणे - घरदारास मुकविणे
पराचा कावळा करणे - लहान गोष्ट फुगवून सांगणे

पर्दाफाश करणे - रहस्य- स्फोट करणे, रहस्य उघड करणे
पर्वा ठेवणे - तमा/ भीडभाड बाळगणे
पलंग धरणे - आजारी पडणे
पलिता लागणे - मशाल पेटणे
पल्ल्यावर असणे - एखाद्याच्या वाईटावर असणे
पल्ल्यावर आणणे - वाटेवर, समजुतीवर आणणे
पल्ल्यावर ठेवणे - विचारात घेणे, लक्ष देणे
पल्ला गाठणे - मजल मारणे
पल्ला घेणे - पळ काढणे
पल्ला देणे - अवसर देणे
पल्ला निघणे - अंतर तोडणे
पल्ला राखणे - पक्के जाणणे
पल्ले लावून पाहणे - (किती लांबीवर गोळा पडतो त्याचा)अंदाज घेणे
पसंत पडणे - आवडणे
पसंत वाटणे - आवडणे
पस्त करणे - विनाश करणे
पस्त खाणे - फन्ना उडविणे
परस्त चोरणे - लुबाडणे,नागविणे
परस्त जाळणे - जाळून राख करणे
पागी होणे - (घोड्यावर ) स्वार होणे
पागेस लागणे - एखाद्याच्या धोरणाने वागणे
पातशहात करणे - राज्य करणे
पायपोस देणे/मारणे - फार अपमान करणे
पायबंद घालणे - नियंत्रणात ठेवणे, आटोक्यात ठेवणे
पायबंद बसणे - वचक बसणे, आळा बसणे
पायमल्ली/पायमाली करणे - नुकसान करणे
पायाब होणे - (पायाने प्रवाह पार करता येण्याजोगा ) उतार होणे
पालखीत बसणे - योग्यता / महत्त्व वाढणे
पालखी मेळविणे - सन्मान प्राप्त करणे
पालाण घालणे - (खोगीर चढविणे) स्वामित्व प्रस्थापित करणे
पासंगास देणे - भर टाकणे
पासंगास न पुरणे - फार कमी योग्यतेचे असणे
पासंगी आणणे - महत्त्व देणे
पासंगी न आणणे - कमी लेखणे

पीरमूर्छाचे स्मरण करणे - स्मरण करणे
पुरजे पुरजे होणे - चुराडा होणे, नाश होणे
पुलावा खाणे - भ्रष्ट होणे
पुस्तपन्हा असणे - पाठराखण करणे, साहाय्य असणे
पूल करणे (फा.पूल् कर्दन्) - पूल बांधणे
पेच असणे - वैर असणे
पेच पडणे - संकट, अडचण येणे
पेचाटी पडणे - संकट कोसळणे
पेचात आणणे - संकटात टाकणे
पेचात येणे - काळजी वाटणे
पेश करणे - सादर करणे
पेश जाणे - यशस्वी होणे , पुढे जाणे,उन्नत होणे
पेशवाई चालणे - (वंशपरंपरेने) पेशवेपद मिळणे
पेशवाई होणे - पेशवेपद मिळणे
पैगाम करणे - संधान बांधणे, काररस्थान करणे
पैगाम लावणे - वाटाघाटी , बोलणे करणे,
पैजारा मारणे - जोडे मारणे, अपमान करणे
पैजारेने घेणे - लाथ मारून घेणे, सहज घेणे
पैरवी करणे - अमलात आणणे, पालन करणे
पैरवी सांगणे - व्यवस्था सोपविणे
पैरवीस लागणे - पाठलाग करणे
पोशाख करणे - वस्त्रे नेसणे
पोशाख देणे - सन्मानार्थ उंची वस्त्रे देणे
प्यादे होणे - (प्यादे पुढे सरकल्याने) राजाचा कोंडमारा होणे
प्याद्याचे फर्जीपणास येणे - रंकाचा राव होणे
प्याला घेणे - मुसलमान होणे, धर्मांतर करणे
फकीरी घेणे - संन्यासाची दीक्षा घेणे
फज्जा करणे - फजिती करणे
फज्जाला पोहचणे - ठरलेले ठिकाण गाठणे
फड टाकणे - हिशेब-तपासनिसाची किंवा कारकुनाची कचेरी थाटणे
फडशा पाडणे - संपविणे/फन्ना उडविणे
फत्ते करणे/मिळविणे - जिंकणे, विजय मिळविणे
फत्तेकाम करणे - उत्कृष्ट कामगिरी करणे
फंद दिसणे - फितुरीचा संशय येणे

फंदफितूर करणे - स्वामिद्रोहास प्रवर्तणे, कृतघ्नपणाचे वर्तन करणे
फंद होणे - बंडाळी माजणे
फंडात पडणे - प्रकरणात, भानगडीत पडणे.
फरक करणे - भेदभाव करणे
फरक होणे - बाजूला होणे
फरागत होणे - मुक्तता होणे
फरार होणे - पळून जाणे, बेपत्ता होणे
फरारी करणे - पळवून लावणे, पराभूत करणे
फरारे होऊन पळणे - भीतीने पळणे
फरेब देणे - फसविणे
फरोक्त करणे - विकणे, देऊन टाकणे
फाके होण्यापर्यंत गुरजणे - (उपवास घडण्यापर्यंत )वाईट दशा प्राप्त होणे
फात्या देणे - प्रार्थना करणे.
फांदा मारणे - लुबाडणे, घबाड मिळविणे
फांद्यात पाडणे - गोंधळात घालणे,घोटाळा करणे
फारकत होणे - वेगळे होणे, घटस्फोट घेणे
फिकिरीत असणे - काळजी असणे
फितुरात घेणे - बंडात सामील करून घेणे
फितूर सापडणे - बंडाळीचे बिंग फुटणे
फित्रत होणे - निर्नायकी होणे
फिसाद वाढणे - भांडण विकोपास जाणे
फुरसत होणे - सवड मिळणे
फुरसत होणे - संधी सापडणे, सवड मिळणे
फैल करणे - चाल करणे,अंमल बसविणे
फैलावर घेणे - कानउघाडणी करणे
फैसला करणे - निकाल लावणे, मिटवून टाकणे
फौज धरणे - सैन्य- भरती करणे
फौजनशीन होणे - सैन्यासह सज्ज होणे
फौज फेडणे - सैन्याची तयारी करणे
फौजबंदी करणे - सैन्याची तयारी करणे
फौजेची फरारी होणे - फौज उधळून जाणे, पळून जाणे
फौजेने चोळले जाणे - फौजेकडून उपद्रव होणे
फौत होणे - मरणे

ब

बकरकुदीवर येणे - लढण्यासाठी निकरावर येणे

बगल दाखविणे - जबाबदारी टाळणे

बगल देणे - डावलणे

चा बगलबच्चा असणे - चा हस्तक असणे

बगल मारणे - सैन्याची एक बाजू मोडून काढणे

बगला वर करणे - जबाबदारी टाळणे

बगलेत असणे - मुठीत असणे

बगलेत घेणे - सामील करून घेणे

बगलेत मारणे - हस्तगत करणे, दाबून बसणे

बतर्फ होणे - बडतर्फ होणे

बदअमल करणे - जुलूम करणे, व्यभिचार करणे

बदनजर धरणे - (मनांत) वाईट वासना बाळगणे

बदनजर पडणे - वाईट दृष्टी पडणे

बदनक्ष होणे - अपकीर्ती होणे

बदनक्षा करणे - बदनामी करणे, योजना पार पडू न देणे

बदनियत ठेवणे - (मनात) वाईट वासना असणे

बदमामली करणे - वाईट वर्तन करणे

बदमामलीस येणे - वाईट वर्तन करणे

बदमामलीस येणे - उलटणे

बदल खाणे - उलटणे

बदल देणे - ऐवजी देणे, खर्चासाठी देणे

बदसल्ला देणे - चुकीचा मार्ग दाखविणे

बंदगी बजावणे - वंदन करणे

बंदर करणे - जहाज नांगरणे

बंदर वाहणे - तुफानामुळे बंद झालेले बंदर खुले होणे

बंदी घालणे - मनाई करणे

बंदूक उडणे - बंदुकीतून गोळी सुटणे

बंदोबस्त पाहणे - व्यवस्था करणे

बयाण अर्ज करणे - निवेदन करणे

बयाणा बांधणे - विक्रीच्या जिनसांवर मालकाची मोहोर करणे

बयाद लावणे- आक्षेप करणे.

बरकत सोडणे - जमिनीचा कस गमावणे

बरखास्त होणे - संपणे, विसर्जन होणे

बरतर्फी घेणे - नोकरी सोडणे
बरदास्त करणे - शुश्रुषा,व्यवस्था,आतिथ्य करणे
बरदास्त ठेवणे - व्यवस्था करणे, आदरातिथ्य करणे
बरबाद होणे - नष्ट होणे
बरयाब होणे - उपस्थित होणे, हजर होणे
बरामद होणे - (एखाद्या गोष्टीत)भाग घेणे
बरी करणे - मर्दुमकी करणे
बरोबर होणे - पूर्णपणे संपणे, चुराडा होणे, एकसारखे होणे
बरोबरी करणे - तुलना करणे
बर्दास्त करणे - पाहुणचार/व्यवस्था करणे
बलाय येणे - इडापिडा टाळण्यासाठी बोटे मोडून दृष्ट काढणे
बला येणे - संकट येणे
बलागीर होणे - सरशी होणे, वरचष्मा मिळविणे
बलादुरी देणे - संकट दूर व्हावे म्हणून काही पदार्थ वा प्राणी ओवाळून टाकणे
बशारत होणे - दृष्टान्त होणे, पूर्वसूचना मिळणे,
बस्तान बसणे - जम बसणे, घडी बसणे
बस्तान बिघडणे - व्यवस्था/घडी बिघडणे
बहर मारणे - चैन करणे
बहाणा करणे - खोटी सबब सांगणे
(मर्जी)बहाल करणे - प्रसन्न असणे
बहाल करणे - देणे
बहाली करणे - भर देणे
(बळीचा) बकरा करणे - निरपराध मनुष्याला शिक्षा करणे, दानाला देणे
बाकी ओढणे - येणे असलेली रक्कम वहीवर नोंदविणे
बाकी ठेवणे - मर्यादेने वागणे,पूर्ण रक्कम न देणे
बाकी थकणे - येणे असलेली रक्कम न मिळणे
बाकी न ठेवणे - भीडभाड न राखणे, कर्ज फेडणे
बाग पाडणे - बागेतील सर्व नारळ पाडणे, फळांचा पाडा करणे
बांग देणे/पुकारणे - पुकारा,प्रार्थनेला बोलावण्याचा पुकारा करणे
बाज खाणे - भीती घेणे, धास्ती वाटणे
बाजगर्दन करणे - दिलेले परत घेणे
बाजार आटोपणे - सारे संपणे
बाजार करणे - जिन्नस खरेदी करणे
बाजार भरणे -गोंधळ होणे

बाजार भरविणे - अनावश्यक माणसे जमविणे
बाजार माजणे - गोंधळ होणे
बाजार मांडणे - पैशासाठी हवे ते करणे
बाजी अंगावर येणे - बाजू उलटणे
बाजी जाणे - फजिती होणे, अप्रतिष्ठा होणे
बाजी देणे - हरविणे
बाजी राखणे - प्रतिष्ठा सांभाळणे, बाजू राखणे
बाजी शिरे करणे - आपली सरशी करणे, आपला पक्ष प्रबळ करणे
बाजीस चालणे - बाजूस चालणे,बरोबर चालणे.
बाजू मारणे -सरशी करणे
बाजू राखणे - कड घेणे, सावरणे
बाजू राहणे - प्रतिष्ठा/पत राहणे
बाजूला बसणे - विटाळशी असणे
बातमी असणे - माहीत असणे
बातमी नसणे - माहीत नसणे
बातमी फोडणे - गुप्त गोष्ट उघड करणे
बातमी येणे - वार्ता कळणे
बातमी लागणे - वार्ता कळणे
बातमी लिहिणे - वार्ता कळविणे
बातमी राखणे - माहिती मिळविणे, टेहळणी करणे
बातमीस पाठविणे - माहिती मिळविण्यासाठी पाठविणे, वार्ता हस्तगत करण्याच्या कामगिरीवर पाठविणे
बादशाहत करणे - राज्य करणे
बायको करणे - विवाह करणे
बार उडवणे - काम फत्ते करणे, विवाह करणे
बार करणे - बारनिशीत नोंदविणे, संपाविणे
बार देणे - सम्मती देणे, शिकवून ठेवणे
बारनिशी करणे - कागदपत्रात नोंदविणे
बार भरणे - बंदुकीत दारू ठासणे, चिलिमीत तंबाखू भरणे, तंबाखू खाणे
बारसीर करणे - वंदन करणे
बारीक बातमी कळणे - गुप्त गोष्ट कळणे
बारी धरणे - वाट रोखून धरणे
बिदागी करणे - पाठविणे
बिदागी देणे - मानधन देणे

बिनी बरसणे - आघाडीवर असणे
बिशाद नसणे - किंमत / प्राज्ञा नसणे
बुरजात जाणे - (बुद्धिबळात) राजा हतीच्या पलीकडे जाणे
बेअदबी बोलणे - अपमान करणे
बेअब्रू करणे - अपकीर्ती / बदनामी करणे
बेआदब माफ करणे - अपराधाची क्षमा करणे
बेआब होणे - अपकीर्ती होणे
बेआरामी होणे - अस्वस्थ होणे
बेइमान होणे - कृतघ्न होणे
बेइमानी करणे - कृतघ्न होणे
बेकिलाफ वागणे - मनात किंतू न ठेवता वागणे
बेकैद होणे - स्वैर वागणे
बेकैदी करणे - स्वैर वागणे
बेखबर असणे - गाफील असणे
बेगमी करणे - गोळा करणे, संग्रह करणे
बेगमी होणे - सुबत्ता होणे
बेचिराख होणे - उध्वस्त,ओसाड होणे
बेतन्हा होणे - अस्वस्थ होणे
बेदखल होणे - बडतर्फ होणे
बेदिल होणे - अस्वस्थ होणे
बेपडदा करणे - अपमान करणे
बेफाम होणे - बेसावध होणे,आटोक्यात न राहणे
बेबदल होणे - फितूर होणे
बेबहा होणे - बेभान होणे
बेमर्जी होणे - असंतुष्ट होणे
बेरोख होणे - बिघडणे
बेहाल होणे - दुर्दशा होणे
बेहिंमत होणे - धीर सोडणे
बेहुकुमी होणे - गैरशिस्तीचे वर्तन करणे
बेहुशार होणे - गाफील असणे
बैतलमाल होणे - बेवारशी होणे, सरकारजप्त होणे
बैद होणे - दाखल होणे
बोऱ्या उडणे/वाजणे - अप्रतिष्ठा होणे, फजिती होणे, पराभूत होणे

भ

भाईदारी करणे - दोस्ती करणे, आश्रय घेणे

म

मकानात येणे - आटोक्यात येणे, टप्प्यात येणे,

मखलाशी करणे - खोटे समर्थन करणे

मजबुदी करणे - व्यवस्था / बंदोबस्त करणे,बळकट करणे

मजरा देणे - वजा घालणे, परतवून लावणे

मजरा होणे - मान्यता मिळणे, मान्य होणे

मजल मारणे - महत्त्वाचा टप्पा गाठणे

(सातव्या) मजल्यावर बसणे - उच्चपदी बसणे, दिमाख मिरविणे

मजा मारणे - चैन करणे

मंजा उतरणे - दृष्ट काढणे

मतलब हजर करणे - सांगणे, विचार मांडणे

मतलबावर गरज ठेवून वागणे- स्वार्थीपणाने वागणे, स्वार्थ साधणे

मदतीस जाणे - साहाय्य करणे

मदतीस पाठविणे - साहाय्य करणे

मदार असणे - अवलंबून असणे

मनमुराद वागणे - मनसोक्त वागणे, वाटेल तसे वागणे

मनसबा चालणे - विचारविनिमय / बेत करणे

मनसबा ठेवणे - विचार निश्चित करणे

मनसुबा विचारणे - काय योजना करावी हे ठरविणे

मरातबास आणणे - प्रतिष्ठा प्राप्त करून देणे

मरातिब मेळविणे - मानसन्मान प्राप्त करुन देणे

मर्जी खपा राहणे/ होणे - रागावणे ,नाराज होणे

मर्जी जाणे - मत वाईट होणे, अप्रसन्न होणे

मर्जीतून उतरणे - विषयी मत वाईट होणे

मर्जी दिक असणे - बरे न वाटणे

मर्जी नाखुश होणे - इतराजी होणे

मर्जीने वागणे - इच्छेप्रमाणे वागणे

मर्जी बसणे - आवडणे, विश्वास बसणे

मर्जी बहाल होणे - प्रसन्न होणे

मर्जी मोडणे - मनाविरुध्द वागणे

मर्जी रक्षणे/राखणे- असलेला लोभ /कृपा टिकविणे

मर्जीस येणे - आवडणे, मान्य असणे

मर्जी संपादन करणे - विश्वासास पात्र ठरणे
मेदुमकी करणे - शौर्य गाजविणे
मर्दुमी करणे - शौर्य गाजविणे
मर्दुमी चालविणे - शौर्य गाजविणे
मलई करणे - बंडखोरी करणे
मलकूफ करणे - आत घालून बंद करणे
मलिदा करणे - तुडविणे, नाश करणे
मलिदा मिळणे - लाभ होणे
मवकूफ करणे - तहकूब करणे
मवाफिकत करणे -मानवणे
मवाशी करणे - पुंडावा करणे
मशागत करणे - मेहनत करणे, पराक्रम करणे
मशाल पाजळणे - प्रसिध्दी पावणे
मसनतीवर बसणे - राज्यकारभार करणे
मसलत उघडी होणे - (गुप्त ) योजना कळणे
मसलत उभी करणे - मोहिमेची योजना करणे
मसलत करणे - विचारविनिमय करणे , हल्ला/स्वारी करणे
मसलत काबूस येणे - अडचणीत येणे
मसलत देणे - सल्ला देणे
मसलत पडणे - मोहीम अयशस्वी होणे, पंचाईत होणे
मसलत शेवटास नेणे - मोहीम पार पाडणे
मसाला देणे - खर्चासाठी पैसा देणे
मसुदा करणे - कच्चा खर्डा तयार करणे
मस्करीची कुस्करी होणे - थट्टेमुळे अनर्थ होणे
महसरा देणे - वेढणे, घेरणे
महसली करणे - तगाद्यासाठी पाठविणे, तगादा करणे
महामुरी होणे - पूर्ण दुर्भिक्ष्य होणे
महासरा देणे - वेढणे, घेरणे
महाल करणे, महालाला जाणे - (राजाने) अंतःपुरात संभोगसुखासाठी जाणे
महालमजकुरावर लोटणे - पुढे ढकलणे, टाळाटाळ करणे
महाली (माली) - मुलकी लिहीणे - महालाचा व इतर प्रदेशाचा जमाखर्च लिहिणे
मागमूस मुद्दा मोडणे - पुरावा नाहीसा करणे
माजी होणे - बडतर्फ होणे
मात करणे - डाव जिंकणे , विजय मिळविणे

मात खाणे - पराजित होणे
मातंगपोशीस येणे - सान्त्वन करण्यासाठी येणे
मात पोख्ती करणे - बोली किंवा करार पक्का करणे
मातम्पुर्शी करणे - सान्त्वन करणे
मामलत करणे/सांगणे - तालुक्यातील किंवा प्रदेशविशेषातील कारभार पाहण्यास सांगणे, नेमणे
मामला बुडणे - नुकसान होणे,काम न होणे
मामला होणे - प्रसार होणे
मामुल चालत येणे- रीत / वहिवाट असणे
मामूर करणे - वसविणे, भरविणे
मारबत खोदणे - हाकून लावणे
मार्फत योजणे - मध्यस्थी करणे
माल खाणे - पक्वान्ने खाणे,फायदा घेणे
माल वघरणे -चांगले पीक येणे
मालाचा माल करणे - कवडीमोल करणे, निरुपयोगी करणे
मालाचा माल राहणे - अप्रतिष्ठा होणे
मालामाल होणे - संपन्न होणे,खूप संपत्ती मिळणे
मालुमात उध्दारणे - मुद्दे किंवा माहिती उतरून घेणे
मांहीत करणे - सांगणे
माहीतगारी सांगणे - माहिती सांगणे
माहीमरातब देणे - सन्मान करणे
मिजाज कायम ठेवणे/ राखणे - असलेला लोभ, कृपा टिकविणे
मिजाशीत येणे - गर्व होणे
मिजास करणे - ऐट/ दिमाख करणे
मिजास जाणे - इतराजी होणे
मिनतमाना करणे - मनधरणी करणे
मिरास पुरणे - (धन इ.) दडवून ठेवणे
मिसलदारी करणे - दर्जेबंदी करणे
मिसलीत उभे राहणे - (दरबारात) दर्जाप्रमाणे उभे राहणे
मुकाबला करणे - सामना देणे
मुकाबला घालणे - सामना देणे
मुकाबला लागणे - सामन्यास /युध्दास प्रारंभ होणे
मुकाबला होणे - युध्द होणे

मुकाबल्यास जाणे - युध्दासाठी/ सामन्यासाठी निघणे
मुक्काम उठवणे - निघून जाणे
मुक्काम करणे - राहणे
मुक्काम जमविणे - लष्कराच्या तळाची आखणी करणे, व्यूह- रचना करणे
मुखजबानी सांगणे - तोंडी सांगणे
मुखत्यार नसणे - हक्क/अधिकार नसणे
मुजरा- आदब करणे - वंदन करणे
मुजरा घेणे - वंदन स्वीकारणे
मुजरा देणे - संमत करणे
मुजरा धरणे - नेम धरणे
मुजारत करणे - मनधरणी करणे
मुडदा पाडणे - ठार करणे,निकाल लावणे ,नायनाट करणे
मुतालेत आणणे - अवलोकन करणे, लक्षात घेणे
मुतिफत होणे - एकत्र येणे, एकवटणे
मुदत मागणे - सवलत मागणे
मुदलावर येणे - मूळ स्वभावाप्रमाणे वागणे
मुदा साख्त करणे - मुद्दा खरा करून देणे
मुद्दा शाबूत करणे - आपले म्हणणे खरे करणे
मुद्दा हाशील होणे - मुद्दा शाबीत होणे
मुनादी मिरविणे - जाहीर करणे
मुबारक करणे - इनाम देणे
मुरवत ठेवणे - भीडभाड बाळगणे
मुरवत न पडणे -भीडभाड न बाळगणे
मुलखात दिवा लावणे -निर्जन प्रदेशात वस्ती करणे
मुलखावर जाणे - परागंदा होणे
मुलखास जाणे - मायदेशी परतणे
मुलाहिजा करणे - भीड बाळगणे, प्रतिष्ठा राखणे
मुलूख उठणे - प्रदेश ओसाड होणे
मुलूख खाणे - प्रदेशाचा वसूल घेणे
मुलुखगिरीस जाणे - स्वारीस निघणे
मुलूख चोळवटणे - प्रदेशाची पायमल्ली करणे, खराब करणे
मुलूख लावून देणे - फौजेच्या खर्चासाठी इ. प्रदेश तोडून देणे
मुलूख सोडविणे - प्रदेश मुक्त करणे
मुशाहिरा करणे - पगार देणे

मुसलमान करणे - बाटविणे, इस्लाम धर्माची दीक्षा देणे
मुसलमानी करणे - इस्लाम धर्म किंवा इस्लामी राज्य प्रस्थापित करणे
मूठमर्दी करणे - जबरदस्ती, धिटाई करणे
मेख घेणे - वेठीस धरून काम करून घेणे
मेख ठेवणे - खोच ठेवणे, उणीव ठेवणे
मेख बसणे - अडवणूक करणे
मेख मारणे -अडवणूक करणे
मेखा उचलणे - घालवून देणे
मेखा घेणे - सूड घेणे
मेखाटीस बसणे - पाठीस लागणे
मेखेवर बसविणे - वाईट वागणे
मेजवानी करणे - भेट देणे, थाटाचे जेवण देणे
मेण करणे - म्यानात घालणे, (तरवार म्यानात घालणे)
मेण काढणे - खूप झोडपणे
मेण खस्त होणे - लठ्ठ होणे
मेण होणे - नरमणे, शांत होणे, नमणे
मेहनत पडणे - कष्ट सोसावे लागणे
मेहमानगी करणे - आतिथ्य करणे
मेहमानी करणे - आतिथ्य करणे
मेहरबानी करणे - कृपा करणे
मैदान बसणे - निसर्ग- शोभा पाहण्यासाठी मैदानात बसणे
मोकाबला देणे - सामना करणे
मोगलाई करणे -मोगलांचे राज्य प्ररथापित करणे
मोगलाई मसलत करणे - लबाडीने विश्वास दाखवून घात करणे
मोगलाई होणे - अन्यायाची अंदाधुंदीची अवस्था असणे
(अन्नास) मोताद होणे - खावयास अन्न न मिळण्याइतकी वाईट दशा प्राप्त होणे
मोदीखाना चालणे - सैन्यास धान्याचा पुरवठा होणे
मोबदला करणे - उट्टे काढणे, उसने फेडणे
मोमदिल असणे - मऊ,लवचिक मनाचा असणे
मोरीवर (फा.मूरी) जाणे - लघवीस जाणे
मोर्तब करणे - सिध्द करणे, 'मोर्तब शुद' असे शब्द असलेला शिक्का मारणे
मोर्चा निघणे- (संबंधित व्यक्ती वा कार्यालय यांच्याकडे )विशिष्ट मागणी करण्यासाठी जमलेल्या लोकांनी एकत्र येणे
मोर्चे चोपणे - हल्ला करून मोर्चे उठविणे किंवा मारणे

मोर्चे चोपणे - सिध्दता करणे
मोर्चे बांधणे- सिध्दता करणे
मोर्चे लावणे - (तोफा) डागण्यासाठी तयारी करणे
मोहरा धरणे - मवाळपणे वागणे
(लढाईचा) मोहरा लागणे - (लढाईस) तोंड लागणे, प्रारंभ होणे
मोहला घेणे - आव्हान स्वीकारणे,धडक घेणे
मोहला पावणे - हल्ला करणे
मोहल्यावर जाणे - हल्ल्यास जाणे
मौज पाहणे -तटस्थपणे दुरून गंमत पाहणे
मौत विकत घेणे - संकट,ओढवून घेणे
(तरवार) म्यान करणे - (तरवार )म्यानात घालणे

य

याद देणे - आठवण करून देणे
येतराज होणे - इतराजी होणे
येल्गार करणे - हल्ला करणे
यैवज-चिठी/उतरणे - ऐवज किंवा रक्कम द्यावी असे पत्र वा हुंडी विशिष्ट गावच्या पेढीस किंवा सावकारास देणे

र

रकमेवर ठेवणे - जागच्या जागी काबूत ठेवणे
रकमेस येणे - जेर होणे, किंमत चढणे
रकान्यावर येणे - जोर येणे
रकान्यास येणे - किंमत येणे
रग उतरणे - नमणे
रग जिरविणे - खोड मोडणे
रग लागणे - शारीरिक त्रास होणे , कळ निघणे
रग लावणे - पिळणे
रंगात हमरंग होणे - सामील होणे
रजा देणे - परवानगी देणे
रंजक खाणे/पिणे - (दारू जळून) बार न उडणे,काम न होणे
रंजक झडणे - फैर झडणे, भांडण सुरू होणे
रंजक देणे - प्रोत्साहन देणे
रंजीस करणे - अडथळा करणे, कष्टी करणे
रंजीस येणे - त्रस्त होणे
रफेदफे करणे - निवाडा/निकाल/निरवानिरव करणे

रबाब जमणे - वचक बसणे
रबाबा पाडणे - सूट दणे, क्षमा करणे, भीड बाळगणे
रयेतगिरीने असणे - रयत किंवा प्रजाजन या नात्याने वागणे
रसद चालणे - साहाय्य करणे
रसद बंद करणे - साहाय्य न देणे
रसद भरणे - खंडणी, ऐवज देणे
रसद मारणे - सैन्यासाठी पाठविलेली सामग्री लुटणे
रस्ता धरणे - निघून जाणे
रस्तेबंदी करणे - वाट बंद करणे
रहदारी बंद करणे - वाहतूक थांबविणे
राबता घालणे - स्नेहसंबंध प्रस्थापित करणे
रिवाज पडणे - पायंडा पडणे
रिसाला करणे - घोडदळाची तुकडी ठेवणे
रुईस येणे - प्रघात पडणे
रुकसत होणे -जाणे
रुकार असणे - सम्मती मिळणे
रुख घेणे - तोंड देणे
रुख न देणे - समोरासमोर न बोलणे ,लक्ष न देणे
रुख मिळविणे - समेट करणे
रुख्त होणे - रुखसत होणे, निरोप घेणे
रुजवात घालणे - कबुली देणे, मान्यता देणे
रुजू घालणे - ताडून पाहणे
रुजू पडणे - मान्य होणे
रुजू होणे - (कामावर) हजर होणे, मान्य होणे
रुबाब करणे - ऐट करणे/ दाखविणे
रुबाब करणे - धाक दाखविणे
रुमाल उडविणे - चवरी वारणे
रुमाल फिरविणे - युध्द थांबविण्याची सूचना देणे
रुस्कत्त करणे - पाठवणे, निरोप देणे,
रुरयात करणे - संकोच करणे
रेज लादणे - रंग लागणे
रेशीम भरणे - रेशमाने नक्षी काढणे
रोखून पाहणे - टक लावून पाहणे
रोजखर्चात लिहिणे - रोज होणाऱ्या खर्चाची नोंद हिशेबात करणे

रोजगार करणे - नोकरी करणे
रोजगारास असणे - नोकरी करणे
(देह) रोजास नेणे - (प्रेत) कबरीसाठी बांधलेल्या वास्तूत नेणे
रोशन करणे - स्पष्ट करणे

ल.

लगाम घालणे - नियंत्रण ठेवणे, आटोक्यात ठेवणे
लगाम लागणे - संबंध जडणे, सूत्र जुळणे
लगामी असणे - ताब्यात असणे
लगामी लावणे - वश करणे, दिमतीस घालणे
लंगर तोडणे - वाघ्याने खंडोबापुढील साखळी तोडणे
लब खाणे - कच खाणे
लश्कराच्या भाकरी भाजणे - नसत्या उठाठेवी करणे
लाचार कायल होणे - निरुपाय होणे, त्रस्त होणे
लाचारी बोलणे - असाहाय्यता प्रकट करणे
लाज (लाईलाज) होणे - निरुपाय होणे असाहाय्य होणे

व

वकीलपत्र घेणे - (एखाद्याची) बाजू मांडणे, समर्थन करणे
वक्त पडणे - संकट, अवघड प्रसंग येणे
वजन पाडणे - छाप पाडणे
वजा करणे - काढून टाकणे
वजीर करणे - प्रधानपद देणे
वरचष्मा गाजवणे - वर्चस्व प्रस्थापित करणे
वरात करणे - हुंडी देणे
वलद होणे - पुत्र होणे
वसवसा खाणे - धास्ती घेणे
वसवसा धरणे - भीती, काळजी वाटणे
वसाहत करणे - (नवीन प्रदेशात) वस्ती करणे, राहणे
वसूल बाकी करणे - येणे असलेली रक्कम वसूल करणे
वहीला जमा करणे - ताब्यात घेणे, आपला समजणे,
वाका होणे - मृत्यू होणे
वाखा करणे - युध्द करणे
(वाट) खर्चास देणे - प्रवासासाठी रक्कम देणे
वापस करणे - न द्यावयाची रक्कम खजिन्यात जमा करणे
वारद होणे - पोचणे

वारसा करणे - हमी पत्करणे ,साहाय्य करणे
वारिसदारी करणे - वंशपरंपरेने चालविणे
वाहवा म्हणणे - प्रशंसा करणे
विदा करणे - निरोप देणे
विलाश्च डागणे - जमिनीची मोजणी करणे
विल्हे करणे - निकालात काढणे, व्यवस्थित मांडणे
विल्हेस लागणे - बंदोबस्त होणे
विल्हेस लावणे - जम बसविणे

श

शकजादा होणे - भीती घेणे, संशय घेणे
शक्कल सांगणे - उपाय सुचाविणे
शरम ठेवणे - प्रतिष्ठा ठेवणे, राखणे
शरम पार पाडणे - लाज राखणे
शर्त करणे - पराकाष्ठा करणे
शर्त बांधणे - विडा उचलणे,पैज लावणे
शह देणे - बेत यशस्वी न होऊ देणे
शह राखणे - दाबात ठेवणे
शहानिशा करणे - चौकशी करणे,तपास करणे
शहास गुंतणे - वचनबध्द होणे,मोहिमेत व्यग्र असणे
शाई देणे - इसार देणे
शाई घालणे - नाश करणे
शागिर्दी करणे - चाकरीस असणे,सेवा करणे
शान करणे - नष्ट करणे
शाबासकी देणे - अभिनंदन/ प्रशंसा करणे
शाबासकी मिळणे - प्रशंसा होणे
शाबुर्दीत निघणे - जिवंत असणे
शालजोडीतून मारणे - उपरोधाने बोलणे
शास्त करणे - शिक्षा करणे
शिकल उडणे/ उतरणे - तेजोभंग होणे, अप्रतिष्ठा होणे
शिकस्त करणे - जिंकणे,पराकाष्ठा करणे
शिकस्त खाणे - पराभव होणे
शिकस्त होणे - पराकाष्ठा होणे, निरुपाय होणे,पराभव होणे
शिकार खेळणे - शिकार करणे
शिक्का करणे - राजमुद्रा उमटविणे

शिक्कामोर्तब करणे - अंतिम मान्यता देणे
शिपाईगिरीची शर्त करणे - शौर्य गाजविणे, पराक्रम गाजविणे
शिरपाव देणे - सन्मानदर्शक पोशाख देणे, सन्मान करणे
शिरसोपी करणे - जबाबदारी सोपविणे, कुल अखत्यार देणे
शिलशिला राखणे - ऋणानुबंध ठेवणे ,परंपरा टिकविणे
शिलेपोस करणे - हत्यारांनी सज्ज करणे
शिरातुरा लावणे - सर्वस्व गाजविणे
शिरातुरा लावणे - दिलेल्या शब्दाप्रमाणे वागणे
शेखी करणे - बढाई मारणे, प्रौढी मिरविणे
शेंडी सलाम करणे - औपचारिकपणे केवळ देखावा म्हणून नमस्कार करणे
शेर होणे - वरचढ होणे, विजयी होणे
शोहरत कळणे - बातमी समजणे,महत्त्व कळणे

स

सई करणे - बहाल करणे
सई करणे / म्हणणे - मान्य करणे, सर करणे
सख्ती करणे - जुलूम करणे,त्रास देणे
सजा आहडणे - शिक्षा करणे
सजा देणे - शिक्षा करणे, पारिपत्य करणे
सतके होणे - (बदके,कोंबडया इ. प्राणी) ओवाळून टाकणे
सदर करणे - दरबार भरविणे
सदराह होणे - पळून जाणे , सैरावैरा होणे
सदरेस असणे - दिमतीस असणे
सफर साधणे - प्रवास करणे, शिकार साधणे
सफा होणे - नष्ट होणे
सफाई करणे - मिटवामिटवी करणे,सारवासारवी करणे
सफाई दाखविणे - सलोख्याने वागणे
सफेजंगी होणे - भयंकर युध्द होणे, कत्तल होणे
सबब लावणे - अगीच निमित्त सांगणे
सबील करणे - वाटेल ते करून पैसा मिळविणे
समशेर करणे - पराक्रम करणे
सर करणे - जिंकणे
सरकारकामास येणे - लढाईत.मरणे
सरपोस ठेवणे - गुप्तता बाळगणे
सरफराजी करणे - उच्च दर्जा देणे, बढती करणे

सरबत्ती झडणे - ताशेरा झडणे, भांडण होणे, रागावणे
सर्द होणे -दिङ्मूढ होणे
सलामत राहणे - चिरकाल टिकणे,चिरकाल सुरक्षित राहणे
सलामी देणे - वंदन करणे
सलामीच्या तोफा मारणे -(भेटीच्या वेळी) तोफांचे आवाज काढणे
सलूख करणे - तह करणे, सख्य करणे
सल्ला करणे - तह,सख्य करणे
सल्ला घेणे - विचारविनिमय करणे
सल्ला देणे - मत सांगणे, मार्गदर्शन करणे
सल्लामसलत करणे - विचारविनिमय करणे
सही करणे - जिंकणे, काबीज करणे, मान्य करणे
सादर करणे - आदरपूर्वक देणे
सानक इनाम करणे - पोटापाण्याची व्यवस्था करणे
साफ करणे - नष्ट करणे ,स्पष्टीकरण करणे
साफ बोलणे - उघड उघड सांगणे, स्पष्टपणे बोलणे
साफी करणे - उघड उघड सांगणे, समेट करणे
सुदामत चालणे - वहिवाटीप्रमाणे चालणे
सुभा करणे - प्रांताचा कारभार करण्यासाठी (सुभेदार म्हणून) नेमणे
सुभा- मामला सांगणे - प्रांताचा कारभार करण्यासाठी (सुभेदार म्हणून) नेमणे
सुभेगिरी करणे - प्रांताचा राज्यकारभार पाहणे
सुरत सांभाळणे - समजू लागणे,सज्ञान होणे
सुलतानढवा करणे - एकदम हल्ला करणे
सेवाचाकरी सांगणे- नोकरीस ठेवणे,काम सांगणे
सोबत देणे - बरोबर राहून काम करणे
सौगंद खाणे/घेणे - शपथ घेणे
स्वारी करणे - हल्ला करणे

ह

हकीकत होणे - प्रसंग घडणे
हक्क करणे - देहान्त शिक्षा करणे
हक्क होणे - मरणे
हक्काटक्कास येणे - तावडीत/ आटोक्यात येणे
हक्कात धरणे - अधिकार सांगणे
हजरजबाबी असणे - ताबडतोब समर्पक उत्तर देणे
हजरत होणे - निधन पावणे

हजार- पाचशे पाऊस पडणे - थोडासा पाऊस पडणे

हजेरी घेणे - रागावणे

हबक खाणे - धास्ती घेणे

हमराई करणे - लगामी लावून घेणे

हमराहा करणे - बरोबरीने प्रवास करणे , गोळा करणे ,जमाविणे

हमराही करणे - बरोबरीने प्रवास करणे, सोबत करणे, साथ देणे

हमी देणे - खात्री देणे

हरकत करणे - आक्षेप घेणे, अडथळा करणे

हरकत मकान करणे - मुक्काम बदलणे

हरामखोर होणे - स्वामिद्रोह करणे, कृतघ्न होणे

हरामखोरी करणे - स्वामिद्रोहास प्रवर्तणे, कृतघ्न होणे

हरीफी करणे - साहस करणे,युध्द करणे, घजणे

हलाखी होणे - दुर्दशेत असणे

हलाल करणे - विधियुक्त हत्या करणे

हल्ली-हरकत करणे - अडथळा आणणे,बखेडा करणे,विरोध करणे

हवा खाऊन राहणे - भयभीत होणे

हवा खावयास जाणे - सहलीस जाणे

हवा खेळणे - मोकळा वारा येणे

हवा घालणे - भरीवर घालणे

हवा पाहणे - परिस्थिती हेरणे, रागरंग पाहणे

हवालदिल होणे - घाबरणे

हवाला घालणे - हमी देणे

हवाथी लागणे - धाप लागणे, दम लागणे

हवेचा राबता पडणे - हवामान प्रकृतीस मानवू लागणे

हसल करणे - मिळविणे

हस्त गालीब होणे - सरशी होणे

हाय खाणे - दहशत घेणे,धास्ती वाटणे

हाल करणे - त्रास देणे, कष्ट देणे

हालखुद ठेवणे - आहे त्या स्थितीत ठेवणे

हाव करणे - अधिक मिळविण्यासाठी धडपडणे , मोहात पडणे

हावभरी होणे - लोभ उत्पन्न होणे

हिल्ला- हरकत करणे - विरोध करणे,अडथळा आणणे

हिशेब करणे - जमाखर्च करणे

हिशेब घेणे - पगार, रक्कम घेणे

हिसाब असणे - पर्वा असणे, किंमत /महत्त्व असणे
हिसाब धरणे - पर्वा करणे
हिसाब न धरणे - पर्वा न करणे, तमा न वाटणे
हिंमत करणे - साहस करणे
हिंमत धरणे - साहसाने वागणे
हिंमत सोडणे - धैर्य खचणे
हिंमत हरणे - अवसान नाहीसे होणे
हुकुमात चालणे - आज्ञेप्रमाणे वागणे
हुकुमात नसणे - आज्ञेप्रमाणे न वागणे
हुकूम करणे - आज्ञा देणे
हुकूम बजावणे - आज्ञेप्रमाणे वागणे
हुकूम येणे - आज्ञा मिळणे
हुकूम सोडणे - आज्ञा करणे
हुक्कातमाखू करणे - (हुक्का ओढणे व तंबाखूचे सेवन करणे), संबंध ठेवणे
हुक्का बंद करणे - वाळीत टाकणे ,संबंध न ठेवणे
(तोंडाचा) हुक्का होणे - तोंड सुकून जाणे ,अस्वस्थ होणे
हुन्नर करणे - युक्ती करणे
हुन्नर होणे - चमत्कार घडणे
हुरमत घेणे - बदनामी करणे
हुरमत जाणे - अपकीर्ती होणे
हुरमत राखणे - प्रतिष्ठा ठेवणे
हुल पडणे - अफवा पसरणे
हेजिबातीस पाठविणे - राज्याचा प्रतिनिधी (वकील) म्हणून पाठविणे
हैदोस करणे - गोंधळ करणे,विध्वंस करणे, नाश करणे
हैदोस घालणे - धांगडधिंगा करणे, अत्याचार करणे
हैबत खाणे - कच खाणे, घाबरणे
हैराण राहणे - आश्चर्यचकित होणे
हैराण होणे - बेचैन होणे
होष निघून जाणे - अवाक् होणे ,अत्यंत घाबरणे, निधन पावणे

----------------

## प्रकरण आठवे

# लि पि वि चा र

## (कागद,शिकस्ता व मोडी लिपी)

मराठीची लिपी देवनागरी आहे.तिच्यापासून मोडी लिपी निर्माण झाली. देवनागरीचेच एक 'मऱ्हाटी ' रूप म्हणजे मोडी लिपी होय.हे कुणी अमान्य करणार नाही. तथापि फार्सीच्या संसर्गामुळे मोडी लिपीची निर्मिती झाल्याची काही प्रमाणे उपलब्ध होतात,ती लक्षात घेणेदेखील आवश्यक आहे. या लिपीच्या निर्मितीची गरज का भासली, कागदाचा शोध व निर्मिती तसेच शासनव्यवहारातील लेखनाची निकड-गतिमानता-यास कितपत कारणीभूत ठरली,अशा प्रकारची गतिमान व अक्षरांची मोडणी बदलणारी लेखनपध्दती फार्सीत होती तिचा परिणाम मोडी लिपीच्या निर्मितीवर कितपत झाला, फार्सीची 'शिकस्ता ' आणि 'मोडी ' यांच्या अर्थातील विलक्षण साम्य इ. बाबी या विषयावर महत्त्वाचा प्रकाश टाकतात.केवळ मराठी भाषेशीच फार्सीचा अनुबंध नव्हता तर मोडीसारख्या तिच्या एका लिपीशीही तिचा घनिष्ट अनुबंध कसा होता. हे पुढील विवेचनावरून लक्षात येईल.

इति. राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचा विचार करताना आठव्या खंडाच्या प्रस्तावनेत वरील तिन्ही बाबींसंबंधी फार महत्त्वाचे व साधार/सप्रमाण विवेचन केले आहे. त्यातून महाराष्ट्रात कागद केव्हा आला याविषयी जशी माहिती मिळते,त्याचप्रमाणे मोडी लिपी आणि फार्सी 'शिकस्ता ' यांचा अन्योन्य संबंध काय आणि 'शिकस्ता 'लेखन-पध्दतीच्या अनुकरणातून मोडी लिपीची निर्मिती कशी झाली, यावरही प्रकाश पडतो इति.राजवाडे [1] यांच्या याविषयीच्या सविस्तर विवेचनाचे मी अभ्यासाच्या सोयीसाठी दोन भाग करतो.

(अ) महाराष्ट्रात 'कागदा 'चे आगमन व त्याचा जीवनव्यवहारात उपयोग, आणि
(आ)मोडी लिपीची निर्मिती व 'शिकस्ता'

(अ) कागद

'कागद ' हा शब्दच मूळ अरबी 'कागज् 'या शब्दापासून फार्सीच्या माध्यमातून मराठीत आला. त्यापूर्वी भूर्जपत्रे,ताडपत्रे,ताम्रपत्रे व चर्मपत्रे व वस्त्रपट यांचा उपयोग करीत असत आणि यादवकाळात कागदाचा उपयोग करू होऊ लागला,त्याचा मुस्लिम राज्यकर्त्यांशी काय संबंध होता,याविषयी इति. राजवाडे यांनी पुढील मत मांडले आहे. ते यावर नेमकेपणाने प्रकाश टाकणारे असल्याने मूळातून विस्ताराने देत आहे -

" इ.स. १३१८ त मुसलमानांचे राज्य महाराष्ट्रात सुरू झालें. १३१८ च्यापूर्वी २५ वर्षे म्हणजे इ.स. १२९३ त अल्लाउद्दीन खिलजीनें यादवांच्या देवगिरीवर पहिली स्वारी केली. १२९३ सनापूर्वी बरोबर शंभर वर्षे म्हणजे इ.स. ११९३ त शहाबुद्दीन घोरीनें दिल्लीच्या पृथ्वीराज चव्हाणाला जिंकिलें. इ.स. ११९३ त देवगिरीस म्हणजे महाराष्ट्रांत यादववंशी जैत्रपाळ राजा राज्य करीत होता. इ.स. ११९३ पासून १२९३ पर्यंत जैत्रपाळ, सिंघण,कृष्ण,महादेव व रामचंद्र असे पांच राजे देवगिरीस झाले. रामदेव १३०७ व त्याचा मुलगा शंकरदेव १३१२ त वारला. १३१८ त रामचंद्राचा जावई हरपाळ याला सुलतान मुबारिकानें ठार मारिलें व देवगिरी कायमची घेतली. त्यानंतर आठ वर्षांनी पर्शरामपंडितानें आपला पर्शरामोपदेश नांवाचा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत भूर्जपत्रें व कापसाचे तुकडे यांवर मंत्रें लिहावीं असे अनेक ठिकाणी म्हटलें आहे. ह्यावरून एवढें सिध्द होतें कीं मंत्र व यंत्रे लिहिण्यास भूर्जपत्रे व वस्त्रपट ह्यांचा उपयोग इ.स.१३२६ च्या सुमारास व पूर्वी लोक करीत असत. ज्ञानेश्वरींत चामावर म्हणजे चर्मावर व कापडावर लिहिल्याचा उल्लेख आहे. कायमची दानपत्रे तांब्याच्या पत्र्यावर लिहिण्याचा प्रघात इ.स.१३२६ त होता. ह्याला अनेक ताम्रपत्रांचा पुरावा आहे. इतकेंच नव्हे तर १३२६ च्या पुढें तीन चारशें वर्षे ताम्रपत्रांवर लिहिण्याचा प्रघात चालू होता. असें मुसलमानांच्या व पेशव्यांच्या रियासतीतील बऱ्याच ताम्रपत्रांवरुन उघड होतें. सारांश,भूर्जपत्रे,ताडपत्रें,वस्त्रपट,ताम्रपत्रे व चर्मपत्रें ह्यांवर १३२६ पर्यंत व क्वचित् प्रसंगी पुढें बरींच वर्षे, लेख लिहिण्याचा महाराष्ट्रांत बराच प्रचार होता परंतु ह्या सुमारास म्हणजे १३२६ च्या पन्नाससाठ वर्षे लिहिण्याकरितां दुसरा एक जिन्नस प्रचारांत येऊं लागला. तो जिन्नस कागद हा होय. ह्या कागदावर लिहिण्यासंबंधानें ज्ञानेश्वरींत काही दुसरे उल्लेख आहेत.

हें बहू असो पंडितू । धरुनु बालकाचा हातू । वोळी लेहे वेगवंतू । आपणचि ।। अध्याय १३ ओवी ३७७ ।।

सुखाची लिपि पूसिली ।। अध्याय ३,ओवी २४६ ।।

दोषांची लिहिली फाडी ।। अध्याय ४,ओवी ५२ ।।

आखरें पूसिलेया न पुसे। अर्थ जैसा ।। अध्याय ८,ओवी १७४ ।।"

हा उतारा स्वतःजवळील लेखी पोथीतील असल्याचा निर्देश करून पुढे राजवाडे म्हणतात.

' ह्या उताऱ्यांत 'सुखाची लिपि पुसिली' हे वाक्य मोठें अर्थप्रचुर आहे.
भूर्जपत्रें,ताडपत्रें,ताम्रपत्रे व वस्त्रपट ह्यांवर काढलेली अक्षरें पुसून टाकितां येत नाहीत, फार तर खोडून टाकितां येतात. ताम्रपत्रांवर ' लोखंडी लेखणीने काढिलली अक्षरे आडव्या रेषा मारून खोडून टाकितात. भूर्जपत्रें व ताम्रपत्रे ह्यांवर लोखंडी लेखणीनेंच लिहावें लागतें व ते लिहिणें पुसतां येत नाहीं . ह्यांच्यावरील लिहिणें नाहींसे करावयाचें असल्यास हरताळ वगैरे जिनसांचा उपयोग करावा लागतो. वस्त्रपटावरील लेखांनाहि हरताळाचाच लेप द्यावा लागतो. एकट्या कागदावरील ओल्या अक्षरांना मात्र 'पुसून 'टाकतां येतें. दोषाची लिहिती फाडलीं हेंहि वाक्य असेच अर्थप्रचुर आहे. ताम्रपट तर मुदलातच फाडिता येत नाहीत. भूर्जपत्रें व ताम्रपत्रें उभी फाडतां येत नसल्यानें त्यावरचीं लिखितें फाडून तुकडे करून टाकितां येत नाहींत,फार झाले तर त्यांच्या आडव्या चिरफाळ्या करतां येतात.
आतां राहतां राहिलें वस्त्रपट. वस्त्रपटांवरील लिखितें फाडतां येतील परंतु ज्ञानेश्वरींत ग्रंथ,पुस्तक वगैरे शब्द आले आहेत व वस्त्रपटांचे ग्रंथ किंवा पुस्तकें होणे अशक्य आहे. तेव्हा ज्ञानेश्वरांनी उल्लेखिलेली 'लिहिलीं ' म्हणजे कागदावरील लिखितें होत ह्यांत संशय नाहीं. शिवाय वर दिलेल्या उताऱ्यांतील पहिल्या ओवींत,पंतोजी जलदीनें वोळी लिहितो,असें विधान केलें आहे. तेव्हां जलदीनें येण्यासारखा ज्ञानेश्वराला माहित असलेला जिन्नस म्हटला म्हणजे कागदच होय ह्यांत संशय नाही . आतां इतकेंच खरे कीं ज्ञानेश्वरींत कागद हा शब्द कोठेंहि आलेला नाहीं व येणे शक्यहि नाहीं. परंतु कागद ह्या अर्थी ज्ञानेश्वरानें दुसरा एक शब्द योजिलेला आहे तो पाट हा होय- पाट्यावरिलें आखरे । जैसी पुसता येती करे।। अध्याय १८,ओवी १०९९.
येणेंप्रमाणे ज्ञानेश्वराच्या वेळेस लिहिण्याच्या कामीं कागद प्रचारात येऊं लागले, हे स्पष्ट आहे ही गोष्ट केवळ अनुमानानेंच सिध्द आहे असें नाहीं. ज्ञानेश्वरांचा समकालीन किंवा किंचित् प्राचीन जो मुकुंदराज त्याच्या विवेकसिंधूची मूळ अस्सल प्रत जोगाईच्या आंब्यास मुकुंदराजाच्या शिष्यशाखेकडे आहे व ती कागदावर लिहिलेली आहे . ह्या मूळ प्रतीवरील अक्षरे तेराव्या शतकांतील जाधवांच्या शिलालेखांतील अक्षरांप्रमाणे असून तीं मुकुंदराजाच्या सध्याच्या शिष्यांना, बाळबोध लिहिली असूनहि,वाचता येत नाहींत,असे सांगतात ह्यावरून इतकें सिध्द होते कीं मुकुंदराज व ज्ञानेश्वर ह्यांच्या वेळीं लिहिण्याच्या कामीं कागदाचा अंशतः उपयोग लोक करू लागले होते. ताडपत्रें,भूर्जपत्रें व वस्त्रपट ह्यांचाहि उपयोग होत होता परंतु ह्या नवीन जिन्नसाकडे लोकांची प्रवृत्ति बरीच पडत चालली होती. ही प्रवृत्ति मुकुंदराज व ज्ञानेश्वर ह्यांच्यापूर्वी इतकेंच नव्हे तर हेमाडपंताच्याहि पूर्वी पांचपंचवीस वर्षे होत होती.'
मराठीतील जुनी बाडं व कागदपत्रे दौलताबादी व जुन्नरी कागदावर ( किंवा त्या पध्दतीने तयार केलल्या )कागदावर लिहिल्याचे आढळते. देवगिरीच्या (दौलताबादेच्या)

वाटेवरच कागजीपुरा हे गाव आहे व तेथे दौलताबादी कागद तयार करण्याचा व्यवसाय मुस्लिम राजवटीपासून आजतागायत चालू आहे. मुस्लिम कारागीर कागजीपुरा व जुन्नर या दोन्ही ठिकाणी या व्यवसायात होते व आहेत. ही बाबही इति. राजवाडे यांच्या 'कागदा 'विषयीच्या विवेचनास पूरक व पोषक अशीच आहे.

**(आ) मोडी लिपीची निर्मिती व 'शिकस्ता'**

फार्सी 'नस्ख् ','शिकस्ता 'लिपी आणि मराठीची मोडी लिपी यांच्यामधील अनुबंधही इति. राजवाडे यांनी सप्रमाण व युक्तिसंगत रीतीने वर्णिला आहे. यादवकाळ ,मुस्लिम राज्यकर्त्यांचे आगमन आणि फार्सीच्या संपर्कातून मोडी लिपीची निर्मिती कशी झाली,याबद्दलचे इति.राजवाडे ' यांनी केलेले विवेचन या विषयावर फार महत्त्वाचा प्रकाश टाकत असल्याने तेही येथ सविस्तर उद्धृत करणे अपरिहार्य आहे, असे मला वाटते. ते म्हणतात,

" अशा वेळीं दफ्तरावरील मुख्याधिकारी जो हेमाडपंत त्यानें मोडी लिपी महाराष्ट्रात नव्याने सुरू केली. ह्या मोडी लिपिचाहि उल्लेख ज्ञानेश्वरानें वरील उताऱ्यांतील पहिल्या ओवींत केला आहे असें दिसतें. पंतोजी अक्षर वेगानें लिहितो,ह्या वाक्यांतील वेगानें हे पद विचारणीय आहे. बाळबोध अक्षर वेगाने लिहितां येत नाही. तेव्हां त्यासंबंधाने वेगवंत हा शब्द योजण्यांत कांहीं विशेष अर्थ नव्हता. तो मोडी अक्षराच्या संबंधानें मात्र सार्थ आहे. ह्यावरून असे दिसतें कीं ज्ञानेश्वरीच्या पूर्वी मोडी अक्षर प्रचारात आलें होतें. ज्ञानेश्वरी इ.स. १२९० म्हणजे शके १२१२ त लिहिली गेली. त्यापूर्वी तीस-चाळीस वर्षे म्हणजे इ.स. १२६० पासून पुढें हेमाद्रि जाधवांचा दफ्तरदार होता. हेमाद्रि दफ्तरदार होण्याच्या वेळी उत्तर हिंदुस्थानांत मुसलमानांचे राज्य होऊन ऐंशी नव्वद वर्षे झाली होतीं. सिंघण राजानें माळवा वगैरे विंध्याद्रीच्या पलीकडील प्रांत जिंकले होते. तेव्हां मुसुलमानांची ऊर्फ म्लेछांची ओळख मराठ्यांना झाली होती. ही ओळख होत असतांना मुसुलमानांची कागद करण्याची कला महाराष्ट्रात सुरू झाली व ही सुरू झाल्यावर मोडी लिहिण्याची पध्दत हेमाद्रीला सुचली. ही मोडी लिहिण्याची पध्दत हेमाद्रीने मुसुलमानांच्या शिकस्ता नामक लेखनपध्दतीवरून घेतली.

फारशीत लिहिण्याच्या पध्दती अनेक आहेत. त्यांत नस्ख आणि शिकस्ता आपल्याकडील बाळबोध व मोडी ह्यांच्याशी जुळतात.नस्ख अक्षर बाळबोधप्रमाणें स्पष्ट व सुव्यक्त असे लिहितात व शिकस्ता अक्षर मोडून लिहिलेलें असतें. फारशींत शिकस्तन ह्या क्रियापदाचा अर्थ मोडणे असा होतो. जलदीनें लिहिण्यास खडें अक्षर मोडून लिहिण्याचें जें वळण त्याला फारशींत शिकस्ता म्हणतात.

मोडी हा शब्द फारशीं शिकस्ता ह्या शब्दाचें हुबेहुब मराठी भाषांतर आहे. मोडी ह्या अर्थाचा वाचक शब्द संस्कृतात किंवा महाराष्ट्रींत नाहीं. हा शब्द हेमाडपंताने फारशी शिकस्ता ह्या शब्दाच्या अर्थाकडे लक्ष देऊन मराठींत अक्षर लिहिण्याच्या एका पध्दतीला नव्याने लागू केला. हेमाडपंतानें अक्षर लिहिण्यात ही नवी सुधारणा केली. तोंपर्यंत

महाराष्ट्रात सर्व लेखी व्यवहार बालबोध अक्षरांत होत असे. ह्या नवीन सुधारणेवरून ही एक गोष्ट ध्यानीं धरण्यासारखी आहे की महाराष्ट्रातील विचारी पुढारी लोक परदेशस्थांची एखादी चांगली रीती उपयोगी असल्यास ती स्वीकारण्यास फार पुरातन काळापासून तयार असत.

इ.स. १२५० च्या अगोदर म्हणजे हेमाद्रीच्या पूर्वी सुमारे शंभर-दीडशे वर्षे महाराष्ट्राच्या उत्तरेस हिंदुस्थानात मुसलमान आले असतां त्यांच्या शिकस्ता लिहिण्याच्या तऱ्हेवरून व्रज भाषा मोडीनें लिहिण्याचा प्रचार तिकडील विचारी पुरुषांनी पाडलेला दिसत नाही. महाराष्ट्रात मोडी लिहिण्याचा प्रघात आज साडेसहाशे वर्षे चालू असतां भरतखंडातील इतर कोणत्याहि भाषेला हा प्रघात उचलण्याची आवश्यकता दिसली नाहीं... कागदावर लिहिण्याचा प्रघात पडल्याबरोबर मोडी लिहिण्याचाही प्रघात महाराष्ट्रांत लवकरच पडला व हा प्रघात पाडण्याचें प्रथम श्रेय जाधवांचा दप्तरदार जो हेमाद्रि त्यास विद्वत्तेच्या व अधिकाराच्या वजनावर सहजासहजीं घेतां आले!' असे विवेचन करून इति. राजवाडे यांनी पुढील निष्कर्ष मांडला आहे व तो पटण्याजोगा आहे '-

' मोडीचा प्रघात फारशी लिपी व फारशी कागद ह्याच्या आगमनानें पडला ह्यांत फारसा संशय नाही.'

--------------------

संदर्भ-टीपा

१. ऐप्र. पृ. ३७४-३७६
२. कित्ता.पृ. ३७५
३. कित्ता.पृ. ३७६-७७
४. कित्ता.पृ. ३७७

--------------------

प्रकरण नववे

# शब्द संक्षेप आणि शब्द संकेत

लेखनात शब्दसंक्षेप का केले जाऊ लागले, याचा आपण विचार करू लागलो तर ती मानवाची एक गरजच होती असे दिसते. याविषयी विवेचन करताना प्रा. ग.ह. खरे [१] म्हणतात,'पत्रव्यवहार,जमाखर्च,राजकीय हुकूम,पोथ्या-पुस्तकें इत्यादींच्या लेखनांत कित्येक सर्वसामान्य शब्द इतके वारंवार येतात कीं ते पूर्ण स्वरूपात पुन्हा पुन्हा लिहिणें मनुष्यास कंटाळवाणें व त्रासाचें वाटूं लागतें. त्यामुळें मनुष्य अशा शब्दांचे संक्षेप करू लागला. कागदाचा शोध लागून त्याचा प्रसार होऊ लागल्यावर लेखनाची एकदम वाढ होऊन शब्दसंक्षेप करण्याची प्रवृत्ती फार झपाट्यानें फोफावली आणि तिचा प्रवेश हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व भाषांतील लिखाणांतून झाला.
मी बालबोध,मोडी,कानडी,हिंदी या लिपींतील आणि मराठी,कानडी,हिंदी या भाषांतील जुन्या पोथ्या व पुराणें ,ऐतिहासिक कागद आणि अनेक लिपी व भाषा यांमधील ताम्रपट,शिलालेख,नाणी इत्यादी साधनें पाहिली आहेत. त्यांपैकी विशेषतः मोडी कागदपत्रांमध्ये हे संक्षेप फार मोठ्या प्रमाणांत आढळतात.येवढेंच नव्हे तर फार्सी शिलालेख व कागदपत्र यांतही असे संक्षेप केल्याचें दिसून येतें. मात्र त्यांची संख्या फार नाही.'

लेखनात सुगमता व गतिमानता यावी, यासाठी मराठीत शब्दसंक्षेप रूढ झाले,यातून शब्दसंक्षेपांच्या निर्मितिप्रक्रियांवर प्रकाश पडतो.'ती ','ती.स्व.''स. न. ', 'स.न.वि.वि. ','ह.भ.प. 'इ. किती तरी मराठी शब्दसंक्षेप आपल्याला परिचित आहेत पण अरबी - फार्सी शब्दांचे मराठी भाषेत शब्दसंक्षेप तयार होणें ही घटना फार्सी-मराठी-अनुबंधाच्या संदर्भात विशेष लक्षात घेण्याजोगी वाटते.हे अरबी-फार्सी शब्द मराठीत इतके रुळले व त्यांचा वापर इतक्या मोठ्या प्रमाणात होऊ लागला की त्यांचा संक्षेप करण्याची गरज व अनिवार्यता मराठी भाषकांना मध्ययुगापासून जाणवली व ती आजतागायत बव्हंशी तशीच कायम आहे,हे त्यातून स्पष्ट होते. शब्दसंक्षेप करण्याची पध्दती फार्सीतही रूढ असून ती सनदांच्या सारख्या ऐतिहासिक कागदपत्रांत आढळते पण मराठीने सातत्याने वापरल्या जाणाऱ्या फार्सी शब्दांचा संक्षेप करावा व त्यांची संख्या प्रा.खरे यांनी दिलेल्या यादीनुसारच पन्नासपेक्षा अधिक असावी,याकडेही अभ्यासकांचे लक्ष वेधावे,असे मला वाटते. यातही आणखी एक बारकावा असा की अनेक फार्सी

शब्दांकरिता एकच मराठी शब्दसंक्षेप योजून संदर्भानुसार त्याचा उलगडा करून , घेण्याचा प्रयत्न मराठी भाषकांनी केला आहे.

उदा. मु।। या संक्षेपाचे मुक्काम,मुताबिक,मुदत,मुद्दल इ. कितीतरी अर्थ संदर्भानुसार होतात. मराठी भाषक हे अर्थ व्यवस्थितपणे लावतात, यावरूनही फार्सी - मराठी संबंधाची जवळीक सहज लक्षात येते. आजच्या मराठीतही 'इ.स.'म्हणजे 'इसवी सन''ता.'म्हणजे 'तारीख' किंवा'तालुका.'ता.क.'म्हणजे 'ताजा कलम ','मु. 'म्हणजे 'मुक्काम','सो.'म्हणजे 'साहेब, 'आ.' म्हणजे 'आमदार ','खा. 'म्हणजे 'खासदार' किंवा 'ना.'म्हणजे 'नामदार 'असे फार्सी शब्दांचे अनेक संक्षेप मराठीत प्रचलित आहेत. मध्ययुगात जुळलेल्या या धाग्याचा पीळ एकविसाव्या शतकातही तग धरून आहे . 'यांची संख्या फार नाही ' हे प्रा.खरे [?] यांचे विधान त्यामुळेच पटत नाही. त्यांनी दिलेली यादीच यावर अधिक प्रकाश टाकते. ती पुढे देत आहे -

**(अ) शब्दसंक्षेप**

मध्ययुगीन मराठी साहित्यात आढळणारे

अरबी - फार्सी शब्दांचे संक्षेप

| | |
|---|---|
| १. अ ।। | अनाम,अर्दास |
| २. इ ।। | इनाम,इब्तिदा,इशरीन,इस्तकबाल,इशारत,इस्तकबील,इस्तिकामत |
| ३. इ ।। दार | इजारदार,इनामदार |
| ४. क।। | कसबे,कारकीर्द |
| ५. क।। दार | कमाविसदार |
| ६. कि ।। | किंमत,कित्ता |
| ७. ख ।। | खरीफ,खान,खारिज,खास,खासगत |
| ८. खु ।। | खुदायेवंद,खुर्द,खुर्दखत,खुर्दा |
| ९. खा े | खरेदी,खेरीज |
| १०. गु ।। | गुजारत,गुजारिले,गुदस्त |
| ११. चा । | चाकर |
| १२. ज | जंजिरा (मुंबई) |
| १३. जा । | जमीन,जामीन |
| १४. जा । खर | जमादिलाखर |
| १५. जा । वल | जमादिलावल |
| १६. जि ।। द | जिल्काद |
| १७. जि ।। ज | जिल्हेज |
| १८. जिरा ।। | जिराईत |
| १९. ज्या ।। | ज्यादती |
| २०. त ।। | तक्सीम,तपे,तर्फ,तागायत |

| | |
|---|---|
| २१. ता | तरीख,तालीक |
| २२. ता। | तर्फ |
| २३. ता। | तपे,तेरीख,तैनात |
| २४. द ॥ | दरवज्ह,दस्तक |
| २५. दि ॥ | दिम्मत |
| २६. दे ॥ | देखील |
| २७. न ॥ | नकल,नखायाती,नजीक,नफर |
| २८. नि ॥ | निशाणी,निसबत |
| २९. प ॥ | परगणे,परवानगी,पादशाही |
| ३०. पा। | पैवस्ती |
| ३१. प्र ॥ | प्रगणे |
| ३२. फु ॥ | फरुख्ती |
| ३३. फ्रो ॥ | फरुख्ती |
| ३४. बा | बाबी कुल |
| ३५. ब ॥ | बदल,बरहुक्म,बरोबर,बाब |
| ३६. बि ॥ | बिकलम,बितपशील,बिदानद,बिन |
| ३७. बु ॥ | बुद्रुक |
| ३८. बा। | बेश्म |
| ३९. म ॥ | मजकूर,मशरुल,मशार,महसूल,माब,मामले,मालूम |
| ४०. म ॥ र | मजकूर,मशार |
| ४१. मि ॥ | मिनहु |
| ४२. मु ॥ | मुक्काम,मुजावर,मुताबिक,मुदत,मुदल,मुल्ला,मुहम्मद. |
| ४३. मा। | मोकदम,मोर्तब,मोकाम,मोहोर |
| ४४. मो। रम | मोहरम |
| ४५. मौ | मौजे |
| ४६. र ॥ | रखतखाने,खाना |
| ४७.र ॥ खर | रबिलाखर |
| ४८. र ॥वल | रबिलावल |
| ४९. व ॥ | वजारत,वल्द |
| ५०. स ॥ | सदर,सन,सबब,सरकार,साहेब |
| ५१. सि ॥ | सिरस्ता |
| ५२. सु. | सुतेन |
| ५३. सु॥ | सुभे,सुमार,सुहूर |
| ५४. ह॥ | हजरत,हद्द,हवाला |

५५. हु ।। हुजूर,हुरगुजी

## (आ) शब्दमूल्ये/शब्दसंकेत

मध्ययुगीन मराठी कागदपत्रात, विशेषतः राज्यकारभारविषयक दस्तावेजात काही अरबी - फारसी शब्दसंकेत योजून वर्षाची नोंद केली जात असे. त्यांचा उलगडा प्रा. ग.ह.खरे[1] यानी केला आहे तो असा -

| शब्द | मूल्य |
|---|---|
| अर्बा | ४ |
| अर्बैन | ४० |
| अलफ | १००० |
| अशर | १० |
| अशरीन | २० |
| इसने - इसनैन | २ |
| इह्दि | १ |
| खम्स | ५ |
| खम्सैन | ५० |
| तिसा | ९ |
| तिसैन | ९० |
| मया - मिअत | १०० |
| मया - मिअतैन | २०० |
| सबा | ७ |
| सबैन | ७० |
| सलास | ३ |
| सलासीन | ३० |
| समान | ८ |
| समानीन | ८० |
| सित्त | ६ |
| सित्तैन | ६० |

याविषयी अधिक तपशील देताना प्रा.खरे म्हणतात','पत्रांमधून या सनाच्या आंकड्यांत उल्लेख क्वचितच येत असेल. असा निश्चित उल्लेख माझ्या तरी आढळण्यांत आला नाही. सामान्यतः याचा उल्लेख दर दिलेल्या अंकवाची अरबी शब्दांनी केला जातो. तो करताना 'अंकानां वामतो गतिः' हा नियम गेल्या चार-पांचशें वर्षांत हिंदुस्थानामध्ये सांपडलेल्या कागदपत्रांतून आलेल्या उल्लेखांत सर्वत्र पाळला गेला आहे. प्रथम अंत्य (एक) स्थानीय आंकडा,मग उपांत्य (दशक)स्थानीय आंकडा नंतर तिसरा शतस्थानीय

आंकडा ,मग चौथा सहस्त्रस्थानीय आंकडा अशा क्रमाने आंकड्यांचा निर्देश होतो. उदाहरणार्थ, १३४५ हे साल सांगावयाचे असेल तर खमस व अर्बैन व सलास मया व अलिफ असा उल्लेख करतील. मराठी व फार्सी कागदपत्रांतील शेंकडो उल्लेख अशा तऱ्हेने केले आहेत.[५] यावरून फार्सी माध्यमातून मराठीत आलेल्या व मध्ययुगीन कागदपत्रांत सातत्याने वापरलेल्या या अरबी शब्दमूल्यांचे / शब्दसंकेतांचे महत्त्व सहज लक्षात येईल.

------------------------------

संदर्भ - टीपा

१. संशोधकाचा मित्र,भाग पहिला,ग.ह.खरे,भा.इ.सं. मंडळ प्रकाशन,पुणे,१९५१,पृ.१

२. कित्ता,पृ.२ ते ६

३. कित्ता,पृ. १११

४. कित्ता. पृ.१११-१२

५. ठळक टाइप माझा.

------------------------------

प्रकरण दहावे

# फार्सी आणि मराठीच्या बोली

कोकणी,वऱ्हाडी व अहिराणी या मराठीच्या प्रमुख बोली आहेत. गोमंतकीचाही मराठीच्या बोलींत समावेश केला जातो व तिचे कोकणीशी लक्षणीय असे साम्य आहे.मध्ययुगीन व वर्तमानकालीन प्रमाण मराठीशी फार्सीचे जसे नाते आहे तसे मराठीच्या या बोलींशी आहे की नाही ? असा एक महत्त्वाचा प्रश्न या संदर्भात उपस्थित होतो व त्याचा आजवर कुणा संशोधकाने वा भाषाशास्त्रज्ञाने सम्यक् असा विचार केल्याचे मला आढळले नाही.या महत्त्वपूर्ण अध्ययनक्षेत्राकडे लक्ष वेधावे, या हेतूने या चारही बोलींशी असलेला फार्सीचा अनुबंध उलगडण्याचा प्रयत्न येथे केला आहे .

सुदैवाने यासंबंधात बरीच संशोधन-सामग्री उपलब्ध आहे. डॉ.सु.मं.कत्रे यांनी कोकणीविषयी,डॉ.वि.बा.प्रभुदेसाई यांनी गोमंतकीविषयी,डॉ. वसंत वऱ्हाडपांडे यांनी नागपुरीविषयी,प्रा. देवीदास सोटे यांनी वऱ्हाडीविषयी, डॉ. रमेश सूर्यवंशी व डॉ. बोरसे यांनी अहिराणीविषयी विचार केला आहे. डॉ.ग्रियर्सन यांच्या 'भारतीय भाषा सर्वेक्षणा' च्या सातव्या खंडांत त्यांना उपलब्ध झालेल्या मराठीच्या सर्व बोलींचे उतारे समाविष्ट केले आहेत.या सर्वच सामग्रीच्या आधारे या बोलींतील अ.तु.फा.शब्दसंग्रह,वाक्प्रचार, त्यांची फार्सीच्या संदर्भातील भाषिक वैशिष्ट्ये येथे नोंदविली आहेत. त्यावरून फार्सी व मराठीच्या बोली यांच्यामधील अनुबंधावर प्रकाश पडेल.अशा प्रकारचा विचार या ग्रंथाच्या निमित्ताने मराठीत प्रथमच होत आहे, हे येथे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.डॉ.ग्रियर्सन यांनी संपादिलेल्या उताऱ्यांना क्रम देऊन त्यांचे पृष्ठ-क्रमांकही संदर्भ-टीपांत दिले आहेत. त्यांनी हे उतारे जेथून मिळविले,त्या स्थळांची, त्याचप्रमाणे कुणबी,आगरी इ. उपभेदांची केलेली नोंदही त्यांत समाविष्ट केली आहे.

I. **कोकणी**

**(अ)** डॉ.सु.मं. कत्रे'यांनी कोकणीविषयी केलेले संशोधन सर्वमान्यआहे. 'The Formation of Konkani' या ग्रंथात त्यांनी कोकणीविषयी सांगोपांग विचार केला आहे.

या ग्रंथाच्या परिशिष्टात त्यांनी कोकणीची जी शब्दसूची दिली आहे,तिच्यामध्ये जे अरबी-तुर्की-फार्सी शब्द आढळतात, ते पुढे दिले आहेत. शब्दांपुढे या ग्रंथातील पृष्ठांक अभ्यासकांच्या सोयीसाठी निर्देशिले आहेत. डॉ. कत्रे यांनी फार्सी 'गार' सारख्या प्रत्ययांनी युक्त असे कोकणी शब्द दिले आहेत पण त्यांच्या फार्सी मुळाचा उल्लेख केला नाही.

अशाही शब्दांचा समावेश येथे केला आहे -

इजात (अ.इज्जत् ,१६८),कागद (अ.कागज् ,१७२),खबर(अ.खबर्,१८५),गरज

(अ.गरज्,१७०),गर्मी(फा.गर्मी ,१७७),गाडीगार(फा.गार्,१७७),चाकर(फा.चाकर्,१८१),जबर(अ.जबर्,१८४),टप्पाल (फा.तप्पह्,१८६),दम्मू (फा.दम्,१९०),दर्जी (फा.दर्जी,१९०),दस्तो (फा.दस्त्,१९०),दुस्मनकी (फा.दुश्मन् १९१),पलंगपोसू[३] (फा.पलंगपोश्,१९५,९६), पाल्की (फा.पाल्की,२१९७),पोइसो (अ.पैसह् १९९,मबफारस्य ५८७),फकत(अ.फकत्',१९९ ),फुसाल (फा.खुश् हाल् ,१९९),फुशी (फा.खुशी,१९९),फोबोर (अ.खबर,२००),बगर(फा/अ.बगैर्,२००),बराबरी (फा.बराबरी,२००),बदसूयत (फा.बद्,२००),मजकूर (अ.मजकूर्,२०३),रोक्का (फा.रुक्अह् ,२०८),वठाण (?अ.वतन् २१०) इ.

या कोकणी शब्दसंग्रहात गर्मी,दुस्मनकी,फुशी(खुशी),बराबरी सारखी भाववाचक नामे आहेत, 'बद' सारखे उपसर्ग आहेत, 'गार' सारखीं तद्धिते आहेत आणि 'बगर' सारखी शब्दयोगी अव्यये आहेत. शब्दसंग्रहात दैनंदिन जीवनात आवश्यक असलेल्या अनेक गोष्टी आहेत. त्यावरून कोकणीचा व फार्सीचा संबंध स्पष्ट होतो.

**(आ)** 'भारतीय भाषा सर्वेक्षणा'त (खंडः७ )डॉ.ग्रियर्सन[१] यांनी संपादिलेल्या कोकणी उताऱ्यांत फार्सी शब्दसंग्रहाबरोबरच अन्य भाषिक वैशिष्ट्ये व वाक्प्रचारही आढळतात ते असे -

**:१: कोळी[४] (मुंबई व बेटे)**

शब्दसंग्रह - चाकर,खुशी,हौस.

भषिक विशेष - त्याला (ला.प्रत्यय च.), चाकरांला, बापासला

वाक्प्रचार - चाकर लेखणे - नोकर समजणे.

**:२: कोळी[५](जंजिरा)**

शब्दसंग्रह - मेनत

भाषिक विशेष - तुमाला (ला.प्रत्यय च.),शेताशिवाय (शिवाय - श अ),व (उभ)

**:३: कुणबी[६](ठाणे)**

शब्दसंग्रह - मुलखाला,फिकीर,मुलखाच्या

भाषिक विशेष - खरचल्यावर (खर्चणे < अ.खर्च् )मुलखाला (ला.प्रत्यय् च. )बापसाला (ला.प्रत्यय च.)दूरच्या (दूर क्रिवि.),जमवून (जमवणे.<अ.जम्अ)

वाक्प्रचार - फिकीर परली. (फिकीर परणे - काळजी वाटणे)

**:४: कुणबी[७] (जंजिरा)**

शब्दसंग्रह - धनदौलत (<अ.दौलत्),

भाषिक विशेष - टाकल्याबरोबर (बरोबर शअ.),गेल्याबरोबर (बरोबर शअ.),दुरुन (ऊन - कृ),तिला (ला प्रत्यय - च.)

**:५: परभी[८] (ठाणे )**

शब्दसंग्रह - दौलत

भाषिक विशेष - खरचल्यावर (खरचणे क्रि. <अ खर्च् ),त्याला (ला.प्रत्यय च.),माला (ला.प्रत्यय च.),देसाला (ला. प्रत्यय च.),दूर (क्रिवी.),चारव्याला (ला.प्रत्यय च.)

वाक्प्रचार - दौलत घालविली (दौलत घालविणे-दरिद्री होणे)

:६: आगरी[९] ( कुलाबा)

शब्दसंग्रह - मुलुक,दवलत

भाषिक विशेष - त्याला (ला प्रत्यय च.)बापासला (ला प्रत्यय च.)मुलुकास (सारू)गिरिस्ताला (ला प्रत्यय च.)

:७: धनगरी [१०] (ठाणे)

शब्दसंग्रह - मालमता,मुलख,जमा,साल

भाषिक विशेष - मालमतेचा (सारू),त्येला (ला प्रत्यय च.), देशाला(ला प्रत्यय च.),मुलखात (सारू),त्याला (ला प्रत्यय,च.),खरचल - (खरचणे < अ. खर्च), दूर (क्रिवि)

वाक्प्रचार - जमा करणे.

:८: धनगरी [११] (जंजिरा)

शब्दसंग्रह - हाकीकत.

भाषिक विशेष - तुला (ला प्रत्यय च.),कासीला (ला प्रत्यय च.),बिरामनला (ला प्रत्यय च.)

वाक्प्रचार - नजर पडला (नजर पडणे - दिसणे.)

:९: भंडारी [१२] (जंजिरा)

शब्दसंग्रह - जिनगी,मुलख,चाकर

भाषिक विशेष - मुलखात (सारू),दूरच्या (क्रिवि),चाकरास (सारू),चाकरापरमान (सारू), त्याला (ला.प्रत्यय च.)

:१०:कुणबी [१३] (सावंतवाडी)

शब्दसंग्रह - जिदगी,खुशाल,बकरी,चाकरी

भाषिक विशेष - जिदगेचो(सारू),दूर(क्रिवि),माजेबरोबर(श अ.), राडांबरोबर(श अ.),बकऱ्याचा (सारू)

वाक्प्रचार - जिदगी वाटणे = संपत्ती विभागून देणे. चाकरी करणे.

II) गोमंतकी

डॉ वि.बा.प्रभुदेसाई [१४] यांनी सतराव्या शतकातील गोमंतकी बोलीचा अभ्यास केला आहे. त्यात त्यांनी प्रामुख्याने फादर स्टीफन्स, पाद्री दियोगु दिबैरू, पाद्री आल्मैद आणि पाद्री आंतोनियु द सालदांज यांच्या ग्रंथांच्या आधारे गोमंतकीचे स्वरूपदर्शन घडविले आहे. त्यात आढळणारे अरबी - फार्सी शब्द असेः (कंसात पृष्ठांक दिले आहेत.)

१. फादर स्टीफन्स

आदाय (अ.आइदह,१५७,मबफारव ३४४),जाजति(अ.जियादत्,१६१),जुलुमु (अ.जुल्म् , १६१),तागाइत (अ.तागायत् , १६४),नाहाक(फा.नाहक् ,१६७),मनसुबी (अ.मन्सब् , १७३),विलाथ(फा.विलायत्,१७६),हुर्मति (अ.हुर्मत्,१७८)

२. पाद्री दियोगु दिबैरू

ख्यालि(अ.खयाल् ,२०१),जेरबंद (फा.जेरबंद्,२०१),बुन्याद(फा.बुनियाद्,२०८), मना(अ.मन्अ,२०९),सकलात /द(अ.सकलात्,२१२),आपखोसी(फा.खुशी,२१७), कारागिर(फा.कार्गीर्,२१७),फारिकपण(अ.फारिग्,२१८),मजतिवार(फ.मददगार् ,२१८), सर्वहुकुमधारु(अ.हुक्म्,२२१)

३. पाद्री आंतोनियु द सालंदाज

गर्दन(फा.गर्दन् ,२३३), गुजरणे(फा.गुजर,गुजश्तन् २३३), मैदान (अ.मैदान्,२३४), हेजिब(अ.हाजिब्,२४१)इ.

४. पाद्री मिगेल द आल्मैद

कसदो(फा.कशीदह् २५९),दुस्मान(फा.दुश्मन् २५७),नदर(अ.नजर् २५७)इ.

या शब्दसंग्रहात 'ना ' सारखे उपसर्ग (नाहाक),'तागाइत 'सारखी शब्दयोगी अव्यये,गुजरणे सारखी क्रियापदे,'गिर 'सारखी तद्धिते(कारगिर)यावरील फार्सीचा प्रभाव जाणवतो.

III.वऱ्हाडी

**(अ)** या विभागात डॉ.वसंत वऱ्हाडपांडे यांच्या 'नागपुरी बोली 'या ग्रंथाच्या शब्दकोशातील अ.फा.तु.शब्द त्यांनी दिलेल्या व्याकरणविशेषांसह व अर्थासह संकलित केले आहेत. यातील एकूण सुमारे ९८० शब्दांपैकी सु.तीनशे - सव्वातीनशे शब्द अ.तु.फा. आहेत व त्यांत तिन्ही लिंगी नामे,विशेषणे,क्रियापदे,उभयान्वयी व शब्दयोगी अव्यये,उपसर्ग व तद्धितेही आहेत. यावरून नागपुरी बोली आणि फार्सी यांच्यामधील संबंध किती गहिरे आहेत,ते स्पष्ट होते.

**(आ)** या विभागात डॉ.ग्रियर्सनसंपादित 'भारतीय भाषा सर्वेक्षणा 'च्या सातव्या खंडातील वऱ्हाडीचे १२ नमुने तिच्या उपभेदांसह,त्याचप्रमाणे फार्सी भाषिक विशेषांसह,नोंदविले आहेत.त्यांनी हळबी बोलीचा समावेशही वऱ्हाडीत केल्याने तो भाग तसाच ठेवला आहे.

**(इ)** या विभागात प्रा. देवीदास सोटे यांच्या 'वैदर्भी बोलीच्या कोशा 'तील अ.तु.फा. शब्द दिले आहेत.

## अ. विभाग

## नागपुरी बोलीतील फार्सी शब्द ^ (सुमारे ३२५)

अइन(वि),अउदा(क्रिवि),अक्सर(क्रिवि),अखड्पक(पु,<अ आखिर+स.पक्ष),अरव्यार(पु),
अगर(उभ),अंगूर(पु?),अजब्(वि),अज्मावणे(क्रि),अजिबात् (क्रिवि),अम्दानी(स्त्री),अंदर
(क्रिवि),अंदाज(पु),अदुगी(क्रिवि),अघ्नक्(स्त्री),अयना(पु),अयब(पु),अर्का (वि<अ.अरक्),
अल्लानामी (वि:बायलट.मूलार्थ-ईश्वरालंबी वृत्तीचा),अव्जार(न),अव्व (क्रिवि/वि),असर(पु),
अरकारा(पु),अस्तानी(स्त्री),अस्ली(वि),आखर(क्रिवि/ना.),आफत(स्त्री),आब(पु),आयना(पु),
आराजी,इज्जत(स्त्री),इताल्ला(पु),इब्लिस(वि),इमान(न),इरादा(पु),इसारा(पु),उजर्(पु),
उमर(स्त्री),उस्तवारी(स्त्री),कत्वारखाना(पु:लेढार),कदम(स्त्री:घोड्याची विशिष्ट चाल),
कदर(स्त्री),कब्जा(पु),कम्(उप.),कम्ती(वि:थोडे),कंबर(स्त्री),कुडता(न<फा.कुर्ता),खराब(वि),
खराबा(पु),खातर(स्त्री),खुर(न<फा.खुर्:पांढरे कोड),खुराक्(स्त्री),खुशाल(क्रिवि),
गदाडखान(पु<फा.खानह्=कचऱ्यामुळे निर्माण झालेली घाण),गर्मी(स्त्री),गल्ती(स्त्री)
,चंदी(स्त्री),टर्बुज(न),टरेबाजी(स्त्री<फा.बाजी),तकाबी(स्त्री<अ.तकावी),तत्का(पु),तक्दीर(स्त्री),
तक्रार(स्त्री),तक्लीब(स्त्री),तक्क्या(पु),तब्बेत(स्त्री),तंगी(स्त्री),तमाम(वि),तमाशा(पु:लज्जास्पद
प्रसंग),तसनस(स्त्री),तल्लफ(स्त्री),ताकत(स्त्री),ताव(पु),तालेवार(वि),तेज(वि:चपळ,तल्लख),
दफनाढणे(क्रि:लुबाडणे),दम(पु:थकवा,श्वास),दमछाक(स्त्री),दरोगा(पु),दर्खास(स्त्री:विनंती
अर्ज <फा.दर्खास्त),दर्जा(पु :दोन विटा/फरशा यात मातीचुन्याने भरायची मोकळी
जागा<फा.दर्ज),दवाइ(स्त्री),दवाखाना(पु),दरती(स्त्री),दावा(पु),दिमाख(पु),
दिमाखचोट्टी(वि:बडेजाव मिरवणारी),दिवाल(स्त्री),दिवालगिरी(स्त्री:भिंतीला
अडकवण्याचा दिवा),देर(स्त्री),दोगल्या(वि<फा.दोग्ला=संकरज),दोस्ताना(पु),धिंगामस्ती
(स्त्री<फा.मस्ती),नक्कल(स्त्री:प्रत),नखरा(पु),नखरेल(वि),नाजुक(वि),नाराजी(स्त्री),नालिश
(स्त्री:फिर्याद,दावा),निकाल(वि:शुद्ध<निखालिस),निवार(स्त्री<फा.नवार),नुक्सानी(स्त्री),नुस्कान(न),
पन्हा(पु कापडाची रुंदी<फा.पहनह्=रुंद),पर्वा(स्त्री),पल्ला(पु),पवंच्या(पु:पायाचा पंजा),
पागल(वि),पागलपना(पु),पागा(पु:?गायम्हशीच्या मागल्या पायाला दूध दोहतेवेळी बांधायची
दोरी),पायखाना(पु),पेवंदी(वि)=कलमी(आंबे<फा.पैवंद),फाजिता(पु):फजितवडा,फाका(पु:=पासमार),
फाकेमस्तान(वि:उपासमारीशी फिकीर न करणारा),फुर्सत(स्त्री:रिकामपण),फोवा
(पु:अत्तराचा फाया),,बकाया(स्त्री),बगल(स्त्री),बत्ता(पु),बद(उप),बंदा(वि< ?),बयान(न:
कोर्टातील निवेदन),,बराबर(क्रिवि),बल्के(क्रिवि),बायको(स्त्री),बिन(उप),बिमारी(स्त्री),
बिल्कुल(क्रिवि),बिल्लोर(पु<फा.बिल्लर),बे(उप)पासून,बयमान,बेकसूर,बेकार,बेसम ,बेवकूब
बेल्दार(पु<फा.दार् विटामातीचे काम करणारा कारागीर),ब्येस(क्रिवि:चांगले.<फा.बेश्)
मइलखोर(वि<फा.खोर् :मळ संपादणारा),मकान(न),मगज(न),मगज्दार (वि),मजाक(स्त्री)
,मजाल(स्त्री:शक्ती,ताकद),मत्लब(पु),मंजुरी(स्त्री),मन्शा(स्त्री),मय्यत(स्त्री:प्रेतयात्रा)
,मर्जी(स्त्री),मस्त(क्रिवि:मनोसक्त,चांगले),मस्ताडणे(क्रि :मस्तीने वागणे),मस्ती(स्त्री),
माजोरी(वि),मानगी(स्त्री:आजार<फा.मांदगी),मामला(पु:विषय),मामुली(वि),

मालिस(स्त्री),मालुम(अ),माल्धनी(पु<अ.माल),मिता<खुशामत,मिनतवारी(स्त्री),मिरतरी(पु),मुकद्दमा(पु), ,मुन्शी(पु):हेडकॉन्स्टेबल(या बोलीतील विशिष्ट अर्थ),मुफत(क्रिवि),मुर्वत(स्त्री),मुलाम(वि), मुस्किल(वि),मोक्का(पु),याद(स्त्री),येलची(वि:चावट<तु.येल्चीउराजदूत),येलचीपना(पु):चावटपणा(या बोलीतील विशिष्ट अर्थ),रकमेरकमेचं (वि):निरनिराळ्या प्रकारचे (या बोलीतील विशिष्ट अर्थ),रद्दी(वि:वाईट<फा.रद्),रफातफा(स्त्री):नासधूस,?रफूचक्कर(होणे),रवाना(करणे):पाठवणे, रवाब्(पु)रुबाब,रुख (पु):तोंड(या बोलीतील विशिष्ट अर्थ.),रुज्वात(स्त्री:शहानिशा),रुबरु (क्रिवि),रोजदार(पु:मजूर),रोजगार(पु),रोजी(स्त्री),लकीर(स्त्री),लम्चा(वि:<फा.'चह् 'प्रत्यय),लबालब(क्रिवि),लास(स्त्री<फा.लाश् ),वल्वला(वि:चुळबूळ करणारा),वारवा (पु:उपासमार),वानगी(स्त्री:<फा.गी प्रत्यय),वायदा(पु:शेतसारा-या बोलीतील विशिष्ट अर्थ),शउक (पु:छंद),शक(पु),शरम(स्त्री),शाडत् (क्रिवि:कदाचित् <फा.शायद्),शान(स्त्री ),शामदानी(स्त्री:दिवा <फा.शमादान्),शाबासकी(स्त्री),शाबुत्(अ),शिक्का(पु:स्त्रियांच्या बोटात घालायची अंगठी - या बोलीतील विशिष्ट अर्थ),शिर्नी(स्त्री:प्रसाद<फा.शीरीन्: गोड),शिवाइ(वि:जास्तीचे,आणखी<फा.सिवा - या बोलीतील विशिष्ट अर्थ),शिशी(स्त्री) सक्त्(वि:निबर,कठीण),सक्करपारा(पु:जर्दाळू?,<फा.शकर्पारा),सद्दी(स्त्री:चलती,भरभराटीचा काळ,<फा.सादी),संदूक(स्त्री),सप्पा(क्रिवि<अ.साफ,सफा?),सफाई (स्त्री:निर्दोषता), सफेदी(स्त्री:चुन्याचा रंग,घराची रंगरंगोटी),सामलात(स्त्री:सामायिक <अ.शामिलात्) ,सायवान(न),साल(न:वर्ष,वर्षाचा पगार),सालोनी(क्रिवि:दरवर्षी),हक्(पु),हक्दार्(पु),हजम (करणे),हजामत(स्त्री),हजारा(पु)हदखोर(वि:फा.खोर् तध्दित).,हद(स्त्री),हप्ता(पु),हब्बा (दाखवणे),हयवान(पु:दुष्ट माणूस),हयरान(क्रिवि),हयसियत(स्त्री),हर(वि),हराम(अ), हरामखोर(वि:बदमाश), हरामाचा(वि:आयता,अनुचित मार्गाने लाभलेला),हरामी(वि),हर्कत (स्त्री),हर्गिज(क्रिवि:नेहमी - या बोलीतील अर्थ),हर्रास(पु),हलाल्खोर् (वि: अप्रामाणिक -या बोलीतील अर्थविपर्यय),हल्काइ(स्त्री),हवा(स्त्री),हाउस(स्त्री: हौस,आवड),हाजर(वि) ,हालत(स्त्री),हाव(स्त्री),हिक्मती(वि)हिपाजत(स्त्री),हिम्मत(स्त्री),हिरस्खोर(वि),हिरस(स्त्री), हिसाब(पु),हुकूम(पु),हुज्जत(स्त्री),हुन्नेर(पु),हुश्शार(वि:तरतरीत,समजदार),हुश्शारी (स्त्री:धूर्तपणा),हेवादावा(पु:फा.दावा)

### 'आ' विभाग (भारतीय भाषा सर्वेक्षण, खंड - ७ )

#### :१: नागपुरी [१५] (जि. नागपूर )

शब्दसंग्रह - हिस्सा,जमेत,चाकर,मेजवानी,खुशाल,जवाब

भाषिक विशेष - व (उभ),चाकरासारख(सारू.),बरोबर (शअ -उदा.[illegible]
,रांडांहीबरोबर)

वाक्प्रचार - जवाब देल्ला(जवाब देणे-उत्तर देणे),चाकरी करणे

:२: वऱ्हाडी [१७] ( ब्राम्हणी - अकोला)

शब्दसंग्रह - वल्लद,उंबर,आजमास,बायको,सदरहु,इसम

भाषिक विशेष - की(उभ.),बायकोन(सारू),गेल्याबरोबर(बरोबर, शअ. ),व (उभ),मला(ला प्रत्यय च.)

वाक्प्रचार - नजर गेल्याबरोबर (नजरजाणे - पाहणे)

:३: वऱ्हाडी [१८] ( वून - अकोला)

शब्दसंग्रह - हिसा,माल,जिनगी,चहूलबाजी,मुलख,सालकरी,खुशाली,चाकरी, बकरा,रांडबाजी,मजा

भाषिक विशेष :हिश्याचा(सारू),व (उभ.),मुलखातील(सारू), कीं (उभ),बरोबर (शअ.),ज्यास्त(वि.),मला(ला प्रत्यय च.)

वाक्प्रचार : मजा करणे - चैन करणे.

:४: वऱ्हाडी [१९] ( बैतुल)

शब्दसंग्रह - हिस्सा,मुलुक,गरीब,बदफैली

भाषिक विशेष : मानसाले,बापाले (ले प्रत्यय च. ),कीं (उभ),मुलुकांत( स.),त्याले (ले प्रत्यय च.)

वाक्प्रचार -बदफैली करणे

:५: झारपी [२०] ( एलिचपूर /अचलपूर)

शब्दसंग्रह -रयत,

भाषिक विशेष -कोणाले (ले प्रत्यय च.),नेतराले(ले प्रत्यय च.),मले(ले प्रत्यय च.)

वाक्प्रचार -खुशाल झाली (खुशाल होणे -आनंदणे)

:६: गोवारी [२१] ( छिंदवाडा)

शब्दसंग्रह - हिस्सा,चाकर,बदमासी,खुसी,चाकरी,दोस्त,किसबीन,बराबर,बकरी,जोडा.

भाषिक विशेष -ह्याले,गळ्याले,बापले,मले,लोकाले,त्याहीले,त्याले,सर्वाले,चाकराले(ले प्रत्यय च.),दोस्ताबरोबर(शअ.),माहाबराबर (शअ.)की (उभ.)

वाक्प्रचार - खुसी झाली(खुशी होणे - आनंदणे),खुसी कराय(खुसी करणे - आनंदोत्सव साजरा करणे),चाकरी करणे,खुसी होणं,चाकर राहणे,जमा करणे (मिळविणे)

:७: मऱ्हेटी [२२] (बालाघाट)

शब्दसंग्रह - दारु,दुकान,तलास,

भाषिक विशेष - पोऱ्याला (ला प्रत्यय च. ),धन्याले(ले प्रत्यय च ),मले (ले प्रत्यय च.),पोऱ्याले (ले प्रत्यय च.) त्याले (ले प्रत्यय च.)दुकानावर (सारू)

:८: मऱ्हेटी [२३] (बालाघाट)

शब्दसंग्रह - हीस्सा,जमा,छीचोरीबाजी,मुलक,मजदुर,पुर

भाषिक विशेष - त्याल (ले प्रत्यय च.),छीचोरी बाजी(बाजी तद्धित ),मुलकाचे (सारू),
मजदुरासारखे (सारू),माला (ला प्रत्यय च. ),गुमाऊन (ऊन-कृ)

वाक्प्रचार - जमा करणे (मिळविणे)

**:९: नतकानी [२४](चांदा)**

शब्दसंग्रह - तक्षिम,माल,नयकर,रोज,दोस्ति.

भाषिक विशेष - मानसाले,मले,त्याले (ले प्रत्यय च.) नवकरामंदे (सारू),नवकराले,
पायाले,हाताले (ले प्रत्यय च.) तक्षिमीचा (सारू)

**:१०: महारी [२५] (बस्तर)**

शब्दसंग्रह - बरबाद,कंगाल,लायक

भाषिक विशेष - ये - (संबोधन),बराबर (शअ)

वाक्प्रचार -बरबाद करलो (बरबाद करणे ),कंगाल होलो (कंगाल होणे),हांक देयासीन
(हाक देणे<फा.आवाज् दादन्)

**:११: हळबी [२६] (भंडारा)**

शब्दसंग्रह - चाकर,जोडा,मालमत्ता,जमा,पैसा ,दुर,मुलख,वकत,हुकुम,खुशी

भाषिक विशेष - त्याले,मानसाले,बापाले,गऱ्याले,पोऱ्याले,चाकराले,माले लेकाले(ले
प्रत्यय च.),मालमत्तेचा (सारू),चाकरापरमाणे (सारू), मुलखामंधी
(सारू ),संग्याबरोबर(शअ),माझ्याबराबर (शअ)

वाक्प्रचार - चाकरी करतून ( चाकरी करणे.),खुशी करावाले (खुशी करणे. )

**:१२: हळबी [२७] (एलिचपूर /अचलपूर)**

शब्दसंग्रह- हिस्सा,पैसा(?)मुलख,सालदार,दूर,कामदार,पेहराव,जोडा,चाकरी,
किसबीन,जिंदगाणी,हौस,खूसी,जमा

भाषिक विशेष - खर्ची भयो (खर्चणे क्रि),गडीबरोबर (शअ),बापला (ला प्रत्यय च.),गमा
दीस (क्रि),कामदार (दार प्रत्यय)

वाक्प्रचार - मजा करणो (मजा करणे.),मोताब भयो (मोताद होणे)

## (इ)विभाग

## 'वऱ्हाडी बोलीच्या कोशा'तील अ.तु.फा. शब्द

(सं.प्रा.देवीदास सोटे )

अकसे,अगना,अगाजणे,अज,अजब(करणे),अजमाईस,अंजाम,अज्जूरा,अतारी,अदब,अंदेशा,अपतर,अब्बासी,अयन,अयना,अरमान,अरबाडी,आखर(होणे),आजम,आदत,आबादानी,आमेद,आरा,आवंदा,इतबार,इतल्ला,इन्साफ,इफाजत,इभरत,इरसाल,इराकत,इरादा,इलजाम,इलम,इत्लत,एकीन,कज्जला,कत्तल(करणे),कतार,कदर,कंदोरी,कमसल,कमीन,कलम,कलमदान,कलार,कसम,कसबी,कसूर,काजी,कारभारी(फा.कार्बार),कुंटनखाना(खानह्),कुडतं(फा.कुर्ता),कुरपत,कुल (अ.कुल्ल्),कुवत,कोसीस,खकाना,खजांजी,खडाजंगी(फा.जंग्)(अ.खास्स),

खिलाप,खिसमतगार,खिस्सा,खुजा,खुद,खुपसुरत,खुबी,खुरम(फा.खुर्म),खुरमानी,खुरसी,
खुराक,खुशामत,खुशी,खुस,खुसबू,खूर,गज,गजब,गंजीखाना(फा.गंजीखानह),गफलत,
गमणे,गर्रक(फा.गर्क),गरज्या(अ.गरज),गराड (अ.गिर्द),गलती,गवार,गाफिल,गायप(होणे
)(फा.गैब),गिबत,गिरदी,गुजरी,गुंजाईस,गुत्ता,गुदस्ता(फा.गुजश्तह),घुस्सेल,चमल चमल(
करणे)(फा.चर्ब),चरबत्तर (फा.चर्ब)चरबदर,चरबर,चाबरणे (फा.चर्ब),चाभरा,जप्ती,जम,
जरावशे,जानमर्द,जाफा,जीकर,जिग्जिग,जिगरजान,जिनगर,जिनगानी,जीन,जीम्मेदार,जीरी,
जुमलेदार,जमाना,जुलमाना,झटझडून(अ.झडती),झरनी,झुमका,डाई(फा.दाव),डागडुजी,डाव,
डेग,तक्ती,तकपट्टी,तत्कपस,तक्शीम,तक्क्या,तक्केफ्राड(फा.तकियह+म.फ्राड),तख्त,तंग,तंगपुस्तंग,
तनखा,तरमा,तरतुद,तरक्की,तरा,तवकुब(करणे),ताजुब,तुरा,दगावणे(फा.दगा),दम(घेणे)
,दव,दम(धरणे),दमदापट(करणे),दमदमा,दरोजा,दवत,दवापानी,दस्त,दस्ती,दाना,दावन,दावा,
दिदार(फा.दीदार),धास्ती(दहशत),धिंगामस्ती(फा.दंगामस्ती),नकरसकाम(अ.नक्श्
+म.काम),नखखी नगदनारायन(फा.नक्त+म.नारायण),नतिजा,नदार(अ.नजर),नसनस
(करणे),नहेर(अ.नहर),नाचारी,नामोसी,नाहकनी,निका,नूर,नेत(अ.नीयत),नेस्तनाबूत,परवा,
परेज,परेशान,पिशाब,पेशेमानी,पैजार,फकन्या,फक्त,फकीर,फक्की,फतई,फतन्या,फंद(देणे),
फलाना,फरस्त,फक्या,फारकत,फितूर,फिरस्त,बगर,बजवय्या(फा.बजा),बदी(फा.बद),बंदा,
बयमान,बरताव,बरसकाला,बलकी,बरस्ता,बहाल,बहाना,बागडोर,बाग,बाजिंदा,बार(भरणे),
बारदाना,बारीस,बासन,बिगर,बिगाऱ्या,बिदागिरी,बीन,बिस्तरा,बुजरूक,बुरं(फा.बुरा),बुलाखा,
बेगनी(फा.बेगमी),बेजार,बेहतरीम,बेहद,बेहमान,बेहुदा,मकऱ्या,मखखा,मगरुर,मजकूर,मजरा,मजाल,
मझारला,मतलबी,मरजी,मसक,मसलत,मसालावने,माफक(अ.मुआफिक),माल मालामाल,
मालूम,मिनता,मुकन,मुकाबला,मुनसफा,मुन्सरीम(फा.मुन्शी),मुभा,मुरदाड,मुरवत,मुलायम,मेढ,मोकील,
मोघम,मोमना,यादररातकार(फा.याद),रखाद,रग,रगरग,रग्गा,रग्गेल,रंज,रद्दा,रफातफा,रहीस,
राजरोस,रू,रिस्तेदार,रेक्ता,लट,लटाऱ्या,लवाजमा,लाजीखाना,लालतंबीर(फा.लाल),,लालझुरुक,
लास,लिबास,वखद,वल्ली,वस्ताद,वाखा,वापेस,वासलात(अ.वासिलात),वाही,शक,शखी,
शानिशा,शामदानी,शामील,शिकस्त,शिरस्ता,शिरनी,शिल्लोक(फा.सल्ख),शिवाई(फा.सिवाअ),
शौक,शौकीन,सई,सगजीर,संगीन,सजा,संदल,सप्पा,सफ्फा,सब्बन,सबक,सर,सल्ला
सवलत,सातरी(अ.सातिर),सानक,सामायन,सालाबाद,सुरत,हदन,हद,हरहम्मेस,हरामी,हरामजादा,
हायवडा,हालत,हाल,हिकमत,हिफाजत,हुन्नेरी,हुरमट,हैरत,होका.

॥ पुरवणी शब्द ॥

अख्त्यार,अजब,अंदाज,अमदानी,अर्कोट,अवजार,असर,अंस्तनी,आस्मानतारा(फा.आस्मान,म.तारा),
आखर,आब,आबादी,आयपत,इजा,इसार,उमर,उस्तवारी,कब्जा,खलास,खाना,खुशाल,
गज,गंजिफा,गुजरणे,जाब,तक्ता,तगादा,तंगी,तमाम,दफनाडणे(अ.दफन),दर्जी,दाद,दिमाख
,निगरानी,पन्हा(फा.पन्हाउरुद),पर्चा,पब्ला,पल्लेदार,फत्ते,फुरसद,बरदास्त,बिल्लोर,बेमुवेत,
मंजुरी,मतलब,मोक्का,याद,मेलशी(तुर्की.पल्पी),रुजवात,रोजी,लबालब,लाजीम,लापता,वहेमा,
शहक,शरम,शाकारणे(स.सक्का),शाबुत,शिपाई,सक्करपारा,सत्तम,सामलात(अ.शामिल).

सायवान,साल,हरनाक,हजम,हजारा,हररान(हयरान),हख्सियत,हर,हिरस(अ.हिर्स),हुज्जत.
,हुरुप,हौरा.

(संदर्भ - 'वैदर्भी बोलीचा शब्दकोश 'प्रा.दे.गं.सोटे. सोटे साहित्य प्रकाशन संस्था वर्धा प्रथमावृत्ती १९७४)

-----------------

IV अहिराणी

'अ' विभाग

डॉ रमेश सूर्यवंशी यांनी अलीकडेच अहिराणीचा केलेला विचार मला लक्षात घेण्याजोगा वाटतो त्यांनी अहिराणीच्या विविध भाषिक अंगांची चांगली व सोदाहरण चर्चा या ग्रंथात केली आहे तथापि त्यातील अ.तु.फा.या भाषांच्या प्रभावाची नोंद शब्दसंग्रहविषयक भाग[१८]-म्हणजे त्यातील पुढील तीन परिच्छेद- वगळता,अन्यत्र केली नाही,त्यामुळे अहिराणीच्या अन्य भाषिक वैशिष्ट्यांवर फार्सीचा कितपत ठसा उमटला, ते स्पष्ट होत नाही . या संदर्भातील त्यांचे मूळ विवेचन असे आहे -

'मुसलमानी भाषेतील शब्द

खानदेशावरील मुसलमानी अंमलामुळे मुसलमानी भाषेचा प्रभाव खानदेशी बोलीवर होणे साहजिकच आहे. मुसलमानी बोलीत आढळणारे अरबी,फार्सी आणि तुर्की या तीनही भाषांतील शब्द खानदेशी बोलीत मुसलमानी भाषेतून आलेत.खानदेशी बोलीत आढळणारे फारशी शब्द व फारशी शब्दावरून तयार झालेली काही रूपे पुढीलप्रमाणे आहेत -

**फारशी शब्द** : मुसलमानीतून बोली भाषेत

कमजोर,कमनशीब,कमर,कलंदर,कार्भारी,खबरी,खाक,खोगीर,गुदस्ता,गुजारा,गुर्मी,चर्बी,चादर,चार, जनावर,जबर,जहाबाज,जिना,टर्बुज,तंग,तमाशा,तालेवार,दगा,दम,दमा,दाना,दारू, दिल्दार,दुही,दोस्त,नापसन,नापाक,नेक,फर्मान,बदनाम,बर्बाद,बाग,बारदान,बिल्कूल इ.

**अरबी शब्द** : (फारशीतून मुसलमानीत व मुसलमानीतून मराठी वा खानदेशी बोलीत)

मजल,मज्बूर,मत्लब,मनोश,मर्जी,मलूल,मस्करी,मस्लत,मानत,मामुली,मालूम,मुर्वत,मुलूख,मुश्कील, मोसम,रईस,रगड,रत्तल,राजी,रिवाज,वहीम,वायदा,वासलात,शरीक,शान,शाबूत,शागील, सफा,सबूर,सुरई,सूरत,हकीकत,हाजर,हद्द,हर्कत,हिशेब,हुल,हैयान इ.'

डॉ.सूर्यवंशी यांनी अन्य विवेचनात अहिराणीतील अ.तु.फा.शब्द वापरले आहेत पण त्यांची तशी नोंद व्युत्पत्तिदृष्ट्या केली नाही व ही वैशिष्ट्ये अ.तु.फा. पासून आल्याचा उल्लेख ते करीत नाहीत. उदा. पृ.८० वर ते भाववाचक नामांची उदाहरणे देताना 'गरमी 'हा शब्द नोंदवितात पण ते फार्सी भाववाचक नाम[१९] असल्याचे सांगत नाहीत.विशेषनामांत शाहू,काफऱ्या ही उदाहरणे देतात पण ती अ./फा/तु असल्याचे नोंदवीत नाही. स्वरान्त नामांत जमाना,गच्ची,नवकरी,गलती,हुषारी, चुघली,जिम्मुदारी,बायको ही नामे देतात पण ती मूळ अ/तु/फा असल्याचे सांगत नाहीत[२०]. वचनाचा विचार करताना जागा,बायको ही उदाहरणे देतात पण त्यांचे मूळ सांगत नाहीत. व्यंजनान्त नपुसकलिंगी नामांत 'कुलूप 'चे अनेकवचन 'कुल्पे 'होते हे सांगतात पण त्याचे अरबी मूळ कुफ्ल् हे आहे,हे सांगत नाहीत.[२१] द्वितीयेचा 'ला 'प्रत्यय फार्सी 'रा 'पासून आला हे इति. राजवाड्यांनीच सांगितले आहे व डॉ माधवराव पटवर्धनानी ते मान्य केले आहे. (याविषयी मी संबंधित स्थळी विचार केलाच आहे.)

या 'ला 'प्रत्ययाचेच अहिराणीत 'ले 'हे रूप होते. वख्खरले, बाइले,पोरगाले,पोऱ्याले ही उदाहरणे देताना हा फार्सी प्रत्यय असल्याची कल्पना डॉ सूर्यवंशी यांना नसावीसे वाटते कारण तशी नोंद ते करीत नाहीत." अहिराणी शब्दयोगी अव्ययांचा विचार करताना ते नजीक,लायक,शिवाय,बरोबर,बदलाम्हा,आयवजी ही अव्यये नोंदवितात पण ती अ.फा. पासून आले,हे स्पष्ट करीत नाहीत.पृ.१०१ वरील 'विशेषणांची सिध्दी 'या उपशीर्षकाखालील ज्या उपसर्गांनी अहिराणी विशेषणे सिध्द झाली ते सर्व उपसर्ग (ब,दर,ना,बीन इ. )मूळचे अ.फा.आहेत.हे स्पष्ट झाले असते तर या सिध्दीतील अ.फा.चा वाटा कसा लक्षणीय आहे ते कळले असते. क्रियाविशेषणे,उभयान्वयी अव्यये यांच्याबाबतीत तीच गोष्ट.अहिराणीतील दोन वखत - तीन वखत (अ.वक़्त ), दूरधून(=दुरुन <फा.दूर ),दर्रोज(फा.दर् रोज् )ही क्रियाविशेषणे,'की ' सारखे उभयान्वयी अव्यय,'वा "शाबास 'सारखी उद्गारवाचक अव्यये अ.फा. तून आली आहेत,हे कळले असते म्हणजे अ.फा.व अहिराणी यांतील भाषिक अनुबंध अधिक चांगल्या प्रकारे स्पष्ट झाला असता.

'आ ' विभाग

अहिराणीचा फारसा विचार केल्याचे डॉ.ग्रियर्सन यांच्या 'भारतीय भाषा सर्वेक्षणा'च्या सातव्या खंडात मला आढळले नाही. मलकापूर - बुलडाण्याच्या परिसरातही अहिराणी बोलली जाते. त्यातील डॉ.ग्रियर्सनसंपादित एका उताऱ्याची " भाषिक वैशिष्ट्ये पुढे देत आहे -

शब्दसंग्रह - हिस्सा,जिनगी,चैनबाजी,

भाषिक विशेष - त्याला (ला -प्रत्यय च. )

वाक्प्रचार - जिनगी उडवणे

----------

संदर्भ-टीपा

१.The Formation of Konkani,Dr.S.M. Katre

२. डॉ. कत्रे यांनी हा सं पर्यंक पासून व्युत्पादिला आहे पण हा मला दूरान्वय वाटतो. पाहा मबफास्त्र,पृ ५८०

३.Linguistic Survey of India(LSI),Vol.VII ,Dr.G.A.Grierson,Motilal Banarasi Dass,Varanasi,Reprint 1968

४. कित्ता ,पृ ६८-६९

५. कित्ता ,पृ ७६

६. कित्ता ,पृ ८७

७. कित्ता ,पृ.८८

८. कित्ता ,पृ.९३

९. कित्ता ,पृ.९५

१०.कित्ता ,पृ.९८

११.कित्ता ,पृ.१००

१२.कित्ता ,पृ.१०७

१३.कित्ता ,पृ. १९६

१४. सतराव्या शतकातील गोमंतकी बोली,डॉ.वि.बा.प्रभुदेसाई,मुंबई विद्यापीठ,मुंबई १९६३

१५. नागपुरी बोली,भाषाशास्त्रीय अभ्यास ,डॉ.वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे,इंदिरा प्रकाशन,नागपूर.१९६२. शब्दकोश पृ. ३२६-३६२

१६. LSI ,pp 248 -249

१७.कित्ता ,पृ.२२८

१८.कित्ता ,पृ.२३९

१९.कित्ता ,पृ.२४६

२०.कित्ता ,पृ.२७५-६

२१.कित्ता ,पृ.२८१-२

२२.कित्ता ,पृ.३१०

२३.कित्ता ,पृ.३०५

२४.कित्ता ,पृ. ३१४

२५.कित्ता ,पृ.३५१-२

२६.कित्ता ,पृ.३६१-२

२७.कित्ता ,पृ.३६७

२८. अहिराणी भाषावैज्ञानिक अभ्यास,डॉ.रमेश सूर्यवंशी,अक्षय प्रकाशन,पुणे.१९९७, पृ.१५८

२९.कित्ता ,पृ.८०

३०. कित्ता ,पृ.८२

३१.कित्ता ,पृ.८४

३२.कित्ता ,पृ.८९

३३. LSI ,p.४६

----------

प्रकरण अकरावे

# वाङ्मयीन अनुबंध

फारसी भाषा आणि वाङ्मय यांचा मराठी वाङ्मयाशी संबंध आला तो काही विशिष्ट कारणांमुळे व काही विशिष्ट परिस्थितीत. त्याचा सविस्तर मागोवा या ग्रंथाच्या एका लहानशा प्रकरणात घेणे अशक्य आहे-कारण त्याची व्याप्ती चौदाव्या शतकापासून, एकविसाव्या शतकापर्यंत आहे. ही व्यापती केवळ काळाच्या दृष्टीनेच लक्षात घेण्याजोगी नाही तर विविध लेखन-प्रकारांच्या दृष्टीनेही महत्त्वाची आहे.त्यांचा अत्यंत संक्षेपाने येथे विचार केला आहे. आकलनाच्या दृष्टीने मी या वाङ्मयीन अनुबंधाचे पाच विभाग केले आहेत.

१. संतसाहित्य २. पत्रात्मक गद्य ३. बखरवाङ्मय ४. शाहिरी वाङ्मय आणि
५. आधुनिक मराठी कविता.

पंडिती वाङ्मयाचे फारसी भाषा व वाङ्मय यांच्याशी नाते जुळले नाही कारण समाजातील विशिष्ट अभिजनांच्या दृष्टीने फारसी भाषा ही 'म्लेछ' भाषा होती व फारसी वाङ्मय हे 'म्लेछ' वाङ्मय होते. तशी पंडिती कविता ही मऱ्हाटमोळ्या जनसामान्यांत कितपत रुजली, हा एक स्वतंत्र संशोधनविषय होऊ शकेल. पंडिती कवितेशी फारसीचे हे नाते न जुळल्याने तिचा विचार करण्याचे प्रयोजनही उरले नाही.

**१. संतसाहित्य :**

(अ)मराठी संतांची 'दक्खिनी ' रचना

संतानी जनसामान्यांची भाषा आपल्या लेखनाचे माध्यम म्हणून स्वीकारली होती. त्यामुळे भाषेची बदलती रूपे व तिच्या बदलत्या शैली यांचे प्रतिबिम्ब संतसाहित्यात उमटणे स्वाभाविक होते.ज्ञानदेवकालापर्यंत मराठीला फारसीचा स्पर्श झाला नाही,असे रामदेवराव यादवांपर्यंतचा इतिहास आपल्याला सांगतो.तथापि ज्ञानदेवांच्या काळात व त्याच्या नंतरही नामदेव होते. या उत्तरकाळात ते पंजाबात गेले होते,त्यांनी 'दक्खिनी 'मध्ये पदे लिहिली होती. त्यांची 'मुखबानी' शिखांच्या 'गुरुग्रंथसाहेब' या पवित्र ग्रंथात समाविष्ट केलेली आहे. त्यांची प्रभावकक्षा उत्तर भारतापर्यंत विस्तृत झाली होती व या अर्थाने 'नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ।।' या बहिणाबाईच्या चरणांनाही एक वेगळी अर्थच्छटा प्राप्त होते.मराठी संतांची दक्खिनी रचना ही मराठी-फारसीमिश्रित आहे .डॉ.श्रीधरराव कुलकर्णी म्हणतात त्याप्रमाणे मराठी संतांची दक्खिनी रचना हा मऱ्हाटी संस्कृतीचाच एक लोभसवाणा आविष्कार आहे. हा आविष्कार मुख्यत्वेकरून नामदेवांच्या दक्खिनी रचनेतून प्रकट झाला. (त्यांच्यापूर्वी थोडीफार दक्खिनी रचना महाराष्ट्रात आली होती हे लक्षात घेऊनही ) नामदेवांनी खऱ्या अर्थाने या क्षेत्रात जी मोलाची भर घातली ती लक्षात घेता अशा दक्खिनी संतकवितेच्या संदर्भात 'नामदेवें रचिला पाया' असे म्हणणेही सयुक्तिकच ठरेल. ही रचना म्हणजे मऱ्हाटी संस्कृतीचा एक उत्कृष्ट

आविष्कार असला तरी तिने हिन्दी वाङ्‌मयालाही मोलाचे योगदान दिले.हिंदी साहित्याच्या आदिकालाला त्यामुळे काहीसा आधीच प्रारंभ झाला.हे नामदेवांचे श्रेयही अमान्य करता येणार नाही. पुढे अनेक शतके (निळोबा आणि बहिणाबाई यांच्या काळापर्यंत) मराठी -फार्सीमिश्रित शैली 'दक्खिनी संतकविते 'च्या रूपाने अखंड प्रवाहित झाली. या प्रवाहात एकनाथ, तुकाराम,शेख महमद आणि रामदास या संतांची कविता आपल्या वेगळेपणाने अधिक उमटून दिसते. महानुभाव आणि वीरशैव संतकवींचेही या संदर्भातील दक्खिनी लेखन दुर्लक्षून चालणार नाही. मुरारीमल्ल बास या महानुभाव संतकवीचा 'दर्शन प्रकाश' हा ग्रंथ आणि त्यातील 'पैगम्बरी मत' हे प्रकरण याविषयी मी माझ्या 'महानुभाव साहित्य संशोधनः खंड १'या ग्रंथात चर्चा केली आहे. त्याचप्रमाणे चक्रपाणी येळंबकर या महानुभाव संतकवीच्या 'तीसा ' साहित्याचा विचार माझ्या 'महाराष्ट्र के महानुभाव साहित्यकारोंका हिन्दी साहित्य को योगदान ' या ग्रंथात सविस्तर केला आहे. सूफींच्या फार्सी काव्यशैलीशी त्यांनी प्रतिपादिलेल्या 'तसव्वुफ' च्या तत्त्वज्ञानाशी त्याचे किती जवळचे नाते आहे, हे त्यावरून स्पष्ट होते. डॉ. इंदू लिमये यानी संपादिलेल्या व धुळयाच्या समर्थ वाग्देवता मंदिराने प्रसिध्द केलेल्या समर्थांची 'मुसलमानी अष्टके 'या सारख्या ग्रंथातून सूफींच्या फार्सी काव्यशैलीशी दक्खिनी व मराठी संतकाव्याची शैली कशी मिसळली होती, याची प्रचीती येते. वीरशैव संतकवींनी फार्सी- मराठी संमिश्र दक्खिनी कविता लिहिली. मन्मथस्वामी आणि लक्ष्मणमहाराज या वीरशैव संतकवींच्या अभंग गाथ्यांत- दक्खिनी रचनाही आढळते. विदर्भातील वीरशैव संतकवींच्या दाक्खिनी रचनेवर सूफींच्या फार्सी शैलीचा प्रभाव कसा जाणवतो, ते यवतमाळचे डॉ. प्रा. भेणकुदळे यांच्या याविषयीच्या प्रबंधात आढळते. नागेश संप्रदायाचे तत्त्वज्ञान ज्यांनी 'वरदनागेश' ' या ग्रंथात विशद केले त्या अज्ञानसिद्ध या संतकवींच्या अभंगगाथेत मराठी-फार्सी अशी संमिश्र दक्खिनी रचनाही आढळते. डॉ. संगीता देशमुख यांनी याविषयी माझ्या मार्गदर्शनाखाली लिहिलेला हा प्रबंध डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठाच्या ग्रंथालयात उपलब्ध आहे, त्याचप्रमाणे त्यांचा समग्र अभंगगाथाही मोहोळकर घराण्यातील नागेश सांप्रदायिकांनी नुकताच प्रसिद्ध केला आहे. मोहोळ व वडवळ (जि. सोलापूर )येथे उपलब्ध असलेल्या नागेश सांप्रदायिकांच्या कुरडेमहाराज प्रकाशित पदसंग्रहातही मराठी - फार्सीसंमिश्र दक्खिनी शैलीची रचना आढळते.

(आ) नाथांची रूपकात्मक भारुडे

या संदर्भात विशेष दखल घ्यायला हवी ती एकनाथांच्या रूपकात्मक भारुडांची 'हिंदु-तुर्क-संवाद 'हे त्याचे एक लक्षणीय उदाहरण. या भारुडाची भाषा मराठी व दक्खिनी अशी संमिश्र आहे . डॉ. एलेनार झेलियट यांच्यासारख्या विदेशी अभ्यासकांनाही त्याचे महत्त्व जाणवले व ते त्यांनी संपादिले आहे.या रूपकात्मक भारुडांचाच पुढचा टप्पा

म्हणजे नाथांची पत्ररूप भारुडे. यादवकालातील लीळाचरित्र,गोविंदप्रभुचरित्र,स्मृतिस्थळ इ. चरित्रात्मक लेखनानंतर मराठी गद्य-वाङ्‌मयाची प्रगती खुंटते की काय,अशी परिस्थिती निर्माण झाली असताना नाथांच्या पत्रात्मक गद्यरूपकांनी या गद्यलेखनात नवचैतन्य ओतले व पुढे शासकीय व सामाजिक स्वरूपाच्या पत्रात्मक गद्यवाङ्‌मयाच्या विकासामुळे हा प्रवाह गतिमान झाला. ही गती देणाऱ्या नाथांच्या पत्रात्मक रूपकांचे सविस्तर स्वरूप असे होते:

दैनंदिन जीवन-व्यवहारांवर तत्कालीन राज्यकर्त्यांचा व त्यांच्या भाषेचा परिणाम होणे स्वाभाविक व अपरिहार्य असते. राज्यकर्त्यांची भाषा ही राज्यकारभाराची व प्रशासनाची भाषा असते. त्यामुळे प्रशासनविषयक पत्रव्यवहारावर राज्यकर्त्यांच्या भाषेचा ठसा उमटला तर त्यात नवल वाटण्याजोगे नाही ते यासाठीच; पण तत्कालीन संतसाहित्यावरही हा ठसा जेव्हा उमटतो,तेव्हा त्याकडे आपले लक्ष विशेषकरून वेधले जाते.

संत एकनाथ हे समकालीन लोकजीवनाशी किती एकरूप झाले होते,याची साक्ष त्यांच्या विविध प्रकारच्या लेखनातून येते. नाथांनी लोकप्रबोधनासाठी विविध माध्यमे हाताळली. लोकगीत,लोककथा,लोकनृत्य,लोकसंगीत इ. लोकसंस्कृतीच्या विविध स्रोतांचाही त्यांनी या कार्यासाठी उपयोग करून घेतला.त्याचप्रमाणे 'पत्र ' या लोकव्यवहाराच्या माध्यमाचाही त्यांनी उपयोग केला,हे पाहून मोठा विस्मय वाटतो.पत्रव्यवहार हे दैनंदिन लोकव्यवहाराचे एक महत्त्वपूर्ण अंग होय. हा पत्रव्यवहार जसा कौटुंबिक स्वरूपाचा असे त्याचप्रमाणे तो शासन आणि प्रजाजन यांच्यामधलाही असे. त्याचा उपयोग परमार्थप्रबोधनासाठी करता येईल का? असा प्रश्न नाथांसारख्या लोकाभिमुख संताला पडला असणे स्वाभाविक आहे. नाथ हे जनार्दनस्वामींचे शिष्य होते व जनार्दनस्वामी दौलताबादच्या मुस्लिम प्रशासनात अधिकारपदी होते, हे सर्वज्ञात आहे. जनार्दनस्वामींचा तत्कालीन राजकर्त्यांच्या दरबारी (फार्सी )भाषेचा व्यासंग व प्रशासकीय (फार्सी) पत्रव्यवहाराचा अनुभवही लक्षणीय होता. 'अकलगिरी' सारखी नाथांची 'दखिनी' प्रकरणे आणि भारुडासारखी त्यांची फार्सीबहुल रचना पाहता नाथांचाही फार्सीचा व्यासंग व त्या भाषेवरील त्यांचे प्रभुत्व दुर्लक्षून चालणार नाही. त्याचप्रमाणे त्यांनी तत्कालीन प्रशासकीय फार्सी पत्रव्यवहाराची शैलीही चांगल्या प्रकारे आत्मसात केली होती. याची प्रचीती त्यांच्या अभंग - गाथेतील 'उपदेशपर रूपके' या विभागातील 'पत्रव्यवहार ' या शीर्षकाखाली दिलेल्या रूपकातून अगदी सहजपणे येते.

इति. वि.का. राजवाडे यांनी तत्कालीन पत्रांचे जे प्रकार निर्देशिले आहेत, त्यातील पुढील सात प्रकारांचा नाथांनी उपयोग केला आहे व त्यावर फार्सी पत्रलेखनशैलीचा फार मोठा प्रभाव दिसून येतो -

१. अर्ज,अर्जदस्त २. अर्जाचा जाब / जाबचिठी ३. विनंतिपत्र ४. अभयपत्र
५. ताकीदपत्र ६. करूलपत्र/कौल ७. आशीर्वादपत्र

अशा प्रकारची एकूण बारा पत्रे नाथांच्या गाथ्यात उपलब्ध होतात.त्यातील 'अर्ज','कौल' व 'अभयपत्र' प्रत्येकी दोन आहेत.

पत्रप्रकारांचा निर्देश -

पत्राच्या शेवटी पत्रप्रकारांचा निर्देश करण्याची फार्सी पत्रव्यवहारातील पध्दती या सर्वच पत्रांच्या शेवटी आढळते.

'हे आशीर्वादपत्र '(पृ.७९६)
'हे विनंतिपत्र' (पृ. ७९७)
'हे अभयपत्र दिले' (पृ. ७९७)
'हे अर्जदस्त' (पृ. ७९८)
'अर्जदस्त' (पृ. ८००)
'जाबचिठी' (पृ. ८०० ,पृ.८०२)
'हे अभयपत्र' (पृ. ८०१)
'हे ताकीदपत्र' (पृ. ८०१)
'हे कौलपत्र' (पृ. ८०४) इ.

फार्सीचा संबंध येण्यापूर्वीही पत्रलेखनाची मराठी घाटणी महाराष्ट्रात रूढ होतीच पण फार्सी पत्रलेखनपध्दतीचा व मायन्याचाही घाटणीवर विशेष व नजरेत भरण्याजोगा प्रभाव पडला.('मायना ' हा अरबी शब्दही मराठीत फार्सीच्या माध्यमातून आला आहे !) काही पत्रांच्या प्रारंभी पत्रप्रकाराची नोंद केली जात असे. ती एकनाथांच्या काही उपदेशपर रूपकांत आढळते -

(१). अभयपत्र (पृ.७९७), २. अर्जदस्त (पृ. ७९७ - ९८), ३. कौल (पृ. ८०४)

त्यानंतर पत्रलेखकाचे नाव,गाव (मौजे/कसबे ),तालुका,परगणा, सुभा इ. पत्ता व ज्यांना पत्र लिहिले त्यांचे नाव,गाव (मौजे/कसबे),तालुका,परगणा,सुभा इ. पत्ता यांचा निर्देश या पत्रात येतो.

वानगीदाखल दोन - तीन उदाहरणे देतो -

१. अर्ज - 'अर्जदार.. बंदे शरीकार। जिवाजी शेकदार । बुधाजी कारकून । प्रगणे शरीराबाद किल्ले कायापुरी ।' (पृ.७९७)

२. अर्जाचाजाब - 'क्षत्रिय कुळवंत । श्रीअयोध्याधीश राजाराम छत्रपती । अखंड ब्रह्मांडनिवासी राजे । श्रीजिवाजीपंत शेकदार । मौजे देहगाव । तालुके अष्टपुरी।मामले पंचाळेश्वर।' (पृ. ८००)

३. अभयपत्र - 'समस्त राजकार्यधुरंधर । विश्वासनिधी। राजमान्य राजश्री । द्विमत अपर्णाकांता।तालुके कैलासगिरी। परगणे कर्म-आचरण । सरकार ब्रह्मांडनगर।' (पृ.८०१)

अभिवादन,आशीर्वाद इ.

मराठी पत्रलेखनपध्दतीत महाराष्ट्रातील पारंपरिक अभिवदन/आशीर्वाद इ. या उपयोग केला जात असला तरी फार्सीच्या प्रभावामुळे तिच्यातील वैशिष्ट्येही मराठी भाषेत आली. एकनाथांच्या 'अर्जा 'तील 'अर्जदार ' 'बंदगी बंदेनवाज' म्हणून 'आलेकम् सलाम 'ही करतो ! (पृ. ७९७-९८ )पण 'आशीर्वादपत्रां'त मात्र 'आत्मारामपंत यांचा आशीर्वाद ' असेच म्हणतो.(पृ. ७९६) एकीकडे आपल्या 'मऱ्हाटी 'परंपरेचे व अस्मितेचे रक्षण व दुसरीकडे प्रचलित शासन व्यवस्थेचा स्वीकार असा समन्वय एकनाथांच्या या पत्रात्मक रूपकांत आढळतो. काही पत्रांच्या शेवटी फारसी पत्रलेखनपध्दतीप्रमाणे स्वतःकडे दासाची भूमिका घेऊन अभिवादन केले आहे-

अर्ज व अर्जदस्त - 'बंदगी रोशन होय '(पृ. ७९८ व ८००)

पत्रांतील मजकुराची भाषा

(।) आदरार्थी संबोधन . साहेब, सरकार,हुजूर इ. - फार्सी पत्रव्यवहारात राजा किंवा सम्राट यांना 'साहेब','स्वारी','हुजूर' किंवा 'सरकार ' या शब्दांनी संबोधले जात असे. (अशा प्रकारची अन्य संबोधनेही होती,त्याचा विचार याच ग्रंथात पत्रात्मक गद्याच्या संदर्भात अन्यत्र विवेचन करताना केला आहे. ) राजा व सम्राट यांच्या नावाचा उल्लेख आदर दाखविण्यासाठी टाळला आहे. ही प्रवृत्ती नाथांच्या पत्रात्मक रूपकातही दिसते स्वतःचा उल्लेख 'बंदा ' (म्हणजे दास)असा करण्यामागेही हाच आदरभाव आढळतो आणि पत्रलेखक आपल्या स्वामीला 'बंदेनवाज ' म्हणतो तेही यासाठीच. त्याच्या अभिवादनात 'साष्टांग नमस्कार ' केलेला नसून 'बंदगी ' केलेली आहे !

'अभयपत्रांत' 'स्वधर्मपंताची स्वारी येणार '(पृ.७९७).असे म्हटले आहे तर 'अर्जा 'त 'साहेबांचे सेवेशी' (पृ.७९८),म्हटले आहे. अर्जातील अर्जदार 'सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार'झाला आहे अर्जाच्या शेवटी 'हुजूर येणे.आपणास साहेबांच्या कल(द) मांचा आश्रय आहे ' असे म्हटले आहे.(पृ. ७९८)नाथांच्या दुसऱ्या एका अभयपत्रांत 'आम्ही सरकारात अर्ज करू ' असा उल्लेख आढळतो (पृ.८०?)तर 'ताकीद पत्रात 'सरकार हुजूर चे मुत्सद्दीही कामगार आहेत' असा उल्लेख आढळतो (पृ.८०२). 'जाबचिठी 'मध्ये'त्याजबरोबर हुजूरच्या सनदा आहेत' असे म्हटले आहे (पृ.८०३)

(॥)आणखी एक सूक्ष्म प्रभाव - या भाषेतील आणखी एका बारकाव्याकडे मला लक्ष वेधायचे आहे. एकनाथांच्या काही पत्रात्मक रूपकांत साहेब,सरकार,हुजूर इ. आदरवाचक फार्सी शब्द न येता त्यांचा मराठी अनुवाद 'धनी ' या शब्दाने केला आहे. येथे वरकरणी अरबी - फार्सी शब्द दिसत नसले तरी त्याचा आशय व त्यातील आदरभाव मराठी शब्दाने व्यक्त करून एक प्रकारे फार्सी पत्रलेखनशैलीच जतन करून ठेवली आहे . हा प्रभाव मला अधिक सूक्ष्म व मराठी पत्रात्मक शैलीवर अंतर्गत ठसा

उमटविणारा आहे, असे वाटते. याची काही उदाहरणे पाहा -

१. अभयपत्र - 'तेणेकरून धन्यास फार संतोष जाहला '(पृ. ७९७)

२. पत्र - माझे पत्र धन्याला'.. 'असा धनी माझा भला'(पृ. ८०५)

३. कौल - 'तत्त्वमसि धन्याचा शिक्का '(पृ. ८०४),'जीवें जी या धन्याचेनी '(पृ. ८०५)

(iii) पत्रांचा शेवट - काही पत्रांच्या शेवटी 'कळावे ' ('अभयपत्र', एगा, पृ.८०१)किंवा 'बहुत काय लिहिणे?' (पृ.८०२)असे उल्लेख येतात ते ही फार्सी पत्रशैलीतील अनुक्रमे 'बदानन्द 'आणि जियादह् चे नविश्तम्' याचे शब्दशः मराठी अनुवाद आहेत. एका 'अर्जदस्ता' त शेवटी आलेल्या 'बंदगी रोशन होय' (एगा,पृ. ८००)या शेवटाचा मूल स्रोत फार्सी पत्रलेखनशैलीतच आहे.

(iv) फार्सी वळणाची वाक्यरचना - एकनाथांच्या या पत्रात्मक रूपकांतील भाषा मराठी असली तरी बरेचसे वळण फार्सीच आहे.शिवाय अरबी - फार्सी शब्दांचे प्रमाणही प्रचंड आहे . उदाहरणासाठी 'अर्जा' सारखे एखादे पत्रही पुरेसे बोलके आहे. नाथांच्या 'अभयपत्रा'तील या वाक्यांचे अर्थ त्यातील फार्सी वळण व संदर्भ लक्षात घेतल्याशिवाय लागणार नाहीत. (पृ.७९७)

- मौजे मजकुरी पावताच याचा अंगिकार करून वहिवाट सुरू करणे.
- या कामी कोणाची हरकत धरू नये.
- मागाहून स्वधर्मपंताची स्वारी येणार आहे .
- तुम्ही आपुले हुशारीत राहणे.

आधी क्रियापद लिहून मग पुढे मजकूर लिहिण्याची फार्सी वाक्यरचना याच पत्रात अशी दिसते -

- कळावे की मौजे देहपूरची वागणूक उत्तम स्वधर्मयुक्त चालवू.
- जाणोन धन्याने तूमचे गावचे आबादीकरिता ज्ञान-वैराग्यासह शांति,क्षमा,दया हे ताबाडतोब रवाना केले.

'ताकीद पत्रा 'तही अशा प्रकारची वाक्यरचना आहे (पृ. ८०१):'ताकीद पत्र दिघले की...'

(v)आणि अनाकलनीयताही ! - फार्सी वळणामुळे या पत्रांची भाषा काही वेळा अनाकलनीय ही होते -

१ 'तो समार्जीपंताची परवानगी आली की हुजूर येणे.'- अर्ज (पृ. ७९८)

२. 'सरकारची रजा घेऊन निघाले.' अर्जदस्त (पृ. ८००)

३ 'तुम्हावर साहेबाची मेहेरबानी होऊन मनाजी देशमुख याजला लबीद पोहोचावयास सरकारातून सुभे रवाना झाले'. अर्जाचा जाब (पृ. ८००)

४. 'तुम्ही आपली खातरजमा राखून साहेबकामास रुजू राहणे'.- अर्जाचा जाब (पृ ८००)
५. 'तूर्तच यमाजीपंताची तलफ होणार । त्याची तलफ काही माघारी फिरत नाही.'- जाबचिठी (पृ. ८०३)

(vi) 'कलमी' रचना ' - कलमवार वा मुद्देसूद लेखन हे शासनव्यवहारात अत्यंत आवश्यक असते.अशा प्रकारची रचना नाथांच्या काही आध्यात्मिक रूपकात्मक पत्रांत आढळते. त्यातील 'क्र०' हा 'कलम' या मूळ शब्दाचा संक्षेप आहे. हे पत्र मूळ एकनाथ-गाथ्यातूनच उद्धृत करीत आहे. पत्राचे नाव आहे 'आशीर्वादपत्र '-
'चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार । वास्तव्य देहपूर यासी आत्मारामपंत यांचा आशीर्वाद। पत्र लिहिणे कारण जे।तुम्हांस देहगावची सनद शंभर वर्षांची देऊन पाठविले। कलम तपसील।
गावची अबादी करावी ।। क्र० ।।१।।
कामक्रोध हे रयत त्यांचे ऐकूं नये ।। क० ।।२।।
आशा-मनाशा यांची संगत धरूं नये ।।क० ।।३।।
सदा स्वधर्मे वागणूक ठेवणें ।।क० ।।४।।
शांती,क्षमा,दया असों देणे ।।क० ।।५।।
ज्ञान,वैराग्य,भजन-पूजनीं आदर ठेवणें ।।क० ।।६।।
ही कलमे कबूल होऊन तुम्हांस रवाना केलें । तुम्ही तो ते विसरून, सदरीचे कलमास न अनुसरून,वाईट वागणुकीचा रस्ता काढला। तो तुम्हांस परिणामीं बाधक होईल। सावध राहणे।। एकाजनार्दनीं । हें आशीर्वादपत्र।।' (एगा,पृ७९६)

एकनाथांनी स्वतःच या पत्रप्रकारास, आपल्या 'विनंतीपत्र 'या रूपकात्मक पत्रात, 'कलमी पत्र 'ही संज्ञा योजिली आहे. (पृ.७९६). त्यावरून ते या सर्व फार्सी पत्रप्रकारांशी किती परिचित होते, ते लक्षात येते.'अर्ज ' या रूपकात्मक पत्रातही यमाजीपंत येणार या धास्तीने शरीरात कसे बदल झाले, याचा कलमवार तपशील 'बीतपशील कलम ' असा उल्लेख करून केला आहे. हाही फार्सी पत्रलेखनपध्दतीचाच प्रभाव.

(इ)मराठी सन्तसाहित्याची शब्दकळा व फार्सी - या संदर्भात एकनाथ, तुकाराम व रामदास यांच्या शब्दकळेचा प्रतिनिधिक स्वरूपात विचार केला आहे.

नाथांच्या साहित्याशी फार्सीचा जो संबंध आला, त्याच्याविषयी काही अभ्यासकांनी घेतलेली भूमिका विस्मयकारक वाटते. माझे स्नेही व मराठीचा ऐतिहासिक भाषावैज्ञानिक दृष्टीने चिकित्सक अभ्यास करणारे संशोधक डॉ कानडे यांच्या एतद्विषयक विवेचनात काहीसा अन्तर्विरोध व पूर्वग्रह जाणवला तो येथे नमूद करतो. ते 'मराठी शब्दसमीक्षा'[१] या ग्रंथात 'फार्सी शब्दविचारा'च्या संदर्भात ते म्हणतात -

'नाथांचे सारे जीवन ज्या पैठण नगरीत व्यतीत झाले तेथे तर मुसलमानी सत्ता होतीच परंतु आजूबाजूच्या प्रदेशावरही त्याच राजवटी होत्या. फारसी भाषेला राजदरबारात मानाचे स्थान मिळाल्यामुळे चौदाव्या शतकापासून मराठीवरील फारसी भाषेचे आक्रमण अधिकाधिक व्यापक होऊ लागले होते. नाथांच्या नंतर सुमारे ३० वर्षांनी लिहिलेल्या एका मराठी पत्रात शे.१४४ मराठी शब्द आढळल्याचे इति.राजवाड्यांनी सांगितलेच आहे.नाथांच्या 'अर्जदास्त 'या एका भारुडातील पहिल्या ओळीमध्ये ('अर्जदास्त अर्जदार बंदगी बंदेनवाज आलेकुम सलाम साहेबांचे सेवेसी ')फक्त एकच मराठी शब्द सापडतो. **त्याचा दाखला देऊन नाथकालीन मराठी भाषेवरील फारसीच्या जबरदस्त प्रभावाची चर्चा करण्यात येत**'. तथापि नाथांची **भागवतटीका,भागवत,रामायण किंवा अन्य** लहानमोठी प्रकरणे पाहिली म्हणजे वेगळाच प्रकार दृष्टीस पडतो. भागवतटीकेतून **'मजूर ' सारखा एखादा फारसी शब्द शोधूनच काढावा लागतो**'. भावार्थरामायणामध्ये समकालीन वातावरणाच्या प्रभावाने दहा पाच फारसी शब्द अधिक आहेत एवढेच. एकूण पंचेचाळीस हजार ओव्यांच्या भावार्थ रामायणात फक्त पुढील फारसी शब्द आढळतात'.' असे म्हणूनही त्यांनी चौदा फारसी शब्द दिले आहेत ते पुढीलप्रमाणे -

भिरारी,प्यादा,मस्ती,खुरासनी,हबसी,पेरीज,मुलामा,कागद,तस्त,पालखी,बाजीगिरी,गर्द, दौत,बहुसाल

ज्या भागवतटीकेत केवळ एकच फारसी शब्द नि तोही शोधून काढावा लागतो असे १९८९ साली म्हणणारे डॉ.कानडे २००१ साली 'एकनाथी भागवत:शब्दार्थ - संदर्भ - कोशा 'तील सातव्या परिशिष्टात' तब्बल ७५ अ.फा. शब्दांची यादी सादर करतात.त्याचप्रमाणे 'मराठी शब्दसमीक्षे'त एकाच भारुडावरून फार्सी प्रभावाचा निष्कर्ष काढणे योग्य नसल्याचे सूचित केल्यानंतर त्याच लेखात अन्य भारुडांतही फारसी शब्दांचा भरणा कसा आहे,ते सांगू लागतात; पण तेही काहीशा संकोचानेच.ते' म्हणतात.'भारुडे हे लोकवाङ्मय असल्याने त्यांत नेहमीच्या वापरातील फारसी शब्द समाविष्ट होणे अटळ होते. तरीही नाथांची सुमारे तीनशेवर जी भारुडे आहेत, त्यांत त्यांची भाषा त्यांच्या अभंगादी स्फुट प्रकरणांशी जुळणारी आहे. काही भारुडांतून केवळ तीन-चार फारसी शब्द आढळतात -

डोबारी - वस्ता,याद,तसरिया,गुलाबराव

चोपदार - चोपदार चाकरी

सौरी - दिवाणदार,फजिती, बाजार

रहाट - बाजार बारीक,तलवार.'

यातही(तलवार हा फार्सी शब्द नाही,तो व बाजार शब्दाची पुनरुक्ती वगळता )दहा अ.फा. शब्द आहेत. उदाहरणे देऊनही हिशेबाची अशी गल्लत का व्हावी ? पुढे अन्य भारुडांविषयी ते' या संदर्भात म्हणतात.' 'किल्ला 'या भारुडात मात्र सैन्यविषयक हालचालींचा संबंध येत असल्याने गलीम,फौज,तोफ,फितूर,रयत,मुजुमदार,हुजऱ्या,

खबर,स्वार,निदार,दरवाजा,बुरुज,चोपदार,इतके फारसी शब्द आढळतात. 'हिंदु - तुर्क - संवाद 'या प्रकरणात 'हिंदू ' वक्त्याच्या भाषेतही किताब,मेवे,फकर,खुदा,नवाजा, अकरीब,जीयादर,दरगाज,दरभिस्तहफ(?),मौजूद,नजर,मुसाफ,दिल,मुष्किल,मुलाना असे फारसी शब्द दिसतात. अर्ज किंवा अर्जदास्त या नावाचे वर उल्लेखिलेले नाथांचे जे प्रसिध्द भारुड आहे, त्यातच फक्त फारसी शब्द नजरेत भरण्याइतक्या संख्येने शिरलेले आहेत-शेकदार,कारकून,परगणे,शरीराबाद,सरकार,स्वार,मजकर(मजकूर),जमादार, हरामजादा,तलाम(सलाम),जोम,तफर,खबर,तलाव,धास्ती,थीतपशील,कलम' हे सारे कशासाठी?- तर पुढील निष्कर्षासाठी व त्यातही 'फार्सीचा चौफेर पगडा 'होता, हे डॉ. कानडे'' मान्यच करतात - 'या सर्व तपशिलाचा निष्कर्ष एवढाच की फारसीचा चौफेर पगडा असतानाही नाथांच्या प्रचंड शब्दभांडारात ५० ते ६० पेक्षा अधिक फारसी शब्दांचा शिरकाव झालेला नाही. मराठी भाषेचे मऱ्हाठपण टिकवून ठेवण्याच्या बाबतीत मराठी संतकवी केवढी अविस्मरणीय कामगिरी केलेली आहे, त्याची यावरून सहज कल्पना करता येते.'

संतकवींची अविस्मरणीय कामगिरी कोण अमान्य करील? पण त्यांची भाषा ही समकालीन लोकव्यवहाराची भाषा होती व संत हे लोकाभिमुख असल्याने त्यांनी त्या जिवंत भाषेचे माध्यम मनमोकळेपणाने स्वीकारले होते, हेही अमान्य करण्याचे कारण नाही.

यापुढील काळात - शिवकाळात - तुकाराम व रामदास हे दोन विख्यात संतकवी होऊन गेले. त्यांच्या शब्दकळेविषयी डॉ.कानडे'' यांनी याच ग्रंथात स्वतंत्र लेख लिहिले आहेत. त्यांच्या लेखनातही अ.फा.शब्दांची संख्या कशी लक्षणीय आहे, ते डॉ. कानडे यांनीच सांगितले आहे. तुकोबांच्या भाषाशैलीविषयी ते'' म्हणतात,'तत्सम आणि तद्भव शब्दांच्या साहाय्याने तुकाराम महाराजांनी आपली भाषा सजवलीच पण ती **अधिक व्यापक व्हावी,मनातील आशयाच्या सर्व लहानसहान छटा तीमधून व्यक्त व्हाव्या यासाठी त्यांनी आपल्या काळात रूढ असणाऱ्या फारसी - अरबी शब्दांचा वापर करण्यातही कमीपणा मानला नाही.किंबहुना असेही म्हणता येईल की तुकाराम महाराजांच्या काळात जे फारसी-अरबी शब्द समाजात सर्वत्र रुळलेले होते ते सहजतेने त्यांच्या अभंगवाणीतही समाविष्ट झाले. चौदाव्या शतकापासून महाराष्ट्रात मुसलमानी राजवट अस्तित्वात असल्याने फारसी भाषा प्रथम राज्यकारभारात सर्रास वापरली जाऊ लागली आणि नंतर ती हळुहळू सामाजिक व्यवहारातही प्रविष्ट झाली आणि म्हणूनच जे मुसलमानी शब्द तत्कालीन समाजजीवनात विशेष परिचयाचे झाले होते. ते तुकारामांनीही आपल्या भाषेत वापरले''**. उदा. -

दाकर,रुका,फिरंग,दगा,फजिती,फजितखोर,सिका,हिमत,जादा,कलबुत,वजन,इमान,बेशरम, निशाणी,मुलामा,कागद,दिवाण,मिरास,साल,दाम,हिशोब,दिमाक,बबकाख,जाब,मुशारा,हुशारणे, तमाशा,अस्मानी,बेरस,आणि बदराही - **हे शब्द लक्षणीय आहेत''**.'

याच ग्रंथात 'रामदासांच्या वाङ्‌मयातील फारसी शब्द 'या लेखात डॉ.कानडे[१४] यांनी या संदर्भात पूर्वी एकनाथांविषयी जशी विधाने केली आहेत, (जवळपास)तशीच विधाने रामदासांच्या शब्दकळेविषयीही केली आहेत -

'समर्थभक्त शं.श्री.देव यांनी रामदासांच्या साहित्यसंभाराची जी मोजदाद केली आहे तीवरून रामदासांनी सुमारे तीस हजारावर कविता लिहिली असल्याचे दिसून येते (कविता म्हणजे तितक्या ओव्या किंवा श्लोक.)या प्रचंड वाङ्मयात जे फारसी शब्द आढळतात त्यांची एक समग्र सूची पुढे जोडली आहे. ही शब्दसंख्या दोनशेहून अधिक आहे.दासबोधाची ओवीसंख्या ७७५१ अशी असून शब्दसंख्या ९००० आहे.केवळ दासबोधातील फारसी-अरबी शब्दांची संख्या ११० आहे. या सूचीतील काही शब्द संशयित स्वरूपाचे आहेत (उदा. खिरापत).काही शब्दांचा चेहरामोहरा फारसी असल्यासारखा वाटतो(उदा.तंगबस्त,तालदारी,धारबंद)परंतु त्यांचे निश्चित मूळ रूप कोणते ते मिळू शकत नाही. तथापि तज्ज्ञांकडून त्यासंबंधी काही माहिती मिळण्याची शक्यता आहे. अशा कल्पनेने असेही शब्द सूचीत समाविष्ट केले आहेत.'

डॉ.कानडे यांच्या या सूचीतील अ.तु.फा. शब्दांची संख्या २१६ इतकी आहे. 'खिरापत सारख्या शब्दाबद्दल यांना संशय वाटण्याचे खरे तर कारण नव्हते कारण - प्रा.कृ.पां कुळकर्णी[१५] यानी मराठी व्युत्पत्तिकोशात फा.खैर् आफियत् 'या संदर्भ देऊन 'कदाचित् फारसी व्युत्पत्तीच बरोबर असावीशी वाटते 'असे म्हटले आहे. 'तंगबस्त' या शब्दातील 'तंग 'हा फार्सी शब्द असल्याचा निर्देश डॉ.पटवर्धन व प्रा.कृ.पां. कुळकर्णी या दोन्ही भाषातज्ज्ञांनी[१६] केला आहे. 'तालदारी ' यातील 'दारी ' हे फार्सी तद्धित आहे,याची कल्पना डॉ.कानडे यांच्यासारख्या भाषातज्ज्ञास नाही,असे कसे म्हणता येईल ?

एकनाथांच्या फार्सी शब्दसंग्रहातील चोपदार दिवाणदार ही दार् - तद्धितयुक्त रूपे त्यांनीच[१७] यापूर्वी नोंदविली आहेत. दावेदार,नफेदार,बेलदार हे फार्सी शब्दही त्यांनी[१८] रामदासांच्या शब्दसंग्रहात निर्देशिले आहेत. 'ताल '(अ.तालिअ)या शब्दाची व्युत्पत्ती ताले व तालेवार या शब्दांच्या संदर्भात डॉ. पटवर्धनांनी[१९] दिली आहे त्याचप्रमाणे प्रा.कृ.पां कुळकर्णी[२०] यांनीही विवेचन केले आहे. 'धारबंद 'यातील 'बंद 'हा प्रत्यय फार्सी आहे, याचीही डॉ.कानडे यांना निश्चित कल्पना आहे कारण त्यांनीच दिलेल्या फार्सी शब्दांच्या सूचीत पायबंदी,बेबंद,हुन्नरबंदी हे शब्द आहेत[२१].

(२) पत्रात्मक गद्य

मध्ययुगीन मराठी वाङ्‌मयाचे एक दालन पत्रात्मक गद्याने सजले आहे.फार्सीच्या संपर्कात येण्यापूर्वी मराठीत पत्रलेखन नव्हते असे कसे म्हणता येईल ? तथापि शासकीय स्वरूपाचा मराठी पत्रव्यवहार व पत्रलेखनपध्दती यावर चौदाव्या शतकापासून फार्सी पत्रलेखनशैलीचा प्रभाव पडणे अपरिहार्य होते. संतवाङ्मयात तो एकनाथांच्या

लेखनात कसा जाणवतो,याचा विचार यापूर्वी केला आहे.पत्रलेखनपध्दती,पत्रांचे मायने, त्यांतील अभिव्यक्तिपध्दती यावर फार्सी पत्रशैलीचा कसा प्रभाव पडला ते यापूर्वी एकनाथांच्या पत्रात्मक भारुडांचा विचार करताना विशद केलेच आहे. (शासकीय पत्रलेखनाच्या ८३ प्रकारांचा तपशील 'इतिहास 'विषयक बाराव्या प्रकरणात दिला आहे.) शासकीय पत्रव्यवहाराप्रमाणे सामाजिक पत्रव्यवहारावरही हा ठसा काही प्रमाणात उमटला, पण तो अल्पस्वल्पच. बखरींना जे वाङ्मयीन मूल्य लाभले ते अर्थातच मध्ययुगीन पत्रात्मक गद्याला लाभले नाही. मराठी गद्याचे अस्तित्व टिकविण्यासाठी त्यांचे मोलाचे साहाय्य झाले व काही पत्रांतून समकालीन भावविश्वाचे दर्शन घडले. डॉ. सुधाकर पवार[२२] यांनी याविषयी सविस्तर विवेचन केले आहे,ते मूळातूनच वाचायला हवे.

मध्ययुगीन मराठी पत्रलेखनशैलीवरील फार्सीपत्रलेखनशैलीचा प्रभाव केवळ एकनाथांच्या पत्रात्मक भारुडांपुरता मर्यादित नसून तो शिवकालीन पत्रात्मक गद्यावरही होता,हे डॉ.पवार यांच्या 'मराठेशाहीतील पत्ररूप गद्य' या ग्रंथाप्रमाणेच आ.बा.जोशी व आबासाहेब चांदोरकर[२३]यांनी संपादिलेल्या 'श्रीशिवशाहीचा लेखनालंकार' या ग्रंथावरूनही जाणवते.

या पत्रात्मक गद्याच्या शब्दकळेविषयी व तिच्यावरील अरबी-फार्सी प्रभावाविषयी डॉ. पवार[२४] यांनी 'भाषिक पाहणी' या प्रकरणात सविस्तर विचार केला असल्याने त्याची पुनरुक्ती येथे करीत नाही.डॉ.मु.श्री.कानडे[२५] यांनी या संदर्भातही केलेले विवेचन त्यांच्या यापूर्वीच्या संतसाहित्यविषयक विवेचनाशी नाते जोडणारे आहे. एकीकडे फार्सी-मराठीचा हा अनुबंध मान्य करण्याची भूमिका व त्याच वेळी तो निष्प्रभ झाल्याची भूमिका या दोहोंचे मिश्रण त्यांच्या 'शिवाजीमहाराजांची पत्रे व फारसी शब्द 'या लेखात पाहून आश्चर्य वाटते.

स्वधर्म,स्वराज्य व स्वभाषा यांच्या रक्षणाचे श्रीशिवछत्रपतींचे अलौकिक कार्य सर्वज्ञात आहे.त्यामुळे मऱ्हाटी अस्मितेचे रक्षण झाले, हे आपण सर्वच मान्य करतो. 'राज्यव्यवहारकोशा'च्या निर्मितीमुळे या कार्यास कसा हातभार लागला, याबद्दलही दुमत असण्याचे कारण नाही.

या संदर्भात डॉ. कानडे[२६] म्हणतात, 'मराठी साहित्यातून फारसी शब्दांची आवक तेराव्या शतकापासून सुरू झाली असली तरी चौदाव्या शतकात बहामनी राज्याची स्थापना झाल्यानंतर फारसी शब्दांच्या आक्रमणाचे क्षेत्र अधिकाधिक पसरत गेले आणि शिवाजी महाराजांचा उदय होईपर्यंत ते मराठी भाषा ग्रासून टाकण्याइतके व्यापक झाले.शिवाजी महाराजांच्या पत्रांतून आलेले अनेक शब्द आजच्या मराठीतून लुप्त झाले आहेत (अजरख्लाखाने,बिदानद,खुर्दखत इ.) **पण या शब्दांचा वापर शिवकालात फार मोठ्या प्रमाणावर होत असल्याचे दिसून येते[२७].'**

त्यानंतर या लेखाचा समारोप करताना ते[४] म्हणतात, '१६७४ मध्ये राज्याभिषेकाचा अभूतपूर्व सोहळा झाल्यानंतर मात्र फारसी शब्दांचा वापर कमी होत जाऊन त्यांच्या जागी संस्कृत शब्दांची योजना होत गेली. पत्रांतून स्वस्तिश्री, वंशपरंपरा,पुत्रपौत्रादी, तरुतृण-काष्ठ-पाषाण-निधिनिक्षेप, प्रतिवर्ष,दंडवत,सेवक इ.शब्द दिसू लागले. तरीसुध्दा सोळाव्या शतकापर्यंत सतत चालू असलेली तीन शतकांची फारसी शब्दांची घुसखोरी इतकी जबरदस्त होती की पुढे अनेक वर्षे तेच रुळलेले शब्द शासकीय पत्रव्यवहारातून वापरले जात' असे म्हणून शेवटी 'हा फारसीचा वरचष्मा दीर्घकालाने का होईना, निष्प्रभ झाला 'असा निष्कर्ष ते काढतात व त्यानंतर शिवाजी महाराजांच्या पत्रांतील ६९१ अ.फा. शब्दांची प्रदीर्घ यादी[५] सादर करतात !

## (३) बखर - वाङ्मय

मुसलमानी राजवटीत फार्सीत इतिहासलेखन करण्याची प्रथा होती. तवारिखा, अखबार,वाके इ. विविध माध्यमांतून हे लेखन कसे होत होते, याविषयी 'फार्सी आणि मराठी इतिहासलेखन ' या शीर्षकाच्या प्रकरणात सविस्तर विचार केलाच आहे पण या फार्सी इतिहासलेखनापासून प्रेरणा घेऊन मराठी बखर अवतरली. त्यामुळे मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे एक फार विस्तीर्ण व वैभवसंपन्न दालन प्रकट झाले. जे फार्सीत घडले नाही ते फार्सीमुळे मराठीत घडले, असेही म्हणायला हरकत नाही. फार्सी तवारिखा,अखबार यांना वाङ्मयीन रूप प्राप्त झाले नाही. त्यांना इतिहासाचे साधनग्रंथ वा काही अंशी इतिहास म्हणूनही स्वीकारले गेले आहे. काही बखरींना इतिहासाचे साधनग्रंथ म्हणून मान्यता मिळाली (उदा.सभासद बखर) पण महाराष्ट्राचा इतिहास ज्यांनी लिहिला त्यांनी बखरींना इतिहास म्हणून फारशी मान्यता दिलीच नाही. डॉ. यदुनाथ सरकार आणि इति. राजवाडे यांची या संदर्भातील मते सर्वज्ञात आहेत. तथापि महत्त्वाचा वाङ्मय- प्रकार म्हणून बखरी सर्वमान्य आहेत. सभासद बखर,भाऊसाहेबांची बखर,होळकरांची कैफियत यासारख्या बखरींना वाङ्मयीन मानदंडाचे महत्त्व प्राप्त झाले.याचे श्रेय प्रतिभासंपन्न बखरकारांना द्यायला हवे. मनोहर कल्पनाविलास,प्रभावी व्यक्तिचित्रणे,विविध रसांचा उत्कट आविष्कार, रम्य स्थलवर्णने व प्रसंगवर्णने ,प्रवाही निवेदनशैली,मनोवेधक शब्दकळा यासारख्या लेण्यांनी मराठी बखर खऱ्या अर्थाने 'सजली ' आहे, नटली आहे. वाङ्मयकृती म्हणून तिचे अनन्यसाधारण स्थान आजवर कुणाला हिरावून घेता आले नाही. जो कल्पनाविलास 'इतिहास 'म्हणून तिच्या मान्यतेआड येतो तोच वाङ्मयीन कलाकृती म्हणून तिचे माहात्म्य वाढवितो. शिवपूर्वकाल, शिवकाल व पेशवेकाल - एवढा मोठा कालखंड या वाङ्मय- प्रकाराने व्यापला व आपल्या वाङ्मयीन गुणवत्तेने त्याने मराठी रसिकांना दिपवून टाकले.बखरींचे तपशीलवार वर्गीकरण बाराव्या प्रकरणात केलेच आहे. फार्सीचे व इतिहासाचे अधिष्ठान असलेला मराठी मातीत रुजलेला हा अंकुर एखाद्या प्रशस्त वटवृक्षासारखा

फोफावला व त्याच्या पारंब्या पुन्हा मराठी मातीत रुजल्या. इतिहासाने जे वाङ्‌मयीन रूप मराठीत घेतले ते फार्सीत मात्र घेतले नाही. ही तुलना मनाला सहजच स्पर्शून जाते.

(४) शाहिरी वाङ्‌मय

या वाङ्मयानेही मध्ययुगीन मराठी वाङ्‌मयाचे शिवकाल-पेशवेकालासारखे दोन मोठे कालखंड व्यापले. त्यानंतरही हा वाङ्मयप्रवाह आजवर महाराष्ट्रात रूढ व लोकप्रिय आहे. लोकनाट्याच्या व अन्य माध्यमांतून लावणी आजही केवळ जिवंतच राहिली नाही तर तिने मराठी मनाची पकड सोडलेली नाही.'शाहीर 'हा शब्द अरबी 'शायर् 'या शब्दापासून सिद्ध झाला आहे,याबद्दल सुदैवाने दुमत नाही,त्यामुळे 'बखर 'च्या व्युत्पत्तीबद्दल जशी चर्चा झाली तशी 'शाहीर 'या शब्दाबद्दल झाली नाही.

शाहिरी वाङ्‌मयाचे सुप्रसिद्ध अभ्यासक श्री म.ना. सहस्रबुद्धे[१] या संदर्भात म्हणतात - 'शाहिरांना शाहीर असें कां म्हणावयाचें याला एकच उत्तर आहे कीं, ते लोक आपल्याला शाहीर म्हणवून घेतात म्हणून. शाहीर हे नांव अरबी-फारसी भाषांतून आलें आहे हे निःसंशय.त्या भाषांना संस्कृतीत मान देणारी सत्ता महाराष्ट्रांत होती, त्या काळात हे नांव केवळ सत्ताधीश वर्गाच्या अनुकरणानें घेतलें गेलें. हा काळ म्हणजे तेराव्या शतकापासूनचा म्हणजे अल्लाउद्दीन खिलजीनें महाराष्ट्राचें राजकीय केंद्र असें देवगिरीचें राज्य यादवांच्याकडून जिंकून घेतलें तेव्हाचा. त्यानंतर मुसलमानी राजसत्ता बहामनी राज्यांच्या रूपानें महाराष्ट्रांत विस्तार पावली.मराठ्यांचे स्वतंत्र राज्य झालें तरी महाराष्ट्राचा मोठा भाग त्या मुसलमानी सत्तेखालीं राहिला. तीनचारशें वर्षे महाराष्ट्राच्या कमी अधिक भागांत त्या सत्तेबरोबर येणाऱ्या बाह्य संस्कारांचा परिणाम होत राहिला. त्यांत भाषेत शिरलेले शतशः शब्द हे मुख्य आहेत. धर्मांतरानें दूर झालेले लोक वगळले तर बाकीचे लोक अंतःकरणाने व आचारानें मूळच्या मराठी संस्कृतींतच राहिले. अशा अवस्थेत मराठी समाज असतांना शाहीर या नांवाचा उगम सांपडतो... शाहीर व शाहिरी म्हणजे कवि व कविता ही दोन्ही मराठी संस्कृतीतलीच आहेत.त्यांच्यात नांवाखेरीज परकीय संस्कृतीचा भाग नाहीं.त्या राजवटींत केवळ ऐट म्हणून हे शब्द स्वीकारले इतकेंच.'

दोन संस्कृती आणि दोन भाषा एकमेकींच्या संपर्कात आल्यानंतर अनेक बाबींचे आदानप्रदान होत असते. त्यामुळे भाषांच्या संपन्नतेकडे वाटचाल होत असते. अशा प्रकारचे आदानप्रदान भाषाभिवृध्दीस पोषकच ठरत असते.हा दृष्टिकोण न बाळगल्यामुळे अनेकदा एकांगी दृष्टिकोण स्वीकारला जातो. लावणीच्या संदर्भातही वरील स्वरूपाचा दृष्टिकोण हा काहीसा एकारलेला दृष्टिकोण वाटतो.

पोवाडा आणि लावणी यांच्या मूळ परंपरा मऱ्हाटमोळ्या व भारतीय आहेत हे खरेच पण वर उल्लेखिलेल्या परिस्थितीमुळे शाहिरी वाङ्मयात केवळ अरबी-फार्सी शब्दाच्या वैपुल्याचा 'बाह्य संस्कार'च घडला काय?

'शाहीर ' व 'शाहिरी ' यांत केवळ 'नावाखेरीज ' दुसरा कोणताच भाग नाही का ? मराठी शाहीरांनी जी रचना केली – विशेषतः त्यांनी जी लावणी लिहिली तिच्या शब्दकळेबरोबरच प्रकृतीवर महत्त्वाचा परिणाम झाला आहे.सवाल-जवाब,कलगी-तुरा, मुजरा हे शब्दच अरबी-फार्सी म्हणीत तर लावणीचे हे विविध प्रकारही आपल्या मूलस्रोतांचे सूचन करतात. 'तमाशा 'हा फार्सी शब्दही या संदर्भात लक्षात घ्यायला हवा. या मूळ शब्दाचा अर्थ 'दृश्य 'असा असताना,त्याला शाहिरांनी केवढे वैभव प्राप्त करून दिले,हेही लक्षात घ्यायला हवे. फार्सी 'अखबार ' चे मराठी 'बखरी 'त रूपान्तर झाल्यावर तिला जे वाङ्मयीन वैभव लाभले ते लोकनाट्य म्हणून 'तमाशा 'ला मराठीत प्राप्त झाले. येथे बखरकारांचे व शाहिरांचे योगदान मान्यच करावे लागते .त्याप्रमाणे फार्सी शायरी,तिच्यातील इष्काच्या नाना परी,आशक-माशूक यांच्याविषयीच्या संकल्पना,आशिकाचा 'छळ 'करणारी माशुका,'असोशी'[१] 'च्या आर्ततेच्या फार्सी कवितेतील छटा, मुक्त शृंगाराची उधळण,फार्सी शायरीतील प्रतिमासृष्टीचे मराठी लावणीत उमटलेले प्रतिबिम्ब, अरबी-फार्सी शब्दकळेमुळे तिला लाभलेले आगळेवेगळे अर्थ – लावण्य इ. कितीतरी बाबींचा सविस्तर तुलनात्मक शोधच घ्यायला हवा. स्थलमर्यादेस्तव तो मी येथे घेऊ शकत नसलो तरी या अध्ययनक्षेत्राकडे संशोधकांचे लक्ष जरूर वेधू इच्छितो. येथे केवळ एकदोन लावण्या - व त्याही श्री.सहस्रबुद्धे यांनी निर्देशिलेल्या- उद्धृत करीत आहे. त्यावरून फार्सी शृंगारिक कवितेचा अन्तर्बाह्य बाज व मराठी लावणी यांत काय नाते होते,ते स्पष्ट होईलः

१) सगनभाऊंच्या[१२] लावणीचा हा मुखडा पाहा -

'गुलचमन तुम्ही, आरजी ऐका आमची स्वामी।
करुं मौजा रंगबहारामधिं ऐषआरामीं ।।
खुषरंगांत बसला फुलबागांत।
कांही रमुज करावी सर्वत्रांचे मनात।।'

२) सगनभाऊंनी[१३] केलेले 'माशुक 'चे हे वर्णन असे आहे-

'माशुक उभी रंगमहाली, कधीं उतरेल खाली ?
कवळी कळी डाळिंबाची टचटचीत लाली[१४]
गोरा रंग तुझा पाहुनिया।आम्ही आलो धावुनिया।
चौमर्दा लाल पसरले। मधिं बोले मुनया।
मी इष्कबाज रोखुन वाटा पाहायास मुखवटा।
कैका ये प्राण अवस्था, किती व्दार धरुनिया।
पावेल इष्क पेचाचा मार पेच त्याचा।
तसा डौल तुझ्या शरिराचा नाजुक बनुनिया।
उजव्या गालावर तीळसा ग चमकतो नीळसा।
दोन्ही नैन विखारी कहरी रोखित निघाली।।'

३) श्री. सहस्रबुद्धे[१] यांनी होनाजी आणि सगनभाऊंच्या 'आषकमाषुका 'तील फरक असा वर्णिला आहे- 'होनाजीचा आषक म्हणजे सौंदर्यभोक्ता आणि सगनभाऊच्या लोभी आसक्तांचा थवा यांत स्पष्ट फरक आहे. तो ध्यानी आला म्हणजे अशा कवनांतील सूत्र हातीं येईल.माषुक दोन्ही कवनांत सारखीच आकर्षक,चंचल,असत् वचनाची आहे.एकाच राजेंद्राच्या सत्ताकक्षेतली दोन्हीं प्रकारची आषक व माषुक ही आहेत. होनाजीनें उभा केलेला आषक विरळा असा एक आहे. सगननें उभा केलेला बहुसंख्याकांचा थवा आहे.'

४) 'हुस्न '(सौंदर्य )आणि 'इश्क'(प्रेम)यांच्याविषयीच्या काही विशिष्ट कल्पना,संकेत व प्रतिमा फार्सी शायरीत आहेत. त्यापासून दूर राहता येत नाही,हे श्री.सहस्रबुद्धे[१] यांनाही जाणवले. आपल्या ग्रंथाच्या पूर्वार्ध संपेपर्यंत त्यांनी या विषयाकडे फारसे लक्ष वेधले नव्हते पण ते वेधणे कसे आवश्यक आहे,हे त्यांच्याच लक्षात असे आले - 'लावणी म्हटली म्हणजे त्यात सौंदर्यदर्शन हा भाग असणार,अशी ठाम समजूत आहे. माझ्या वाचकांना मी आतांपर्यंत त्याच्या पासून शक्यतो दूर ठेविलें आहे, म्हणून पुष्कळसे माझ्यावर रुष्टहि असतील...'मजमून-इ-हुस्न और इष्क 'यांवर कवन रचणाऱ्या मराठी शाहिरांची ओळख करून देतो असे आश्वासन देऊन 'हुस्ना 'पासून वाचकांना दूर ठेवीत आलो ही वंचना झाली, याची जाणीव मला आहे.'

शब्दकळा,प्रतिमासृष्टी,रसाविष्कार,काव्यसंकेत,अभिव्यक्तिपध्दती व शैली यांच्या संदर्भात फार्सी शायरी व मराठी' शाहिरी'- विशेषतः 'लावणी'-यांच्यातील हे अन्तःसूत्र लक्षात घेण्याजोगे असले तरी त्याकडे आजवर बरेच दुर्लक्ष झाले आहे, हेही यावरून लक्षात येईल.त्याचप्रमाणे सुफी कवींची 'तसव्वुफ 'पर रचना व शाहिरांची कलगी - तुऱ्याची आध्यात्मिक रचना या दोन्ही रचना समान्तर असल्या तरी त्यांच्यामधील प्रकृतिसाम्य (आध्यात्मिक सूत्र )देखील अभ्यासण्याजोगे आहे, याचीही नोंद घ्यायला हवी.

**५) आधुनिक मराठी कविता**

गजल,रुबाई व मसनवी या फार्सी काव्यप्रकारांचा या संदर्भात विचार करायला हवा. दक्खिनीत 'रुबाई' हा प्रकार रुजला असला तरी मराठी कवितेत तो फारसा रुजला नाही.फार्सी 'मसनवीबद्दलही',असेच विधान करता येईल. मात्र 'गजल 'या फार्सी काव्यप्रकाराने मराठी मनावर अनेक शतकें अधिराज्य गाजविले. कवी माधव ज्यूलियन यांनी त्याची तोंडओळख 'गज्जलांजली' या संग्रहातून करून दिली व पुढे भाऊसाहेब पाटणकर आणि सुरेश भट यांनी तो विशेष लोकप्रिय केला. केवळ प्रेमकविता हे त्याचे मूळ रूप कायम न ठेवता त्यातील अनेकविध आशयाभिव्यक्तिसामर्थ्याचा शोध त्यांनी घेतला व फार्सी गजल हा काव्यप्रकार मराठी वाणीत अभिवृध्द व समृध्द केला. खावर सारख्या आधुनिक कवींनी या काव्यप्रकाराच्या अभिवृध्दीसाठी केलेले योगदानही मोलाचे आहे.आजच्या मराठी कवितेतील 'गजल 'चे स्थान निश्चितपणे लक्षणीय आहे.

डॉ.अजीज नदाफ यांच्यासारख्या अभ्यासकांनी त्याविषयी लेखन केले आहे. विस्तारभयास्तव त्याचेही येथे तपशीलवार विवरण करणे शक्य नाही.

**समारोप**

फार्सी - मराठीच्या अनुबंधाची व्याप्ती भाषिक वैशिष्टयापुरतीच सीमित नव्हती तर तिने वाङ्‌मयाचा प्रांतही आपल्यामध्ये समाविष्ट केला होता. मराठी संतसाहित्याचा विचार करता सूफींच्या 'तसव्वुफ' च्या तत्त्वज्ञानाचा व मधुराभक्तीचा त्याच्याशी काहीसा संबंध आला होता मराठी संतांच्या दक्खिनी लेखनात फार्सी-मराठीच्या मीलनाचे मनोरम प्रतिबिम्ब उमटले आहे.एकनाथासारख्या संतांच्या काही पत्रात्मक भारुडांत व रामदासांच्या 'मुसलमानी अष्टकां 'सारख्या रचनेतही याची प्रचीती येते. मराठी पत्रात्मक गद्याच्या जडणघडणीस अनेक फार्सी (जवळपास ८३)पत्रप्रकारांचे, फार्सीच्या लेखनशैलीचे व आकृतिबंधाचे महत्त्वपूर्ण योगदान लाभले आहे. फार्सी तवारिखा आणि अखबार यांना मराठीने बखरीचे वाङ्‌मयीन रूप दिले. विविध प्रकारोपप्रकारांच्या रूपाने शिव आणि पेशवेकालात हा लेखनप्रकार (वाङ्‌मयप्रकार)बहरला. फा.'शायर् 'आणि 'शायरी 'यांच्याशी मराठी शाहीर आणि शाहिरी वाङ्‌मय यांचे केवळ व्युत्पत्तीपुरते व नावापुरते नाते नसून आशयाभिव्यक्तीशीही आहे. फार्सी शायरीतील इश्काचे विविध रंग मराठी लावणीतील सवाल-जवाब आणि मुजरा या प्रकारांत उधळले गेले आहेत तर कलगीतुऱ्याच्या आध्यात्मिक शायरीने सूफींच्या फार्सी आध्यात्मिक शायरीशी आपले नाते जोडले आहे. 'गजल 'हा आजच्या मराठीतील अत्यंत लोकप्रिय काव्यप्रकार मूळचा फार्सीचाच पण त्याला या मराठी भूमीत नवा आशय मिळाला, नवे अनोखे रूप मिळाले. फार्सी रुबाई,मर्सिया व मसनवी त्या मानाने मराठी कवितेत फारशी रुजली नाही.

-----------------

**संदर्भ-टीपा**

१.या ग्रंथाचे संपादन करून मी तो विस्तृत प्रस्तावनेसह सुमारे ३०-३५ वर्षांपूर्वी प्रसिध्द केला होता. (प्रकाशक,जोशी ब्रदर्स,औरंगपुरा,औरंगाबाद.)

२. एगा.(श्री संत एकनाथमहाराज यांची अभंगांची गाथा, चित्रशाळा प्रकाशन, पुणे,१९५६) पृ. ७९६-८०५. एकनाथांची पत्रात्मक रूपके या उपशीर्षकाखाली केलेल्या विवेचनात निर्देशिलेले पृष्ठ - क्रमांक याच ग्रंथातील आहेत.

३. मशस.पृ.१८

४. ठळक टाइप माझा.

५. मशस.पृ.३८

६. कित्ता,पृ.३८-३९

७. एकनाथी भागवत: शब्दार्थ संदर्भकोश.सं.डॉ.मु.श्री कानडे व रा.शं. नागरकर,रामकृष्ण प्रकाशन,पुणे, २००१,पृ. ३८४
८. मशस.पृ.३९
९. कित्ता,(कंसातील शब्द माझे)
१०. कित्ता पृ.३९
११.कित्ता.पृ.४१-५६
१२. कित्ता.पृ. ४४-४५
१३. ठळक टाइप माझा.
१४. मशस.पृ. ५०
१५. व्युको,पृ.२०७
१६. फामको पृ. ८७ व व्युको पृ. ३६०
१७. मशस,पृ. ३९
१८. कित्ता,पृ.५४-५५
१९. फामको,पृ. ९९
२०. व्युको,पृ. ३७७
२१. मशस पृ.५४-५६
२२. मपग पृ. १००-१३८
२३. श्रीशिवशाहीचा लेखनालंकार,प्रका. आबा चांदोरकर पुणे, राज्याभिषेक शक २६०
२४. मपग, पृ.८३-९९
२५. मशस,पृ.५७-६१
२६. कित्ता,पृ.६०
२७. ठळक टाइप माझा.
२८. मशस,पृ.६१
२९. कित्ता,पृ. ६१ ते ७१
३०. मराठी शहिरी वाङ्मया,म.ना.सहस्रबुद्धे, ढोकळ प्रकाशन,पुणे , पृ ८
३१. कित्ता.पृ. १२७-१३४
३२. कित्ता.पृ.१६८
३३. कित्ता.पृ. ११०
३४. अनारकलीची प्रतिमा उर्दू-फार्सी शायरीत फार लोकप्रिय व प्रचलित आहे.
३५. मशादा. पृ. १११
३६. कित्ता.पृ. १४८

..................

## प्रकरण बारावे

# सांस्कृतिक अनुबंध

## (अ)फार्सी आणि मराठी इतिहासलेखन

भाषा,बोली आणि वाङ्मय हे संस्कृतीचेच विविध घटक आहेत.त्याच्या संदर्भातील अनुबंधाचा फार्सी आणि मराठीचा विचार यापूर्वीच्या विवेचनात केला आहे. इतिहास व लोकसाहित्य हेही संस्कृतीचे दोन महत्त्वाचे घटक आहेत मराठी इतिहासलेखनप्रकारांना ,मराठी लोकसाहित्याला त्याचप्रमाणे कोलामीसारख्या महाराष्ट्रातील आदिवासी भाषेला फार्सीचे योगदान कितपत लाभले, हाही संस्कृतीच्या अभ्यासकांच्या दृष्टीने विचार करण्याजोगा प्रश्न आहे. त्याची चर्चा पुढे क्रमशः केली आहे.

फार्सी भाषेचा व तिच्यांतील इतिहासलेखनाचा संबंध येण्यापूर्वी मराठी भाषेत काही अपवादात्मक लेखन (उदा. महानुभाव इतिहासप्रकर्ण ) वगळता इतिहासलेखन झालेले नाही. 'महानुभाव इतिहासप्रकर्ण' हेही अत्यंत छोटेखानी असून त्यात केवळ सांप्रदायिक वृत्तान्तच संक्षेपाने दिला आहे.त्यामुळे त्याचा समावेश मराठी इतिहासलेखनातच करायला असेल तर तो फार मर्यादित अर्थाने करावा लागेल.

फार्सीतील इतिहासलेखनाची परंपरा फार जुनी व पुरातन होती महाराष्ट्रात मुसलमानांच्या आगमनानंतर (मुस्लिम राज्यकर्त्यांनी फार्सीला दरबारी भाषेचे स्थान दिल्यामुळे) फार्सी इतिहास लेखनाशी व विविध इतिहासलेखन-प्रकाराशी मराठीचा फार घनिष्ठ संबंध आला. मराठी इतिहासलेखनशास्त्राला फार्सी इतिहासलेखनशास्त्राचे योगदान त्यामुळेच लाभले. भारतात इतिहासलेखन हे मुख्यत्वेकरून बंगाली आणि फार्सी भाषांत झाले,असे मत डॉ.यदुनाथ सरकार यांनी 'Shivaji and his times 'सारख्या ग्रंथात मांडले आहे. इति राजवाडे यांनीही मुसलमानांच्या फार्सी इतिहासलेखनामुळे मराठी इतिहासलेखनास प्रेरणा मिळाल्याचे नमूद केले आहे. ते[१] म्हणतात,'मुसलमानांच्या सहवासाने,त्यांच्या तवारिखा पाहून, मराठ्यांनीहि बखरी लिहिण्याचा प्रघात पाडला.'

श्री. वा.सी. बेन्द्रे[२] यांनी आपल्या 'साधनचिकित्सा 'या ग्रंथात या विषयावर अधिक प्रकाश टाकला असून मराठीशी फार्सी ऐतिहासिक साधनांचा संबंध कसा व कशा प्रकारे आला, त्याविषयी केलेले विवेचन महत्त्वाचे आहे - 'मुसलमानांच्या आगमनाबरोबर हिंदुस्थानात फारसीचा प्रवेश झाला व मुसलमानी सत्तेबरोबर ती राजभाषा म्हणून सर्वांवर अधिकार गाजवू लागली. इ.सनाच्या १५ व १६ व्या शतकात तिचा सर्वत्र प्रसार झाला. खेडेगावांतून महजरादी काही गावकी थाटाची कागदपत्रे मराठीत लिहिली जात, परंतु बहुतेक राजकीय दप्तर फारसीतच ठेवले जाई. इतकेच नव्हे तर फारसी ही राजभाषा झाल्याने व्यवहारात तिचा इतका उपयोग केला जाऊ लागला की मराठी पत्रांत फारसी शब्दांचा अर्ध्याहून अधिक उपयोग केला जाई ...

शिवशाहीच्या इतिहासाला उपयुक्त अशी मोगली साधने फारसीतच मिळतील... फारसी साधनांत इतिहासोपयोगी अशी प्रत्यक्ष राजकीय साधने जर काही उपलब्ध झालीच तर ती मोगली दप्तरातच उपलब्ध होतील. खाजगत पत्रांचा व इतिहासग्रंथांचा साठा मात्र मराठीपेक्षा अधिक मिळण्याचा संभव आहे. फारसी साधनांचे स्थूल मानाने चार प्रकाराने भाग पाडता येतील:

(१) फर्माने किंवा दरबारी हुकूम व कौलनामादी इतर सरकारी पत्रे

(२) वाक्यांसारखी वाकेनिविसांनी किंवा इतर सुभेदारांनी आपापल्या हुजुरांत लिहिलेली पत्रे

(३) तवारिखांसारखी नंतर जुळवून तयार केलेली टिपणे व

(४) 'नामे ' यांसारखी चरित्रकारांनी मुद्दाम तयार केलेली चरित्रे '.

'महाराष्ट्रात इतर बाबतीप्रमाणे इतिहासलेखनाच्या बाबतींतहि मुसलमानांचे अनुकरण झाले ' हे डॉ.र.वि. हेरवाडकर[३] यांनीही मान्य केले आहे.

मराठीच्या इतिहासलेखनशास्त्राविषयी डॉ. रा.श्री. मोरवंचीकर[४] यांनी आपल्या ग्रंथात यासंबंधी महत्त्वाचे विवेचन केले असून त्यांनी केलेल्या वर्गीकरणातून मराठी इतिहासलेखन-प्रकारांवर व ऐतिहासिक साधनांवर प्रकाश पडतो, त्याचप्रमाणे यांतील काही लेखनप्रकारांच्या नावांवरूनदेखील फार्सी इतिहासलेखनप्रकारांचा मराठीशी कसा संबंध आला असावा, याचे सूचना होते.

**"मध्ययुगीन साधने (लिखित)**

समकालीन कागदपत्रे - बातमीपत्रे,अखबार,आत्मवृत्ते

सरकारी कागदपत्रे- शासकीय,खाजगी

जमाखर्च - शासकीय,खाजगी

बखरी

कळकुटी,वंशवृक्ष

चरित्रे

शकावली

चित्रे - नकाशे

प्रवासवर्णने

...सुलतान कालखंडापासून प्रत्येक राजाने आपली चरित्रे व घराण्याचा इतिहास, दरबारचे कामकाज लिहून ठेवण्याची प्रथा पडली होती.**त्या अनुषंगाने मोठ्या प्रमाणात चरित्र व इतिहास लेखन झाले**. अर्थात् याला निखळ इतिहासलेखन म्हणता येत नसले तरी ते इतिहासाचे उत्तम साधन म्हणून ग्राह्य होते. त्याच धर्तीवर नंतरच्या मुघल काळातही लिखाण झाले. मराठा कालखंडात बखररूपाने ते साकारले. बखरीच्या विश्वासार्हतेबद्दल वाद असला तरी **बखरवाङ्मयाने मध्ययुगीन इतिहासाचे दालन समृध्द केले हे निश्चित**."

बखर-वाङ्मय

फार्सीमध्ये इतिहासलेखनाचे विविध प्रकार होते. त्यांत पुढील प्रकारांचा निर्देश करता येईल :

तारीख-तवारिखा,अखबार,नामे,कैफियती,वाके,बातमीपत्रे,कुळकथा-वंशावळी,हकीकत इ. या सर्वांचाच प्रभाव समकालीन व उत्तरकालीन मराठी इतिहासलेखनावर पडल्याचे त्यांच्या नावावरूनही लक्षात येईल. हे प्रकार-उपप्रकार व त्यांची प्रकृती मूलतः भिन्न आहे पण डॉ.हेरवाडकर[१] यांनी त्यांचा सर्वांचाच समावेश 'बखर 'या व्यापक संज्ञेत केला असून त्यांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे केले आहे;त्यावरून मूळ फार्सी इतिहासलेखन-प्रकारांनी मराठीत किती विविध रूपे घेतली, याचीही कल्पना येईल.

१.चरित्रात्मकः कृ.अ. सभासदविरचित शिवछत्रपतींचे चरित्र, म.रा.चिटणीसविरचित शककर्ते श्रीशिवछत्रपती महाराज ह्यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र.

२.प्रसंगात्मकः रघुनाथ यादवकृत पाणिपतची बखर, खर्ड्याच्या स्वारीची बखर.

३.विशिष्ट घराण्याचा इतिहास - दाभाडे सेनापती यांची हकीगत,गायकवाड यांची हकीगत

४.विशिष्ट काळातील इतिहास - पेशवाईच्या अखेरची अखबार, शक १७३८ सालची हकीगत

५.आत्मचरित्र - नाना फडणविसांचे आत्मचरित्र,बापू कान्हो यांचे आत्मवृत्त.

६.एका विशिष्ट पक्षाची बाजू[२] - होळकरांची थैली

७.कलमीबखर - ९१ कलमी किंवा ९६ कलमी बखर.

८.केवळ बातमी म्हणून झालेले लेखन - शके १७४० मधील माहिती

९.उत्पन्न चालू राहावे,यासाठी लिहिलेल्या बखरी - सरकारात गुजरलेल्या कैफियती.

१०.सांप्रदायिक - समर्थांची बखर, जयरामस्वामी वडगावकर यांची बखर.

११.शैक्षणिक - (सवाई माधवरावांच्यासाठी मुद्दाम तयार करविलेली) बकासुराची बखर

१२.भाषांतरित - बुंदेल्याची बखर, सोनपत-पानपत येथील मराठे-दुराणी युध्द.(काशीराज पंडित)

१३.स्थलवर्णनात्मक - महाबळेश्वराची जुनी माहिती

१४.पौराणिक - कृष्णजन्मकथाबखर,माघमाहात्म्य.

यांतील शिवछत्रपतींचे चरित्र, भाऊसाहेबांची बखर, पानिपतची बखर यासारख्या बखरींचे मराठी वाङ्मयातील स्थानही मानदंडाचे आहे. फार्सी इतिहासलेखन- प्रकारांना जे वाङ्मयीन स्थान प्राप्त झाले नाही ते प्रतिभावंत मराठी बखरकारांमुळे या बखरींना प्राप्त झाले व फार्सीचे अधिष्ठान असलेल्या या लेखनाने मध्ययुगीन मराठी वाङ्मय समृद्ध झाले. फार्सीत जे घडले नाही ते या मराठी भूमीत घडले.

पत्रात्मक ऐतिहासिक साधने

इति.राजवाडे यांनी शासकीय पत्ररूप ऐतिहासिक साधनांचे ('सरकारी कागदां'चे) ७८ प्रकार वर्णिले आहेत, त्यांत पुरतीदुरुस्ती करून श्री.वा.सी. बेंद्रे[८] यांनी पुढील ८४ प्रकारांच्या या साधनांचे वर्णन असे केले आहे. त्यांच्या नावावरून फार्सी पत्रप्रकारांचा त्यांच्यावरील ठसा सहज जाणवेल-

"१. अभयपत्र- दहशतीने परागंदा झालेल्यास परत आणण्याबद्दल लिहावयाचे ते

२. अमानत किंवा जप्तीपत्र-एक वादी भोगवटा करतो, दुसरा फिर्याद,सबब लिहिले ते.

३. अर्जीइनामपत्र - नजर देऊन इनाम घेणे ते

४. आमंत्रणपत्रिका - दरबारात बोलाविले ती.

५. आज्ञापत्र - छत्रपतींचे खुद्द पत्र ते.

६. इनामपत्र - धन्यांनी कृपा करून जमीन अगर गाव देणे त्याबद्दलचे.

७. कबजपत्र - कबजा दिल्हा ते.

८. कबुलायत - ठराव करून लिहून घेणे ती.

९. कर्जरोखा - रिनकोनाम लिहून घेणे तो.

१०. करीना - वादी यांची हकीकत लिहून घेणे तो.

११. कुंकुमपत्र - लग्नमुंजीचे पत्र ते.

१२. कुंठितपत्र - कलमाकलमास लबाडी दिसून आली सबब यापरते बोलणे नाही म्हणोन लिहून घेणे ते.

१३. कौलनामा - रयतेस इस्तावा देऊन लावणी अगर वसाहत करणसाठी जे पत्र लिहून देणे ते.

१४. खरेदीपत्र - खरेदी ज़मीन वगैरे घेतले ते.

१५. खोका - हुंडीवर भरपाई लेहून घेतली,ठिकाणी हुंडीचा ऐवज पावला न पावला, चौकशी केली तरी दाखविणे तो.

१६. खोटपत्र - कलमाकलमाची पुरवणी पांढरमुखे झाली नाही. खोटा पडला,नंतर लिहून घेणे ते.

१७. गुन्हेगारी किंवा दंडपत्र - न्यायी खोटा झाला त्यापासोन द्रव्य घेणे त्याचे पत्र ते .

१८. जातकतबा किंवा मोकदमजामीनकतबा - जातीस जामीन मोकदमास घेणे तो

१९. जातपत्र - आपण लिहून देणे ते.

२०. जन्मटिपण - जन्मता केले ते

२१.जप्तीचिट्टी - जप्ती करविली ती.

२२. जप्तीपत्र - वर नं.२ पाहा

२३. जाब - हुंडी गमावली पुन्हा लिहून घेणे तो.

२४. जामीनसाखळी - रयतेस एकमेकांस जामीन घेणे ती.

२५. जामीनी - ऐवज कुळाकडून येणे थकला, त्यास तगादा केला,सबब बोलावयास आला,तेव्हा त्याजपासोन खात्री घेणे ती.

२६. तकरीर - वाद्याचा लेख वाद्यास दाखवून त्याजवरी लिहून घेणे ती.

२७. तगीरपत्र - कामावरून काढणे ते.

२८. तवकरेपत्र - महाली कमाविसदारावरी पैका घेतल्याचा मुद्दा शाबीत करून तुफानदार आला, त्याजपासोन निशा सरकारने घेऊन कमाविसदार बोलावून आणून रुजुवात करविली; सबब पत्र लिहून घेणे ते.

२९. तह - सरकारने कोणताही जुजबी करार किंवा नियम केला तो.

३०. तहनामा - दोन राज्यांत नेमबंदी झाली तो .

३१. ताकीदपत्र - बखेडा जाला त्याविषयी लिहिणे ते.

३२. थळपत्र - थळ नेमून दिल्हे,तेथे पंचाईत जाली ते.

३३. दस्तक - हंशील माफ करणे जकातीचे ते .

३४. दंडपत्र - वर नं.१७ पाहा.

३५. दुमालपत्र - नवा अंमलदार आला, माजी अंमलदारापासोन इनामी वगैरे जाबसाल लेहून आणणे ते.

३६. निवाडपत्र - सरकारात न्याय मिळाला ते

३७. निशचिट्ठी - जमीदारापासून अगर कमाविसदारापासून ऐवजाची खातर घेणे ती.

३८. निशापत्र - जमीदार सामील करून कारकुन कमाविसदारांनी द्रव्य खादले त्याजपासोन धणी घेणे,निशा घेणे ते.

३९. निशेदारी - वर नं. २५ मधील जामीनीला उगवणी ती. खताखाली 'यासि उगवणीस धणी अमुक ' पुढे गुंतवणे तसे लिहिणें.

४०. नेमोतरपत्र - वादीस थलीहून निरोप देतेसमयी पुन्हा यावयाची मुदत करून घ्यावी ते.

४१. पावती - ऐवज पावला म्हणून लिहून घेणे ती.

४२. पुरशिस - करीना व तकरीर यांतील कलमे एकमेकांची बोलणी विचारून लिहून घेणे ती.

४३. फारखती - खत गमावले त्याची .

४४. बहालपत्र किंवा बक्षिसपत्र - बक्षिस दिल्हे ते

४५. बक्षिसपत्र - वर नं. ४४ पाहा

४६. भाळपत्र - दिवा काढण्यास राजी झाला त्याचे मस्तकी उच्चारपत्र शीर्ष बांधतात ते.

४७. मनाचिट्ठी - तगादा मना करणे ती किंवा वरातदार उठवून आणणे ती.

४८. मसालापत्र किंवा हुकमी रोखा - हुकूम मोडला अगर सालाबाद शिरस्त्याप्रमाणे न वर्तला तरी मसालापत्र लिहिणे तो.

४९. महजर - महालांत किंवा कसब्यांत पंचाईत किंवा मनसुबी जाली तो.

५०. माफीपत्र - अस्मानी म्हणजे पर्जन्य न पडला अथवा फार लागला व सुलतानी म्हणजे दग्यानी लुटले,त्याबदल सूट देणे ते.

५१. मुचलका - वादी यांचा परस्परे तंटा लेहून घेणे तो.

५२. मुदतबंदी - मुदत करणे ती.

५३. मृत्युपत्र - मरणसमयी लिहिले ते .

५४. मोकदम - जामीनकतबा (वर नं.१८ पाहा)

५५. मोजदादपत्र - अंमलावरी गेल्यावरी सरकारी जिनसा माजी मामलतदारापासोन घेणे ते.

५६. यजितपत्र - सर्वमते खोटा झाला त्यापासोन लेहून घेणे ते.

५७. यादी - संस्थानिकांनी हुजूर अर्ज करणे ती.

५८. राजीनामा - वादी याणी खुशीने लेहून दिल्हा तो.

५९. लग्नचिट्टी - लग्नाचे वेळी लिहिली ती.

६०. वदणुक - पांढर,बलोते व गोवरगांव मेळवून यांचे माथा इमान टाकून साक्ष पुसणे ती.

६१. वंशावळ - पिढयांतील नावे लिहून घेणे ती.

६२. वाटेपत्र किंवा विभागपत्र - आपापसांत समजुतीने वाटे झाले ते.

६३. वृत्तिपत्र - वृत्ति नेमून दिल्ही ते.

६४. सडीपत्र - महालीहून वाद्याचे वर्तमान लिहून आणणे ते .

६५. सनद - गावावर किंवा महालावर मामलतदार किंवा कमाविसदार यास लिहून देणे ती.

६६. समजपत्र- वाद न करिता समजुतीस आले ते.

६७. समापत्र - भाऊबंद वगैरे वतनभाऊ मेळवून घेणे एकदिल सारे होणे त्याचा ठराव करणे,तो केला ते.

६८. समलातीपत्र - मदतीस बोलावणे ते.

६९.सरंजामपत्र - सरंजाम दिल्हा ते.

७०. सरकतनामा - सरकतीने शेत वगैरे उदीम करणे तो.

७१. सामिलनामा - जातीने आंगवण नाही सबब भाऊ उभा करणे त्यास लिहून देणे घेणे तो

७२. सारांश - वाद्यावाद्यांचा कयास निवडून संभाविताचे मत देणे तो.

७३. साहित्यपत्र - नव्या अंमलदाराच्या मदतीकरिता दिले ते.

७४. साक्षपत्र - साक्ष अगर गोही लिहून दिली ते.

७५. सोडचिट्टी - अंमल सोडणे त्याबदल लेहून देणे किंवा जप्ती करून सोडणे ती.

७६. हजिरीपत्रक - हजिरी घेणे ते.

७७. हप्तेबंदी - दरमुदत ऐवज घेणे त्याविषयी लेहून घेणे ती.
७८. हरकीपत्र - न्यायात खरा झाला त्यापासोन पैका घेणे त्याचे पत्र ते.
७९. हरदुमुरसा जुमला (मुजरा?)चिट्‌टी गमावली ती नवीन करून घेणे त्यास.
८०. हुकुमीपत्र - कामगिरीवर रवाना करणे ते.
८१. हुकमी रोखा - वर नं. ४८ पाहा
८२. हुज्जत - पोत्यास ऐवज जमा केला त्याची पावती देणे ती.
८३. हुंडी - ऐवज देऊन देशावरावरी घेणे ती."

फर्माने,सनदा,महजर,मेस्तके ऐतिहासिक पत्रे इ. चा संग्रह मराठी रुमाल,पेशवे दप्तर यासारख्या ग्रंथांच्या विविध खंडांत केला आहे. महाराष्ट्रात जागोजाग ही कागदपत्रे विखुरली आहेत व त्यांची व्याप्ती लक्षणीय आहे. वरील विवेचनावरून फार्सी इतिहासलेखन आणि मराठी इतिहासलेखन यांचे नाते एकमेकाशी किती घनिष्टपणे जुळले होते हे स्पष्ट होईल व त्यातील अन्तःसूत्रेही जाणवतील,अशी अपेक्षा आहे. या अध्ययन-संशोधन-क्षेत्राकडे इति.राजवाडे,वा.सी.बेंद्रे, ग.ह.पोतदार, डॉ. ग.ह.खरे यांच्यासारख्या दिग्गजांनी लक्ष वेधले पण त्यांच्या पाऊलखुणांवर पुढे किती संशोधक चालले,हे जाणकार अभ्यासकांना विदित आहेच. या क्षेत्रात किती प्रचंड अध्ययनसामग्री व सुप्त सामर्थ्य दडले आहे, याची कल्पना वरील विवेचनावरून यावी.

---------------

## (आ) फार्सी व मराठी लोकसाहित्य

फार्सीच्या माध्यमातून फार्सी शब्दांबरोबरच अरबी व तुर्की शब्दही मराठी लोकसाहित्याच्या भाषेत आले, ही बाब फार्सी - मराठीच्या अनुबंधाबरोबरच सांस्कृतिक अनुबंधाचेही दर्शन घडविते,असे मला वाटते.मराठी लोकसाहित्याची भाषा ही जनलोकांच्या मुखी रुळलेली जिवंत भाषा होय. तिच्यातही या शब्दांचा आढळ होणे ही सांस्कृतिक आदान-प्रदानाच्या संदर्भातील लक्षणीय घटना नव्हे काय? या दृष्टीने विचार करता मला पुढील भाषिक वैशिष्ट्ये जाणवली - वानगीदाखल काही उदाहरणे -

(१) नामे

पुल्लिंग -उपराळा,उरुस,खंदिल,छबिना,अलम,दरोजा,दुसमान,वकत.

स्त्रीलिंग - उमत,उमर,कलालीन,जबाण,दुन्या,पडदनी,फवज.

नपुसकलिंग - उदबन,तकत,लिशान

(२) विशेषणे - अशीगल,खुनेरी,गर्दाबाज,जलाल,जानी,तालेवंत,तालेवार,दमगीर,
मखमली.

(३) क्रियापद - खंदिणे,तावणे

(४) शब्दयोगी अव्यय - बराबर

(५) क्रियाविशेषणे - अवंदा,आखरी,उजून,गईप,दुरून,हम्मेस

(६) भाववाचक नामे - उस्तवारी,नाचारी,मुरवत,मुलाजा,मुसाफरी,रंज,लालाई,सरोबरी

सादशब्द - आकानतुफान,कल्लाबल्ला, खदलाबदली.

तद्धिते - जानगिरि (फा.गीरी),तालेवंत(फा.वन्द्),तालेवार(फा.वार्),नक्रदार
(फा.दार्),बिदागिरी (फा.गीरी)

वाक्प्रचार - गजबजा होणे,दमघीर होणे,विदा करणे,शिलागी जाना(जाणे),सरोबरी
करणे.

वरील उदाहरणांवरून हे लक्षात येईल की मराठी लोकवाङ्मयात केवळ अ.तु.फा. शब्दविशेषच आले नाहीत तर मराठी शब्दांची सिद्धी करणारे अनेक प्रत्यय (तद्धिते)आले आहेत, शब्दयोगी अव्यये व क्रियाविशेषणे आली आहे. भाववाचक नामे व सादशब्दही आले असून त्यांनी मराठी शब्दसिद्धीच्या प्रक्रियेस हातभार लावला आहे. फार्सी शब्दांपासून काही क्रियापदे सिद्ध झाली आहेत;एवढेच नव्हे मराठी वाक्प्रचारांच्या कोशातही अ.फा. वाक्प्रचारांचीही लक्षात घेण्याजोगी भर पडली आहे. माझ्या मार्गदर्शनाखाली डॉ. हरिहर मातेकर यांनी पीएच्.डी.साठी 'मराठवाड्यातील लोकसाहित्याचा भाषिक अभ्यास ' हा प्रबंध बऱ्याच वर्षांपूर्वी डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठास सादर केला व तो पी एच्.डी (मराठी)साठी मान्यही झाली. त्यात मराठवाड्यातील लोकसाहित्याचा व फार्सीचा किती जवळचा संबंध आहे, हे स्पष्ट होते पण हा प्रबंध अद्यापि अप्रकाशित असल्याने त्यातील संदर्भ मी येथे दिले नाहीत.पुढे डॉ. सरोजिनी बाबर[१] यांनी संपादिलेल्या (प्रा.गजमल माळी व डॉ.ग.मो.

पाटील यांनी संकलित केलेल्या) 'लोकसाहित्य शब्दकोशा' तील अ.तु.फा. शब्दांची सूची देत आहे.

अलाबला(पु.),अल्लाबल्ला(पु),अवंदा(क्रिवि),अशीगल(वि),आकनतुफान(न),आखरी(क्रिवि) आखर्स(न),आगाजा(क्रिवि),आन(पु.),आयना(पु),आसमान(न),आरकन्रा(पु),इलाना(पु),इसबंद(पु), उजून(क्रिवि),उपराळा(पु),उमत(स्त्री),उमर(न),उम्मईतु(स्त्री),उम्मत(स्त्री),उरमाल(पु),उरन्रा(पु), उस्तवारी(स्त्री),ऊदबन(न),औदा(क्रिवि),कदर(स्त्री),कबजा(पु),कर्जा(पु),कलालीन(स्त्री), कलीदा(पु),कल्ला(पु),कल्लाबल्ला(पु),कसाला(पु),करसाकस्सा(वि),कईल(स्त्री),काहारी(वि), कुडतान(न),कुरगत(स्त्री),कुल्ना(पु),कंकोरा(पु),कंदील(पु),खतीब(पु),खदलाबदली(स्त्री), खबर(स्त्री),खुदधी(स्त्री),खुतनी(स्त्री),खुती(स्त्री),खुनस(पु),खुनेरी(वि),खुषमोज्या(वि),खैस(वि), खंगर(वि),खंदिणे(क्रि),खंदील(पु/न),ख्याल(पु),गईप(क्रिवि),गजनी(स्त्री),गजबजा होणे(क्रि),गजगज(वि),गझनी(वि),गर्दी(पु),गर्दीबाज(वि),गाही(स्त्री),गुजरी,गुमान(पु/न), गुलझार(वि),गंज(स्त्री),गंजी(स्त्री),पुगई (स्त्री),चौसुपी(वि),छप्पर-पलंग(फा.पलंग)(पु), छबिना(पु),छातीखोर(फा.खुर)(वि),छापी करणे(क्रि),छिलाक(वि),जखम(स्त्री), जबाण(स्त्री),जरम् परती(स्त्री),जलाल(वि),जवारीन(स्त्री),जव्हारी(स्त्री),जान(स्त्री), जानगिरी(स्त्री),जाफर(न),जामा(पु),जार(क्रि.वि),जोडे(श.अ.),ज्यान(स्त्री),ज्वानी(स्त्री), झलम(पु),झोड(स्त्री),डाव(पु.),डावज(स्त्री),डुबुकदार(फा.दार)(वि),डेरा(पु),डेलज(स्त्री), तकाल(न),तकीम(क्रि),तक्त(न),तर्फ(स्त्री),तलप(स्त्री),तल्लासा(पु),ताजी(वि),तापता(पु) तारफ/तारीफ(स्त्री),तालीवार(वि),तालेवार(वि),तालेवंत(वि),तावणे(क्रि),तोबा(पु),दम(पु), दमगिर/दिमगीर (वि),दमधीर होणे., दरकार(पु),दरज(स्त्री),दरजा(पु),दरिया(पु), दरोजा(पु),दादर(पु),दिक्कत(स्त्री),दिरंग/दिरंगा (पु),दुई(सं.वि),दुन्या(स्त्री),दुरून(क्रिवि), दुशाल(स्त्री),दुसमान(पु),दुसायार(न),दुही(स्त्री),नक्रदार (वि),नगदनारायण(फा.नक्द)(पु), नाचारी(स्त्री),नालक(वि),नोकईरी(स्त्री),पडदनी(स्त्री),पडेदार(न),परसदार(न),फरईत(वि), फरशी(स्त्री),फवज(स्त्री),बदन(न)बनात(स्त्री),बराबर(श अ),बाजई(वि),बाजिंदी(वि/स्त्री), बादीर(वि/पु),बिजवा(पु),बिदागीरी(स्त्री),मखमली(वि),मन्सा(स्त्री),मन्सुरा(पु),माजुम(स्त्री), माल(पु),मनसुब(पु),मुरवत(स्त्री),मुराद(स्त्री),मुलाजा(पु),मुलाणी(पु),मुसाफरी(स्त्री),मेना(पु), मोकाशी(पु),मोहोर(स्त्री),म्हाल(पु),याद(स्त्री),रयत(स्त्री),रहीरा(पु),राब(पु),रुका(पु),रेसम(न), रोज(पु),रंज(पु),लवा(पु),लालवा(पु),लालाई(स्त्री),लालीप(वि),लिशान(न),वकुब(पु),वतन(पु), वर्दी (स्त्री),विदा करणे,शक(पु),शामदानी(स्त्री)शार(न),शाहीमिर्ग(पु),शिरणी(स्त्री), शिलक(स्त्री),शिलागी जाना (जाने),राकालात(स्त्री),सदर(स्त्री),सरोबरी करणे, सलदी(वि),सुरत/सुर्त(स्त्री),सुपारी(स्त्री),संदूक(पु),संबला(पु),हम्मेरा/हम्मेसा(क्रि.वि), हाऊद(पु),हाऊस(स्त्री),हवशा/हवशी/हावईशी(वि),हिकमत(स्त्री),हुकूम(पु),हुरमुश/ हुरमुशी(पु).

## (इ) फार्सी आणि महाराष्ट्रीय आदिवासींची भाषा (विशेष संदर्भ: कोलामी)

या संशोधनक्षेत्राला आजवर कुणीही स्पर्श केला नसल्याने फार्सी-मराठी अनुबंधाच्या संदर्भात त्याचा अवश्य विचार व्हायला हवा,असे मला सातत्याने जाणवत होते. तशी या विषयाची व्याप्ती मोठी आहे व त्याहून मोठी आहे महाराष्ट्रातील आदिवासींच्या बोलींची/भाषांची व्याप्ती. त्यांची नोंद अलीकडे काही प्रमाणात घेतली जात असल्याचे 'ढोल'[*] सारख्या आदिवासींच्या नियतकालिकावरून आपल्याला जाणवते तथापि महाराष्ट्रातील आदिवासींच्या अशा अनेकविध बोलींचा सूक्ष्म अभ्यास झाल्याशिवाय फार्सीचा व त्यांचा कितपत संबंध आला, हे सांगता येणार नाही. तोवर थांबण्यापेक्षा आज उपलब्ध असलेल्या सामग्रीच्या आधारे या अपरिचित व दुर्लक्षीत अध्ययनक्षेत्रावर थोडाफार का होईना प्रकाश का टाकू नये, या विचाराने या ग्रंथात त्याचे संक्षेपाने विवरण करीत आहे.

विदर्भातील ख्यातनाम संशोधक डॉ.भाऊ मांडवकर[११] यांनी 'कोलाम 'या आपल्या ग्रंथात महाराष्ट्रातील आदिवासी जमातीची संस्कृती व त्यांची बोली या विषयी उपयुक्त विवेचन केले.त्याचा आधार घेऊन वरील विषयाची शलाकापरीक्षा - एका अर्थाने 'case study'- करावी,या हेतूने मी पाहणी केली व या पाहणीतून जी तथ्ये निदर्शनाला आली ती पुढे दिली आहेत.

महाराष्ट्रातील आदिवासी दऱ्याखोऱ्यांत जंगलात व दुर्गम प्रदेशात राहतात. त्यांचा संपर्क नागर संस्कृतीशी फारसा येत नाही; पण ग्रामीण संस्कृतीशी येतो तोही त्यांच्या गरजेपुरताच. अशा परिस्थितीत त्यांच्या बोलीवर - विशेषतः शब्दसंग्रहावर - फार्सीचा जो प्रभाव जाणवतो, त्याची नोंद घेणे अपरिहार्यच नव्हे तर महत्त्वपूर्ण आहे, असे मला वाटते.

विदर्भातील यवतमाळ ,वणी,चांदा,दारव्हा,पुसद आणि मराठवाड्यातील नांदेड, उस्मानाबाद व नांदेड जिल्ह्यातील किनवटसारख्या दुर्गम भागातही कोलामांची वस्ती आहे.कोलामांच्या वास्तव्याविषयी माहिती देऊन डॉ. मांडवकर म्हणतात[११],

'वर दिलेल्या १८९१ ते १९६१ च्या कोलामांच्या आकड्यांवरून स्पष्ट दिसून येईल की कोलामांची सर्वात अधिक संख्या यवतमाळ जिल्ह्यात आहे.१९४१ मध्ये संपूर्ण मध्यप्रांत-वऱ्हाडात असलेल्या ३६ ,५९५ कोलामांतून ३२,७२० कोलाम यवतमाळ जिल्ह्यात होते.१९५१ व १९६१ मध्येही ही संख्या सर्वाधिक आहे. यवतमाळ जिल्ह्यास लागून असलेले भूप्रदेश म्हणजे उत्तरेस अमरावती जिल्हा(त्यातील चांदूर तालुका),पूर्वेस वर्धा जिल्हा,दक्षिणेस व पूर्वेस चांदा जिल्हा,दक्षिणेस आदिलाबाद व नांदेड हे जिल्हे यातून कोलामांची वस्ती आढळते... वरील आकाडयांच्या आधारे असे दिसते की, कोलामांची दाट वस्ती यवतमाळ जिल्ह्यातच असून त्यांची वस्ती आजूबाजूला विरळ विरळ होत जाऊन संपली आहे.'

कोलामांच्या मागासलेपणाविषयी डॉ. मांडवकर पुढे म्हणतात,'यवतमाळ जिल्ह्यात आदिवासी अधिक आहेत. या जिल्ह्यातील व जवळच्या परिसरातील गोंड,प्रधान, आंध,बंजारा यासारख्या जातींपेक्षा कोलाम कमालीचे मागासलेले आहेत.डॉ.एल्विन[११]यांनी आदिवासींविषयक अहवालात जे मत मांडले आहे ते डॉ.मांडवकरांच्या विधानाला पुष्टीच देते. ते म्हणतात,

'It is the Kolams or Kolavars who can best claim the title of 'aboriginal' in this area.'

डॉ.ग्रियर्सन यांनी आपल्या भारतीय भाषा सर्वेक्षणात कोलामी बोलीचा थोडासा विचार केला आहे तथापि १८९७ साली हेग आणि वुलस्ली यांनी गोंडी व कोलामी यांतील काही शब्दांची तुलना केली[१४].सेतुमाधवराव पगडी यांनी १९५० मध्ये कोलामी भाषेचे व्याकरण प्रसिध्द केले. इ.स. १९५०-५१ मध्ये ऑक्सफर्ड विद्यापीठाचे संस्कृतचे प्राध्यापक टी.ब्यूरो आणि भट्टाचार्य यांनी किनवट (मराठवाडा)व पांढरकवडा (विदर्भ)या परिसरातील कोलामीचे शब्द मिळविले. रसेल-हिरालाल यांनी 'The Tribes and Castes of Central Provinces of India'. या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडात कोलामीचे स्थान तमिळ,तेलगू व कानडी यांच्यामध्ये आहे असे म्हटले आहे. हा ग्रंथ बऱ्याच वर्षांपूर्वी इ.स.१९६१ मध्ये-लंडन येथून प्रकाशित झाला आहे[१५]. ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनी ज्ञानकोशाच्या अकराव्या विभागात कोलामीचा विचार केला असून डॉ.इरावती कर्वे यांनी ' मराठी लोकांची संस्कृती ' या ग्रंथात पृ.११० वर कोलामीचा निर्देश केला आहे.या सर्व उल्लेखांवरून महाराष्ट्राच्या विदर्भ-मराठवाडा या विभागांतील कोलामीचें महत्त्व लक्षात येईल. या ग्रंथात संशोधनार्थ व फार्सीच्या प्रभावाच्या संदर्भात तिची निवड करण्यामागील माझा हेतूही यावरून स्पष्ट होईल.

यवतमाळच्या परिसरात बहुसंख्य कोलाम आहेत व त्या परिसरात वऱ्हाडी ही मराठी बोली बोलली जाते. डॉ.मांडवकर यांच्या संशोधनानुसार कोलामीचा शब्दसंग्रह आठशेच्या जवळपास असावा, असे दिसते. 'स्वभाषेतील शब्द कमी पडल्यास कोलाम लोक तो शेजारच्या भाषेतून उसना घेतात[१६] ' त्यामुळे असे शब्द कोलामीत सहज रुळले. वऱ्हाडीवर हिन्दी व उर्दूचाही प्रभाव असल्याने फार्सी शब्द हिन्दी/उर्दूच्या माध्यमातून वऱ्हाडीत व तिथून कोलामीत आले असावेत. 'हिंदीतून कोलामीत काही शब्द आले असावेत ', हा तर्क मला पटत नाही. 'हिंदीपेक्षा उर्दूचा प्रभाव मुस्लिम राजवटीत वऱ्हाड व मोगलाई या भागांतील एतद्देशीय भाषांवर पडला[१७] 'हे डॉ. मांडवकर यांचे मत स्वीकारण्याजोगे आहे, असे मलाही वाटते. तथापि 'याद,अस्सल,तकलीफ,अव्वल,तपास,पत्ता इ. तुरळक[१८] हिन्दी उर्दू शब्द कोलामीत आले त्यांचे मत मात्र त्यांनीच दिलेल्या शब्दसंग्रहावरून मला योग्य वाटत नाही.कोलामीत (अरबीतून फार्सीत आलेल्या व मूळ)फार्सी शब्दांची संख्या तुरळक नसून बरीच जास्त म्हणजे ७५ च्या आसपास आहे,हे सोबतच्या सूचीवरून सहज लक्षात येईल. त्यामुळे

विदर्भ-मराठवाडा या मराठीच्या गाभाऱ्यातील आदिवासींच्या भाषेतही हा परिणाम झाला होता, हे सूचित होते.

कोलामी शब्दसंग्रहात आढळणारे भाषिक विशेष असे -

नामे -केदी/कैदी,खबुत्तर,खोगीर,दरोजा,दाना,दोस्त,बजार,बगीश(बगीचा),बर्सी (बर्ची)

भाववाचक नाम - कारगिरी,खात्री,खुशी,जबुरदेस्ती,जलदी,रोजी

विशेषणे - असाल(अस्सल),खराब,गुनबाज,लाल

वचन - अनेकवचन - नगारे

लिंग - पुल्लिंग - केज्जा(कज्जा),केदी/कैदी,तीर,दरोजा(दरवाजा),मालिक, सुरमा

स्त्रीलिंग - खबुत्री,बर्सी(बर्ची),यादी,सावारी,सिसी,सेंदुक

नपुसकलिंग - इनाम,खोगीर,जनवर,निसान,बदक.

शब्दयोगी अव्यय - बरोबर/बोरोबर

क्रियाविशेषण - आयेंद(यंदा),जलदी

तद्धित - गिरी - कारागिरी,दार-जोरदार,बाज-गुनबाज

## 'कोलामी' भाषेतील अरबी फारसी शब्द[१९]

'क' विभाग

अम्नबरोबर (श अ): फा.बराबर् ,आएड/आयेंद (क्रिवि),मुद्दल(न),याद(ना),साल

'ग' विभाग

असाल(वि),<अ.फा.अस्ल्(तुलनाःवऱ्हाडी-अस्सल),इनाम(न),इस्वादार(त.)<फा.दार् (तुलनाःवऱ्हाडी - इस्वादार),कबूल(क्रि),कारागिरी(स्त्री),केज्जा(पु),केदी(पु),केंदिल(न), कोतवालाक(पु),खबुत्तर (न)(तुलनाःवऱ्हाडी खबुत्तर), खराब,खात्री,खारिज,खिजिल(वि), खुशाल(वि),खुशी(स्त्री),खेबुत्री(स्त्री),खोगीर(न),गंज(स्त्री),गुनबाज(वि)<फा.त.बाज् (तुलनाःवऱ्हाडी गुनबाज),चमचा(पु),जनवर(न)(तुलनाःवऱ्हाडी जनवर),जबुरदेस्ती(स्त्री), जलदी(क्रिवि)(तुलनाःवऱ्हाडी जलदी),जांगा(स्त्री),जुलूम(पु),जोरदाराक(वि)<फा.त. दार्, जोरदाराल(वि),तकलीप(स्त्री)(तुलना- वऱ्हाडी तकलीक,तपलीक).

तपास(पु),तीर(पु),दम(पु),दरोजा(पु)(तुलनाःवऱ्हाडी दरोजा),दाना(पु)[तुलनाःवऱ्हाडी दाना (धान्य)], दप्तरी(पु),दोस्ताक(पु):मित्र,दोस्तिराल(स्त्री):मैत्रिणी,नगारे(पु),नाल(पु), निसान(न),नेसीब,फलांदराल(स्त्री):फलाणी स्त्री,फलाने(पु):फलाणा माणूस,बगीशा(पु) (तुलनाः वऱ्हाडी बगीशा),बजार(पु)(तुलनाःवऱ्हाडी बजार), बदक(न),बदलीपेड(क्रि): बदलणे,बदुक(न),बंद,बरोबर(अ),बर्सी(स्त्री):बरची, बोरोबर(अ),मदत(स्त्री),मालिक(पु), मेना(पु):महिना,यादी(स्त्री):आठवण,रोजी(स्त्री):रोजची मजुरी, रोझदराक(पु):रोजदार, लगाम(पु),लाल(वि),वस्तरा(पु),सायेब(पु),सायेबिराल(स्त्री):साहेबीण,साल(न), सिवाई(वि)-जास्तीचा (वऱ्हाडी सिवाई),सिसी(स्त्री),सुरमा(पु),सेएर(न)(तुलना-

वऱ्हाडी:सेएर),सेंदुक(स्त्री)(तुलना-वऱ्हाडी संदुक)

'घ' विभाग

गोदमा(पु)<फा.गुदम्?:गहू.सावारी (स्त्री)(तुलना:वऱ्हाडी सावारी)

समारोप

मराठी भाषा,मराठीच्या बोली व मराठी वाड्मय याप्रमाणेच महाराष्ट्रीय इतिहास/ इतिहासलेखन,मराठी लोकसाहित्य व महाराष्ट्रीय आदिवासींचे जीवन- त्यांची भाषा, हीही मऱ्हाटी संस्कृतीची अन्य अंगे आहेत. त्यांच्याशी फार्सीचा अनुबंध कितपत जुळला, याचा विचार आजवर (इतिहासलेखनाचा अपवाद काही प्रमाणात वगळता)झाला नाही तो या प्रकरणात केला आहे.फार्सीच्या विविध इतिहसलेखन- प्रकारांमुळे मराठी इतिहासलेखनास प्रेरणा व गती मिळाली व मराठी इतिहासलेखनशास्त्र समृद्ध झाले,हे आपल्या इतिहासकारांनी व डॉ.यदुनाथ सरकार यांच्यासारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या विद्वान संशोधकांनीही मान्य केले आहे.

लोकसाहित्य हा तर मऱ्हाटी संस्कृतीचा गाभा. अ.फा. शब्दांनी त्याचा शब्दसंग्रह व त्याची भाषा कशी समृद्ध केली याची पाहणी या प्रकरणात केली आहे. फार्सीचे व्याकरणविशेष,शब्दसिद्धी व वाक्प्रचारदेखील या लोकभाषेत आले,ही बाबही फार्सी- मराठी - अनुबंधातील जवळीक विशद करते.महाराष्ट्रातील आदिवासींच्या भाषेशी फार्सीचा कितपत संबंध आला, याविषयीच्या विचारास आजवर प्रारंभच झाला नाही. तो करावा या दृष्टीने महाराष्ट्रातील कोलामी भाषेतील अनुबंध शोधण्याचा प्रयत्न या प्रकरणाच्या शेवटी केला आहे. यातही केवळ अ.फा.चा शब्दसंग्रह नाही तर अ.फा.भाववाचक नामे,विशेषणे,शब्दयोगी अव्यये,क्रियाविशेषणे व तद्धिते इ.भाषिक वैशिष्ट्येही आहेत. केवळ शलाका-परीक्षा किंवा नमुना-पाहणी (case study)म्हणून हा विचार करून या विषयाचा उपन्यास येथे केला आहे. या दृष्टीने महाराष्ट्रातील अन्य आदिवासींच्या,भटक्या व विमुक्त जमातींच्या भाषांचा व बोलींचा अभ्यास करण्यास केवढे तरी मोठे, विस्तीर्ण क्षेत्र उपलब्ध आहे !

-----------------

संदर्भ - टीपा

१. ऐप्र.पृ. २,१०४

२. साधनचिकित्सा,वा.सी.बेंद्रे,दुसरी आवृत्ती,१९७६,लोकवाङ्.मय गृह,मुंबई,पृ.७८-७९

३.मराठी बखर,डॉ.र.वि.हेरवाडकर,व्हीनस प्रकाशन,पुणे,१९५७,पृ.७

४.इतिहासलेखनशास्त्र,व इतिहासकार,डॉ.रा.श्री.मोरवंचीकर,विद्या बुक्स पब्लिशर्स,औरंगाबाद,१९९९,पृ.६६-६७

५.ठळक टाइप माझा.

६.मराठी बखर,पृ.१८-१९

७.यात 'होळकरांची कैफियत ' या बखरीचाही समावेश करता येईल.

८.साधनचिकित्सा,पृ.१००-१०३

९.लोकसाहित्य शब्दकोश,सं.डॉ.सरोजिनी बाबर,महाराष्ट्र शासन,मुंबई,१९७३.

१०. ढोल,अंक १ मे २०००,भाषा संशोधन प्रकाशन केन्द्र,वडोदरा.

११. कोलाम,डॉ.भाऊ मांडवकर,सेवा प्रकाशन,अमरावती,१९६६

१२. किता,पृ.२३-२४

१३.Report of the Committee on Special Multipurpose Tribal Blocks,Dr. Verrier Elvin, Ministry of Home Affairs Publication , New Delhi,1960,p.378

१४. A Comparative Vocabulary of the Gaudi and Kolami languages,Journal of Asiatic Society of Bengal, Haig Wolseley,1857,pp185-191

१५. Kolami,a Dravidian Language,London, 1955

१६. कोलाम,पृ.३१५

१७. किता,पृ.३१६

१८.ठळक टाइप माझा.कोलाम,पृ.३१६

१९.कोलाम,पृ.३२७-४२०

-----------------

## संदर्भ-साहित्य


अ) मराठी

अभिनव मराठी - मराठी शब्दकोश : डॉ.द.ह.अग्निहोत्री,व्हीनस प्रकाशन,पुणे,
खंड १ ते ५,१९८२

अहिराणी : भाषावैज्ञानिक अभ्यास,डॉ.रमेश सूर्यवंशी,अक्षय प्रकाशन,पुणे १९९७

अज्ञानसिद्धविरचित 'वरदनागेश',सं. डॉ.यू.म.पठाण,जोशी ब्रदर्स,औरंगाबाद.

आंग्रे यांची हकीकत,इतिहास - संग्रह,जुलै १९०९

आपासाहेब सांगलीकर यांची वांका ,सं.खरे,शके१८४८

इतिहासलेखनशास्त्र व इतिहासकार,डॉ.रा.श्री.मोरवंचीकर,विद्या बुक्स् पब्लिशर्स,
औरंगाबाद,१९९९

उर्दू-मराठी शब्दकोश, सं. श्रीपाद जोशी,प्रा एन्.एस्.गोरेकर,म.रा.साहित्य
संस्कृती मंडळ,मुंबई १९८९

एक्क्याण्णव कलमी बखर,भारतवर्ष,अंक ११-१२,शके १८१९

ऐतिहासिक प्रस्तावना,सं.वि.का.राजवाडे,आवृत्ती पहिली,पुणे,श्री शं.न.जोशी,१९२८

ऐतिहासिक विविध विषय,सं. श्री वि.का.राजवाडे,आवृत्ती पहिली,धुळे,
श्री म.वा.भट,१९४०

ऐतिहासिक शब्दकोश,सं. य.न. केळकर,ठोकळ प्रकाशन,पुणे,१९६२

कोलाम,डॉ.भाऊ मांडवकर,सेवा प्रकाशन,अमरावती,१९६६

खर्ड्याच्या स्वारीची बखर,सं.का.ना.साने,काव्येतिहास - संग्रह : १५शके१८०७

गंगाधरशास्त्री पटवर्धन यांचे आत्मचरित्र,भा.इ.सं.मंडळ त्रैमासिक,वर्ष ३ अंक१,
पुणे, शके१८४४

गायकवाड यांची हकीकत ,सं.का.ना.साने,शके १८०९

चेऊलची बखर ,सं.वि.का.राजवाडे,म.इ.साधनं,खंड ३.

जयरामस्वामी यांचे गुरू,परमगुरू व शिष्यप्रशिष्य यांच्या चरित्राची बखर
,सं.ज.बा.मोडक,काव्येतिहास- संग्रह २७,शके १८११

थोरले राजाराममहाराज यांचे चरित्र,सं.का.ना.साने,तिसरी आवृत्ती,इंदिरा,पुणे,१९१५

दखनी भाषा,डॉ. श्री रं.कुळकर्णी,राज्य मराठी विकास संस्था प्रकाशन,मुंबई,१९९८

दाभाडे सेनापती यांची हकीकत ,सं.का.ना.साने,शके१८०९

ध्वनिविचार,डॉ.ना.गो.कालेलकर,आ.पहिली,डेक्कन कॉलेज,पुणे,१९५५

नागपुरी बोली,भाषाशास्त्रीय अभ्यास,डॉ.वसंत कृष्ण वऱ्हाडपांडे,इंदिरा प्रकाशन,
नागपुर,१९७२

नाना फडणीस यांचे आत्मचरित्र,काव्येतिहास-संग्रह,जून१९३०,ऐति.पत्रे,यादी
वगैरे लेख,द्वितीयावृती,चित्रशाळा,पुणे

निबंध आणि भाषणे,चिं.वि.वैद्य,आ.दुसरी,मुंबई,श्री रा.का.तटणीस,१९४१

पाणिपतची बखर,रघुनाथ यादव,सं.का.ना.साने,शके१८८५

पेशवाईच्या अखेरची अखबार,सं.वि.का.राजवाडे,म.इ.साधने,खंड४,शके१८४१

पेशवेदप्तरातील मराठी भाषेचे स्वरूप,डॉ.गं.ब.ग्रामोपाध्ये,आ.पहिली,
नेलेकर,पुणे,१९४१

पेशव्यांची बखर,का.ग.कारकून,सं.वि.का.राजवाडे,म.इ.साधनें,खंड ४,शके१८४१

फारशी-मराठी कोश,डॉ.मा.त्र्यं.पटवर्धन,भा.इ.सं.मंडळ प्रकाशन,पुणे,१९२५

बापू कान्हो यांचे आत्मवृत्त,ऐति.स्फुट लेख,पृ.७७ ते ८६ आणि चिटणीसविरचित श्रीमंत छत्रपती शाहूराजे यांचे प्रकरण,पृ.८७ ते १०५

ब्रह्मेन्द्रस्वामी ऊर्फ भार्गवबाबा यांचे चरित्र,सं.का.ना.साने,काव्येतिहास - संग्रहः८, इ.स.१८८२

भाऊसाहेबांची बखर,सं.चिंताळे-जोशी,पुणे,शके १८७७

मराठवाड्यातील मराठी शिलालेख,डॉ.यू.म.पठाण,डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ,औरंगाबाद,१९८९

मराठीचा अर्थविचार,डॉ.अनुराधा पोतदार,आ.पहिली,पुणे विद्यापीठ प्रकाशन,पुणे १९६९

मराठी बखर,डॉ.र.वि.हेरवाडकर,व्हीनस प्रकाशन,पुणे,१९५७

मराठी भाषाःउदगम व विकास,प्रा.कृ.पां.कुलकर्णी,आ.चौथी,कमलाबाई भिडे,पुणे,१९६३

मराठी भाषेचा विकास,झुल् ब्लोक,अनु.श्री.वा.गो.परांजपे,पुणे,१९४१

मराठी व्याकरणाची मूलतत्त्वे,प्रा.ग.ह.केळकर,आ.पहिली,बॉम्बे बुक डेपो,मुंबई,१९३३

मराठी व्युत्पत्तिकोश,प्रा.कृ.पां.कुलकर्णी,के.मि.ढवळे प्रकाशन,मुंबई,प्रथमावृत्ती,१९४६

मराठी शब्दसंग्रह-मीमांसा (टंकलिखित प्रत), डॉ.म.अ.करंदीकर,मुंबई विद्यापीठ ग्रंथालय,मुंबई

मराठी शब्दसमीक्षा,डॉ.मु.श्री.कानडे,सन पब्लिकेशन्स्,पुणे,१९८९

मराठी शाहिरी वाङ्मय,डॉ.म.ना.सहस्रबुध्दे,ठोकळ प्रकाशन,पुणे

मराठी साम्राज्याची छोटी बखर,सं.मोडक,शके १८??

मराठेशाहीतील पत्ररूप गद्य,डॉ.सुधाकर पवार,शिवाजी विद्यापीठ,कोल्हापूर,१९७८

मराठ्यांच्या इतिहासाची साधने,वि.का.राजवाडे,धुळे

महाबळेश्वरची जुनी माहिती,इतिहास-संग्रह,ऐति.स्फुटलेख,भाग २

महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश,भाग १ व २,सं.य.रा.दाते,चिंतामण गणेश कर्वे,
महाराष्ट्र कोश मंडळ,पुणे,१९४७

महाराष्ट्र सारस्वत,श्री.वि.ल.भावे,पुरवणी,डॉ.शं.गो.तुळपुळे,आ.पाचवी,मुंबई,
ग.रा.भटकळ,१९६३

महिकावतीची ऊर्फ माहीमची बखर,सं.वि.का.राजवाडे,चित्रशाळा,पुणे,शके १८४६

मुसलमानपूर्व महाराष्ट्र,खंड २,वा.कृ.भावे

यादवकालीन मराठी भाषा,डॉ.शं.गो.तुळपुळे,आ.पहिली,केशव भिकाजी ढवळे,
मुंबई, १९४२

राजवाडे मराठी धातुकोश, भाग पहिला,सं.प्रा.कृ.पां.कुलकर्णी,आ.पहिली,
राजवाडे संशोधन मंडळ,धुळे,१९५९

लोकसाहित्य शब्दकोश,सं.डॉ.सरोजनी बाबर,महाराष्ट्र शासन,
मुंबई,१९७३

विजयनगरचा विध्वंस ,भा.इ.स.मंडळ,द्वितीय संमेलन वृत्त,शके १८३६

शककर्ते श्रीशिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र,म.रा.चिटणीस,
सं.का.ना.साने,शके १८४६

शास्त्रीय मराठी व्याकरण,मो.के.दामले,आ.दुसरी,पुणे,श्री र.दा.यंदे,१९६५

शाहूमहाराज यांची बखर,गो.खं.चिटणीस,भारतवर्ष,खंड ३,फेब्रवारी-मार्च १९००

शिवचरित्र-प्रदीप,संपा.श्री द.वि.आपटे आणि स.म.दिवेकर,आ.पहिली,
स.म.दिवेकर,पुणे,शके १८४७

शिवचरित्र-वृत्त-संग्रह,दुसरा खंड,फार्सी विभाग,सं.प्रा.ग.ह.खरे,आ.पहिली,
भा.इ.सं.मंडळ,पुणे,१९३९

शिवाजीमहाराजांची बखर,चित्रगुप्त,सं.का.ना.साने,काव्येतिहास-संग्रहः२६

श्रीमंत छत्रपती शाहूराजे यांचे प्रकरण,म.रा.चिटणीस,सं.का.ना.साने,शके १८०६

श्रीमंत भाऊसाहेब यांची कैफियत,सं.का.ना.साने,काव्येतिहास-संग्रहः१९,शके१८०९

श्रीशिवछत्रपतींचे चरित्र,कृ.अ.सभासद,सं.का.ना.साने,द्वितीयावृत्ती,पुणे,इ.स.१८८९

श्रीशिवशाहीचा लेखनालंकार,आ.बा.जोशी,आबा चांदोरकर,प्रका. आबा चांदोरकर,
पुणे,श्रीराज्याभिषेक वर्ष २६०

श्रीशिवाजीप्रताप,पुरातनेतिहास प्रकाशन मंडळी,बडोदे,शके १८१७

श्री संत एकनाथमहाराज यांची अभंगांची गाथा,चित्रशाळा प्रकाशन,पुणे,१९५६

सनपुरीची बखर,सं.र.मु.जोशी,दफ्तर-इ-दिवानी,हैद्राबाद द.इ.स.१९५०

सतराव्या शतकातील गोमंतकी बोली,डॉ.वि.बा.प्रभुदेसाई,मुंबई विश्वविद्यालय,
मुंबई,१९६३

सतराशें अडतीस शकांतील हकीकत,सं.वि.का.राजवाडे,म.इ.साधने,खंड ४,
शके १८४५

समग्र सावरकर वाङ्मय,खंड ३

संशोधकाचा मित्र,भाग १,प्रा.ग.ह.खरे,भा.इ.सं. मंडळ प्रकाशन,पुणे,१९५१

साधन-चिकित्सा,वा.सी.बेंद्रे,दुसरी आवृत्ती,लोकवाङ्मय गृह,मुंबई,१९७६

हरिवंशाची बखर,बा.ह.पटवर्धन,स.वा.वा.खरे,आर्यभूषण,पुणे.इ.स.१९०९

हिंदुस्थानी-मराठी शब्दकोश,सं.गो.प.नेने,तु.ना.देवरे,आ.पहिली,अखिल भारतीय हिन्दी प्रचार समिती,१९३९

होळकरांची कैफियत,सं.य.न.केळकर,प्रका.स.ल.कोकाटे,पुणे,इ.स.१९५४

होळकरांची थैली,सं.वि.का.राजवाडे,म.इ.साधने,खंड ३

ज्ञानेश्वरीतील मराठी भाषेचे व्याकरण,वि.का.राजवाडे,आ.१,सत्कार्योत्तेजक सभा, धुळे,श.१८३१

ज्ञानेश्वरी,राजवाडे प्रत,सं.वि.का.राजवाडे,महाराष्ट्र शासन प्रकाशन,मुंबई

(आ) हिन्दी

भारतीय आर्यभाषा और हिन्दी,डॉ.सुनीतिकुमार चतर्जी,आ.२,१९५७

हिन्दी पर फारसी का प्रभाव,पं.अंबिकाप्रसाद वाजपेयी,व्दितीय संस्करण,हिन्दी साहित्य सम्मेलन,प्रयाग,संवत् २००५

हिन्दी भाषा का इतिहास,डॉ.धीरेन्द्र वर्मा,आ.७,हिन्दुस्तानी ऐकेडमी,प्रयाग,१९५३

(इ) गुजराती

गुजराती पर अरबी-फारसीनी असर,भाग १-२,डॉ.छो.र.नायक,गुजराथ विद्यासभा, अहमदाबाद,१९५४

(ई) उर्दू

अरबी जबान व अदब का उर्दू पर असर,डॉ.शफी शेख,सदर-इ-शअबा-इ-अरबी, मुंबई विद्यापीठ,मुंबई

मराठी अदब-एक तार्रुफ,डॉ.रफिया शबनम आबेदी,फारान पब्लिशर्स,मुंबई,१९९९

मरेठी जबान पर फारसी का असर,डॉ.अब्दुल् हक्,आ.१,अंजुमने तरक्की ए उर्दू, औरंगाबाद,१९३३

मौलवी अब्दुल् हक् की खिदमात : कयाम औरंगाबाद के दौरान,डॉ.मसर्रत् फिर्दौस् ,औरंगाबाद १९९९ .

उ) इंग्रजी

A Comparative and Etymological Dictionary of Nepali language, Ed.Prof.R.L.Turner,London,Kegan Paul,French,Trubner and Co. Ltd. 1931.

A Comparative Vocabulary of the Gaudi and Kolami languages, Haig Wolsely,Journal of Asiatic Society of Bengal,1957.

A Comprehensive Persian-English Dictionary,Dr.F.Steingass, Fourth impression,London,Routledge and Kegan Paul,1957.

A Dictionary of Islam,T.P.Hughes,London,W.H.Allen and Co,1935.

A History of Muslim Historiography,Franz Rosenthal,London,1952.

A Literary History of Persia,Prof.E.G.Browne,Volume IV, Cambridge University Press,1930.

Arab Geographers' Knowledge of Southern India,Dr.S.M.Nainar, University of Madras,1942.

A Short History of Persian Literature at the Bahamani, the Adilshahi and the Qutubshahi Courts,Dr.T.N.Deware,Poona, Mrs.S.Devare Pune,1961.

Higher Persian Grammar,Phillot

Kolami-A Dravidian language,Dr.M.B.Emaneau,London,1955.

Linguistic Pecularities of Jnanesvari,Dr.M.G.Panse,First edition, Deccan College,Pune,1953.

Linguistic Survey of India (Vol VII),Dr.G.A.Grierson,Motilal Banarsi Dass,Varanasi,Reprint,1968.

Report of the committee on special multipurpose Tribal Blocks,Dr. Verrier Elvin,Ministry of Home Affairs Publication,New Delhi,1960.

The Formation of Kokani,S.M.Katre,Karnatak Publishing House, Bombay,1942.

The Literature of Persia,Prof.E.G.Browne,London,1912.

(ऊ) नियतकालिके

ढोल,अंक १,मे २०००,भाषा संशोधन प्रकाशन केन्द्र,वडोदरा.

पुणे विद्यापीठ पत्रिका,क्र.३,पुणे विद्यापीठ,पुणे

महाराष्ट्र साहित्य पत्रिका,म.सा.परिषद प्रकाशन,पुणे.

------------------

## डॉ. यु.म. पठाण यांची ग्रंथसंपदा

### अ) मराठी

संपादनः भाऊसाहेबांची बखर, सभासद बखर, नवरसनारायणविरचित शल्यपर्व, अज्ञानसिध्द विरचित वरदनागेश, स्वामी रामानंद यांच्या सम्पादण्या, डिंभविरचित ऋध्दिपुरमाहात्म्य, लीळाचरित्र : एकांक, दृष्टान्तपाठ, स्मृतिस्थळ, गोपाळदासकृत शुकदेवचरित्र, चोंभाविरचित, उखाहरण.

**संशोधनपर लेखन :** मराठी बखरीतील फार्सीचे स्वरुप (राज्यपुरस्कार, १९७२) नागेश संप्रदाय, मराठवाडयातील लोककथा, शोधणी, महानुभाव साहित्य संशोधन : खंड-१, संतसाहित्य चिंतन (महाराष्ट्र साहित्य परिषद पुरस्कार १९८४) मराठवाडयातील मराठी शिलालेख, संतसाहित्य : पुनर्मूल्यांकन, संतसंग, आठव : ज्ञानदेवांचा, ज्ञानदेवीचा, नंदादीप (महानुभाव विश्वभारती पुरस्कार), मध्ययुगीन संतसाहित्य : काही आयाम, नामयाची अभंगवाणी.

**ललितलेखसंग्रह :** सय, पाऊलखुणा, रेशीमबंध, अजून आठवतं.

कथासंग्रह : जितराब, हवेली.

**व्यक्तिचित्रसंग्रह :** मराठवाडी माणसं.

**निबंधसंग्रह :** निबंधांजली

**(आ) हिन्दी :** मराठी संतोंकी हिन्दी वाणी, महाराष्ट्र के महानुभाव साहित्यकारोंका हिन्दी साहित्य को योगदान, दास आनंद विरचित 'सुदामचरित्र' आधुनिक हिन्दी कहानियाँ.

(इ) **English :** (Monographs)

Mahatma Phule and Satyashodhak Samaj, Lokhitwadi : Pioneer of rationalism in Maharashtra.



.डॉ. यू. म. पठाण

संतसाहित्याचे भाष्यकार म्हणून त्रेसष्टाव्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. यू. एम. पठाण देशात व विदेशात ख्यातनाम आहेत. ललित लेखक म्हणूनही ते महाराष्ट्राला परिचित आहेत. कथा, ललित लेख नि व्यक्तिचित्रे हे वाङमयप्रकार त्यांनी गेली पाच दशके यशस्वीपणे हाताळले आहेत.

भाषाविज्ञान व सांस्कृतिक अध्ययन संशोधन या क्षेत्रातही डॉ. पठाण यांनी मौलिक कार्य केले आहे. विशेषतः त्यांचे फार्सी मराठी अनुबंधविषयक चिन्तन अत्यंत लक्षणीय व संदर्भमूल्यगर्भ आहे. त्यांना दिल्लीच्या बिर्ला फाउंडेशनने तुलनात्मक भारतीय भाषाध्ययनासाठी राष्ट्रीय गौरववृती देऊन त्यांचा सन्मान केला. त्याचे फलित म्हणजेच हा ग्रंथ होय. फार्सी-मराठीच्या भाषिक, वाङ्मयीन व सांस्कृतिक अनुबंधाचा मूलगामी स्वरूपाचा विचार या ग्रंथाच्या रुपाने मराठी भाषेत प्रथमच होत असून अभ्यासक / अध्यापक / संशोधक यांना तसेच सर्वसामान्य मराठी रसिकांना तो अत्यंत उपयुक्त व नवनवीन आयामांना स्पर्श करीत असल्याचे जाणवेल. या ग्रंथामुळे मराठीच्या भाषावैज्ञानिक /अध्ययन / संशोधनात पायाभूत स्वरुपाची भर तर पडेलच पण फार्सी-मराठीचे हे रेशीमबंध किती बहुरंगी, विविधांगी नि चिवट - जिवट आहेत, याची प्रचीती येईल. त्याचप्रमाणे डॉ. पठाण यांच्या सखोल व्यासंगाचा मूलगामी चिन्तनाचा नि प्रदीर्घ परिश्रमशीलतेचाही प्रत्यय येईल.